# "भारतीय श्रेष्ठत्व."


लेखक

कै० दत्तात्रय गोपाळ लिमये, बी. ए.

( माजी दुय्यम संपादक, केसरी )

व

रा. रा. शंकर रामचंद्र बेडेकर बी. ए.



आवृत्ति दुसरी.

सन १९२५

किंमत १॥ रु.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



'भारतीय श्रेष्ठत्व' हा ग्रंथ चित्रमयजगत्मधून प्रकरणशः प्रसिद्ध झाला होता. तो आतां कित्येक विद्वान लोकांच्या सूचनेवरून पुस्तकरूपाने लोकांपुढे मांडण्यांत आला आहे. याचा पहिला भाग केसरीचे दुय्यम संपादक कै० दत्तात्रय गोपाळ लिमये यांनी लिहिलेला आहे व सर्व ग्रंथ त्यांच्याच हातून पुरा झाला असता तर बरें झालें असतें. परंतु ईश्वरी संकेत निराळा असल्यामुळें लिमये यांच्यावर १९१५ सालीं काळाने झडप घातली. यानंतर या ग्रंथाचीं राहिलेलीं प्रकरणें पुरें करण्याचें काम योग्य गृहस्थ न लाभल्यामुळें चार वर्षें तसेच पडून राहिलें होते. परंतु १९१९ मध्ये रा. शंकर रामचंद्र बडेकर यांनीं परिश्रमपूर्वक उत्तरार्ध लिहून देण्याची जबाबदारी पत्करली व ती योग्य प्रकारें पार पाडली हें कळविण्यास आम्हांस आनंद वाटतो.

हा ग्रंथ कोणत्या धोरणाने व काय आधारावर लिहिण्यांत आला, याचें दिग्दर्शन कै० लिमये यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेंत उत्तम रीतीने केलेलेच आहे. तेव्हां त्याची पुनरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. तथापि वाचकांना एक सूचना देणें अगत्याचें दिसतें. ती ही कीं, या ग्रंथांत भारतीय वाङ्मय, गणित, ज्योतिष तत्त्वज्ञान, संगीतशास्त्र वगैरे सर्वच विषयाची माहिती दिलेली आहे, ती वाचकाना बहुश्रुतपणा आणण्यास चांगली उपयोगी पडेल. तथापि सर्वच प्रकरणे प्रत्येक वाचकास एकसारखी मनोरंजक व सुबोध वाटणार नाहींत. याचें कारण, कोणास गणिताची गोडी असते तर कोणास संगीतशास्त्र अवगत असतें; आणि आपल्या आवडीच्या विषयासंबंधीचें विवेचन कोणासहि झालें तरी जसें बारकाईने लक्षांत येतें, तसें इतर विषयासंबंधी म्हणतां येत नाहीं. याकरितां आवडत्या विषयावरील प्रकरणें प्रथम वाचून ग्रंथपद्धति लक्षांत घेतली म्हणजे इतर भाग समजण्यास तादृश अडचण पडणार नाहीं. प्रत्येक भागांतील विवेचन अगदीं स्वतंत्रपणें करण्यात आलें असल्यामुळें मधलाच एखादा भाग वाचण्यास हरकत नाहीं. सारांश, आपल्या परिचयाच्या प्रकरणापासून सुरवात करून सर्व ग्रंथाचें लक्षपूर्वक अध्ययन करणाऱ्यास आमच्या संस्कृतीचें यथार्थ स्वरूप लक्षांत येऊन आज पश्चात्य संस्कृतीपासून आम्हास कोणता भाग उचलावयाचा आहे, याचा निर्णय करण्यास चांगली मदत व्हावी अशी ग्रंथाची मांडणी आहे ती लक्षांत घेऊन वाचक या ग्रंथाचें योग्य चीज करतील अशी आम्हांस आशा आहे.

**व्यवस्थापक—चित्रशाळा, पुणें.**

# प्रस्तावना.



कुस्तीमध्यें एका मल्लानें दुसऱ्या मल्लास चीत केलें, तर याचे अंगीं पहिल्यापेक्षां शरीरसामर्थ्य, चपळपणा किंवा पेचांचें ज्ञान कमी आहे, इतकेंच फार झालें तर जग म्हणतें. याच न्यायानें, रणभूमीचे आखाड्यांत दोन राष्ट्रांची कुस्ती होऊन तींत एकाचा पराजय झाला, तर त्याजवळ पहिल्याइतकें लष्करी सामर्थ्य, हत्यारांचा सरंजाम, डावपेचांचें ज्ञान, पैशाचा पुरवठा अगर शौर्य नाहीं, इतकेंच फार झालें तर जग न्यायानें म्हणूं शकेल. पण जग इतकेंच म्हणून रहात नाहीं. तें याच्याही पलीकडे जाऊन जित राष्ट्रास सर्व बाबतींत सर्व बाजूंनीं नादान ठरवूं पाहतें ! जगाच्या या मनोवृत्तीस जेत्या राष्ट्राकडून स्वाभाविकपणेंच उत्तेजन मिळत असतें; किंबहुना जित राष्ट्राचा तेजोभंग करण्याच्या या कार्यांत विजयी राष्ट्रच अहंकारानें प्रेरित होऊन पुढारीपण घेत असतें. जेत्या राष्ट्रानें किंवा जगानें जित राष्ट्रासंबंधानें आपली अशी समजूत करून घ्यावी, हा दुष्टपणा किंवा अधमपणा यापेक्षां अहंकारी मानवी स्वभाव व तज्जन्य गैरसमज यांचाच खेळ आहे, हें सांगावयास नकोच.

हिंदुलोक, हिंदुराष्ट्र व हिंदुस्थान यांचा रणभूमीवर व मुत्सद्दीपणाच्या डावपेंचांत अखेरीस पुरता मोड व पराजय होऊन त्यांस राजकीय पारतंत्र्य आल्यादिवसापासून हिंदु लोकांचीही स्थिति बहुतांशीं वरील प्रकारचीच झाली होती. हिंदूंचा जातिभेद, हिंदूंची मूर्तिपूजा, हिंदूंचें तत्त्वज्ञान, हिंदूंचें वाङ्मय, हिंदूंचें शिल्प, हिंदूंची स्त्रियाविषयींची कल्पना, सारांश हिंदूंचें जें जें काय असेल तें तें त्याज्य, नादान, टाकाऊ व गचाळच आहे किंवा असलें पाहिजे, असें जगांतील सामान्य लोक गृहीतच घेऊन चालूं लागले ! यांतच युरोपीयन मिशनरी व प्रवासी याच्या पुस्तकांनीं व व्याख्यानांनीं भर घातली. विशेष दुःखाची व शोचनीय गोष्ट ही कीं, आमच्यांतीलही कांहीं पुढाऱ्यात हीच कल्पना अतिशय जोरानें रुजून तेही हिंदुधर्म व हिंदुसमाज यांजवर निष्ठुरपणें प्रहार करीत सुटले ! याचा एकंदरींत हिंदुसमाजावर अत्यंत अनिष्ट परिणाम होऊन समाजबंधनें शिथिल झालीं, व त्यामुळें त्याचें समष्टिरूपाचें सामर्थ्य ऱ्हास पावूं लागलें. आम्हीच काय ते सर्व जगांत सर्वतोपरि श्रेष्ठ आहों व पुढेंही श्रेष्ठच राहणार, ही कल्पना जितकी अभ्युन्नतीस अपायकारक आहे; तितकीच, आम्ही सर्व प्रकारें

नादानच आहों व नादानच राहणार, ही मनोवृत्तिही उन्नतीस घातक असते, हें त्या कालीं कोणाचेंही फारसें ध्यानांत आलें नाहीं. ' हिंदूंचें सर्व कांहीं नादान व टाकाऊ आहे; त्याचा त्यांनीं जोंपर्यंत सर्वस्वीं त्याग केला नाहीं, तोंपर्यंत त्यांचा हा ऱ्हास एकसारखा होऊन हिंदुराष्ट्र अखेर नष्ट होणार. त्यास हा मृत्यु टाळावयाचा असेल तर त्यानें आपलें गचाळ हिंदुत्व टाकून पाश्चात्य राष्ट्रांचा कित्ता सर्व बाबतींत गिरविला पाहिजे, तरच त्याची धडगत आहे. ' ही कल्पना सिद्धांत म्हणून सर्वत्र वावरूं लागली !

पण ही आत्मविश्वासशून्य व म्हणूनच आत्मघातक कल्पना वास्तविक खरी आहे काय ? हिंदुराष्ट्र हें जगांतील सर्वांत जुनें व प्राचीन राष्ट्र आहे; व तें अद्या-पही आपलें हिंदुत्व राखून जगलें आहे. हिंदुराष्ट्र इतकें नादान व गचाळ असेल तर तें आजपर्यंत जगविण्यांत परमेश्वराचा हेतु तरी काय ? बाबिलोनिया, असीरिया, इजिप्त, ग्रीस, रोम, इराण येथील जुनीं राष्ट्रें नामशेष कां झालीं व हिंदुराष्ट्र तेवढेंच कां टिकलें ? वरील राष्ट्रांचे वंशज आज पृथ्वीवर हयात आहेत, नाहीं असें नाहीं. पण धर्म, भाषा, वाङ्मय, परंपरा, संस्कृति या बाब-तींत जुनें असें त्यांच्या राष्ट्रीय जीवनांत फारसें उरलेलें नाहीं. पण हिंदूंचा प्रकार तसा नाहीं. त्यांनीं आपली भाषा, समाजरचना, धर्म, तत्त्वज्ञान यांची परंपरा आपल्या राष्ट्रीय संसारात अद्याप कायम राखली आहे. पृथ्वीवरील इतर कोणत्याही राष्ट्रांत दिसून आला नाहीं इतका चिवटपणा जर हिंदु राष्ट्रांत प्रत्यक्ष दिसून येत आहे, तर हिंदुसमाजाचा पायाच कालासही दाद न देणाऱ्या अशा कांहीं विलक्षण भक्कम व टिकाऊ मालमसाल्याचा बनविला असला पाहिजे, असें मानण्यावांचून गत्यंतरच नाहीं. दुसरें असें कीं, हिंदुराष्ट्रास सर्वस्वीं नादान व गचाळ मानण्याची ही प्रवृत्ति एकोणिसाव्या शतकांतलीच आहे. त्यापूर्वी किंवा प्राचीनकाळीं हिंदुस्थानाबद्दल जगाचें असें हलकें मत मुळींच नव्हतें. उलट हिंदुस्थानांत संपत्तीचा धूर निघत असून तेथील सर्व कांहीं सोनें, हिरे व माणकें यांनीं मढविलेलें आहे व तेथें सर्वत्र दिव्य सुगंध भरून राहिलेला आहे, अशा दूरस्थांच्या या देशासंबंधानें कल्पना होत्या ! तसेंच एकोणिसाव्या शतकाचे अखेरच्या पादापासून हिंदूंच्या प्राचीन विद्या-कलांचा जसजसा जास्त अभ्यास युरोपीयन पंडित करूं लागले तसतसे वरील भ्रामक कल्पनांचें जाळेंही हळूहळू उडून जाऊं लागलें; आणि हिंदु राष्ट्राचे श्रेष्ठ गुण व श्रेष्ठ संस्कृति यांजबद्दल जगांत योग्य आदरबुद्धि उत्पन्न होऊं लागली. अर्थात् हिंदूंवर नादानपणाचा व

गबाळपणाचा शिक्का मारणारें मध्यंतरीचें अगावें मत केवळ विशिष्ट काळच्या व विशिष्ट स्थळाच्या हिंदु समाजाचें वरवर निरीक्षण करून बनलेलें होतें, असेंच मानलें पाहिजे. हिंदु लोकांची स्वतःबद्दलची पहिली तिरस्कारबुद्धिही हळूहळू नष्ट व्हावयास लागली असून, त्यांच्यांत स्वाभिमान व आत्मविश्वास यांची ज्योत पेटूं लागली आहे. ही ज्योत अद्यापही ज्या अंतःकरणांत पेटली नसेल त्यांत ती उत्पन्न व्हावी व जेथें ती उत्पन्न झाली असेल तेथें ती जास्त प्रज्वलित व सतेज व्हावी या हेतूनें, हिंदु राष्ट्रानें जगाच्या इतिहासांत आजपर्यंत कोणतीं महत्कार्यें केलीं व जगांतील प्रमुख राष्ट्रांत त्यानें कोणतें स्थान संपादेलें, याचें या पुस्तकांत पंडित हरविलास यांचा 'मागोवा' घेत विहंगमदृष्टया अवलोकन करण्याचें योजिलें आहे. या अवलोकनास मुख्य आधार सर विल्यम जोन्स, प्रो. विल्सन, कोलब्रुक, मॅक्सम्यूलर कर्नल टॉड, पोकॉक, वगैरे युरोपीयन पंडित व ग्रंथकार यांचाच घेतला आहे, हें सांगणें अवश्य आहे. 'युरोपीयनांचा शब्द म्हणजे वेदवाक्य' अशा बुद्धीनें हे आधार घेतलेले नसून, अगदीं तिऱ्हाइत व प्रतिष्ठित साक्षीदाराच्या साक्षीस ज्या दृष्टीनें न्यायकोर्टांत विशेष महत्त्व दिलें जातें, त्या दृष्टीनेच हे आधार घेतले आहेत. वास्तविक युरोपीयन पंडित व ग्रंथकार यांचे मनात हिंदुस्थानाविषयीं विशेष आदरबुद्धि नसणें व त्यांनीं त्यास नावें ठेवणें हेंच स्वाभाविक आहे. पण असें असताही जर त्यानीं हिंदुस्थानचा आदर, गौरव व स्तुति केली असेल तर ती पूर्ण विचारांतीं पूर्ण खात्री झाल्यामुळेंच, कदाचित् नाइलाजानें, केली असली पाहिजे, असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. निव्वळ भाटाच्या स्तुतीपेक्षां आरंभीं निंदक असून पुढें गुणग्राहक व नंतर स्तुतिपाठक बनलेल्यांनीं केलेल्या स्तुतीचा योग्यता अर्थातच अधिक आहे; व याच दृष्टीनें युरोपियन पंडित व ग्रंथकार यांचाच आधार या विहंगमावलोकनास घेतला आहे. सदरहू पंडित हरविलास सारदा बी. ए. यांच्या 'हिंदु सुपिरिऑरिटी' नामक ग्रंथाचा हें पुस्तक तयार करण्यास फार उपयोग झाला; किंबहुना त्या ग्रंथाचेंच हे पुस्तक मराठी रूपांतर आहे, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं.

दत्तात्रय गोपाळ लिमये.



# भारतीय श्रेष्ठत्व.



## उपोद्घात.

हिंदुस्थानदेशाकडे अगदी स्थूल दृष्टीने पाहणारासही, या देशावर सृष्टिदेवतेची पूर्ण कृपा आहे, असें तात्काळ दिसून येते. ' हिंदुस्थान हा सगळ्या पृथ्वीचाच एक लहानसा नमुना आहे. ( India is an epitome of the whole world ) असें जें एका मार्मिक लेखकानें ( Chamber's Eccyclopedia p.337 ) म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. जगांतील निरनिराळ्या देशांत सृष्टीचीं जीं भिन्नभिन्न विशिष्ट स्वरूपें दिसून येतात तीं सर्व हिंदुस्थानांत एकत्र नांदतांना दिसतात. प्रेक्षकाचें मन आपल्या जादूनें भारून टाकणारें सृष्टिसौंदर्य, अत्यंत सुपीक जमीन, अति घनदाट अरण्यें, अत्युच्च पर्वत, प्रचंड नद्या आणि अतिशय कडक थंडी, याचे बरोबरच या देशांत वृक्षशून्य व खडकाळ मैदानें, जलशून्य वालुकामय प्रदेश आणि अति कडक उष्णता हींही पाहावयास व अनुभवावयास सांपडतात ! मरेनामक इतिहासकार ( हिंदुस्थानचा इतिहास पृ० १ ) म्हणतो कीं, ' हिंदुस्थानांतील सृष्टिशोभेची भव्यता, विशालत्व व विविधता आणि तेथील भूमींत उत्पन्न होणारी अनेक प्रकारची बहुमोल व मुबलक धान्यसंपत्ति या बाबतींत जगांतील कोणताही देश हिंदुस्थानाची बरोबरी करूं शकणार नाहीं. ' ( The varied grandeur of its scenery and the rich production of its soils are scarcely equalled in any other country ) कौंट जॉर्नस्टजर्ना ( Theogony of the Hindus, p. 126. ) लिहितोः—" या हिंदुस्थान देशांतील सृष्टिदेवतेनें चित्रविचित्र व अनेक रंगाचें बहुमोल वस्त्रच पांघरलें आहेसें वाटतें. या देशात उन्हाळ्यांत एकदम वर येणारी मुबलक वनस्पतीसंपत्ति व पावसाळ्यांत होणारीं भयंकर वादळें, त्याच्या हिमाच्छादित हिमालयाची भव्यता व वालुकामैदानाचा रखरखितपणा, उत्तर हिंदुस्थानांतील अतिविस्तीर्ण मैदानें व गगनचुंबित पर्वतांवरील सृष्टिशोभा, हीं पाहणाराचे मनावर तेथील सृष्टीची विलक्षणता, भव्यता व चमत्कृति याचा कायमचा परिणाम झाल्यावाचून राहत

नाहीं. " नगाधिराज हिमालयाच्या भव्य शोभेचें तर वर्णन कोणत्या शब्दांनी करूं असेंच प्रवाशास होऊन जातें ! एल्फिन्स्टन इतिहासकार ( हिंदुस्थानचा इतिहास पृ. ८१ ) लिहितो कीं, ' प्रवासी कितीही साधाभोळा, गंभीर किंवा काटेतोल लिहिणारा असो, हिमालयाच्या सृष्टिशोभेत इतकें अपूर्व सामर्थ्य भरलेलें आहे कीं, ती एकदां त्याचे दृष्टीस पडली की त्याचे मन व त्याची लेखणी उत्साहाने भराऱ्याच मारावयास लागते; त्या सृष्टिशोभेची स्मृति त्याचे मनांतून आमरणांत नष्ट होत नाहीं व तसली शोभा त्यास जगांत अन्यत्र पाहावयासही सापडत नाहीं. ' ( The scenery of the Himalayas is a sight which the soberest traveller has never described without kindling into enthusiasm, and which, if once seen, leaves an impression that can never be equalled or effaced. )

हिंदुस्थानावर सृष्टिदेवतेचा जसा कृपाप्रसाद आहे तसा बुद्धिदेवतेचाही त्याजवर अखंड वरदहस्त आहे ! जसें विविध सृष्टिरचनेचें तसेंच मनुष्यसमाजाचें निरीक्षण व अध्ययन करण्यास हिंदुस्थान देश व हिंदुसमाज हा एक सनातन ग्रंथच आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कौंट जॉर्नस्टजर्ना या ग्रंथकाराने लिहिल्याप्रमाणें, ' नखशिखांत लोखंडी चिलखत घातलेला राजपुतान्यांतील अश्वारूढ योद्धा व काशीच्या देवालयांतील ईश्वरधर्मनिष्ठ ब्राम्हण पहा; आपल्या लढाऊ तट्टावरून किंवा चपळ घोड्यावरून त्वरेने हालचाली करणारा कडवा मराठा व हत्तीवर बसून मंदगतीने चालणारा नबाब याजकडे दृष्टि फेका; अगर जंगलांत वाघाची शिकार करणारी वीरस्त्री व आपली कामवासना देवासच अर्पण करणारी मुरळी याजकडे नजर फेका; तुम्हांस हिंदुस्थानांत विलक्षणता, भव्यपणा व चमत्कार हीं आढळल्यावांचून रहाणार नाहींत ' ( Theogony of the Hindus, P. 126 ). कर्नल टॉड राजस्थानचे इतिहासांत ( पृ० ६०८, ६०९ ) लिहितो:-" ग्रीक तत्त्वज्ञानाच्या तोडीचीं किंबहुना प्लेटो, थेल्स, पायथागोरस वगैरे तत्त्ववेत्त्यांस गुरुस्थानीं असलेलीं तत्त्वज्ञानदर्शनें निर्माण करणारे ऋषि हिंदुस्थानाखेरीज अन्यत्र कोठें सापडणार ? ज्यांचें ज्योतिषज्ञान पाहून साप्रतही युरोपियन पंडितांस आश्चर्य वाटतें असे ज्योतिषशास्त्रज्ञ, युरोपियन तज्ज्ञांच्या अद्यापही आदरास पात्र होणारीं प्रचंड व सुंदर लेणीं कोरणारे शिल्पशास्त्रज्ञ व मूर्तिकार, आणि राग व स्वर बदलून श्रोत्यांचे

अंतःकरण आनंदांतून दुःखात व दुःखांतून हर्षस्मितांत सहज लीलेनें नेणारे गायक हिंदुस्थानावाचून दुसऱ्या देशात कोठचे सापडणार ? " कलकत्ता रिव्ह्यू-नामक मासिकात ( दिसेंबर १८६१ ) एक लेखक लिहितो:-" हिंदुराष्ट्र सांप्रत जरी हीन दीन झालेलें असलें, तरी प्राचीन काळीं ह्या राष्ट्रात श्रेष्ठ कलाकौशल्य व युद्धविद्या, सुखकारक राज्यपद्धति, शहाणपणाचे कायदे व उच्च प्रकारचें ज्ञान हीं सर्व नांदत होतीं, यांत शंका नाहीं. " एडिंबरो रिव्ह्यूमध्येंही ( आक्टोबर १८७२ ) एक लेखक म्हणतो:—" जगाच्या उपलब्ध इतिहासांत जीं प्राचीन राष्ट्रे केवळ नाममात्रेकरून सांप्रत हयात आहेत, त्यांच्यामध्ये संस्कृतीचा अरुणोदय होण्यापूर्वीच या प्राचीन हिंदुराष्ट्राचा संस्कृतिसूर्य मध्यान्हीं येऊन ठेपला होता ! ज्याच्या प्राचीन संस्कृतीचे महत्त्वाचे अवशेष सांप्रत विद्यमान आहेत अशा जुन्या राष्ट्रांत हिंदुराष्ट्र हें सर्वांत जुने आहे. असें असूनही सुसंस्कृति व सुधारणा या बाबतींत आजतागायत कोणत्याही राष्ट्राला हिंदुराष्ट्रास मागें टाकता आलेले नाहीं ! " ' सगळ्या जगात मनुष्यप्राणी श्रेष्ठ असून मनुष्यातही त्याचें मन अत्यंत श्रेष्ठ होय ' असें सर विल्यम हॅमिल्टन-नामक तत्त्ववेत्त्याचें एक सूत्र आहे. त्या सूत्राचे दृष्टीनें विचार केला तर 'हिंदुराष्ट्राच्या मनाची व बुद्धीची भरारी जितकी उंच व दूर पोचलेली आहे, तितकी पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याही राष्ट्राची पोचलेली नाहीं ' असें जे मिसेस मॅनिंग ( Ancient & Mediaeval India vol II, P. 148 ) या ग्रंथकर्तीनें म्हटलें आहे त्याची सत्यता तेव्हांच पटते. दुसरा एक ग्रंथकार लिहितो:—" काव्य व गायन हीं प्राचीन हिंदुराष्ट्राच्या हाडींमासीं खिळलेलीं असून ते व्यापारधंद्यातही तरबेज होते. शास्त्रशोधात व शास्त्ररचनेतही त्यांचा अचाट उद्योग व सूक्ष्म आणि तीव्र दृष्टि पदोपदीं दिसून येते. हिंदुस्थानात कलाकौशल्यानें तर आपली अखेरची सीमाच गांठली आहे कीं काय असा भास होतो. त्यांची संस्कृत भाषा ही जगांतील भाषात सर्वोत्कृष्ट व अत्यंत मनोहर आहे. सत्यनिष्ठा, औदार्य व इमान या बाबतींतलि हिंदूंच्या राष्ट्रीय शीलाची कोणासही बरोबरी करता येणार नाहीं. त्यांच्याच वसाहतींनीं एका काळीं सर्व जग व्यापलेले होते. त्यांच्या राजासच इतर राष्ट्रें अजूनही सागरदेवता म्हणून पूजित आहेत; किंबहुना सुधारलेल्या जगाच्या प्रत्येक कोनाकोपऱ्यात व प्रत्येक मनुष्याच्या भोंवतीं चाललेल्या सर्व व्यवहारांत प्राचीन हिंदूंचीच सुधारणा भरून राहिलेली आहे. " प्रो. हीरेन (Historical researches, Vol II,

P. 45 ) म्हणतातः— "केवळ आशिया खंडाचेच नव्हे तर युरोपखंडातील लोकांचेही सर्व ज्ञानाचा व धर्मांचा उगम हिंदुस्थानांतच आहे."

हिंदुस्थान व हिंदुराष्ट्र यांच्या गुणांचा गौरव करतांना मॅक्स मुल्लरसाहेबाच्या वाणीस तर वक्तृत्वाचें अतोनांत भरतेंच आलेले आहे! 'हिंदुस्थान, व तें आम्हास काय शिकवील?' या आपल्या ग्रंथांत ( India, what can it teach us P. 15 ) ते लिहितातः—"सृष्टि देवतेने आपली समृद्धि, सामर्थ्य व सौंदर्य हीं सर्व पूर्णपणें ओतून कोणत्या देशास मृत्युलोकचें नंदनवन बनविलें आहे, हें पहाण्यास मी जर सर्व जग धुंडाळूं लागलों तर मला अखेर हिंदुस्थानाकडेच बोट दाखवावें लागेल! मानवी अंतःकरणाच्या व बुद्धीच्या श्रेष्ठ वृत्ति व शक्ति कोणत्या देशांत पूर्णावस्थेस पोंचल्या आहेत? सृष्टींतील व संसारांतील अत्यंत महत्त्वाच्या गूढ प्रमेयाचा सूक्ष्म व खोल विचार कोठे झाला आहे? व प्लेटो, कँटप्रभृति तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांचे परिशीलन केलेल्या पंडिताच्याही अध्ययनास सर्वस्वीं पात्र होईल असा वरील गूढ प्रमेयाचा उलगडा कोठें झाला आहे? असे प्रश्न मला कोणी विचारले तर मी त्यांस 'हिंदुस्थान–हिंदुस्थान–हिंदुस्थान' असें एकच उत्तर देईन! ग्रीक, रोमन व यहुदी या तीनच राष्ट्रांचे विचार, वाङ्मय व संस्कृति याजवर युरोपियन राष्ट्राचें आजपर्यंत पोषण झालेलें असल्यामुळें त्याचें आध्यात्मिक जीवन अपुरें, आकुंचित व खुरटें झालेले आहे. हें जीवन खरोखर परिपूर्ण, विशाळ, सर्व मनुष्यता आकलन करणारें व विश्वव्यापक करावयाचें असल्यास, किंबहुना त्यांत नवीन व सनातन असें चैतन्य ओतून त्यास अजरामर करावयाचें असल्यास आपण कोणत्या देशाच्या वाङ्मयाकडे धाव घ्यावी, असा मी मनाशीं विचार करूं लागलों तर भाग्यशालीभरतखंडच माझ्या डोळ्यापुढें उभें राहतें' भाषा, धर्म, पुराण-कथा, कायदे, चालीरीती, प्राचीन कला, प्राचीन शास्त्रें वगैरे जे मानवी मनोबुद्धीचे निरनिराळे विकास व विलास आहेत त्यांपैकीं कोणत्याही एकाच्या विशेष अध्ययनास आरंभ केल्यावर, तुम्हास आवडो वा न आवडो तुम्हास हिंदुस्थानाकडेच जाणें भाग पडेल! कारण मानवी इतिहासाच्या सामुग्रीपैकीं अत्यंत महत्त्वाच्या व अत्यंत बोधकारक सामुग्रीचें भांडार हिंदुस्थानांत–केवळ एकट्या हिंदुस्थानांतच–साठविलेलें आहे"*

---

* If I were to look over the whole world to find out the country most richly endowed with all the wealth, power and beauty that nature can bestow-in some parts a very paradise

साराश,राष्ट्रीय प्रपंचाचें कोणतेही अंग घ्या किंवा मानवी मनोबुद्धि विकासाच्या कोणत्याहि शाखेचा विचार करा, त्या प्रत्येकात प्राचीन हिंदुलोक श्रेष्ठ व अग्रगण्य होते, आणि हें वैशिष्ट्य जगातील इतर कोणत्याही राष्ट्रांचे ठायीं दिसून येत नाहीं, असेंच प्रत्ययास येईल. आजपर्यंत जगांत एखादे राष्ट्र युद्धविद्येत तर दुसरें व्यापारात श्रेष्ठ झाले असेल; कोणी तत्त्वज्ञानात तर कोणी काव्यात, कोणी शास्त्रात तर कोणी कलाकौशल्यात निष्णात झालें असेल. एखादें राष्ट्र राजकीय दृष्ट्या अति उच्च पदास पोचलें असेल, पण तें नैतिक व बौद्धिक दृष्ट्याही तितके उच्च असेलच असें नाहीं. पण वरील सर्व बाबतीत सारखेच श्रेष्ठ व सारखेच अग्रगण्य असें प्राचीन हिंदुराष्ट्राखेरीज पृथ्वीचे पाठीवर एकही राष्ट्र पूर्वीही नव्हते व सांप्रतही नाहीं ' ' प्राचीन हिंदुराष्ट्राचे असें भपकेदार रंगात चित्र रेखाटून त्यांचे दोष लपवून ठेवणे व गुण तेवढेच फुगवून वर्णन करणे हे अयोग्य आहे ' असा कोणी टीकाकार यावर आक्षेप घेईल. पण पर्वताची उंची मोजतात ती

---

on earth. I should point to India. If I were asked under what sky the human mind has most fully developed some of its choicest gifts, has most deeply pondered on the greatest problems of life, and has found solutions of some of them which well deserve the attention even of those who have studied Plato and Kant, I should point to India. And if I were to ask myself from what literature we here in Europe—we who have been nurtured almost exclusively on the thoughts of the Greeks and the Romans, and of one Semitic race the Jewish—may draw that corrective which is most wanted in order to make our inner life more perfect, more comprehensive, more universal, in fact more truly human—a life not for this life only, but a transfigured and eternal life, again I should point to India......
Whatever sphere of human mind you may select for your special study, whether it be language, or religion or mythology, or philosophy, whether it be laws or customs, primitive art or primitive science, everywhere you have to go to India, whether you like it or not; because, some of the most valuable and most instructive materials in the history of man are treasured up in India and in India only."

त्यांच्या लहानमहान टेंकड्यांचें किंवा डोंगरांचें माप घेऊन कोणी मोजीत नाहीत; तर त्यांची जीं अत्युच्च शिखरें असतात त्यांचे मोजमाप घेऊनच तीं मोजीत असतात, हें या टीकाकारांनीं लक्षात ठेवावे. हिमालय पर्वतास 'नगाधिराज' ही जी यथार्थ पदवी मिळाली आहे, ती मसुरी, दार्जिलिंग किंवा सिमला याजजवळच्या उंच डोंगरावरून नव्हे; तर गौरीशंकर धवलगिरि व कांचनगंगा या गगनचुंबित शिखरांवरून मिळालेली आहे. याच न्यायानें हिंदुंची संस्कृति व हिंदुराष्ट्रानें जगाचे इतिहासात केलेलीं महत्कार्यें यांचे मोजमाप करताना त्यांच्या अत्युच्च शिखराचेंच मोजमाप घेणें अवश्य आहे.

असीरियन, बाबिलोनियन, इजिप्शियन, फोनिशियन, ग्रीक, इराणी, रोमन वगैरे अनेक प्राचीन राष्ट्रें जगांत उदयास आलीं व वैभवाचे शिखरास चढलीं; आणि राजकीय क्रांत्या, सामाजिक उत्पात किंवा नैसर्गिक भूकंप यांचे तडाक्यात सापडून नामशेषही झालीं. पण असल्या क्रांत्यातून, उत्पातातून व भूकंपातूनही वर वर्णिलेल्या प्रकारचें भाग्यशाली हिंदुराष्ट्र आपला विशिष्ट हिंदूपणा कायम राखून अद्यापि जिवंत राहिलें आहे, याचें बीज कोणतें ? हिंदुधर्माची इमारत सनातन सत्य पायावर उभारली असून तिच्याच आश्रयानें जन्मलेली व वाढलेली जी हिंदुसंस्कृति तींत विलक्षण जिवटपणा व श्रेष्ठता आहे; आणि म्हणूनच त्या धर्मानें वाढलेलें व संस्कृतीनें पोसिलेलें हिंदुराष्ट्र अजून जिवंत राहिलें आहे, यांत संशय नाहीं. असीरिया, बाबिलोनिया, इजिप्त, इराण, ग्रीस, रोमन हीं राष्ट्रें व त्यांची संस्कृति वैभवशाली होती हें खरें. पण आकाशातील एखादी उल्का पृथ्वीवर व आकाशात क्षणमात्र देदीप्यमान प्रकाश पाडीत व लोकांचे डोळे दिपवीत तात्काळ नष्ट होते; किंवा एखादा धूमकेतु आपल्या विलक्षण वेगानें व अपूर्व आकृतीनें जगास चकित करीत उदय पावून लवकरच अनंत आकाशांत भरारी मारून अदृश्य होतो. तशा स्वरूपाचें वर सांगितलेल्या राष्ट्रांचें वैभव व संस्कृति ही होती. परंतु हिंदुराष्ट्राचें वैभव व हिंदुसंस्कृति यांच्या सूर्यास मधूनमधून मेघांनी झाकून टाकलें किंवा प्रसंगीं त्यास ग्रहण लागलें, तरी हा सूर्य सर्व जगाच्या दूरदूरच्या कोनाकोपऱ्यातही आपला प्रकाश, उष्णता व चैतन्य पसरवीत आणि मानवजातीस समाधान व सौख्यलाभ करून देत अद्यापही एकसारखा प्रकाशत आहे !

---

# प्रकरण १ लें.



## भारतीय समाजघटना.

जगातील अनेक प्राचीन व वैभवशाली संस्कृति आणि राष्ट्रे नामशेष झालीं असता हिंदुसंस्कृति, हिंदुराष्ट्र व हिंदुधर्म हींच तेवढीं 'सनातन' या विशेषणास कां पात्र झालीं, याचें सामान्य दिग्दर्शन गेल्या उपोद्घातात केलें होतें. या प्रकरणात या मुद्द्याचा थोड्या निराळ्या दृष्टीनें विचार करावयाचा आहे.

अनेक व्यक्तींच्या समुदायास 'समाज' हें नाव प्राप्त होण्यास त्याचें स्वरूप कसें असावें लागतें? आणि त्या समाजाची अभिवृद्धि व ऱ्हास' हीं कोणत्या नियमास अनुसरून होतात? या प्रश्नासंबंधानें युरोपियन समाजशास्त्र-वेत्त्यामध्यें पुष्कळ भवति न भवति होऊन अखेर असा सिद्धांत सर्वमान्य झालेला आहे कीं, समाज म्हणजे वाळवंटातील वाळूच्या अनेक कणांप्रमाणे एकमेकापासून अगदीं स्वतंत्र व असंबद्ध अशा अनेक व्यक्तींचा एकत्र राहणारा समूह नसून, समाज ही एक ( Organic body ) सजीव व सचेतन वस्तु आहे; व तिचा उत्कर्षापकर्ष सृष्टीतील इतर सजीव सचेतन वस्तूंची वाढ व ऱ्हास याविपर्याच्या नियमासच अनुसरून होत असतो. अर्थात समाज व राष्ट्र चिरस्थायी होण्यास त्याची घटना सृष्टीच्या नियमानुसार व शास्त्रशुद्ध पायावरच होणें आवश्यक आहे. हजारो जातींच्या सचेतन वस्तूंच्या उत्क्रांतीचें सूक्ष्म निरीक्षण करून हर्बर्टस्पेन्सरप्रभृति पाश्चात्त्य उत्क्रांतिवाद्यांनी असा सिद्धांत स्थापित केला आहे कीं, सजीव व सचेतन वस्तूंची जसजशी उत्क्रांति होत जाते तसतसे त्यांचे निरनिराळे शारीरिक व्यापार व कार्यें करण्यास निरनिराळे अवयव व इंद्रियें उत्पन्न होत जातात. जीवांच्या उत्क्रांतीतील अगदीं खालच्या पायरीवरचा अतिसूक्ष्म अणुजीव असून त्यास निरनिराळे अवयव किंवा इंद्रियें मुळींच नाहींत; त्याचे सर्व व्यापार त्याचें अणुमात्र वाटोळें शरीरच करीत असतें. प्रत्येक व्यापारासाठीं एकेक भिन्न व स्वतंत्र अवयव किंवा इंद्रिय उत्पन्न होणें ही उत्क्रांतीची शेवटची पायरी असून ती मनुष्य प्राण्यांत बहुतांशानें सिद्ध झालेली दिसून येते.

सृष्टीतील सजीव व सचेतन वस्तूंच्या उत्क्रांतीचा हाच नियम ज्या समाज-घटनेंत बऱ्याच अंशानें पाळलेला आढळून येईल, तो समाज चिरस्थायी किंबहुना सनातन

राहण्यास पात्र झाला, असे मानण्यास प्रत्यवाय नाहीं. या उत्क्रांति-तत्त्वाच्या दृष्टीनें विचार केल्यास जगातील सर्व समाजांत हिंदुसमाजाचीच घटना वरील सृष्टिनियमांस अनुसरून झालेली आहे, असे कोणासही दिसून येईल. समाजाच्या अस्तित्वास, पोषणास व अभिवृद्धीस जे व्यापार व जीं कार्ये आवश्यक आहेत, तीं तीं चोख रीतीनें करण्यास त्या समाजाचे भिन्नभिन्न अवयव व इंद्रियें (अर्थात् वर्ग) उत्पन्न होणें, हीच त्या समाजाच्या अभिवृद्धीची मुख्य खूण होय. पुरुषसूक्तांत राष्ट्रपुरुषाच्या चार अवयवांचे स्थानीं चातुर्वर्ण्याची केलेली स्थापना किती मार्मिक आहे हें यावरून लक्षात येतें. सामाजिक व्यापार व कार्ये यांचे हे पूर्ण विभेदीकरणाचे उत्क्रांतितत्त्व हिंदुसमाज-घटनेंत वर्णाश्रम-धर्मरूपानें परिणत झालेलें आहे; व म्हणूनच हिंदुसमाज, हिंदुराष्ट्र व हिंदुधर्म अजून सजिवंत राहिला आहे युरोपियन समाजांत अमक्या व्यक्तीनें किंवा अमुक व्यक्ति-समुदायानें समाजांतील अमुकच व्यापार किंवा कार्य केलें पाहिजे, असा तिकडे नियम नाहीं. व्यक्तीनें किंवा व्यक्तिसमुदायानें आपल्या स्वार्थास इष्ट किंवा मतास योग्य वाटेल ते कार्य उचलावें व वाटेल तेव्हा तें बदलावें; या तत्त्वाचा अंमल व्यक्तिस्वातंत्र्य व प्रतिस्पर्धा या तत्त्वाचे नावाखालीं तिकडे जारीनें चालू आहे. अर्थात् तिकडील समाज अजून वरील अणुजीवाच्या किंवा कार्हामें त्याच्या वरच्या पायरीचे आहेत; व त्याचे शरीर आता कोठें निरनिराळें अवयव व इंद्रियें फुटण्याच्या तयारीस लागलें आहे, असें म्हणणें भाग आहे. तिकडे (ट्रेड गिल्ड) व्यवसायसंघाच्या रूपानें विभेदीकरणाचें किंवा हिंदूंच्या वर्ण-व्यवस्थेचें तत्त्व हळुहळू दृग्गोचर होऊं लागलें आहे. म्हणजे युरोपांतील आजचे हे व्यवसाय-संघ कांहीं शतकांनीं आमचे वर्ण व जाती यांच्याच वळणावर जाणार, किंबहुना तसे ते गेले तरच तिकडील समाजास अभिवृद्धि व चिरस्थायित्व प्राप्त होईल, असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

आमच्या प्राचीन समाजप्रवर्तक ऋषींना सृष्टीचा हा उत्क्रांति-नियम जाणून व त्या नियमास अनुसरून हिंदुसमाजघटना केली आहे. त्यांचें आत्मनिरीक्षण व आत्मज्ञान जसें श्रेष्ठ कोटींतलें होतें, त्याप्रमाणें सृष्टीच्या निरनिराळ्या गूढागूढ व स्थूल-सूक्ष्म व्यापाराचे व कार्यांचेंही सूक्ष्म अवलोकन करून त्यावरून समाज-घटनेचे व व्यक्तीच्या सदाचाराचे सनातन सिद्धांत त्यांनीं काढले होते. या सिद्धांतांचे पायावर हिंदुसमाज-घटनेची इमारत त्यांनीं उभारल्यामुळेंच कर्तृत्वा-

बरोबर सौख्य, प्रगतीबरोबर स्थैर्य आणि अभिवृद्धीबरोबरच स्वत्व-संरक्षण ह्यांचा या समाजास लाभ झाला, आणि या सृष्टिनियम-स्थापित सिद्धांतास अनुसरल्यामुळेंच हिंदूंचे समाज-नियम व संस्था यास दृढता व स्थैर्य याचे बरोबरच एक प्रकारची उज्ज्वलताही आली. मानवी शरीरात भिन्नभिन्न अवयव व निरनिराळीं इंद्रियें एकाच अंतरात्म्याच्या प्रेरणेप्रमाणे वागून आपापले व्यापार व कार्ये इतराच्या व्यापाराच्या व कार्याच्या आड न येता, पण एकमेकास पोषकच होतील अशा रीतीने, बिनबोभाट करीत असतात, म्हणूनच तो मनुष्यप्राणी जोमदार राहून वाढत जातो. किंवा सूर्यमालेतील निरनिराळे ग्रह, उपग्रह, लघुग्रह मध्यवर्ती सूर्याच्या आकर्षणशक्तीच्या अनुरोधाने आपापल्या विवक्षित कक्षेत विवक्षित गतीने इतराच्या आड न येता फिरत राहतात, म्हणूनच सूर्यमालेचे हे चक्र सुयंत्रित चाललेले आहे. याच न्यायाने हिंदुसमाज जेव्हा आपल्या पूर्ण वैभवाच्या व सामर्थ्याच्या भरात होता तेव्हा यातील निरनिराळे वर्ण, वर्ग व जाती आपपले नियमित व्यवसाय नियमित रीतीने आणि इतर वर्णास व सर्व समाजास पोषक होतील अशा प्रकारे करीत असत.

सारांश, हिंदुसमाजाची घटना अशा रीतीने शास्त्रशुद्ध पायावर झालेली असल्यामुळे अर्वाचीन युरोपियन समाज-रचनेतील व संस्कृतीतील दोष, उणीवा व वैगुण्य त्यात आलेले नाही. हिंदुसमाजात स्पर्धा व कलह यांच्या मादक उत्तेजनाशिवाय शांतपणाने व स्थिरतेने सर्व सामाजिक व्यवहार व सामाजिक प्रगति होत आलेली आहे. युरोपियन समाजाप्रमाणें हिंदुसमाजातील एका वर्गातच संपत्ति बेसुमार साठून इतर वर्गास दैन्य व दारिद्र्य आलेले नाही; आणि श्रीमानास अधिक धनिक व गरीबास अधिक दरिद्री करणारी समाज-बंधनें व समाजनियमही त्यात नाहीत. वर्णाश्रम-पद्धतीचे मुख्य मर्म व रहस्य हें आहे की, प्रत्येक वर्ण, जाती किंवा वर्ग आणि त्यातील प्रत्येक व्यक्ति यास ज्याच्या त्याच्या मानसिक व शारीरिक योग्यतेप्रमाणे व सामर्थ्याप्रमाणे कामे करण्याची संधी व साधने तिने आयती दिलेली असून ती कार्ये करीत असता सबंध समाजाचा व राष्ट्राचा व्यवहार, हित व प्रगति हीही सहज साधतात; व ती साधतांना व्यक्तींच्या स्वाभाविक गुणांचा, शक्तीचा व कर्तृत्वाचा सुलभपणे व शांततेने विकास होत जातो. हिंदुसमाजांतील या वर्णाश्रम-विभाग-पद्धतीमुळें संपत्ति एकाच वर्गात साठविली न जातां तिची सर्व वर्गांत योग्य विभागणी होऊन देशांत अठरा विश्वे दारिद्र्य व उपासमार ही फारशी राहिली नाहीत; लोकांची

नैतिक व बौद्धिक प्रगति झाली, राष्ट्रीय व्यवहार चोख व विनबोभाट रीतीनें चालला; आणि विशेष हें कीं, शांतता व स्थैर्य कायम राहून राष्ट्राची विशेष प्रगति झाली.

हिंदूंच्या समाजघटनेचा मुख्य विशेष वर्णाश्रम-विभाग हा आहे हें वर सांगितलेंच आहे. ही समाज-घटना होऊं लागली त्या काळीं आरंभीं आर्य व अनार्य असे मनुष्यजातींचे दोन ठळक विभाग होते. अर्वाचीन काळीं सुधारलेले ( civilized ) व रानटी ( savage) असे जे दोन विभाग मानले जातात, त्याच प्रकारचा आर्य-अनार्य हा विभाग आहे. आर्यांमध्यें पुढील चार वर्ण होते:-

१ ब्राह्मण—ज्ञान-विज्ञान, विद्या व शास्त्रकला, अध्ययनाध्यापन व यजन, याजन, हीं यांचीं कर्में होतीं.

२ क्षत्रिय—धनुर्विद्येचें शास्त्र व युद्धकला यांचें संपादन आणि राज्यकारभार हीं यांचीं कामें होतीं.

३ वैश्य—शेती, गोरक्षण, व्यापार व इतर कारागिरीचे धंदे हे करीत.

४ शूद्र—मानसिक व बौद्धिक दृष्टीनें कमी दर्जाचे असलेले लोक वरील तीन वर्णांची सेवा-नोकरी-करीत.

कोणत्याही सुधारलेल्या समाजात वरील प्रकारचा कर्म-विभाग कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपानें अस्तित्वात असतोच, पण या बाबतींतील भारतीयांची श्रेष्ठता ही कीं, त्यांनीं ही कर्म-विभाग-पद्धति फार प्राचीन काळीं शास्त्रीय तत्त्वाच्या पायावर उभारून पूर्णावस्थेस नेली. ही शास्त्रीय तत्त्वें म्हटलीं म्हणजे आनुवंशत्व ( या तत्त्वाचें महत्त्व व व्यापकत्व अद्याप युरोपियन समाजशास्त्रज्ञांस पुरतें समजलेलें नाहीं ), श्रमविभाग, समाजाच्या [illegible] काटकसर व संरक्षण, त्याच्या सामर्थ्याची सुलभ वाढ आणि विशिष्ट मनोबुद्धिगुणांचा विशिष्ट प्रकारें होणारा पूर्ण विकास हीं होत. विद्वान लोक, योद्धे, वैद्य,

---

* हिंदूंच्या चतुर्वर्णी समाजाचीं हीं ' स्वभावज ' कर्में व गुण भगवद्गीतेंतील पुढील श्लोकांत स्पष्ट रीतीनें सांगितलेलीं आहेत:—

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ।
कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥

कायदेपंडित, धर्माधिकारी, व्यापारी, कामकरी हे वर्ग जसे अर्वाचीन काळी युरोप—अमेरिकेंतील सर्व सुधारलेल्या देशांत आहेत, तसे ते भरतखंडातही होते व आहेत. पण त्यांत फरक इतकाच आहे की, पाश्चात्त्य समाजातील ही कर्म-विभागणी शिथिल, अपूर्ण, अस्पष्ट आणि चंचल असून तिचें कार्य अनियमित व यदृच्छेनें होत आहे; पण भारतीय समाजांतील ही विभागणी दृढ, परिपूर्ण, स्पष्ट व स्थिर असून ती एकाद्या यंत्राप्रमाणे आपले कार्य नियमितपणे व बिनचूक करीत असे.

हिंदुसमाज-घटनेस प्रारंभ झाला त्या वेळी व त्यानंतरही बराच काळ वर्ण-व्यवस्थेस हल्लींच्या दृढ जातिव्यवस्थेचें स्वरूप प्राप्त झालेलें नव्हतें. चारी वर्णांतील लोक आपापल्या नवोदित गुणकर्माप्रमाणे खालच्या आणि वरच्या वर्णांमध्ये प्रविष्ट होत असत; म्हणजे त्या काली व्यक्तीची उत्क्रांति व अपक्रांति, उन्नति आणि अधोगति ही दोनही सारखी समवेगानें समाजात चालू होती. समाज-घटनेच्या प्राथमिक अवस्थेत असे होणे स्वाभाविक किंबहुना इष्टही होते. ब्राह्मण आईबापांचे पोटी जन्मलेला मनुष्य आपल्या गुणकर्माप्रमाणें कधीं क्षत्रिय, कधी वैश्य व कधीं शूद्रही होत असे; उलट शूद्रही ब्राह्मण किंवा क्षत्रिय होत असे. शांकरदिग्वि-जयकारांनी सांगितलेल्या—

**जन्मना जायते शूद्रः संस्कारैर्द्विज उच्यते ।**
**वेदपाठी भवेद्विप्रो ब्रह्म जानाति ब्राह्मणः ।**

या न्यायानें त्या वेळी सर्व लोक जन्मसमयीं एका दृष्टीनें शूद्र समजून व्यक्तीच्या गुणकर्मप्रवृत्तीप्रमाणे तिला वर्ण-व्यवस्थेतील ते ते स्थान मिळे.
महाभारताच्या वनपर्वांतही म्हटलें आहे:—

**सत्यं ज्ञानं क्षमा शीलमानृशंस्यं तपो घृणा ।**
**दृश्यंते यत्र नागेश स ब्राह्मण इति स्मृतः ॥**

दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर शांतिपर्वांत सांगितल्याप्रमाणें,

**न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत् ।**
**ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मभिर्वर्णतां जगत् ॥**

ब्रह्मदेवानें मनुष्यप्राणी निर्माण केले तेव्हा ते सर्व ब्राह्मणच होते; पण ते आपापल्या भिन्न गुणकर्मप्रवृत्तीप्रमाणे भिन्न भिन्न वर्णांचे झाले.

कवष ऐलूष हा दासीपुत्र व शूद्र असूनही त्याची विद्वत्ता पाहून त्यास ऋषींनीं आपणात समाविष्ट करून घेतलें; किंबहुना तो शूद्र असूनही ऋग्वेदांतील काही

मंत्रांचा तो द्रष्टा ऋषि झाला. ( ऐतरेय ब्राह्मण, द्वितीय पंचिका अ० ३-१९ व ऋग्वेद १० वें मंडल, सूक्त ३०—३४ ) सत्यकाम जाबाल यास गोत्र नसून त्याच्या मातेचें नाव ' जबाला ' असें होतें; व त्यावरूनच त्याचें ' जाबाल ' हे नाव पडलें. छांदोग्य-उपनिषद्, ४।४ ) असें असूनही हा यजुर्वेदाच्या एका शाखेचा आद्य प्रवर्तक झाला. मनुस्मृति ( अध्याय १० श्लोक ६५ ) सांगते कीं:—

' शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ।

पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायीच्या ६ व्या अध्यायात ( १—३० ) चाक्रवर्मण-नामक एक प्राचीन वैय्याकरण उल्लेखिलला असून तो ' वर्मण ' या प्रत्ययावरून क्षत्रिय होता, हें उघड सिद्ध होतें. विश्वामित्र जन्मानें क्षत्रिय व वाल्मिकी शूद्र होते, हे सुप्रसिद्धच आहे. शिकंदराची हिंदुस्थानावर स्वारी झाली त्या काळी ही स्थिति कांहीं अंशीं कायम होतीसें दिसते. ग्रीक ग्रंथकारांनी हिंदूंच्या चारच जातींचा उल्लेख केलेला आहे. कोणत्याही जातीच्या हिंदूस 'सोफिस्ट ' (ब्राह्मण) होता येत असे, असें मेगॅस्थनीस म्हणतो. सोफिस्ट, शेतकरी, धनगर, कारागीर, शिपाई, अधिकारी व मंत्री असे हिंदूंचे सात वर्ग एरियन ग्रंथकारानें नमूद केले आहेत. कर्नल टॉड राजस्थानाचे इतिहासात लिहितो की, " सूर्य-चंद्रराजवंशाच्या पहिल्या कांहीं पिढ्यांचे काळीं उपाध्यायपण हा एक धंदा होता, त्यास वंशपरंपरेचें स्वरूप प्राप्त झालेलें नव्हतें. या राजवंशाची वंशावळी पाहता असें दिसून येतें कीं, या वंशातील कांहीं शाखांनी मध्यंतरीच क्षात्रिय कर्म सोडून देऊन व नवीन गोत्रास प्रारंभ करून ब्राह्मणकर्म अंगिकारिलें होतें; व पुढे याच्याच वंशजांनी आपलें पहिलें क्षात्रकर्म पुनः अंगिकारिलें होतें. "

वर्णव्यवस्थेचा हा लवचिकपणा पुढें पुढें नष्ट होत जाऊन त्यास साप्रतच्या दृढ व परस्परास अप्रवेश्य अशा जातिभेदाचें स्वरूप प्राप्त झालें. त्या काळीं अनुवंशत्वाचें तत्त्व प्रधान मानून जन्मावरून जाति निश्चित होऊं लागली. पण त्यातही पूर्वीच्या लवचिक वर्ण-व्यवस्थेचें-गुणकर्म-विभागाचें तत्त्व कायमच होतें. ब्राह्मण-कुळात जन्मलेल्यास ब्राह्मणत्व मिळे, पण ब्राह्मणाप्रमाणें आचरण करण्याची जबाबदारीही त्याचे शिरावर येई. ही जबाबदारी न ओळखता जर तो अन्य कर्म करूं लागला, तर त्या काळचे वर्णाश्रम-पद्धतीचे अभिमानी, असलेले क्षात्रिय राजे त्याच्या कर्मास योग्य अशा जातीत त्यास घालीत, किंवा त्याची निराळीच जात बने. साराश, या काळीं खालच्या जातींतून वरच्या जातींत प्रवेश होणे

बंद होऊन वरच्या जातींतून खालच्या जातींत अधःपात होणें किंवा नवी जात बनणें हीं कार्यें मात्र चालू राहिलीं. पुढे भारतीयांचा परकीय राष्ट्रांशीं व भिन्न संस्कृतींशीं अत्यंत निकट संबंध येऊन त्यांचे राजे हिंदुस्थानावर राज्य करूं लागल्यापासून आमच्या चातुर्वर्ण्य व्यवस्थेंतील एक अंग अजीबात तुटून जाऊन समाज विकलांग झाला. चारी वर्ण व त्यांत अंतर्भूत झालेल्या जाती आपआपलीं नियमित कार्यें करीत आहेत कीं नाहींत हें पाहणें व कांहीं तसें करीत नसतील तर त्यांस समाजातील खालच्या जातींतलें स्थान घेण्यास भाग पाडणें, हें जें हिंदुसमाजघटनेंतील क्षत्रिय राजाचें मुख्य काम तें लुप्त झाल्यामुळें समाज अत्यंत विस्खलित झाला आणि जाति-भेदास सांप्रतचें चमत्कारिक स्वरूप प्राप्त झालें. हल्लीं वरिष्ठ जातींतील मनुष्यानें कितीही भ्रष्टाचरण केलें तरी हिंदुधर्मीय राज्यशास्ता नसल्यामुळें, त्याचें सक्तीनें खालच्या जातींत अधःपतन होत नाहीं ! जातिभेदास हल्लीं जें हीनस्वरूप प्राप्त झालें आहे व ज्यामुळें कनिष्ठ जातींना वरिष्ठ ब्राह्मणादि जातींचा मत्सर वाटावयास लागला आहे, त्याचें मुख्य कारण तरी जातिभेदाची वरील स्थिति हेंच आहे. ही स्थिति उत्पन्न होण्याचीं मुख्य कारणें अशीं झालीं कीं, भारतीय युद्धांतील क्षत्रिय-संहारामुळें, राष्ट्राच्या युद्धसामर्थ्यास कमकुवतपणा आला; यामुळें आर्यावर्ताचें राज्य अन्यधर्मीयांचे हातीं गेलें आणि हिंदुसमाजघटनेंतील महत्त्वाचें कार्य करणारा हिंदुधर्मीय राज्यशास्ता न उरल्यामुळें समाज-व्यवस्थेची घडी बिघडली !

भारतीययुद्ध संपल्यानंतर लागलीच कलिकालास कशी व कां सुरुवात झाली, अर्थात् हिंदुसमाजांत ऱ्हासाचें बीज कसें पेरलें गेलें, हें वरील विवेचनावरून वाचकांचे ध्यानांत येईल. भारतीय वैभवसूर्य द्वापाराचे अंतीं म्हणजे भारतीय युद्धकालीं मध्यान्हीं येऊन तळपत होता तो कलियुगाचे आरंभाबरोबरच अस्ताचलाकडे कलूं लागला; तो, ठाणेश्वराच्या लढाईंत शहाबुद्दीन घोरीनें पृथ्वीराजाचा पराभव केला त्या वेळीं, संयोगितेचा अपूर्व अनुराग व पृथ्वीराजाचें अद्वितीय तेज, यांचा रक्तवर्ण संधिप्रकाश पाडीत अस्तास गेला; आणि पानपत ऊर्फ कुरुक्षेत्राच्या त्याच अपेशी रणभूमीवर अहमदशाहा दुराणी याच्या सैन्यानें मराठ्यांच्या फौजेचा मोड केला, त्या वेळीं या सूर्यानें अधःपतनाचा परम नीच बिंदु गाठला, असेंही म्हणतां येईल !

वर सांगितल्याप्रमाणें हिंदुसमाजाची वर्णाश्रमव्यवस्थेची घडी सांप्रत जरी बिघडलेली आहे, तरीही ती अद्याप हिंदुसमाजाच्या स्वत्वसंरक्षणाचें कार्य बऱ्याच

अंशानें करीत आहे. वर्णाश्रमव्यवस्थेचीं स्वत्वसंरक्षण व प्रगति हीं किंवा कार्ये असून, विपरीत परिस्थितीमुळे उत्तरोक्त कार्य शिजकट झालें आहे, तरीही ती स्वत्वसंरक्षणाचें पूर्वोक्त कार्य अद्यापही करीत आहे. व म्हणूनच हिंदुसमाज गेल्या एक हजार वर्षांतील राजकीय व धार्मिक कलह यातून निभावून जिवंत राहिला आहे. जातिव्यवस्थेची ही युक्तता परकीय एकवर्णी समाजांतील समंजस व निःपक्षपाती निरीक्षक नजरेस आली आहे. **सर हेनरी कॉटन** लिहितात:—( The system of caste, far from being the source of all the troubles which can be traced in Hindu society, has rendered most important services in the past and still continues to sustain order and solidarity. ) " साम्प्रतच्या हिंदुसमाजात जे दोष, उणीवा, अडचणी किंवा भानगडी दिसून येतात त्या सर्वांचा उगम जातिव्यवस्थेपासून झालेला नाही; येवढेच नव्हे तर या व्यवस्थेने प्राचीन काळीं समाजघटनेचें मोठे कार्य केलेले असून साम्प्रत त्यामुळेच हिंदुसमाजाची सुव्यवस्था व दृढता कायम राहिली आहे. " युरोपियन समाजशास्त्राच्या दृष्टीनेही आमच्या जाति—व्यवस्थेत कोणते गुण आहेत, याचें वर्णन मि. **स्मिडनं लो** यांनी [A Vision of India] नावाच्या आपल्या पुस्तकात पुढीलप्रमाणें केलें आहे:—' जातिव्यवस्थेमुळेच हिंदुसमाजाचा पाया खंबीर व मजबूत राहून त्यात समाधान नांदलें, आणि या गुणामुळेच राज्यक्रांति व पंचमहाभूतांचे उत्पात यांशी अनेक शतकें एकसारखी टक्कर देत राहण्याचें हिंदुसमाजात सामर्थ्य आलें, यात तिळमात्र संदेह नाही. समाजांतील प्रत्येक माणसास त्याचें योग्य स्थान, योग्य धंदा, योग्य कर्तव्य व योग्य मित्र दाखवून देण्याचें कार्य हीच जाति-व्यवस्था करते. प्रत्येक व्यक्ति एकटी, स्वतंत्र व असहाय्य अशी न राहता तिला प्रारंभापासूनच एका वर्गाचा व जातीचा अवयव ही बनवून टाकते; आणि सामाजिक मत्सर व मनोरथ-भंगाची निराशा या दुर्धर रोगाची त्याला आभरणात बाधा देऊं देत नाही. त्याचे स्थितीस व धंद्यास योग्य असे समशीलाचे स्नेही-सोबती व बांधव त्यास मिळवून देऊन त्याचे मनांतही त्यांच्याविषयी स्नेहाची व बंधुत्वाची भावना ही दृढ करते. युरोपियन समाजात क्लब, व्यवसाय संघ [ट्रेड युनियन] परस्पर साह्यकारी संस्था [बेनिफिट सोसायटी] व धर्मखाते या संस्था जी कार्ये करतात, ती सर्व एकटी जातिव्यवस्था हिंदु समाजात करिते. हिंदुस्थानात युरोपप्रमाणें अनाथगृहे [ वर्क हौसेस् ] नाहीत, व

अजून त्याची आवश्यकताही उत्पन्न झालेली नाही. याचे तरी कारण हेच की, आपले आप्तेष्ट, स्नेही व ज्ञातिबांधव यास संकटकाली सर्व प्रकारे सहाय्य करणे हें आपले कर्तव्य आहे, अशी हिंदुसमाजात सार्वत्रिक भावना आहे. आणि कुटुंबाचे सांसारिक पाश तसेच सहवास व समव्यवसाय यांनी उत्पन्न केलेलीं बंधनें जाति-व्यवस्थेनें विशेष दृढ केल्यामुळेच वर सांगितलेली सार्वत्रिक कर्तव्यभावना उत्पन्न झाली आहे, यात शंका नाहीं. सारांश, हिंदुस्थान व जातिभेद यांचा इतका एकजीव झालेला आहे कीं, जातिभेदशून्य अशा हिंदुस्थानाची नुसती मनात कल्पना करणेंही दुर्घट आहे."

There is no doubt that it is the main cause of the fundamental stability and contentment by which Indian society has been braced for centuries against the shocks of politics and the cataclysms of Nature. It provides every man with his place, his career, his occupation, his circle of friends. It makes him, at the outset, a member of a corporate body; it protects him through life from the canker of social jealousy and unfulfilled aspirations; it ensures him companionship and a sense of community with others in like case with himself. The caste organization is to the Hindu his club, his trade union, his benefit society, his philanthropic society; there are no work-houses in India and none are as yet needed. The obligation to provide for kinsfolk and friends in distress is universally [illegible]; nor can it be questioned that this is due to the recognition of the strength of family ties and of the bonds created by associations and common pursuits which is fostered by caste principle. An India without caste, as things stand at present, is not quite easy to imagine.

# प्रकरण २ रें.



## भारतीय संस्कृतीची प्राचीनता.

हिंदुसमाजाची उभारणी अविनाशी व सनातन अशा तत्त्वाच्या पायावर सृष्टिनियमानुसार झालेली असल्यामुळे हिंदुसमाज, हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति यांच्या मध्यें विलक्षण जिवटपणा कसा आला आहे, याचें दिग्दर्शन मागील प्रकरणात केलें. हिंदुसंस्कृतीचा हा जिवटपणा जसा आश्चर्यकारक आहे तशी तिची प्राचीनताही मन थक्क करून सोडणारी आहे, हें या प्रकरणात दाखविण्याचा विचार आहे.

ग्रीक राष्ट्राच्या प्राचीनतेकडे पहा, इजिप्तमधील जगद्विख्यात मनोरे बांधणाऱ्या सोफी राजघराण्याचे प्राचीन काळाकडे नजर फेका, किंवा अर्वाचीन युरोपियन शास्त्रज्ञांनी मानलेल्या ‘ शिलायुगा ’चा* विचार करा; हिंदुसंस्कृतीच्या प्राचीनतेच्या दृष्टीनें हे काळ अगदींच अर्वाचीन भासतील. आपल्या या पृथ्वीचें आयुर्मान इतकें मोठें आहे कीं, तें हजारांनीं किंवा लक्षांनीं न मोजतां अब्जांनीच वास्तविक मोजलें पाहिजे ! आणि अशा या पुराणतम कालापर्यंत पसरलेल्या जगाच्या इतिहासात ज्या ज्या संस्कृतींचा इतिहास सांप्रत उपलब्ध आहे, त्या सर्वांत हिंदुसंस्कृति अधिक प्राचीन आहे, ही गोष्ट निःपक्षपाती इतिहास-शोधकास मान्य झालेली आहे. या जगात आजपर्यंत अनेक राष्ट्रें जन्म पावलीं व नामशेष झालीं; अनेक साम्राज्यें उभारलीं व जमीन-दोस्त झालीं आणि अनेक राष्ट्रें उदयास आलीं व नष्ट झालीं. पण या सर्वांचा जन्म व मृत्यु, स्थापना व नाश, उदय व अस्त हीं दोनही हिंदुराष्ट्रानें पाहिलीं, अर्थात् त्यांच्या बारशाचा सोहळा व बाराव्याचा विधि हीं दोनही जिनें पाहिलीं, ती हिंदुसंस्कृति सर्वांत प्राचीनतम होय हें स्पष्ट आहे.

सर्व जुन्या राष्ट्रांच्या संस्कृतीच्या प्राचीनतेची परीक्षा करून **कौंट जार्नस्टजर्ना** यांनी असा सिद्धांत नमूद केला आहे कीं,(Theogony of the Hindus पृ० ५० ) “ हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति यांच्या प्राचीनतेची बरोबरी करूं शकेल,

---

* मनुष्य प्रथमतः गारगोट्या वगैरेंचीं हत्यारें करीत असून त्यास पुढें क्रमानें तांबें, ब्राँझ, लोखंड वगैरे धातूंचा शोध लागला, असें कांहीं युरोपियन विद्वान् मानतात; त्यास अनुसरून मानवी सुधारणेचीं युगें मानण्याचा तिकडे प्रघात आहे.

असें एकही राष्ट्र या पृथ्वीचे पाठींवर नव्हतें व नाहीं. " अमेरिकेंतील येल कॉलेजचे प्रेसिडेंट डॉ. स्टाइल्स हे संस्कृत वाङ्मयाची प्राचीनता पाहून इतके थक्क झाले होते कीं, ' आडामचीं पुस्तकें ' हिंदुस्थानात सांपडण्याचा संभव आहे, असें वाटून त्याचा शोध करण्याची विनंति त्यानीं सर विल्यम जोन्स यास केली होती ! ( Ward 's Mythology पृष्ठ १४४ ) हिंदूंची चतुर्युगांची काल-गणना पाहून हालेडनामक ग्रंथकाराचें मन आश्चर्यानें व पूज्य-बुद्धीनें भरून आलें, आणि ' हिंदूंच्या या कालगणनेची प्राचीनता पाहिली म्हणजे तिच्यापुढें यहुदी धर्मग्रंथांत वर्णिलेला सृष्टिरचनेचा काळ हा परवांचा वाटावयास लागतो ' असे उद्गार त्यानें काढले ! कोणतेही राष्ट्र बाल्यावस्थेंतून व तरुणपणातून प्रौढ दशेस येईपर्यंत त्यामध्यें सृष्टिशास्त्रें निर्माण होत नाहींत; अशा शास्त्रांमध्येंही आकाशस्थ ग्रहगोलाचें [ ज्योतिष ] शास्त्र हें तर सर्वांचे मागून उदय पावतें. आणि या शास्त्रात शोध व प्रगति हांही पायरी पायरीनें व हळू हळू होत असतात. या दृष्टीनें हिंदूंच्या ज्योतिष शास्त्राची प्राचीनता पाहिली तर तीवरून त्या शास्त्राचा उदय होण्यापूर्वीं हिंदुराष्ट्र किती तरी सहस्र वर्षें अस्तित्वांत असलें पाहिजे, याची सहज कल्पना येते. हिंदुज्योतिषाच्या प्राचीनतेच सर्व बाजूंनीं विचार करून अखेर कौंट जार्नस्टजर्ना लिहितात कीं, ( Theogony of the Hindus पृ. ३७।३८ ) " बेलीनें केलेल्या गणितावरून असें दिसून येतें कीं, ख्रिस्तापूर्वीं ३००० वर्षांचे सुमारास ज्योतिष व भूमिति या शास्त्रात हिंदुराष्ट्राची पुष्कळ प्रगति होऊन चुकली होती; अर्थात् हिंदुराष्ट्राची सामान्य संस्कृति त्या कालाच्या किती तरी सहस्रके आधीं जन्मास आलेली असली पाहिजे, असें मानावयास हरकत नाहीं. दुसरें असें कीं अजंठा, वेरूळ, घारापुरी वगैरे ठिकाणचीं लेणीं आणि इजिप्तच्या मनोऱ्यांचीही प्रचंडपणात बरोबरी करणारीं पण शिल्पसौंदर्यांत त्याहूनही श्रेष्ठ असलेलीं देवळें पाहिलीं, म्हणजे हिंदुसंस्कृतीची प्राचीनता मनास तेव्हाच पटते. " बेकस्पासून शिकंदरापर्यंतचा काल ६४५१ वर्षांचा असून, त्या अवधींत हिंदुस्थानावर एकंदर १५३ राजांनी राज्य केलें. असें प्लिनी इतिहासकार सांगतो. बकस्च्या पूर्वी इकडे किती राजे झाले असतील, हें मात्र इतिहासास मुळीच माहित नाहीं. काश्मीरच्या प्राचीन इतिहासाचें वर्णन करणाऱ्या राजतरंगिणींत ज्या राजाच्या कारकीर्दीचें वर्णन आहे, त्याच्या सर्व कारकीर्दींचा काळ ४१०९ वर्षें, ११ महिने, ९ दिवस इतका होत आहे. ' स्पटेंबसपासून संद्रकोटस [ चंद्रगुप्त ] पर्यंत ६०४२ वर्षें लोटलीं. ' असें मेगॅस्थनीस म्हणतो.

[ स्पटेंबसास किंत्येक ग्रीक इतिहासकार ' डायोनिसियस ' म्हणत असून हिंदुस्थानांतील अतिप्राचीन काळच्या एका राजाच्या नांवाचा हा ग्रीक अपभ्रंश आहे. ] प्रो. मॅक्मडंकर History of Antiquity P. 218/674 ) लिहितातः—"विक्रमशकापूर्वी ३०४४ किंवा ख्रिस्ती शकापूर्वी ३१०० वर्षांचे सुमारास युधिष्ठिर-शक सुरू झाला, आणि त्याचेही पूर्वी म्हणजे ख्रिस्तीशकापूर्वी ६७१७ वर्षांचे सुमारास स्पटेंबस् ऊर्फ डायोनिसियस हा भारतवर्षांत राज्य करीत असावा." कौंट जार्नस्टजर्ना हे लिहितातः—(Theogony of the Hindus P. 4 ) "चंद्रगुप्ताची राजधानी पाटलिपुत्र येथें शिकंदराचा वकील मॅगॅस्थनीस हा आला असतां, त्यास तेथे कांहीं राजवंशावलि पाहावयास मिळाल्या. त्यामध्यें डायोनिसियसपासून चंद्रगुप्तापर्यंत झालेल्या १५३ राजांची नावें व प्रत्येकाच्या कारकीर्दीची वर्षें, हीं नक्की दिलेलीं आढळलीं. त्यावरून या १५३ राजांचा एकंदर राज्यकाळ ६४५१ वर्षे झाल्याचें त्यास कळून आलें. यावरून हिशेब करतां डायोनिसियस राजा ख्रिस्तापूर्वी सुमारें ७००० वर्षांचे सुमारास भरतखंडांत राज्य करीत होता, असें सिद्ध होतें. इजिप्तमधील सर्वात जुना गिझे-मनोरा बांधणारा सौफी राजा ख्रिस्तापूर्वी ३८६७ चे सुमारास असून इजिप्तमधील सर्वांत जुन्या राजाचा काल ख्रिस्तापूर्वी ५८६७ हा आहे. पण याच्याही पूर्वी भरतखंडांतील डायोनिसियस राजाचा हा काळ येत आहे!" सर विल्यम जोन्स लिहितात.—[त्याचे ग्रंथ Vol I. P. 304. ] " मगधदेशावर राज्य केलेल्या ८१ राजांचा निर्देश पुराणांत आहे. त्यांपैकीं पहिल्या २० राजांच्या कारकीर्दीचा काल दिलेला नाहीं. त्यापुढील ६१ राजे हे एकाच राजघराण्यांतील नसून ते पाच घराण्यांचे आहेत. यांपैकीं पहिल्या राजघराण्यांतील प्रद्योत राजापासून तो नंदराजापर्यंत एकंदर सोळा राजांनी ख्रि.पू. २१००पासून ख्रि. पू १५०० पर्यंत राज्य केलें. यानंतर दुसऱ्या राजघराण्याच्या १०राजांनी ख्रि.पू.१३६५पर्यंत राज्य केले.शुंग घराण्यांतही दहाच राजे असून त्यांची समाप्ति ख्रि.पू. १२५३ चे सुमारासी झाली; त्यानंतर आलेल्या काण्वायन घराण्यांत फक्त चारच राजे झाले व त्यांनी ख्रि.पू.९०८पर्यंत राज्य केलें.पांचवें राजघराणें आंध्रांचे असून ख्रि. पू. ४५६ किंवा विक्रमपूर्व ४०० वर्षेंपर्यंत त्यांचे राज्य टिकलें."

" प्रद्योत ऊर्फ प्रदिष्ट राजघराणें स्थापन होण्यापूर्वी [ ख्रि. पू. २१०० ] बार्हद्रथ घराणें मगधदेशावर राज्य करीत असून त्यांतील पहिला सोमपी व शेवटचा रिपुंजयनामक राजा झाला; व या घराण्यानें १००० वर्षें राज्य केलें. आणि या बार्हद्रथ घराण्याचे पूर्वी सहदेव, जरासंध व बृहद्रथ हे राजे झाले होते."

या वरील सर्व माहितीवरून असे दिसून येतें कीं, हिंदुराजांची कालगणना अर्थात् करतांना पुराणकारास प्रत्येक राजाचा काल घेण्याऐवजीं एकेक राजघराणें घेऊनच त्याची कालगणना करावी लागली आहे. हिंदुसंस्कृतीची प्राचीनता सिद्ध करण्यास येवढी एकच गोष्ट पुरेशी आहे. प्रो. हीरनच्या मते अयोध्या नगरी ख्रि. पू. १५००–२००० वर्षांचे दरम्यान वसविली असावी. कॅप्टन ट्रॉयर हे याच्याही पलीकडे जाऊन असे म्हणतात कीं, ख्रि. पू. ३००० चे सुमारास सुधारणेंत फार पुढे गेलेलीं अनेक मोठीं राज्यें हिंदुस्थानांत होतीं. व या कालाचे पूर्वी बरींच शतकें रामायणाचा नायक राम हा झाला असला पाहिजे. अयोध्या नगरीनें १५०० वर्षे वैभव उपभोगल्यानंतर शुंग घराण्याच्या एका राजानें कनोज शहर वसविलें, असें पुराणांतरीं वर्णन आहे; आणि या कनोज नगराची स्थापना ख्रि. पू. १००० चे सुमारास झाली असावी, असा रॅनलचा तर्क आहे. हस्तिनापुर व इंद्रप्रस्थ यांची स्थापना फारच प्राचीनकाळीं झाली असली पाहिजे, हे तर सर्व शोधकास मान्य झालेंच आहे. दबिस्ताननामक एक बाक्ट्रियन लेख सर विल्यम जोन्स यास काश्मिरांत सांपडला होता. व तो पुढे त्यांनी युरोपांत नेला. या लेखांत अनेक राजांची मोठी नामावली दिलेली असून तींतील पहिला राजा बाक्ट्रिया देशांत शिकंदराचे स्वारीपूर्वी ५६०० वर्षांचे सुमारास राज्य करीत होता, आणि हा राजा हिंदुच होता. यावरून ख्रि. पू. ६००० चे सुमारास, म्हणजे पृथ्वीवर मनुष्यप्राणी निर्माण झाल्याचा जो काळ मध्ययुगीन युरोपियन ग्रंथकारांनी दिला होता त्याचे आधीं अनेक शतकें, भरतखंडाची संस्कृति किती श्रेष्ठतेस पोचली होती ते कळून येतें." असें कौंट जार्नस्टजर्ना (Theogony of the Hindus P. 134) लिहितात. तसेंच जगातील प्राचीन देशांत जी नाणीं सांपडलीं आहेत, त्यांत सर्वांत जुनें नाणें हिंदुस्थानांतलेंच आहे; यावरूनही हिंदुसंस्कृतीच्या प्राचीनतेची कल्पना येईल. इजिप्त, ग्रीस, इराण, चीन, अमेरिका वगैरे देशांत फार प्राचीनकाळीं हिंदूंनींच वसाहती केल्या, आणि त्यांचेच वंशज पुढें तेथील नामांकित राष्ट्र बनलीं. तसेंच स्कांडेनेव्हिया, जर्मनी व ब्रिटन येथील लोकांच्याही संस्कृति व धर्म हीं हिंदुस्थानापासूनच त्यास मिळालीं आहेत. सारांश, सर्व जगास प्राचीनकाळीं विद्या, संस्कृति व धर्म यांचा जो लाभ झाला, तो भरतखंडरूपी गुरूपासूनच होय. ( ही गोष्ट पुढे एका प्रकरणांत विवेचावयाचीच आहे. ) यावरूनही हिंदुसंस्कृतीची प्राचीनता कोणासही सहज पटेल.

पाश्चात्य विद्वान् शोधक कालनिर्णयाचे व कालगणनेचे बाबतींत विशेष चिकित्सक व प्रत्यक्ष-प्रमाणवादी असतात; आणि हें एका दृष्टीनें योग्य व इष्टही आहे. पण हीं चिकित्सक बुद्धि अतिरिक्त झाली म्हणजे तिला संशयीपणाचे व विश्वास-शून्यतेचेच स्वरूप प्राप्त होतें. प्रो. विल्सन यांनी म्हटल्याप्रमाणें, भोळसरपणाचे पाशांत न सांपडण्याचे प्रयत्न करता करतां ते त्याच्या उलट दिशेच्या पक्क्या संशयीपणाच्या भोवऱ्यात सापडतात. या बाबतींत दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, सामान्य युरोपियन विद्वानांची ऐतिहासिक दृष्टि फार दूरवर न पोंचणारी, संकुचित व कोती असते. पाश्चात्याची ही ऐतिहासिक नजर ५।६ हजार वर्षांपलीकडे फार करून पोंचतच नाहीं. युरोपखंडातील साप्रतची संस्कृति अगदीं अर्वाचीन काळची असल्यामुळे या संस्कृतीपूर्वी युरोपात जगाच्या आरंभापासून रानटीपणा व अज्ञानच होतें, असा त्याचा दृढ समज झालेला आहे. किंबहुना या जगाची व त्यावरील मनुष्यप्राण्याची जी उत्पत्ति झाली, तिच्या कालासंबंधानेंही त्यांची दृष्टि अशीच कोती व संकुचित होती व आहे. जग उत्पन्न होऊन १०।१२ हजार वर्षे व मनुष्यप्राणी निर्माण होऊन ५।६ हजार वर्षे झालीं, ही समजूत जेथें अनेक शतकें दृढ होऊन गेलेली आहे, तेथील शोधकाचेंही मन हिंदुस्थानातील संस्कृतीची अवाढव्य प्राचीनता व त्याच्या कालगणनेची प्रचंडता पाहून गोंधळून व बावरून जावें, यात काहीं नवल नाहीं. ४।५ हजार वर्षांपूर्वी बहुतेक युरोपखंडात रानटी स्थितिच होती, असें त्यास दिसून आल्यामुळे, इतर देशात १०।१५ हजार वर्षांपूर्वीही लोक पुष्कळच सुधारलेले होते, असें त्यास सांगितलें तर त्याचा त्यावर विश्वासच बसत नाहीं. युरोपियन विद्वानांच्या ह्या मनःस्थितीचा परिणाम युरोपियन शोधकाच्याही मनावर त्यास न कळत झाल्यावाचून राहत नाहीं. हिंदुस्थानातील राजे, कवि किंवा ग्रंथ याचा कालनिर्णय ठरविताना त्यांस होता होईल तितके अर्वाचीन कालाकडे खेचण्याचा प्रयत्न युरोपियन शोधकाकडून होतो, त्याचे तरी बीज हेंच आहे. कित्येक शोधक आधीं मनांत काहीं तरी प्रमेय ठाम करून घेतात. आणि मग ते त्यास अनुकूल असे आधार शोधतात, काहीं आधार ओढाताण करून जुळवतात व जीं वचनें त्यांचे प्रमेयास विरुद्ध असतील तीं प्रक्षिप्तात ढकलून मोकळे होतात ! पण ही पूर्वग्रह-दूषित मनोवृत्ति खऱ्या शोधकतेस व्यत्यय आणणारी आहे, हे सांगावयास नकोच. आपल्या ह्या पृथ्वीचें आयुष्य हजारांनीं किंवा लक्षांनींही न मोजता अब्ज वर्षांनीं मोजलें पाहिजे; तसेच या पृथ्वीवर मनुष्यप्राणी निर्माण होऊनही लक्षांनीं मोजता येतील इतकीं वर्षे झालेलीं आहेत. या गोष्टी भूस्तर शास्त्रवेत्त्यांचे प्रयत्नानें

आता कोठे युरोपांत थोड्याबहुत मान्य व्हावयास लागल्या आहेत. अर्थात् सांप्रतकाळीं ज्या देशात केवळ रानटी लोकांचीच वस्ती आहे, असे देश जगाचे आरंभापासून त्याच स्थितींत आहेत, असे गृहीत धरून राष्ट्राच्या किंवा देशाच्या संस्कृतीची प्राचीनता ठरविण्याचे काहीच कारण नाहीं. एकादा देश अत्यंत सुधारलेला असूनही तेथील संस्कृति प्रचंड भूकंप, ज्वालामुखींचे उद्रेक जलप्रलय किंवा कात्या यानीं नामशेष होऊन, तेथें पुनः रानटी स्थिति येण्याचाही संभव आहे, ही गोष्ट विसरतां कामा नये. तसेच जगात अति प्राचीन, काळी एक देश अगदी रानटी स्थितीत असला, म्हणजे त्या काली सबंध पृथ्वीवरील सर्वच देशाची तशीच स्थिति होती, असेही गृहीत धरण्याचे कारण नाहीं. किंबहुना सांप्रत काळीं जेथे महासागर किंवा कडक थंडीने गोठलेले समुद्र आहेत, तेथे ते जगाचे आरंभापासूनच आहेत असेही नाहीं. त्या जागी मोठी खंडें, मोठी राष्ट्रे व उच्च संस्कृति ही अतिप्राचीन काळीं होती, असे आता दिसून येऊं लागले आहे. या सर्व गोष्टींचा विचार करता युरोपियन विद्वान् व शोधक यांच्या, जगातील निरनिराळ्या संस्कृतीच्या प्राचीनतेसंबंधाच्या कल्पना संकुचित आणि चुकीच्या कशा व कां आहेत हें ध्यानात येईल.

पृथ्वीच्या उत्पत्तीचा किंवा मनुष्यप्राण्याच्या निर्मितीचा काळ भारतीयानीं अशा संकुचित किंवा कोत्या दृष्टीने मुळीच ठरविलेला नाहीं. त्याची युगपद्धतीची कालगणना अर्वाचीन भूस्तर-शास्त्र-वेत्त्याच्या कालगणनेच्या बरीच जवळ जवळ येते, हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. भारतीयानी आपल्या सूक्ष्म बुद्धीनें कालाचे विभाग जसे अतिसूक्ष्म परिमाणापर्यंत पाडले आहेत तशी त्यानी अनाद्यनंत काल मोजण्याची प्रचंड परिमाणेंही आपल्या विशाल बुद्धीने ठरवून ठेवलीं आहेत, हें सहज सिद्ध करून देता येईल.

हिंदूंच्या प्रत्येक लहान-मोठ्या धार्मिक विधींच्या व धर्म-कृत्याच्या आरंभीं जो संकल्प म्हणण्यात येतो, त्यात जगदुत्पत्तीचा काल स्पष्टपणे सांगितलेला आढळून येतो.

**'अद्य श्री-ब्रह्मणो द्वितीय-प्रहरार्धे वैवस्वत-मन्वंतरे**
**अष्टाविंशतितमे कलियुगे कलिप्रथमचरणे दंडकारण्ये देशे' इ०.**

अशा प्रकारचा हा संकल्प आहे. या संकल्पाचा अर्थ काय व त्यावरून जगदुत्पत्तीच्या कालाची नक्की गणना कशी होते, ते आता पाहूं.

जगदुत्पत्तीसंबंधाने भारतीयांचा असा सिद्धांत आहे कीं, एकदा जग उत्पन्न झालें म्हणजे त्याचे तें व्यक्त स्वरूप विवक्षित काल टिकतें; व नंतर त्या व्यक्त जगाचा नाश

होऊन ते अव्यक्त स्वरूपांत म्हणजे मूळ परमाणुरूपात तितकाच काल राहून त्यानंतर जगास पुनः व्यक्त स्वरूप प्राप्त होते. जगास हे व्यक्त स्वरूप जितक्या कालपर्यंत असते, त्या कालास ' ब्रह्मदिन ' म्हणजे सृष्टि-कर्त्याचा दिवस, व अव्यक्त स्वरूप असते त्या कालास ' ब्रह्मरात्रि ' म्हणजे सृष्टि-कर्त्याची रात्र, अशी अन्वर्थक पारिभाषिक नावे दिलेली आहेत. याच ब्रह्मदिन-ब्रह्मरात्रीस ' कल्प ' असाही एक दुसरा पर्याय शब्द आहे.

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥**
**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥**

( भगवद्गीता अ० ८ श्लो० १८।१९ )

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥**

( भ० गी० अ० ९ श्लो० ७ )

या श्लोकात जगदुत्पत्तीचे हेच रहाटगाडगें किंवा चक्र कसे फिरत असते ते सांगितलेले आहे. आता ब्रह्मदेवाचा हा दिवस व ही रात्र यांचे–कल्पाचे–मानवी वर्षांशी प्रमाण काय, ते पाहिले पाहिजे. भारतीयांच्या कालगणनेत सामान्यतः ६ व ६० ही दोन परिमाणे विशेष महत्त्वाची आहेत, हे पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

६० पळे - १ घटका. ६० घटका - १ अहोरात्र.

६० अहोरात्र - १ ऋतु. ६ ऋतु - १ वर्ष.

६० वर्षे - १ संवत्सरचक्र. ६ संवत्सरचक्रे - १ दिव्यवर्ष. (देवाचे एक वर्ष)

हे देवाचे एक वर्ष व ब्रह्मदेवाची अहोरात्र यांचे परस्पर-प्रमाण मनुस्मृतीच्या ( अ० १, श्लोक ६९-७२ या ) चार श्लोकात सांगितलेले आहे.

**चत्वार्याहुः सहस्राणि वर्षाणां तु कृतं युगम् ।**
**तस्य तावच्छती संध्या संध्यांशश्च तथाविधः ॥**
**इतरेषु ससंध्येषु ससंध्यांशेषु च त्रिषु ।**
**एकापायेन वर्तन्ते सहस्राणि शतानि च ॥**
**यदेतत्परिसंख्यातमादावेव चतुर्युगम् ।**
**एतद् द्वादशसाहस्रं देवानां युगमुच्यते ॥**
**दैविकानां युगानां तु सहस्र-परिसंख्यया ।**

**ब्राह्ममेकमहर्ज्ञेयं तावती रात्रिरेव च ॥**

या श्लोकावरून पुढील हिशेब स्पष्ट दिसून येतो:—

सत्ययुग=४००० दिव्यवर्षे+४०० दिव्यवर्षे संध्या+४०० दिव्यवर्षे संध्यांश=
४८०० दिव्यवर्षे.

त्रेतायुग=३००० दि० व०+३०० दि० व० संध्या+३०० दि० व संध्यांश=
३६०० दि० वर्षे.

द्वापारयुग=२००० दि० व०+२०० दि० व० संध्या+२०० संध्यांश=
२४०० दि० वर्षे.

कलियुग=१००० दि० व०+१०० दि० व० संध्या+१०० संध्यांश=
१२०० दिव्यवर्षे

एकूण=१२००० दिव्यवर्षे.

चार युगे=१२००० दिव्यवर्षे=१ दिव्ययुग.

१००० दिव्ययुगे=१ ब्रह्मदिन

,, =१ ब्रह्मरात्रि.

३६० मानवी वर्षे=१ दिव्यवर्ष. म्हणून:—

सत्ययुग=४८०० दि० व०×३६०=१७२८००० मानवी वर्षे

त्रेतायुग=३६०० दि० व०×३६०=१२९६००० मा. वर्षे.

द्वापारयुग=२४०० दि० व०×३६०=८६४००० मा. वर्षे.

कलियुग=१२०० दि० व०×३६०=४३२००० मा. वर्षे.

एक चतुर्युगा=१ दिव्ययुग=४३, २०, ००० मा. वर्षे.

अर्थात् १ ब्रह्मदिन=४३२०००००००० मानवी वर्षे.

इतका काळ जगताचे साप्रतचे व्यक्त स्वरूप कायम राहणार आहे. आता साप्रतचा काळ हा ब्रह्मदिनापैकी कोणता काळ आहे, म्हणजे जगदुत्पत्ति होऊन किती काळ लोटला, हे पहावयाचे आहे.

**यत्प्राग् द्वादशसाहस्रमुदितं दैविकं युगम् ।**
**तदेकं सप्ततिगुणं मन्वंतरमिहोच्यते ॥**

या मनुस्मृतीतील श्लोकावरून ( अ० १. श्लोक ७९ ) असे दिसून येते की, वर जे दिव्ययुग किंवा एक चतुर्युगी सांगितली, तशा ७१ चतुर्युग्या झाल्या म्हणजे एक मन्वंतर होते; व अशी १४ मन्वंतरे एका ब्रह्मदिनात किंवा कल्पात

असतात. कालगणणेची ही सर्व परिमाणें सूर्य सिद्धातांत ( अ० १, श्लोक १८, २० ) पुढील प्रमाणें दिलीं आहेत:—

**युगानां सप्ततिः सैका मन्वंतरमिहोच्यते ।**
**कृताब्दसंख्या तस्यांते संधिः प्रोक्तो जलप्लवः ॥**
**ससंधयस्ते मनवः कल्पे ज्ञेयाश्चतुर्दश ।**
**कृतप्रमाणः कल्पादौ संधि पंचदश स्मृतः ॥**
**इत्थं युगसहस्रेण भूतसंहारकारकः ।**
**कल्पो ब्राह्ममहः प्रोक्तं शर्वरी तस्य तावती ॥**

अर्थात् ७१ दिव्ययुगे किंवा चतुर्युगी=१ मन्वंतर; आणि संधीसह १४ मन्वंतरें=१ ब्रह्मदिन किंवा कल्प. आणि दोन मन्वंतराचे संधीस जलप्लव किंवा जलप्रलय व्हावयाचा; व १४ मन्वंतराचे अखेरीस जगाचे व्यक्त स्वरूप नष्ट होऊन तें अव्यक्त—[illegible] जावयाचे, असें या श्लोकावरून स्पष्ट होतें.

आता वर दिलेल्या संकल्पांत असें सांगितलें आहे कीं, जगदुत्पत्ति होऊन आजपर्यंत ( **स्वायंभुव, स्वारोचिष,** औत्तमि, **तामस,** रैवत व **चाक्षुस** हीं ) सहा मन्वंतरें होऊन गेलीं असून, सांप्रत सातवें वैवस्वत मन्वंतर चालू आहे.

यापुढें चालू मन्वंतराचीं शेष वर्षे व ( सावर्णि, दक्ष-सावर्णि, ब्रह्म-सावर्णि, धर्म-सावर्णि, रुद्र-सावर्णि, रौच्य-सावर्णि किंवा देव-सावर्णि, व भौत्य-सावर्णि किंवा इंद्र-सावर्णि हीं ) सात मन्वंतरें जावयाचीं असून त्याचे अखेरीस कल्पांत होणार आहे. चालू असलेल्या वैवस्वत मन्वंतराच्या ७१ चतुर्युगीपैकीं २८ व्या चतुर्युगींतलें कलियुग सांप्रत चालू आहे. याचा हिशोब प्रत्यक्ष मांडला असता तो असा होईल:—

एक चतुर्युगी=४३,२०,००० मानवी वर्षे.

एक मन्वंतर=७१ चतुर्युगी=४३,२०,०००×७१=३०,६७,२०,००० वर्षे; अर्थात् सहा मन्वंतरें=३०,६७,२०,०००×६=१,८४,०३,२०,००० वर्षे.

सातव्या मन्वंतरापैकीं होऊन गेलेल्या २७ चतुर्युगी=४३,२०,०००×२७=११,६६,४०,०००. वर्षे.

अठ्ठाविसाव्या चतुर्युगीपैकीं तीन युगें संपून कलियुगाचीही ५०१४ वर्षे होऊन गेलीं; म्हणून कलियुगाचीं ४२६९८६ वर्षे अद्याप शिल्लक आहेत.

अर्थात् २८ वी चतुर्युगी ... ... =४३,२०,००० वर्षे.
राहिलेलीं काल-वर्षे ... ... ... =४,२६,९८६.

बाकी ——————
अठ्ठाविसाव्या चतुर्युगीची गेलेली वर्षे=३८,९३,०१४.

तेव्हा जगदुत्पत्तीपासून आजपर्यंत एकंदर
सहा मन्वंतरें ... ... ... =१,८४,०३,२०,००० वर्षे.
सातव्या मन्वंतरातील २७ चतुर्युगी=११,६६,४०,००० ,,
२८ व्या चतुर्युगीची गेलेली वर्षे +३८,९३,०१४ ,,

एकूण १,९६,०८,५३,०१४ वर्षे झाली.

व राहिलेली शेवटची सात मन्वंतरे ३०, ६७, २०, ०००×७=२१४७०४०-
००० वर्षे. सातव्या मन्वंतरापैकी राहिलेल्या ४३ चतुर्युगी
४३२००००×४३ ... .. =१८५७६००००
चालू २८ व्या चतुर्युगीची शिलकी वर्षे ... ...= ४, २६, ९८६

विद्यमान जगाचा अंत-कल्पान-होण्यास एकूण ... ... २,३३,३२,२६,९८६ वर्षे लोटली पाहिजेत असे होतें ! !

ज्याच्या ऐतिहासिक दृष्टीचा किंवा कल्पनेचा मोठा पल्ला म्हटला तरी ६।७ हजार वर्षांचे पलीकडे जाऊं शकत नाहीं, त्याची बुद्धि भारतीयांची ही विशाल-काल-गणना पाहून गोंधळून जाऊन त्यांनीं तीवर अशक्यतेचा किंवा काल्पनिक-तेचा शिक्का मारावा, हे साहजिकच आहे. पण पाश्चात्याच्या या कोत्या व आकुंचित दृष्टीचे भ्रमास आमच्यातील विद्वान शोधकानींही भुलून जावे, हे मात्र मोठे आश्चर्य होय. अशा प्रकारचे अलीकडचे ताजे व ठळक उदाहरण म्हटले म्हणजे रा. रा. त्र्यंबक गुरुनाथ काळे याचे आहे. यांनी आपल्या ' पुराण-निरीक्षण ' ग्रंथात भारतीय युद्धाचा काल ख्रि. पू. १२६३ वें वर्ष, हा ठरविला आहे. या कालनिर्णयास एक मुख्य आधार त्यांनीं असा दिला आहे कीं, लोक ज्या कालास कलियुगाचा आरंभ असे समजत आले आहेत, तो खरोखर 'कल्यारंभ' नसून 'कल्पारंभ' आहे; व हा 'य' आणि 'प' अक्षराचा घोटाळा आर्य-भट्टादि ज्योतिष्यानीं केला आहे. रा. काळे यांनीं आपली ही समजूत एकदा ठाम करून घेतल्यामुळे यांचें युग ४ वर्षांचें, एक मन्वंतर २८८ वर्षांचे व

एक कल्प ४०३२ च वर्षांचा बनला आहे ! ! प्रो. फर्ग्युसन याचें एक लटपटीत मत ग्राह्य धरल्यामुळेंच रा. काळे याचा असा गोंधळ उडाला आहे. ख्रि. पू. ३१०१ हा काळ कलियुगारंभाचा नसून, आर्य लोकांनीं सिंधू नदी ओलांडून प्रथमतः सरस्वतीतीरीं वसाहत केली त्याचा आहे. असें एक आपलें 'निःसंशय पण प्रमाणशून्य' मत प्रो. फर्ग्युसन यानीं दिलें आहे. तेंच रा. काळे यांनी ग्राह्य धरलें आहे. येवढेंच नव्हे तर या साहेबांचेंही पुढें जाऊन या वसाहत कालास त्यांनीं कल्पारंभ असें नाव देऊन ठेवलें आहे ! पण 'कल्प' शब्दाचा असा अर्थ रा. काळे कोणत्या आधारावरून करतात ? वर उल्लेख केलेला सूर्यसिद्धांत एक वेळ बाजूस राहो; पण भगवद्गीता व मनुस्मृति यांतील जीं वचनें मागें दिलीं आहेत, त्यांत कल्प म्हणजे ब्रह्मदिन, कल्पारंभ म्हणजे जगाची नवीन व्यक्त रचना, आणि कल्पांत म्हणजे नुसता जल-प्रलय नव्हे तर जगाच्या व्यक्त स्वरूपाचा पूर्ण नाश, अशाच अर्थीं आहे. अमरकोशांतही कल्प म्हणजे ब्रह्मदिन किंवा जगत्क्षय, असे दोनच अर्थ दिलेले आहेत. त्यावरून भारतीय युद्धाचे पूर्वी जगदुत्पत्ति होऊन फक्त १८३९ च वर्षे झालीं होतीं, असा रा. काळे यांच्या या उपपत्तीचा हास्यास्पद अर्थ होत आहे! तसेंच दोन मन्वंतराचे दरम्यान होणारा जलप्रलय, रा. काळे यांच्या उपपत्तीप्रमाणें प्रत्येक २८८ वर्षांनीं झाला पाहिजे असें होतें ! मनुस्मृति ही युगाचीं वर्षे दिव्यवर्षांनीं सांगत आहे, मानवी वर्षांनीं नव्हे, हीही गोष्ट आर्यभट्टास दोष देणारे रा. काळे यांचे लक्षांत आलेली दिसत नाहीं. 'कल्प' शब्दास आपल्या मनचाच कांहीं तरी अर्थ चिकटवावयाचा, कल्यारंभ तोच खरोखर कल्पारंभ असें आधाराशिवाय विधान करावयाचें, आणि आर्यभट्ट त्यास कल्पारंभ न म्हणतां कल्यारंभ म्हणतो म्हणून, आपल्या डोक्यांतल्या घोटाळ्याचें खापर त्याजवर फोडून मोकळें व्हावयाचें, हा भोळेपणा चिकित्सक शोधकास मुळींच शोभण्यासारखा नाहीं, असें म्हणणें भाग आहे.

---

# प्रकरण ३ रें.

## भारतीय राज्यव्यवस्था.

मागील प्रकरणात भारतीय संस्कृति किती प्राचीन आहे, याचें दिग्दर्शन केलें या प्रकरणात या संस्कृतीचें एक महत्त्वाचें अंग असलेल्या भारतीय राज्यव्यवस्थेचें त्रोटक वर्णन करावयाचें आहे. पण तें करण्यापूर्वी आधुनिक सामान्य सुशिक्षितांचे मनामध्यें स्वातंत्र्य (Freedom), राज्यपद्धति ( Constitution), राज्यव्यवस्था ( Administration किंवा Government ) यांचे स्वरूपासंबंधानें जो घोटाळा झालेला दिसून येतो, त्याचें निराकरण करणें अवश्य आहे.

' स्वातंत्र्य ' हा शब्द दिसावयास फार सुंदर असून, आधुनिक सुशिक्षितास तर त्याचें महत्त्व प्रत्यक्ष ईश्वराहूनही ज्यास्त वाटतेंसें दिसतें. पण हा शब्द वास्तविक सापेक्ष असून नैसर्गिक व सामाजिक बंधनांनीं ' स्वातंत्र्य ' मुळातच फार मर्यादित होऊन बसलेलें आहे. पक्ष्यास आकाशात हवें तिकडे संचार करण्याचें स्वातंत्र्य आहे, असें आपणास सकृद्दर्शनीं वाटतें. पण या स्वतंत्र पक्ष्यास समुद्राचें उल्लंघन करता येत नाही, किंवा वातावरणातही विशिष्ट उंचीपलीकडे भरारी मारता येत नाही. हीच स्थिति ' जन्मतः स्वतंत्र ' म्हटलेल्या मनुष्याचीही आहे. मनुष्याच्या मनानें इच्छेच्या कितीही भराऱ्या मारल्या, तरी त्याची गति, मृत्यूनें व तो ज्या समाजात राहतो त्या समाजाच्या मूळ नियमांनी बरीच मर्यादित करून ठेवली आहे. ' मनुष्यप्राणी जन्मत. स्वतंत्र आहे, स्वातंत्र्य हा त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे ' असें पाश्चात्त्यांच्या उसन्या तत्त्ववादावर उड्या मारणारे सुशिक्षित खुशाल म्हणोत; पण त्याचें हें स्वातंत्र्य फारच मर्यादित आहे. किंबहुना आमच्या वेदान्त-दर्शनें, कर्मोपाधीमुळें जीव जन्मास आले की, त्याचें स्वातंत्र्य नष्ट होऊन ते बंधनातच पडतात, ही गोष्ट खऱ्या तत्त्वज्ञान्यास व सत्यनिष्ठास पटल्यावाचून राहणार नाहीं.

स्वातंत्र्याचा हा तात्त्विक विचार सोडून देऊन केवळ राजकीय स्वातंत्र्यासंबंधानें पाहिलें, तरी तेथेही मर्यादा ही दिसून येतेच. राजकीय स्वातंत्र्यास दोन बाजू आहेत. एक बाजू अशी कीं, विशिष्ट देशाच्या राज्यपद्धतीत किंवा राज्यव्यवस्थेत अन्य देशाची कोणाचीही हुकमत नसली पाहिजे. स्वातंत्र्याच्या ह्या बाजूस ' बाह्यस्वातंत्र्य ' असें नाव देता येईल. स्वातंत्र्याची दुसरी बाजू ही आहे कीं, राज्यव्यवस्थेस अत्यंत आवश्यक अशा बाबींखेरीज इतर सर्व गोष्टींत राज्यकर्त्यांची हुकमत प्रजेवर चालू नये. स्वातंत्र्याच्या या स्वरूपास ' अंतः-

स्वातंत्र्य ' असे म्हणता येईल. बाह्यस्वातंत्र्यात अनेक राष्ट्रे किंवा देश याचा परस्परसंबंध अपेक्षित आहे; व अंत:स्वातंत्र्यात राजा किंवा राज्यकर्ते व प्रजा याचा संबंध उल्लेखिलेला आहे. अर्थात् एकाद्या देशास वरील प्रकारचे बाह्य-स्वातंत्र्य लाभण्या न लाभण्याशी त्या देशातील राज्यपद्धतीचा वास्तविक काही संबंध नाही. देशात अनियंत्रित राजसत्ताक पद्धति अंमलात असतानाही त्यास हें बाह्यस्वातंत्र्य असू शकते, व उलट प्रजासत्ताक राज्यपद्धति असूनही त्या देशास हें बाह्यस्वातंत्र्य कधीं कधीं पूर्णपणें नसते. अंत:स्वातंत्र्याचा व राज्यपद्धतीचा ( Constitution ) मात्र निकट संबंध आहे, असे कोणासही सकृद्दर्शनीं वाटतें. जगातील काही अर्वाचीन प्रजासत्ताक राज्यामुळें तेथील प्रजाजनाचे स्वातंत्र्य वृद्धिगत झालेलें दिसून येतें; व त्यावरून अनियंत्रित राजसत्ताक राज्य-पद्धति व प्रजेचें पारतंत्र्य, आणि प्रजासत्ताक राज्यपद्धति व प्रजास्वातंत्र्य याचा दृढ संबंध आहे, असें साहजिकच अनुमान करण्यात येते; व राज्यसत्तेचा वाटा प्रत्येक प्रजाजनास मिळाला, म्हणजे ती प्रजा स्वतंत्र आहे असे मानण्यांत येतें. पण वास्तविक हा संबंध नित्यसंबंध नाही. तसा तो आहे असे मानणे हा निव्वळ भ्रम आहे. राज्यपद्धति व राज्यव्यवस्था किंवा प्रजास्वातंत्र्य याचा परस्पर संबंध वस्तुत:साधनसाध्यासारखा आहे. विशिष्ट राज्यपद्धति हे एक साधन व सुखकारक राज्यव्यवस्था किंवा प्रजास्वातंत्र्य हें त्याचें एक साध्य आहे. पण हर्बर्ट स्पेन्सरनें म्हटल्याप्रमाणे ( हर्बर्ट स्पेन्सरचें आत्मचरित्र-व्हाल्यूम १. पृ. ४३९ ) हा संबंध पुष्कळ सुशिक्षित लोक विसरतात. किंबहुना ह्या दोनही गोष्टी भिन्न नसून एकच आहेत, अशीच त्याची समजूत असते! राज्यपद्धति अनियंत्रित राजसत्ताक असूनही प्रजाजनास स्वातंत्र्य असू शकतें. उदाहरणार्थ, आपल्या प्राचीन ग्राम-संस्थाच्या लहान लहान लोकसत्ताक राज्यसंघाना बनलेली अनियंत्रित राज-सत्ताक पद्धतिच पहा. तीत दिसावयाला राज्यपद्धति राजसत्ताक असली तरी प्रजेस या ग्रामसंस्थामुळें बहुतेक बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य असे. उलट राज्यपद्धति लोकसत्ताक असूनही तेथील राज्यकर्ते आपल्या खऱ्या कर्तव्यापलीकडे जाऊन, स्पेन्सरसाहेबानीं अपायकारक ठरविलेली,(over-government)फाजील सत्ता गाजवीत असतील,तर तेथील प्रजा स्वतंत्र आहे, असें कदापि म्हणता येणार नाही.

स्वतंत्र देशातील राज्यपद्धति पाहिल्या असता असे दिसून येते कीं, तेथील समाजरचनेचें व समाजव्यवस्थेचें तें एक महत्त्वाचें अंग असतें. समाजाच्या अस्ति-त्वासाठी, स्थैर्यासाठी व अभिवृद्धीसाठी त्यास व्यक्तीकडून किंवा व्यक्तिसमुदाया-कडून अनेक कार्यें करून घ्यावीं लागतात. त्यापैकीं एक कार्य असें आहे कीं,

त्या समाजाचे परसमाजापासून व समाजातील एका व्यक्तीचें किंवा वर्गाचें दुसऱ्या व्यक्तीपासून किंवा वर्गापासून संरक्षण करणें. समाजाचें हें एक कार्य ज्या संस्थेवर सोपविलेलें असतें, ती राज्यसंस्था होय; आणि राज्यसंस्थेचें खरें व मुख्य कर्तव्य येवढेंच आहे. या कर्तव्यापलीकडच्या टापून राज्यसंस्था जितकी ज्यास्त ढवळाढवळ करूं लागेल—मग तिची राज्यपद्धति कोणतीही असो-तर तेथील प्रजेचें स्वातंत्र्य तितक्या प्रमाणानें कमीच होत जाणार; येवढेंच नव्हे, तर राज्यसंस्थेचें खरें कर्तव्य परिपूर्ण होण्यास व्यत्यय येणार, हें उघड आहे. राज्य-संस्था हें समाजव्यवस्थेचें एक अंग असल्यामुळें, सामाजिक व नैतिक ध्येय आणि त्यामुळें बनलेलें त्या समाजाचें शील ज्या स्वरूपाचें व दर्जाचें असेल, तशा स्वरू-पाची सामान्यतः तेथील राज्यपद्धती व विशेषतः राज्यव्यवस्था असते. राज्य-पद्धति कोणतीहि असली तरी, समाजाची आध्यात्मिक, नैतिक व सामाजिक ध्येयें उच्च प्रतीचीं असतील, तर तेथील राज्यव्यवस्थाही त्याच ध्येयास अनुसरून प्रजेस सुखावह अशी होत असते. समाजात अशी ध्येयें खेळत नसली म्हणजे, राज्यपद्धति कितीही उत्तम असली तरी, तेथील राज्यव्यवस्थेंत व्यक्तीव्यक्तीमध्ये पक्षापक्षामध्यें व वर्गावर्गामध्यें द्रव्यासाठीं, व हक्कासाठीं ('चढाओढ' हें गोडस नाव मिळालेला) कलह माजल्यावाचून रहात नाहीं. युरोप व अमेरिकेंतील राज्यपद्धति बहुतांशी लोकसत्तात्मक असूनही तेथें असा मोठा कलह माजून राहिलेला असतो, याचें तरी बीज हेंच होय. सत्तेच्या अधिष्ठानाचे दृष्टीनें राज्य-पद्धतींचें वर्गीकरण केलें तर राजसत्ताक, महाजनसत्ताक, प्रतिनिधिसत्ताक, लोक-सत्ताक वगैरे तिचे भेद होतील.पण प्रजाजनाचें सुख व भरभराट हीं एकच दृष्टि ठेवून विचार केला तर,असा सामान्य सिद्धांत निघेल कीं उच्च शीलाचे,उदार मनाचे,व्यापक सहानुभूतीचे, थोर सद्‌गुणाचे व श्रेष्ठ बुद्धिमत्तेचे लोकांस मात्र जी राज्यपद्धति श्रेष्ठपदास चढविते आणि शीलहीन, हलक्या मनाचे, संकुचित दृष्टीचे, दुराचरणी व बुद्धिहीन लोकांस श्रेष्ठतेस चढूं देत नाहीं. तीच राज्यपद्धति उत्तम होय.

कोणत्याही देशांतील विनिश्चित काळची राज्यव्यवस्था चांगली होती का वाईट होती, हें निश्चितपणे ठरविण्याची आणखी एक बिनचूक कसोटी इंग्लं-डांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व राजनीतिज्ञ एडमंड बर्क यानें नमूद करून ठेविली आहे. देशांतील लोकसंख्या व संपत्ति हीं मुबलक व वाढती असली म्हणजे,—मग तेथील राज्यपद्धति राजसत्ताक का असेना—ती राज्यव्यवस्था चांगली आहे, असें निःसंशय समजावें. याचे उलट लोकसंख्या व संपत्ति यांतील एक किंवा दोनही कमी असून त्यांची वाढही चांगलीशी होत नसली तर,

जेथें लोकसत्तात्मक राज्यपद्धति असूनही ती राज्यव्यवस्था वाईट, असें ठाम मानावें. ही कसोटी प्राचीन भरतखंडास लावून पाहिली तर, तेथील राज्यव्यवस्था उत्तम होती, असें कोणाचेंही मत झाल्यावांचून रहाणार नाहीं. हायडास्पिस ( झेलम ) व हायपानिस् ऊर्फ हायपासिस ( बियास ) या नद्यांचे दरम्यानच्या १ हजार नगरावर युक्रटाईडीज् राजाची सत्ता चालत होती ' असें स्ट्रेबोनामक ग्रीक इतिहासकार लिहितो. सदरहू दोन नद्यांचे दरम्यान १५०० नगरें असून त्या पकीं कोणाचीही लोकसंख्या कोस शहराहून कमी नाहीं, असें आपोलोडोरस म्हणतो ( एलफिन्स्टनचा हिंदुस्थानचा इतिहास पृ. २६१ ). हिंदुस्थानांत एकंदर निरनिराळीं १२० राष्ट्रें आहेत, असें मेगॅस्थनीसनें लिहिलें आहे ! आर्यावर्ताची लोकवस्ती अफाट असून त्यांतील शहरांची मोजदाद करणें अशक्य आहे, असें एरियन ग्रंथकारानें लिहिलें असून, पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांत प्राचीन भारतीय राष्ट्र संख्येनें सर्वांहून श्रेष्ठ होतें, असें प्रो. मॅक्स डंकर यांनीं ( History ov Antiquity Vol. V. P. 18 ) मत दिलें आहे. टाशियसनामक ग्रंथकारानें तर यांचेही पलीकडे जाऊन असें म्हटलें आहे कीं, ' इतर सर्व समकालीन राष्ट्रांची लोकसंख्या एकत्र केली असता जितकी होईल, तितकी प्राचीन हिंदूंची लोकसंख्या होती ! स्ट्रेबो इतिहासकार लिहितो कीं, ' पालिबोथ्रा ( पाटलीपुत्र ) नगराची लांबी ८ मैल असून, त्याच्या विस्तीर्ण तटास ५७० बुरूज व ६४ वेशी होत्या ' ' किंबहुना सोळाव्या शतकांतही कनोज शहरांत ३० हजार तांबोळी व ६० हजार बाजंत्रीवाले होते. असेंही एके ठिकाणीं नमूद केलेलें आढळतें ! ( Researches, Vol. II. p. 220 ). यावरून हिंदुस्थानांत पूर्वी लोकसंख्या किती होती, याची कोणासही सहज कल्पना होईल. प्राचीन काळीं भरतखंडांतून अनेक लोक देशत्याग करून युरोप-अमेरिकेत वसाहत करण्यास अनेकदां गेले, व त्यांनीं तिकडे प्रबळ राष्ट्र स्थापन केलीं. ( याचें वर्णन पुढें एका लेखांत येणार आहे ) यावरूनही प्राचीन काळच्या येथील प्रचंड लोकसंख्येचें अनुमान करतां येईल.

संपत्तीची कसोटी लावून पाहिली असतांहि भारतीयांची राज्यपद्धति पूर्णपणें कसास उतरते, असें दिसून येईल. केवळ संपत्तीच्या विपुलतेवरूनच या देशास ' सुवर्णभूमि ' हें सार्थ नांव मिळालें आहे. ( याचीही सविस्तर माहिती पुढें एका लेखांत देण्याचा विचार आहे. ) ' प्राचीन भरतखंडांत चोरांचें नावही नव्हतें ' असें स्ट्रेबोनें नमूद करून ठेवलें आहे ! अलीकडे सुधारलेल्या पाश्चात्य

राष्ट्राची राजधानी म्हणजे सैतानाचे माहेर घर असून, रात्री रस्त्यातून फिरणे म्हणजे मरणाची तयारी करणे आहे व परकयाचे घरी निजावयास जाण्यापूर्वी आपले मृत्युपत्र करून ठेवणे आवश्यक आहे, असे ज्या काळाचे डॉ. जॉनसनने अत्युक्तीचे वर्णन केलेले आहे, त्या काळी घराचे दरवाजे का लावावयाचे व त्यास कड्याकुलुपें कशासाठी घालावयाची, हेही हिंदुलोकास माहीत नव्हते ! मेगॅस्थनीस याने असे लिहिले आहे की, चंद्रगुप्ताचे छावणीत एकंदर ४ लक्ष लोक असूनही तेथे दररोज होणाऱ्या चोऱ्याचा माल सरासरीने ३० रुपयाहून जास्त किमतीचा नसे ! यावरून त्या काळच्या पोलिसच्या चोखपणाचीही साक्ष पटेल. इंग्लंडमध्ये व्हिक्टोरिया महाराणीचे कारकीर्दीपर्यंत व्यवस्थित पोलिसखाते अस्तित्वातही आलेले नव्हते. ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे.

प्रतिनिधिसत्ताक राज्यपद्धति हिंदूंच्या स्वप्नातही आली नव्हती, किंबहुना ती त्यांच्या राजकीय प्रकृतीस कधी मानवणारही नाही, असे पुष्कळ विद्वान म्हणत असतात; पण हे म्हणणे साफ चुकीचे आहे. " प्राचीनकाळापासून हिंदुस्थानातील प्रत्येक गाव किंवा शहर म्हणजे एक लहानसे पण स्वयंपूर्ण लोकसत्ताक राज्यच असे, व सर्व हिंदुस्थान म्हणजे अशा छोट्या स्वराज्याचा एक प्रचंड संघच होता. " असे ले. कर्नल मार्क विल्क्स ( Historical sketches of the South of India Vol. I p. 119 ) म्हणतात. 'भरतखंडातील प्रत्येक व्यक्ति स्वतंत्र आहे ' असे जे एरियनने आदरपूर्वक म्हटले आहे, ते याचकरिता होय. हिंदुस्थानची प्राचीन राज्यपद्धति व कायदे यामध्ये लोकसत्ताक राज्याचीं बीजे स्पष्ट दिसत आहेत, असे मिलसारख्या दुराग्रही व अहंमन्य इतिहासकारासही कबूल करावे लागले आहे ! सर चार्लस मेटकाफ यांनी तर या ग्रामसंस्थांचे मोठेच रसभरित गुणवर्णन केले आहे. ते लिहितात:—" या ग्रामसंस्थारूपी छोट्या लोकसत्ताक राज्यांच्या बहुतेक सर्व गरजा गावांतल्या गावांत भागत. त्यांचेवर परकीय राजसत्तेचा शह कधीच बसला नाही. जेथे इतर सर्व गोष्टी क्षणभंगुर भासतात, तेथे या ग्रामसंस्था मात्र सनातन दिसतात. एकामागून दुसरे अशी अनेक राजघराणी जमीनदोस्त झाली. एकामागून एक राज्यक्रांत्या अनेक होऊन गेल्या. पठाण, मोंगल, मराठे, शीख, इंग्रज वगैरेंच्या राजसत्ता आळीपाळीने या देशावर बसल्या, पण या सर्व उलथापालथीत ग्रामसंस्था आपल्या पूर्ववत् कायमच्या कायमच आहेत ! या ग्रामसंस्थारूपी लहान लहान लोकसत्ताक राज्यांचा असा संघ बनल्यामुळेच

हिंदुलोकास राजकीय स्वातंत्र्य स्वावलंबन व राजकीय सुख याचा लाभ झाला आहे. "* पण ह्या लहान लहान ग्रामसंस्था वाळूच्या कणाप्रमाणे पृथक् असून त्याचा एकजीव नव्हता असें कोणास वाटेल, पण खरी स्थिति तशी नव्हती. राजानें प्रत्येक गावावर एकेक, दहा किंवा वीस गावाच्या समुदायावर एक, अशा पाच किंवा दहा समुदायावर एक, आणि अशा दहा महासमुदायावर एक याप्रमाणें अधिकारी नेमावे; व त्यांनी एकमेकांशी चढत्या क्रमानें जबाबदारीनें वागावें. अशी पद्धत होती. ( मनुस्मृति–अ. ७।१२३,१२४. )

धर्मशास्त्र किंवा कायदे याचे स्वरूप व व्यापकता हीही राज्यव्यवस्थेच्या बरेवाईटपणाची एक कसोटी आहे. भारतीयांच्या धर्मशास्त्राचा मुख्य ग्रंथ मनुस्मृति हा होय. याची रचना जशी साधी आहे, तसे त्यांतील नियम दूरदृष्टीचे व शहाणपणाचे पूर्ण निदर्शक आहेत. हे नियम वारंवार बदलणारे नसूनही ते समाजांतील व्यक्तींच्या सर्व भिन्नभिन्न परस्परसंबंधास पुरतील इतके व्यापक आहेत. सर विल्यम जोन्स लिहितात:– " मनुस्मृति हा ग्रीक स्मृतिकार सोलन किंबहुना लायकरगस याच्या कायद्याहूनही प्राचीनतर असला पाहिजे. त्यांत ग्रथित केलेले धर्मशास्त्राचे नियम समाजात प्रथमतः अंमलात आल्याचा काळ तर इजिप्त व भरतखंड येथे प्रथमतः राजसत्ता स्थापित झाली त्या सुमाराचा असावा. क्रीट बेटांतील प्राचीन कायदे मनूच्या धर्मशास्त्रासारखेच असल्याचे दिसून येते; व हेच कायदे लायकरगसनें स्पार्टामध्ये आणले असावेत. " ( Houghton's Institutes of Hindu Law–प्रस्तावना पृ. १०. १२ ). 'धी बायबल इन् इंडिया ' नावाचा ग्रंथ लिहिणाऱ्या लेखकाचे तर असे

---

* The village-communities are little republics having nearly everything they can want within themselves and almost independent of any foreign nation. They seem to last where nothing lasts. Dynasty after dynasty tumbles down, revolution succeeds revolution; and Pathan, Moghul, Marhatha, Sikh, English are all Masters in turn, but the village communities remain the same. The union of village communities, each one forming a little state in itself, is in a high degree conducive to their ( Hindoo ) happiness and to the enjoyment of a great portion of freedom and independence. ( Report of the Select Committee Vol. III. of the House of Commons 1832. )

मत आहे की, ' इजिप्त, इराण, ग्रीस व रोमन येथील कायद्यांची रचना मनुस्मृतीचेच पायावर केलेली आहे; व अजूनही युरोपखंडाच्या न्यायकचेऱ्यात मनुस्मृतीचेच प्राबल्य असल्याचे दररोज दिसून येते. ( The मनुस्मृति was the foundation upon which the Egyptian, the Persian, the Grecian, and the Roman code of law were built and The influence of मनु was still every day felt in Europe ) ' डेसेमव्हरेटच्या अमदानीत ग्रीकांनीं भारतीयांच्या स्मृत्यांवरून आपले कायदे तयार केले असावे. व पुढे ग्रीककायद्यापासून रोमन व रोमनपासून इंग्रजी कायदे रचण्यात आले. प्रो. विल्सन लिहितात की, " हिंदूंच्या स्मृतिग्रंथांत समाजांतील सर्व भिन्न भिन्न संबंध नियमित करणारे नियम दिले आहेत हे नियम प्रचलित असलेला समाज फारच सुधारलेला असल्यावाचून असे नियम अस्तित्वातच येणे शक्य नाही. "

हिंदूंच्या धर्मशास्त्रासंबंधाने मिल इतिहासकाराचा मात्र अतिशय दुराग्रह होता. " हिंदूंचे धर्मशास्त्र, स्मृति किंवा कायदे यांची रचना व वर्गीकरण ओबडधोबड असून त्यावरून हिंदुराष्ट्राचा रानटीपणा सिद्ध होतो. काही वस्तु तारण म्हणून गहाण ठेऊन मग कर्ज देणे ही पद्धतही रानटीपणाच दर्शविते. खोटी साक्ष देणे हा एक मोठाच गुण आहे असे हिंदुधर्मशास्त्र मानते. ह्या शास्त्रांत अनिश्चितपणा फार आहे. तसेच धर्मशास्त्राचा अर्थ करताना एका पंडिताचे मत दुसऱ्याशी जमत नाही. मुसलमानी धर्मशास्त्र हिंदुधर्मशास्त्राहून फार श्रेष्ठ आहे. ' वगैरे वगैरे अनेक आक्षेप मिलने घेतले आहेत. ( Mill's India, Vol II. ) पण मिलचा हा इतिहास ज्यांनी संपादिला त्या प्रो. विल्सनसाहेबांनी मिलची ही सर्व विधाने सप्रमाण खोडून काढून, त्यावरून मिलचा हिंदूविपर्यांचा पक्का दुराग्रह व गाढ अज्ञान यांचे मात्र प्रदर्शन झाले, असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे ! " कायद्यांची रचना व वर्गीकरण पाहून राष्ट्राच्या सुधारणेचे मोजमाप करावयाचे असेल, तर हिंदूंपेक्षा इंग्रजी राष्ट्र सुधारणेत कमी दर्जाचे आहे, असेच ठरेल. गहाणाची पद्धत जर रानटीपणा दर्शवीत असेल, तर लंडनांत गहाणाचा व्यवहार करणारे असंख्य pawn-brokers सावकार इंग्लंडाचाही रानटीपणा सिद्ध करतील. ' हिंदुधर्मशास्त्र खोट्या साक्षीस गुण समजते, हे मिलचे म्हणणे अगदी निराधार असून ते त्याच्या रोगटकल्पनाशक्तीचेच फळ अपत्य आहे. हिंदुधर्मशास्त्रांत अनिश्चितपणा असेल तर इंग्रजी कायद्याचा विस्तारही तितकाच घातक आहे. या

विलंबामुळेंच लाचलुचपत, फितवाफितवी व कारस्थानें यास अवसर सांपडतो. हिंदु पंडितांत शास्त्रवचनाच्या अर्थासंबंधानें मतभेद होतो, तसा इंग्रजी राज्यांतही होत नाहीं असें नाहीं. मद्रासच्या चीफ जस्टिसचा निकाल लोकास फसविणारा व कायद्याचे स्पष्टशेल विरुद्ध आहे, असें बंगालच्या चीफ जस्टिस म्हणूं शकतो ! मुसलमानी धर्मशास्त्रांत शिक्षेचे बाबींत सुडाची राकटी कल्पना विशेष प्रबळ आहे, तशी ती हिंदुधर्मशास्त्रात मुळींच नाहीं. हिंदुधर्मशास्त्रांत करार व वारसा यसंबंधानें जितकें परिपूर्ण व निश्चित वर्णन आहे तितकें मुसलमानी शास्त्रांत नाहीं ' असें प्रो. विल्सन यांनी पूर्णपणें सिद्ध केलें आहे प्रो मॅक्स मुलर यांनीं तर मिलच्या इतिहासावर निर्भीडपणानें पुढील शिक्का मारून ठेवला आहे.- " इंग्रजी भाषेत जर एकादा ग्रंथ अत्यंत खोडसाळ असेल तर तो मिलचा हिंदुस्थानाचा इतिहासच असून हिंदुस्थानावर आलेल्या काहीं महान संकटांची जबाबदारीही या ग्रंथावरच आहे. मिलच्या इतिहासांत इतकें विष भरलेलें आहे कीं, प्रो. विल्सन यांच्या टीपांनी दिलेल्या विषप्रतिबंधक औषधानेंही त्या विषाचा जोर कमी झालेला नाहीं. " अशा प्रकारें या ग्रंथासंबंधानें अभिप्राय देऊन प्रो. मॅक्स मुलर म्हणतात कीं, असला ग्रंथ सिव्हिल सर्विसच्या उमेदवारास अभ्यासास लावतात व त्यांत त्यांची परीक्षा घेतात ही दुर्दैवाची गोष्ट होय ! [1]

' Mythology of the Hindus,' नामक ग्रंथांत (पृ.८) कोलमन् यांनी असा अभिप्राय दिला आहे कीं, 'मनुस्मृतीच्या भाषेत कायद्याच्या ग्रंथास आवश्यक असें एक प्रकारचें गांभीर्य व उदात्तता असून त्यामुळें तीबद्दल मनात एक प्रकारचा आदरयुक्त दरारा वाटतो. ईश्वराखेरीज इतर सर्वासंबंधानें नियम सांगतांना मनुस्मृतीनें अत्यंत स्वतंत्रता स्वीकारल्याचें दिसून येत असून खुद्द

---

[1] The book which I consider most mischievous, nay which I hold responsible for some of the greatest misfortunes that have happened in India, is Mill's History of India, even with the antidote against its poison which is supplied by Prof. Wilson's notes ( India, what can it teach us, P. 42 ).

राजाचीही न्यायनिष्ठुरपणें तिने केलेली कान उघाडणी तर खरोखर उच्च दर्जाची आहे.' ( The style of मनु has a certain austere majesty that sounds like the language of legislation and extorts a respectful awe. The sentiments of independence on all beings but God and the harsh admonitions even to Kings are truly noble ) तसेच डॉ. रॉबर्टसन यानी ( Disquisition concerning India Appe P 217 ) असे लिहिले आहे की, " विवेचन केलेल्या बाबींची संख्या व विविधता या दृष्टीने हिंदु मनुस्मृति, जास्टिनियनचे रोमन धर्मशास्त्र किंवा इतर कोणत्याही सुधारलेल्या देशाचे धर्मशास्त्र याच्या तोडीचे आहे. त्यातील कलमांचा अनुक्रम स्वाभाविक व स्पष्ट आहे. ही कलमे व्यापक व अनेक प्रकारची असून त्यातील विवेचन फारच सूक्ष्म व चिकित्सक दृष्टीने केलेले आहे. तसेच तीमध्ये केलेले निर्णय, जगात सर्वकाळी व सर्व स्थळी लोकास मान्य असलेल्या उच्च व सनातन अशा न्यायतत्त्वांचे पायावरच उभारलेले आहेत हे धर्मशास्त्र मान्य करणारा समाज अत्यंत वैभवशाली व सुधारलेला असाच असला पाहिजे, हे उघड दिसून येते. या स्मृतीमध्ये कित्येक बाबींसंबंधाने इतका व्यापक विस्तार व सूक्ष्म वर्गीकरण केले आहे की, याची पुष्कळ युरोपियन धर्मशास्त्रकारास कल्पनाही नव्हती. तीतील काही कलमांवरून तर त्या समाजाच्या संस्कृतीची श्रेष्ठता तत्काळ पटते, व ही संस्कृति त्या समाजात फार प्राचीन काळी निर्माण झाली होती, हे पाहून मन थक्क होऊन जाते ! " हिंदुधर्मशास्त्रांतील पुराव्याचे शास्त्रासंबंधाने मद्रास हायकोर्टाचे चीफ जस्टिस सर थॉमस स्ट्रेंज यानीं तर असे लिहिले आहे की, " ह्या शास्त्राचे अध्ययन केल्यास प्रत्येक इंग्रज कायदेपंडिताचा फायदा होऊन त्याच्या नुसत्या वाचनानेही त्याचे मनात आदर व आनंद उत्पन्न झाल्या-वाचून रहाणार नाही. "

It ( Hindu law of Evidence ) will be read by every English lawyer with a mixture of admiration and delight, as it may be studied by him to advantage मनुस्मृतीचा टीकाकार कुल्लुक याच्या टीकेसंबंधाने सर विल्यम जोन्स यानीं असे मत दिले आहे:—" ही टीका सर्वांत लहान पण सर्वाहून अर्थप्रकाशक आहे. तीत टीकाकाराची विद्वत्ता पूर्णपणें दिसून येत असूनही पांडित्याचें वृथा प्रदर्शन मात्र तीत मुळीच नाही. युरोप व आशिया खंडातील कोणत्याही प्राचीन व अर्वाचीन ग्रंथावर

कुल्लुकासारखी अत्यंत सखोल व सर्वमान्य टीका कोणीही केलेली नाहीं." It is the Shortest yet the most luminous the least ostentatious yet the most learned, the deepest yet the most agreeable commentary ever composed on any author ancient or modern, European or Asiatic (Houghtoni's Institutes of Hindu Lawप्रस्तावना पृ. १८)



# प्रकरण ८ वें.

## भारतीयांचें शील.

मागील प्रकरणांत भारतीयांची राज्यव्यवस्था कशी होती, तें सांगितलें भारतीयांची समाजव्यवस्था व राज्यव्यवस्था श्रेष्ठ प्रतीची होती, या संबंधाचा आणखी पुरावा पाहिजे असल्यास, त्यामुळें भारतीयांचें जें शील बनलें तें पहावें. म्हणजे खात्री पटेल. प्राचीन भारतीय लोकांच्या नीतिकल्पना किती श्रेष्ठ होत्या व त्यांचें शील किती उच्च दर्जाचें होतें, यासंबंधानें भारतीय ग्रंथांची व पुरुषांची साक्ष हवी तेवढी देतां येईल. परंतु या बाबतींत त्यांजवर आत्मश्लाघेचा आरोप येऊं शकेल, या दृष्टीनें निःपक्षपाती तिऱ्हाइतांनींच दिलेले अभिप्राय विशेष महत्त्वाचे असल्यामुळें तेच आतां क्रमानें देऊं.

मनुष्याच्या मानसिक, बौद्धिक व आध्यात्मिक उन्नतीस आणि समाजाभिवृद्धीस जे सद्गुण आवश्यक आहेत, त्यांत सत्य हा सद्गुण सर्वांत श्रेष्ठ आहे. किंबहुना निरनिराळे सद्गुण किंवा नीतितत्त्वें हीं एका सत्याचींच भिन्नभिन्न स्वरूपें होत असेंही म्हणतां येईल. असा हा श्रेष्ठ सद्गुण भारतीयांत फार उत्कटत्वानें वसत होता, यासंबंधानें सर्व देशांचे व धर्मांचे ग्रंथकार, प्रवासी व मुत्सद्दी यांचें एकमत आहे. ' असत्य भाषण करणारा भारतीय आजपर्यंत कोणासही आढळला नाहीं ' असें एरियन नामक ग्रीक इतिहासकारानें ( २ रें ख्रिस्ती शतक ) लिहिलें आहे. तसेंच " भारतीय इतके प्रामाणिक आहेत कीं, त्यांना दारास कुलुपें लावण्याची किंवा करार बंधनकारक करण्यास ते लेखी करण्याची गरजच वाटत नाहीं ! ' असें स्ट्रॅबो इतिहासकारानें म्हटलें आहे ' सुप्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग ( Vol. II पृ. ८३ ) लिहितो.—' प्रामाणिकपणा व सरळपणा या गुणांत हिंदीलोक फार श्रेष्ठ आहेत; त्यांच्या राज्यव्यवस्थेंतही हेच गुण दिसून येतात. ते अन्यायानें केव्हांही कोणाचेंही द्रव्य हरण करीत नाहींत. ते न्यायी तर इतके आहेत कीं कित्येक वेळां त्यांच्या न्यायास फाजिल औदार्याचें स्वरूप येतें. ' ' हिंदी लोक सरळ, प्रामाणिक, सत्यनिष्ठ व न्यायी असून ते एकदा घेतलेली शपथ कदापि मोडीत नाहींत. त्यांचे अंगीं लबाडी व दुष्टपणा मुळींच नसून त्यांस जशी जगण्याची तशीच मरणाचीही भीति वाटत नाहीं. ' अशा

साक्षी सयामचा एक वकील सू-वे ( सन १२३१ ), फ्रायर ऑर्डेनस ( १४ वें शतक ), चिनी वकील फी–हू ( सन ६०५ ) व वेदी अब्र इमान ( १३ वे शतक) यांनी दिल्या आहेत (India, what can it teach us पृ. ५५ व २७५ ). अकराव्या शतकात लिहिलेल्या आपल्या भूगोलात इद्रिसी म्हणतो कीं, ' हिंदी लोक इतके न्यायी, विश्वासूक, प्रामाणिक व एकवचनी आहेत की, त्यांच्या या गुणाची कीर्ति ऐकून परदेशांतील अनेक रहिवासी चोहोंकडून त्या देशात जाऊन राहतात. तेराव्या शतकातील मार्को पोलो नामक एक प्रवासी लिहितो की, या ब्राह्मणाइतके सच्चे व इमानी व्यापारी जगात कोठेही नाहींत; कारण इहलोकच्या कोणत्याही फायद्याकरता ते कदापि असत्य भाषण करीत नाहींत.' कालिकत व विद्यानगर येथील दरबारी आलेला ( सन १४१३–१४८२) खाकन देशचा मुसलमान वकील कमाल उद्दीन समरकंदी यानेंही भारतवर्षातील व्यापाऱ्याच्या जीवितवित्ताचे संरक्षण उत्तम होते, अशी साक्ष दिलेली आहे. ' आपल्या सर्व व्यवहारात सत्य व अमर्याद इमान यास हिंदु लोक फार मान देतात ' असें आबुल फाजलने नमूद करून ठेवले आहे. सर जॉन मालकम यांनी असा अभिप्राय दिला आहे की, ( मिलचा हिंदुस्थानचा इतिहास Vol. I, P. 523 ) ' हिंदूंची जशी सत्यनिष्ठा तसेंच त्याचे धैर्यही श्रेष्ठ प्रतीचे आहे ! हिंदूंचे शीलाची परीक्षा करण्याची पात्रता कर्नल स्लीमन यास जितकी होती तितकी फारच थोड्या युरोपियनात असेल. ' परस्पराशी व्यवहार करताना लबाडी किंवा असत्य भाषण करण्याचे खेड्यातील लोकांस माहीतच नाहीं ' याप्रमाणे अभिप्राय देऊन पुढें कर्नलसाहेब लिहितातः–'मजपुढे शेकडो खटले असे आले होते की, आरोपी खोटें बोलेल तरच त्याची मालमत्ता, स्वातंत्र्य किंवा प्राण बचावतील; पण अशा आणीबाणीच्या प्रसंगींही आरोपींनी खोटें बोलण्याचें साफ नाकारले आहे ! ' ( I have had before me hundreds of cases in which a man's property, liberty and life has depended upon his telling a lie, and he has refused to tell it.)

कर्नल साहेबाचें हें बहुमोल सर्टिफिकिट नमूद करून मॅक्स मुलरसाहेब विचारतात कीं, ' असे उद्गार इंग्लंडांतल्या किती इंग्रज जज्जांचे तोंडून निघतील ? ' ( India, what can it teach us पृ. ५० ) मॅक्स मुलरसाहेब पुढे लिहितात कीं, ' हिंदुस्थानाशीं ज्या ज्या परकीय लोकाचा संबंध आला

त्या सर्वांस, तेथील लोकांच्या राष्ट्रीय शीलांत सत्यप्रीति हा मुख्य व ठळक सद्गुण असल्याचे पाहून फार आश्चर्य वाटलेले आहे. हिंदु लोक म्हणजे लबाड, असा आरोप त्यांचेवर कोणीही केलेला नाहीं. साप्रत काळचे प्रवास लेखक, ग्रंथकार, परदेशातील लोकांच्या सत्यनिष्ठेची बहुधा केव्हाही तारीफ करीत नाहीत. फ्रान्सात गेलेला इंग्रज प्रवासी फ्रेंचांचा प्रामाणिकपणा किंवा सत्यनिष्ठा यांबद्दल ब्रही काढीत नाही. उलट इंग्लंडांत आलेला फ्रेंच प्रवासी आपल्या प्रवासाचें वर्णन करताना ( Perfide Albion ) ‘ दगलबाज इंग्लंड ’ असा एकादा तरी टोमणा मारल्यावाचून राहत नाहीं! अशा स्थितींत हिंदु लोकांच्या सत्यप्रीतीचा गौरवपूर्वक उल्लेख प्रत्येक परदेशीय गृहस्थ करतो, यावरून यास मुळात तसेंच बलवत्तर कारण असलें पाहिजे, हें उघड आहे ’ [ किता पृ. ५७ )

मॅक्स मुलरसाहेबाचे उद्गार वाचून कलकत्ता युनिव्हर्सिटीचे मंदिरांत वृद्ध-तरुण सुशिक्षितासमक्ष हिंदुराष्ट्राचे कपाळावर सरसकट ‘ लबाड ’ असा शिक्का मारणाऱ्या सत्यनिष्ठ कर्झनसाहेबाचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं. सन १९०५ च्या फेब्रुआरी महिन्याच्या ११ वे तारखेस कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या पदवीदान-समारंभाचे वेळीं जमलेल्या निवडक वृद्ध-तरुण बंगाली विद्वानाची लॉर्ड कर्झन यांनी चान्सेलर या नात्याने चांगलीच पायपूजा केली. ‘ सत्याचे अत्युच्च ध्येय हें मुख्यतः पाश्चिमात्यातच आहे. ’ ‘ पौर्वात्य नीतिशास्त्रात सत्यास श्रेष्ठपद प्राप्त होण्यापूर्वीच तें त्यास पाश्चात्य नीतिशास्त्रात मिळालेले होतें ’ वगैरे सिद्धांत ठोकून देऊन लॉर्ड कर्झन यानीं असत्य व तोंडपुजेपणा याच्या पुढीलप्रमाणे व्याख्या सांगितल्याः—‘ आपले शील, दुसऱ्याचें वर्तन, किंवा जगात घडणाऱ्या गोष्टी याचे संबंधाने आपल्या ज्या भाषणानें किंवा वर्तनाने लोकांचा चुकीचा ग्रह होतो त्यास असत्य असे म्हणावे. तोंडपुजेपणा प्रामाणिकपणाचा किंवा अप्रामाणिकपणाचा असतो. पण हे दोन्ही प्रकार वाईटच असल्यामुळे त्याचा त्याग करावा. तोंडपुजेपणा प्रामाणिकपणाचा असला तरी तो असत्यच असतो; आणि तो अप्रामाणिकपणाचा असला तर तो असत्य असून शिवाय नीचपणाचाही असतो. लॉर्ड कर्झनसाहेबाच्या पूर्वोक्त उद्गारोद्गाराचा त्या वेळीं सगळ्या हिंदुस्थानाने जोराने व एकमताने निषेध केला; पण त्यास तेव्हा कर्झनसाहेबानी मुळींच प्रत्युत्तर दिले नाहीं. पण पुढे ८ वर्षांनी त्यानीं एका मध्यस्थाचे मार्फत असें उत्तर दिले कीं, ‘ मी हिंदु लोकास सरसकट लबाड मुळींच म्हटलेले नाहीं. विवाहकाले रति

संप्रयोगे प्राणत्यये सर्वधनापहारे । धर्मस्य चार्थेऽप्यनृतं वदेत पंचानृतान्याहुरपातकानि ' ॥ या श्लोकात सांगितलेल्या पांच प्रसंगीं खोटें बोललें असतां पातक लागत नाहीं, या हिंदु कल्पनेवरच माझा कटाक्ष होता. ' पण लॉर्ड कर्झनसाहेबांनीं अशा प्रकारच्या असत्य भाषणाचीं उदाहरणें काढण्याकरतां महाभारत धुंडाळण्याचें वास्तविक काहींच प्रयोजन नव्हतें. त्यांनीं स्वतःच लिहिलेल्या Problems of the far east या ग्रंथाचीं १५५ व १५६ वीं पृष्ठें वाचून पाहिलीं असतीं, तर कोरियाचे फारिन ऑफिसच्या प्रधानापाशीं खुद्द आपणच सत्याचा श्रेष्ठ पाश्चात्य ध्येयाचा ' कोणता मासला दाखविला, हे त्यांचे त्यांसच कळून आलें असतें. कोरियाचे बादशहाच्या भेटीस जाण्यापूर्वी त्या वेळचे मिस्तर कर्झन यांनीं वरील प्रधानाची मुलाखत घेतली. तेव्हां प्रधानानें विचारलें, 'आपलें वय काय ?' कोरिया देशांत थोड्या वयाचे तरुण पुरुषास मान मिळत नाहीं. ही गोष्ट कर्झनसाहेबास माहीत झाली होती. म्हणून त्यांनीं न डगमगतां ' चाळीस ' असें ठासून उत्तर दिलें ! हा इंग्रज गृहस्थ वय ४० सांगतो पण दिसतो पुष्कळ तरुण, असें मनांत येऊन प्रधानानें पुनः त्यास विचारलें कीं, ' आपण वयाच्या मानानें इतके तरुण कसे दिसतां ? ' तेव्हां कर्झनसाहेबांनां उत्तर दिलें कीं, ' कोरियासारख्या उत्तम हवेच्या देशांत मी महिनाभर प्रवास करीत असल्यामुळें ४० वर्षांचा असूनही मी पुष्कळच तरुण दिसूं लागलों आहे. यावर कोरियन प्रधानानें प्रश्न केला कीं, ' आपण इंग्लंडच्या महाराणीचे अगदीं जवळचे नातलग असाल ? ' या प्रश्नास मात्र कर्झनसाहेबांनां ' नाहीं ' असा खरा जबाब दिला. पण तो ऐकून प्रधानाचे चेहऱ्यावर तिटकारा उत्पन्न झाल्याचें पाहतांच कर्झनसाहेबांनीं ' बेशरमपणें ' ( unscrupulous )' पण मी अजून अविवाहित आहे ' असें सांगून व आपण महाराणीचे जावई होण्याचा संभव आहे, असें ध्वनित करून वरील कोरियन प्रधानास खुष केलें ! कर्झनसाहेबांच्या ' उच्च पाश्चात्य सत्यानेंचें ' हें वर्णन दुसऱ्या तिसऱ्या कोणी मत्सरी मनुष्यानें केलेलें नसून तें त्यांनींच स्वतः स्वतःच्याच ग्रंथांत वर्णिलेलें आहे ! कर्झनसाहेबांना कलकत्ता युनिव्हर्सिटींत ज्याचें लक्षण सांगितलें तें असत्य व तोंडपुजेपणा यांचें एक उत्कृष्ट उदाहरण व्याख्या करणारानेंच जगास अगाऊ दाखवून ठेवलें होतें ! हिंदु लोकांच्या वर दिलेल्या नीतिश्लोकांतील पांच अपवादांतही कर्झनसाहेबांचीं वरील खोटीं भाषणें पडत नाहींत. कारण कोरियाचे प्रधानाशीं बोलतांना कर्झनसाहेबास

एकादी कोरियन नवरी मिळवावयाची नव्हती, रतिसंप्रयोगाचाही तो समय नव्हता, त्याच्या प्राणावर संकट आलें नव्हतें, त्याचें सगळें धन जाण्याचा प्रसंग आला नव्हता किंवा त्याला धर्मरक्षण्या कोणाचें हितही साधावयाचें नव्हतें. असें असूनही केवळ आत्मप्रतिष्ठस्तव लागोपाठ तीन धडधडीत खोटीं विधानें करणार, येवढेंच नव्हे तर तीं आपल्या ग्रंथांत फुशारकीनें नमूद करणार सद्गृहस्थच मोठ्या दिमाखानें हिंदु लोकांस पर्यायानें असत्यभाषणी व तोंडपुजे म्हणतात, हा धाष्टर्याचा कळसच म्हटला पाहिजे! वटलरादि नोकरचाकर, पोटार्थी कारकून किंवा न्याड व लब्धप्रतिष्ठित रावसाहेब–रावबहादूर यांऱ्यांशीच संबंध आल्यामुळें त्यांची असत्य भाषणें व तोंडपुजेपणा हींच ऐकण्याची संवय झालेले इतरही अनेक युरोपियन हिंदुराष्ट्राच्या सत्यनिष्ठेसंबधानें असेच भलभलते तर्क करीत असतात. पण मॅक्स मुलरसाहेबांनीं दिलेला इशारत असल्या लोकांनीं लक्षांत ठेवावी. ते लिहितात कीं, 'शितावरून भाताची परीक्षा, हा न्याय भातापुरताच बरोबर आहे. तो मनुष्याच्या समाजास किंवा राष्ट्रास लावूं पहाणें निंद्य आहे. एका इंग्रजी आगबोटीवर एका इंग्रज पाद्र्यास एका फ्रेंच मुलास बासम्मा देण्याचा एकच प्रसंग आला होता. त्या मुलाचें नाक लांब असल्याचें पाहिल्यापासून सदर पाद्र्यानें पक्का सिद्धांतच बांधून ठेवला कीं सर्व फ्रेंच मुलांचीं नाकें लांबलचक असतात!' असलीच चुकी वरील न्याय माणसास लावणारे पढतमूर्ख करतात. महाभारतांतील अत्यंत श्रेष्ठ पुरुष भीष्म पितामह याचें चारित्र्य पहा किंवा रामायणांतील रामचंद्राचें चरित्र अवलोकन करा. त्यांत सर्वत्र सत्यासच अत्युच्च पद दिलेलें असून सत्याकरिताच लागेल तो स्वार्थत्याग या व्यक्तींनीं केलेला आहे. चुकून तोंडांतून गेलेला शब्द खरा करण्याकरतां हरिश्चंद्रानें किती हाल सोसले ते जगजाहीरच आहे. वरील तीन महापुरुषांच्या तोडीची सत्यनिष्ठा धारण करणारा एक तरी पुरुष लॉर्ड कर्झनसारख्या निंदकांनीं जगांतील कोणत्याही देशाच्या खऱ्याखुऱ्या इतिहासांत किंवा कल्पित कादंबऱ्यांत दाखवून मग हिंदु लोकांवर आग पाखडण्यास खुशाल तयार व्हावें.

सत्यनिष्ठेखेरीज इतरही अनेक सद्गुण परकीय लोकांस हिंदुलोकांत आढळून आले असून त्याबद्दल त्यांनीं त्यांचा मोकळ्या मनानें गौरव केला आहे. युरोपांत माहीत असलेल्या गुलामगिरीचें हिंदुस्थानांत नांवही नसून तेथील पुरुषांचें शौर्य-धैर्य व स्त्रियांचें पातिव्रत्य हे गुण पाहून मेगस्थनीस यास त्यांचे बद्दल फारच आदरबुद्धि उत्पन्न

झाली होती. तो लिहितो कीं, ' शौर्याचे बाबतीत ते इतर सर्व आशिआटिकांत श्रेष्ठ असून उद्योगी व व्यसनपराङ्मुख आहेत; त्याचे शेतकरीही मेहनती व कुशल कारागीर असून ते स्वदेशी राजाचे अंमलाखाली शांतपणाने रहातात, व ते कोर्टाची पायरी बहुधा चढतच नाहींत. ' ( हंटरचे गॅझिटियर ' India ' पृ. २६६. ) Religions of the World नामक ग्रंथांत ( पृ. ८३ ) रे. मोरिस लिहितात कीं, ' कोणत्याही दृष्टीने विचार केला तरी शूद्र हे पूर्वी गुलामगिरींत असणे शक्य नाहीं, व ते सांप्रतही गुलाम नाहींत. हिंदुस्थानांतले सर्व लोक स्वतंत्र नागरिक असल्याचे पाहून ग्रीक लोकांस मोठाच अचंबा वाटला'. ( The sudras are not in any sense slaves, and never can have been such. The Greeks were surprised to find all classes in India free citizens ). एल्फिन्स्टनसाहेब हिंदुस्थानच्या इतिहासांत ( पृ. २४३ ) लिहितातः—' हिंदूंच्या जुन्या नाटक-ग्रंथांतील इतर पात्रें राजाशीं बोलतांना तोंडपुजेपणा किंवा दैन्य मुळींच दाखवीत नाहींत, ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. ' ' धनी फाजील कदरखोर नसला म्हणजे हिंदु नोकर त्याशीं मोकळ्या मनानें व विश्वासूकपणानें वागतात; वरिष्ठाशीं बोलतांना हिंदु लोक दैन्य किंवा हांजीहांजीखोरपणा मुळींच दाखवीत नाहींत. ' अशी साक्ष प्रो० विल्सन यांनी दिली आहे. एल्फिन्स्टन साहेब आपल्या इतिहासांत ( पृ. २०२ ) पुनः लिहितात, ' नोकराशीं धनी जर खरोखर दयाळूपणानें व सुविचारानें वागत असला तर हिंदु नोकरही त्याशीं इतक्या इमानानें वागतात कीं, त्याहून अधिक इमानीपणा जगांत कोठेंच आढळणार नाहीं. आजारीपणांत किंवा एकाद्या अडचणीच्या व संकटाच्या वेळीं हिंदु नोकर इमान व स्वामिनिष्ठा यांचे कसोटींत पूर्णपणे उतरतात, असा युरोपियनांचा अनुभव आहे. ' हिंदु लोक धार्मिक, मोकळ्या मनाचे, परकीयाशीं सभ्यतेनें वागणारे, आनंदी, ज्ञाननिष्ठ, न्यायप्रिय, व्यवहारदक्ष, सत्यनिष्ठ आणि प्रत्येक व्यवहारांत अति इमानी असे आहेत ' असें अबुल फजल ह्या कुशल व चतुर लोकनिरीक्षक मुसलमान इतिहासकारानें नमूद करून ठेवलें आहे, ( टॉडकृत राजस्थानचा इतिहास Vol I, p. 643. ) हिंदूंचा इमानीपणा, सत्यनिष्ठा, प्रामाणिकपणा, निर्वाणीचें शौर्य, राजनिष्ठा आणि अन्नाच्या बचावाचा प्रश्न आला असतां त्याचे अंगीं दिसून येणारी व तिऱ्हाइतांचेही मनास चटका

लावणारी स्वामिनिष्ठा, या सद्गुणाची तारीफ, अजमीर-मारवाडचे कमिशनर कर्नल डिक्सन ( सन १८५० ) यांनी केली आहे. नेबुहर लिहितो की, ' हिंदूइतके परधर्मसहिष्णु लोक पृथ्वीचे पाठीवर दुसरे कोणीच नाहीत. तसेच प्राणिमात्रास होतां होईल तों कोणतेंही दुःख द्यावयाचे नाहीं, ही प्रवृत्ति जगांत कोठें उत्कटत्वानें वसत असेल तर ती हिंदु लोकातच वसत आहे. मॉनियर विल्यम्स Modern India & Indians या ग्रंथांत ( पृ. ३३ ) लिहितात की, ' हिंदी लोक जाणूनबुजून केव्हांही प्राणिहत्या करीत नाहीत. जगात आपणही जगावें व इतरासही जगूं द्यावें, हे त्याचे तत्त्व आहे. आकाश निरभ्र होऊन चक्क ऊन पडलें असता इंग्रज गृहस्थास अति आनंद होतो; व या आनंदाचें प्रदर्शन म्हणून तो जंगलात जाऊन काही निरुपद्रवी प्राणी ठार मारून टाकतो ! इंग्रजाच्या ह्या चमत्कारिक मनोवृत्तीची हिंदु लोकास कल्पनाच होत नाहीं. ' एल्फिन्स्टनसाहेब आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासात ( पृ. १९९ ) लिहितात !—' खेड्यात राहणारे लोक निरुपद्रवी, गरीब, कुटुंबीयावर प्रेम करणार व शेजाऱ्यांशी ममतेने वागणारे असे असून सरकाराखेरीज इतर सर्वांशी ते प्रामाणिकपणाने व सच्चा दिलाने वागतात. ' सन १८१३ साला ब्रिटिश पार्लमेंटपुढे साक्ष देताना कॅप्टन सिडनहॅम हिंदूंच्या अनेक सद्गुणाचे वर्णन करून म्हणाले की, ' त्यांची ग्राहकशक्ति व बुद्धि तीव्र असून ते उद्योगी व इमानी आहेत. धर्मादाय, परोपकार व मातापितृभक्ति या संबंधाची सर्व कर्तव्ये योग्य काळीं बिनचूकपणे व मनःपूर्वक करण्याचे कामात हिंदु लोक जगातील इतर कोणत्याही राष्ट्राची बरोबरी करतील ( मिलचा हिंदुस्थानचा इतिहास पृ. ५२३ ). ' बांधवाविषयींची आपली सामाजिक कर्तव्ये कोणती व ती कशी करावीं, हे हिंदु लोकास युरोपियनाइतकेंच-किंबहुना त्याचेपेक्षा जास्त चांगलें-समजतें ' असें अॅबे डुबॉईस या प्रवाशाने मत दिले आहे. वर उल्लेख केलेल्या पार्लमेंटपुढील चौकशीत सर जॉन माल्कम म्हणालेः—' बहार प्रांतांतले लोक शरीराने जसे उंच व ताकदवान् आहेत तसेच ते मनानेंही शूर, उदार, दयाळू, सत्यनिष्ठ व धैर्यवान् आहेत. इमान आणि अन्न यासंबंधाची त्यांची निष्ठा फार उच्च दर्जाची आहे; व तीसंबंधाने नेहमीं अशीं उदाहरणे घडून येत असतात की ती इतिहासापेक्षा कादंबऱ्यातच जास्त शोभतील, असे कोणीही इंग्रज म्हणेल. त्याच्या इतके विश्वासू लोक तर मला दुसरे कोणतेच माहीत नाहीत. इंग्लंडशी हिंदुस्थानाचा व्यापार खुलेपणाने सुरू झाला तर हिंदूंच्या

संस्कृतीची अभिवृद्धि होईल, असे तुम्हास वाटते काय ? असा प्रश्न विचारला असता सर थॉमस् मनरो यांनी उत्तर दिलें कीं, ' धर्मभोळेपणा व दुराग्रह नष्ट करणारें उदार शिक्षण आणि राजनीति या दोन गोष्टींत हिंदु लोक युरोपियनांपेक्षा कमी आहेत. परंतु श्रेष्ठ प्रतीची कृषिपद्धति, अद्वितीय हस्तकौशल्य, सौख्य किंवा चैन यास आवश्यक असलेल्या सर्व वस्तु निर्माण करण्याची योग्यता, प्रत्येक गावांत लिहिणे, वाचणे व गणित शिकविणारी शाळा असणे, * एकमेकांशी सभ्यतेचें, आदरसत्काराचें व परोपकाराचें आणि विशेषतः स्त्रियांशी विश्वासाचें, आदराचें व मार्दवयुक्त वर्तन ठेवणे, हे गुण अंगीं असणे ही जर सुधारलेपणाची लक्षणें असतील, तर या बाबतींत हिंदु लोक कोणत्याही युरोपियन राष्ट्राहून कमी नाहीत. सुधारणा किंवा संस्कृति ह्या वस्तूंची जर दोन राष्ट्रांत देवघेव करावयाची असेल तर हिंदुस्थानच्या ह्या माल आयात करण्यांत इंग्लंडचाच पुष्कळ फायदा होईल, अशी मला खात्री वाटते ! ' ' ( If civilization is to become an article of trade between two countries, I am convinced that England will gain by the import cargo. ) '

व्यक्तीचें किंवा राष्ट्राचें शील त्याच्या ग्रंथांत व वाङ्मयांत सहज व स्पष्टपणे दिसून येते; विशेषतः वाङ्मयविषयक वादविवादाची तऱ्हा व स्वरूप यावरून तर याची हटकून परीक्षा होते. अशा तऱ्हेचा वादविवाद हिंदुस्थानचे पंडित आणि युरोपियन संस्कृत ' स्कॉलर ' व इतर विद्वान आपसांत व एकमेकांत करीत असतात. याचा २० वर्षे अनुभव घेतल्यानंतर मॅक्स म्युलर साहेबांनी असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे कीं, ' अशा तऱ्हेच्या वादविवादांत युरोपियन पंडित एकमेकांवर व्यक्तिविषयक हल्ला करतात, एवढेंच नव्हे तर विपर्यास व सत्यापलाप याचाही अवलंब करतात. असल्या वादविवादांत विजय व स्तुति यांच्यापेक्षा सत्य व स्वाभिमान यास जास्त किंमतवान मानणारे पंडित कुचकामाचे होत, अशी त्यांची भावना असते. व तीस अनुसरून, वादविवाद करताना ते जाणूनबुजून

---

* हे विधान कित्येकांस आश्चर्यकारकच वाटेल; पण तशी वस्तुस्थिति नाही. सरकारी शाळा सुरू होण्यापूर्वी बंगाल्यांत ८० हजार गावठी शाळा होत्या; सन १८३५ मध्ये ह्या शाळांचें प्रमाण ४०० माणसांस १ असे पडत होते. मद्रासमध्येंही ३ ते १ मुलगा या गावठी शाळांत शिकणारा असे, असे सरकारी रिपोर्टच आहेत !

खोटीं विधानें करण्यासही कमी करीत नाहीत. पण हिंदुस्थानच्या पंडितांची तऱ्हा याचे उलट आहे. वादविवादांत ग्राम्य शिव्या व उद्धट भाषा वापरणारा पंडित असभ्यच नव्हे तर अज्ञानीही आहे, असे ते मानतात. युरोप-अमेरिकेत वादविवाद चालला असता पंडितांत जितकी सत्यनिष्ठा, औदार्य व उमदेपणा दिसून येतो, त्याहून ज्यास्त सत्यनिष्ठा, औदार्य व उमदेपणा हिंदी पंडितांत दिसून आला आहे. ते वादविवादांत चिकाटी व सत्याग्रह दाखवितात, पण उद्धटपणा त्यांच्यांत कधींही दिसून आला नाहीं. चूक झाली तर ती कबूल करण्यास ते नेहमीं तयार असतात, व प्रतिपक्षाची चूक झाली तरी तीबद्दल ते त्याचा उपहासही करीत नाहीत ( They have displayed a far greater respect for truth, and a far more manly and generous spirit than we are accustomed to even in Europe and America. They have shown strength but no rudeness When they were wrong they have readily admitted their mistake; when they were right they have never sneered at their European adversaries. ) ' जगातील इतर कोणत्याही देशापेक्षा हिंदुस्थानांत व्यापारी दानत किंवा अब्रू ही जास्त असून विल नाकारल्याची उदाहरणें तिकडे बहुधा घडतच नाहीत ' अशी ग्वाही इंग्रज व्यापाऱ्यांनी अनेकदा मजपाशी दिलेली आहे ( India what can it teach us P. 63) हिंदुस्थानचे पहिले गव्हर्नर जनरल वॉरन हेस्तिंग्स यांनी पार्लमेंटच्या कमिटीपुढे साक्ष देताना सांगितलें कीं, ' हिंदुलोक मानवी मनोविकारांच्या दुष्ट मार्गांपासून इतर कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्राइतकेच पराङ्मुख अ[illegible] अन्यायाचा सूड उगविण्यापेक्षा उपकाराबद्दल कृतज्ञता दर्शविण्याचाच [illegible] जास्त तयारी असते. ' बिशप हेबर यांनी लिहिले आहे कीं ' सौम्य व स्वभाव, नैसर्गिक ग्राहकशक्ति व कुशाग्र बुद्धि हे गुण मानवजातींत सा[illegible] आढळतात त्याहून ते अधिक प्रमाणांत हिंदु लोकांत वसत आहेत, असा अनुभव आलेला आहे. ' प्रो० विल्सन यांनी लिहिले आहे कीं, ' हिं[illegible] सामान्यतः अगदीं साध्या व सरळ स्वभावाचे असून त्यास व्यवहारांतले [illegible] कळत नाहींत. युरोपियन सुधारणेचा प्रचार जेथें पुष्कळ काळ झाला आहे ते[illegible]

लोकातून मात्र हे गुण नष्ट होत चालले आहेत. *विद्वान हिंदु लोकही उद्योगी, बुद्धिमान, आनंदी व मोकळ्या मनाचे असतात. बारा-तेरा वर्षांच्या हिंदु मुलात पुष्कळ वेळा अपूर्व व आश्चर्यकारक ग्राहकशक्ति आढळते. बुद्धिमत्ता, ग्राहकशक्ति व अभ्यासितपणा या गुणात हिंदु मुले युरोपियन मुलाहून वरचढ आहेत. घरंदाज व श्रीमान हिंदुलोकातही सभ्य चालरीत, बुद्धीची विशदता व व्यापकता, मनाचें औदार्य व वर्तनाचा बाणेदारपणा हे गुण इतक्या प्रकटत्वाने दिसून येतात की, जगातील कोणत्याही देशात त्याची गणना सद्गृहस्थातच ( Gentlemen ) होईल. ' ( मिलचा हिंदुस्थानचा इतिहास, Vol. I. P. 530-32. ). ' हिंदु लोकाहून अधिक धार्मिक व कर्तव्यनिष्ठ लोक मला युरोपात कोणीही आढळले नाहीत ' असे प्रो० मोनियर विल्यम्स यांनी लिहिले आहे ( Modern India & Indians P. 88 & 128 ). एल्फिन्स्टन साहेब आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासात ( पृ. ३७५-८१ ) लिहितातः-' हिंदु व इंग्रज यांची तुलना करता असे आढळून येते की, हिंदूंत इतर कोणतेही दुर्गुण असले तरी त्यांच्यात मद्यपानाचें व्यसन व असभ्यता हे दोष नसल्यामुळे त्यांची चालचलणूक इंग्रजापेक्षा अधिक शुद्ध असते. इंग्लंडातल्या मोठ्या शहरांतील अत्यंत कनिष्ठ दर्जाचे लोक जितके नीतिभ्रष्ट असतात, तितका हिंदूमधील अगदी कनिष्ठ वर्गही नीतिभ्रष्ट नाहीं. ' सन १८३२ साली पार्लमेंटपुढे आलेल्या रिपोर्टावरून काढलेल्या चार वर्षांच्या आकड्यांची खालील तुलना या बाबतींत पहाण्यासारखी आहे.

| | इंग्लंड व वेल्स. | बंगाल. |
|---|---|---|
| ोकसंख्या. | १३० लक्ष | ६ कोट. |
| ोशाची शिक्षा आलेल्यांची वार्षिक सरासरी. | १२३२ | ५९ |
| ा गेलेल्याचे लोकसंख्येशी प्रमाण. | २०३२८१:१ | १००४१८२.१ |
| ेच्या लोकाचे प्रमाण | ६७१७३.१ | ४०२०१०:१ |

सिद्ध शास्त्रज्ञ डार्विन याने प्रवासात असताना पोर्ट लुई येथील तुरुंगात

---

The longer we possess a province, the more mon and grave does perjury become ' असे सर जी. यांनी लिहिले आहे. ( S. Johnson 's Oriental Religions, lia p. 288. )

हिंदु कैदी पाहिले. तेव्हा त्यांची चालचलणूक पाहून या शास्त्रज्ञास आश्चर्य वाटले, व त्याचे मनात त्यांचेविषयी मोठाच आदरबुद्धि उत्पन्न झाली. तो लिहितो—हे कैदी शांत असून त्यांचें वर्तन चांगले आहे. त्यांची बाह्य वर्तणूक, त्यांची स्वच्छता व रोजचे आपले धार्मिक आचार पाळण्यांतील त्यांची तत्परता हीं पाहणारास, न्यू सौथ वेल्सच्या तुरुंगांतील आपल्या कैद्यांचा जसा आपणांस तिरस्कार वाटतो तसा त्यांचे संबंधाने वाटणे शक्यच नाही ' ( A naturalist's Voyage round the world p. 454). हिंदूंच्या कृतज्ञतेसंबंधाने एल्फिन्स्टन साहेबांनी असा अभिप्राय दिला आहे की, ( हिंदुस्थानचा इतिहास पृ० २०१, २०२ ) ' बऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं केलेल्या उपकाराबद्दल ते इतके कृतज्ञ असतात की, ते अधिकारी अधिकारच्युत व दरिद्री झाले तरी ते त्यास मदत करतात; किंबहुना त्यांचे पश्चात् त्यांच्या कुटुंबाचाही परामर्ष घेतात. बंगाल्यातील असाच एक बडा अधिकारी बडतर्फ होऊन इंग्लंडात दारिद्र्यात दिवस कंठीत होता. त्यास एका मराठा ब्राह्मणाने या संकटकाली निरपेक्षपणे १ लक्ष रुपयांची मदत केली. एवढेच नव्हे तर पुढें ही रक्कम परत करीत असताही ती घेण्याचे त्याने नाकारले'. ' हिंदी शिपायाच्या इमानाबद्दल हाच इतिहासकार लिहितो की, ' आणीबाणीच्या प्रसंगी हिंदी शिपायांनी आपल्या परकीय धन्याबद्दल जितकी निष्ठा व जितके इमान दाखविले आहे, तितकी निष्ठा व तितके इमान दुसऱ्या कोणत्याही देशातील शिपायांचे वर्तनात स्वदेशीय धन्यासंबंधानेही आढळणे कठीण आहे ' ( The fidelity of our sepoys to their foreign masters has been shown in instances which it would be difficult to match even among national troops in any other country. ) ' शरीरे व घरेदारे स्वच्छ ठेवण्याचे बाबतीत हिंदुलोक दक्षिण युरोपातील लोकांहून श्रेष्ठ आहेत, येवढेच नव्हे तर स्वच्छता ठेवण्याच्या त्यांच्या काही चाली उत्तर युरोपातील लोकांनीही अनुकरण करण्यासारख्या आहेत ! ' असें एकाने लिहिले आहे.

मद्यमांसाविषयींचा हिंदूंचा तिटकारा जगप्रसिद्ध आहे. काहीं हिंदुजातींस मांसाशन निषिद्ध नाही हे खरें; पण त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति प्राणिमात्राशीं ममतेनें वागण्याची आहे मांस निषिद्ध नसलेल्या जातींचेंही तें-मुसलमान किंवा युरोपियन यांचे प्रमाणें-रोजचें अन्न नाही. आणि असें असण्याचे कारण धर्मांधता किंवा फाजिल

सोंवळेपणा हे नसून त्याचे मुळाशीं एक मोठेंच शास्त्रीय तत्त्व आहे. ' सुधारणेचा इतिहास ' नावाच्या ग्रंथांत बकल नामक प्रसिद्ध इंग्रज इतिहासकाराने असा सिद्धान्त प्रणीत केला आहे कीं, ( Vol. I. P. 64. ) थंड देशांतल्या लोकांपेक्षा उष्ण देशांतल्या लोकांच्या शरीरपोषणास मांसादि कर्ब विशिष्ट (Crabonaceous ) अन्नापेक्षा पिष्टांश (Starch)-विशिष्ट व (Oxygenous-) ऑक्सिजनविशिष्ट धान्यादिकांचीच जास्त आवश्यकता आहे. शिवाय उष्णदेशांतील हवेचाच नैसर्गिक परिणाम असा होतो कीं, मनुष्याचे हातून विशेष परिश्रमाचें काम एकसारखें होत नाहीं, तो लवकर थकतो व त्याचे मनास उत्साह राहत नाहीं. या गोष्टीचा अनुभव उष्ण देशांतल्या लोकांसही हिंवाळा व उन्हाळा यांतील कामाचे प्रमाणावरून सहज येतो. हे दोन सिद्धान्त लक्षांत घेतले असतां हिंदुलोकांत मांसाशनाबद्दल इतकी पराङ्मुखता कां, ते मुख्यतः शाकाहारीच कां व त्यांतही तांदुळावरच बहुतेक त्यांची मदार कां, याचा सहज उलगडा होतो. इतर धान्यांपेक्षा तांदुळांत पिष्टांश जास्त असून थोड्या श्रमानें त्याचे पीक मुबलक येते, कारण भाताचें पीक मूळ बियाण्याचे ६० पट येतें, असें प्रमाण आहे. अर्थात हिंदुलोक भातखाऊ बनण्यांत केवळ निसर्ग-देवतेच्या नियमांचेंच पालन करीत आहेत हे यावरून दिसून येईल. इंद्रियजन्य विषयसुखाच्या अतिसेवनापासून शरीरावर व मनावर होणारा अनिष्ट परिणाम थंड हवेपेक्षा उष्ण हवेच्या देशांत अधिक प्रमाणांत व जास्त त्वरित होतो. अर्थात उष्णदेशांत राहणाऱ्या लोकांस आपले राष्ट्र शारीरिक, मानसिक व बौद्धिक बाबतींत जोमदार स्थितींत अखंड राखण्याकरतां शक्य तितके विषयसुखपराङ्मुख होणें भागच पडतें. जीवनशास्त्र, मानसशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांस लागू पडणारा हा महासिद्धान्त आणि सामान्य माणसें वैद्याच्या उपदेशापेक्षा धर्माज्ञेवर जास्त विश्वास ठेवतात हा मनुष्यस्वभाव आर्य ऋषींस माहीत होता; म्हणूनच त्यांनीं आर्य राष्ट्राचीं मनें धर्मबंधनांनीं जखडून प्रवृत्तीपेक्षा निवृत्तीचेंच मार्गाने नेऊन त्यांचेवर महदुपकारच केले आहेत, असें कबूल करणें भाग आहे. असो; हिंदूंच्या या आहारपद्धतीचा परिणाम त्यांच्या मानसिक, शारीरिक व बौद्धिक स्थितीवर इष्ट असाच झालेला आहे. सन १८८१ सालीच सुमारास इंग्लंडमध्ये वेड्यांचे प्रमाण दहा हजारांत ३० होतें, तेंच हिंदुस्थानांत त्या वेळीं सुमारें दहा हजारांत ३ असें होतें. गेल्या खानेसुमारींत हिंदुस्थानांत हे प्रमाण एक लक्षांत २६ व २७ यांचे दरम्यान पडलें आहे. मुंबई इलाख्यांत हे प्रमाण पारशांत १६०, युरोपियनांत १३० व

# प्रकरण ५ वें.



## भारतीयांचा क्षात्रधर्म.

मागील प्रकरणात भारतीयांच्या एकंदर शीलासंबंधाने पाश्चात्य प्रवासी व ग्रंथकार यांच्या अभिप्रायांचे आधारे विवेचन केले. या प्रकरणात त्यांचे शौर्य धैर्य, देशभक्ति, धर्मयुद्ध-प्रीति अर्थात या सर्व गुणांचा अंतर्भाव करणारा जो त्यांचा क्षात्रधर्म त्यासंबंधाने लिहावयाचें आहे. शीलात समाविष्ट होणाऱ्या यवल्याच गुणाचा निराळा विचार करण्याचे कारणही उघड आहे. राष्ट्रांत काय किंवा व्यक्तींत काय इतर सात्त्विक व राजस सद्गुण कितीही असले, तरी त्याचे अंगी शौर्य, धैर्य, देशभक्ति, करारीपणा, इत्यादि क्षात्रवृत्ति कोणत्या तरी रूपानें वसत नसतील तर त्याला जगात कोठेही मान मिळणार नाही. ' यस्यास्ति वित्तं स नरः कुलीनः । स पंडितः सः श्रुतवान् गुणज्ञः ॥ स एव वक्ता स च दर्शनीयः । सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयंति ॥ ' हें सुभाषित सामान्य व्यक्तिविषयक व्यवहारात खरें असलें तरी त्यातील तत्त्व राष्ट्रास लागू करताना, वित्त-काञ्चनाचे जागी शौर्यादि शब्दच घालावे लागतील. जपानी राष्ट्राने रणभूमीवर पराक्रम गाजवून रशियास चारी मुंड्या चीत केल्याबरोबर जपानचे वैभव, जपानचा व्यापार, जपानचे वाङ्मय, जपानची चित्रकला, जपानची समाजव्यवस्था यांचा चोहोंकडे जयजयकार होऊं लागला, त्याचे तरी बीज हेच होय. साराश, शारीरिक नैतिक व मानसिक गोष्टींत मार्दव हा जसा स्त्रीजातीचा मुख्य गुण त्याचप्रमाणे या तीनही बाबतीत मर्दपणा अंगी असणे हा पुरुषवर्गाचा मुख्य पौरुषगुण होय. तो ज्या राष्ट्राचे अंगी नसेल त्याचेबद्दल इतरांना फार तर दया वाटेल व कीव येईल, पण आदर वाटणार नाही. करता या पौरुषवृत्तीच्या किंवा क्षात्रधर्माच्या कसोटीस भारतीय राष्ट्र कितपत उतरतें ते आता पाहूं.

वर सांगितलेल्या पौरुषवृत्तीच्या मुळाशी एक महत्त्वाचे तत्त्व किंवा मनोवृत्ति आहे. ती ही की, मनुष्यास सामान्यतः जरी आपले प्राण अत्यंत प्रिय असले, तरी त्यास प्राणाहूनही अधिक प्रिय अशी कोणती तरी वस्तु, कोणते तरी ध्येय असावे लागते. ते

नसल तर त्याचे अंगीं पौरुषत्वाचाच नव्हे तर मनुष्यत्वाचाही तुटवडा आहे, असे खास समजावें. सामान्यतः गरीब असणारा शेतकरी जुलमी जबरदस्ताचे कोरडे दीनदुबळेपणानें पाठीवर सोशील; पण त्याच्या स्त्रीचें पातिव्रत्य किंवा त्याचा धर्म भ्रष्ट करूं पाहणाऱ्याच्या नरडीचा घोट घेण्यास तो धावून जाईल. प्रसंगी तो त्याकरता स्वप्राणत्यागही करील! कुलीन प्रतिव्रता स्त्री दुष्ट चोरास भिऊन अंगावरचे सर्व दागिनें स्वतः काढून त्याचे हवाली करील; पण एकादा दुष्ट कामुक तिचा पातिव्रत्यालंकार हरण करूं पाहील तर अन्य उपाय हरल्यास ती त्याचा तरी प्राण घेईल किंवा आपला तरी देईल! याचें कारण हेंच कीं, तिला दागिन्यांपेक्षा प्राणाची किंमत अधिक वाटते; पण प्राणापेक्षाही ती पातिव्रत्यास जास्त मोलवान् मानते. क्षात्रवृत्तीच्या मुळाशीही अशाच प्रकारचे तत्त्व आहे. स्वदेश, स्वराज्य अगर आपला राजा, त्याचे वैभव, इभ्रत किंवा स्वातंत्र्य, अगर आपलें इमान याची योग्यता स्वप्राणाहूनही अधिक मानणे हे क्षात्रवृत्तीचे मूळ तत्त्व असून ते प्राचीन भारतीयांत उत्कटत्वानें व अर्वाचीन लढाऊ जातींतही बहुताशानें वसत आहे. हें तत्त्व हा अभिमान व रोमरोमी खिळण्यास जीवन व मरण याचे संबंधाचे भारतीयाचे तत्त्वज्ञानही पुष्कळ अंशी कारणीभूत झालेलें आहे. पूर्वजन्म-पुनर्जन्म आणि कर्मफलवाद हा हिंदुधर्माचा एक मोठा विशेष असून तो त्याच्या सर्व प्रकारच्या व्यवहारात प्रविष्ट झालेला दिसून येतो. दोन दिवसांच्या मधील जशी रात्रींची निद्रा तशी मृत्यु ही दोन जन्मांचे मधील निद्रा होय; मरण म्हणजे जीवानें एक बिऱ्हाड सोडून नवें बिऱ्हाड करणे किंवा जुनीं वस्त्रे टाकून नवी धारण करणें आहे. हे तत्त्व ज्याच्या मनोभूमींत कायमचे रुजले त्यास विशिष्ट उच्च हेतूंकरिता येणाऱ्या मरणाचे किंवा प्राणत्यागाचें मुळीच भय वाटावयाचे नाहीं, हें उघड आहे. भरतखंडातले प्राचीन भारतीय योद्धे किंवा अर्वाचीन लढाऊ जाती यांचे अंगी दिसून येणाऱ्या मरणाविषयींच्या विलक्षण निर्भयतेचे खरे व मूळ कारण त्यांच्या या धर्मतत्त्वातच आहे. ' जेव्हा एकादें अनिवारणीय संकट अंगावर येऊन कोसळतें, तेव्हा हिंदु लोकांतल्या अगदी कनिष्ठ वर्गातलाही पुरुष जी शांतवृत्ति दाखवितो, ती पाहून युरोपियन लोक तोंडात बोटच घालतील ' असे जें सर्टिफिकिट एल्फिन्स्टनसाहेबांनी ( हिंदुस्थानचा इतिहास पृ. १९८-१९९ ) दिलें आहे, त्याचें तरी कारण वरील तत्त्वातच सापडणार आहे.

दिग्विजयी शिकंदर बादशहाच्या मोहिमेंत त्याच्या ग्रीक सैन्यास ज्या

राष्ट्रांशी लढावे लागले, त्यांत त्यांस भारतीयांइतके शूर राष्ट्र दुसरे कोणतेच आढळले नाही, अशी त्यानी स्वतःच साक्ष दिलेली आहे ( किता पृ. १९७ ). शिकंदराच्या विजयी सैन्याने पंजाबापलीकडे जाण्याचे नाकारले व त्यास तेथूनच परतावे लागलें, याचे मुख्य कारण मध्यदेशच्या बलाढ्य हिंदु राजाच्या पराक्रमाची त्यास दहशत वाटत होती, हेच होय; व अलेक्झांडर पुढे चाल करून जाता, तर त्याच्या अखंड-विजयी सैन्यास कदाचित् पराभूतही व्हावें लागलें असते, असेंही कित्येक इतिहासकारानी लिहिले आहे ! अकबरकालीन इतिहासकार आबुल फाझल लिहितो की, ' विशेषतः संकटकाळी हिंदूंचे शील जास्तच उज्ज्वलता पावलेले दिसून येते. रणभूमीतून पाय काढून पळून जाणे हें रजपुतास मुळीं माहितच नाहीं. युद्धात यश येणार नाही. असे दिसूं लागताच तो पलायनाचा विचार करीत नाही; तर तो घोड्यावरून खाली उतरतो व शत्रूंत घुसून प्राण जाईपर्यंत लढत रहातो ! ' प्राणात होईपर्यंत लढण्याचा निश्चय झाला म्हणजे स्पार्टन योद्धे विशिष्ट केशरचना करीत, त्याप्रमाणे रजपूत शिपाइ अशावेळीं केशरी पोषख करीत. दारा व अवरंगझेब-मुराद याचेमध्यें झालेल्या धोलपूरच्या युद्धात बादशाही फौजेसह दाराने पळ काढला, पण बुंदीचा रजपूत राजा मरेपर्यंत रणभूमीवर एकटाच लढत होता. ' रणातून पळून जाणाऱ्या भ्याडाचा धिक्कार असो. मी बादशाही निमक खात असून माझे पाय या रणभूमीवर मी कायमचेच रोवले आहेत. विजय मिळाल्यावाचून तेथून जिवंत परत जाईल, तो निमकहराम होय. असे उद्गार या वेळी त्याने काढले ! उज्जयिनी व धोलपूर या दोन लढायात बुंदीच्या घराण्यातील १२ राजपुत्र व हाडा-रजपुताच्या सर्व घराण्याचे मुख्य कर्ते पुरुष ठार झाले ! अशी हकीगत देऊन कर्नल टॉड ( Where are we to look for such examples) शौर्याची व निष्ठेची असली उदाहरणे आपणास कोठे सांपडतील ? असा आदराश्चर्ययुक्त प्रश्न विचारतात. ( राजस्थानचा इतिहास Vol II. पृ.४८१.)

जहांगीर बादशहा वैभवाशिखरास चढला होता, अशा वेळीं त्यास त्याचेच छावणीत अचानक कैद करण्याचे, मोगलांचे इतिहासातील जें अति अद्‌भुत धाडसाचे कृत्य, ते मोहबतखानानें सिसोदिया रजपुताच्याच साह्याने केले. खुद्द मोहबतखानही धर्माने मुसलमान पण जन्मानें रजपूत असून तो राणा प्रतापसिंह याच्या सावत्र भावाचा मुलगा होता. अकबर, जहांगीर व अवरंगझेब यास मिळालेल्या महत्त्वाच्या सर्व विजयांचें श्रेय त्याच्या रजपुत

दोस्त राजाकडेच आहे. मोंगलांकरतां हेच रजपुत अफगाणिस्थानाच्या हिममय डोंगराळ प्रदेशात अफगाणासारख्या कडव्या लोकांशी लढले आहेत. अशी साक्ष खुद्द वरील बादशहानी दिलेली आहे. मोंगलाच्या राज्यविस्ताराचे निमे अधिक श्रेय ( लाख तलवार रहाटोरन ) राहटोराच्या लाख तलवारी कडेच आहे. पण मोंगलबादशहांनी अशा शूर व इमानी दोस्तांच्या साह्याचे चीज केले नाहीं. जोधपूरच्या जसवंतसिंगास काबूल येथे व त्याचा पुत्र पृथ्वीसिंग यास दिल्ली येथे अवरंगझेबाने विषप्रयोग करवून मारविले, व मगच हिंदूंवर झिजियाची दुःसह डोईपट्टी बसविण्याची त्यास छाती आली ! उघड युद्धात ज्याशी सामना करण्याचा आपणात वकूब नसेल त्यास विषप्रयोगाने नाहींसे करण्याच्या ह्या युक्तीचा अवलंब एकदा अकबरानेही केला होता म्हणतात. अकबराचे पश्चात सेलिमचे ऐवजी अकबराचा पुतण्या खुस्रु यास गादी मिळावी, असा अंबरचा राजा मानसिंग याचा इरादा अकबरास कळला. तेव्हा त्याने एक माजूमची वडी तयार करून तिच्या एका बाजूस विष लावले. पण वडी मोडून मानसिंगास देताना चुकून चांगला भाग मानसिंगाकडे गेला व विषारी भाग अकबराने खाल्ला ! अशा प्रकारचे कपटाचरण, साम्राज्यमद व धार्मिक छळ यांनी रजपूत लोकास गांजून मोंगलांनी आपले कट्टे शत्रू बनविले नसते तर त्यांनी नादीरशहास दिल्लीची धूळदाण कदापि करूं दिली नसती. असो; रजपूत जसे शूर होते तसेच त्यांचे शरीरसामर्थ्यही अचाट होते. खोरासानच्या बादशहाने दिल्लीच्या बादशहाकडे एक लोखंडी धनुष्य पाठवून ते वाकविणारा कोणी वीर तुम्हापाशीं आहे काय, अशी उद्दामपणे पृच्छा केली होती. तेव्हा हे धनुष्य वाकविणारा दिल्लीस कोणीही निघाला नाहीं. पण मर्दीकुळातला प्रचंड पुरुष सोनिगदेव याने हे धनुष्य वाकविले येवढेच नव्हे तर मोडूनही टाकले ! कर्नल टॉड लिहितात—' कुरूंशी तुलना करता त्यांचे पुढे होमरचे वीर पुरुष क्षुद्र वामनमूर्तीच ठरतील. कुरूंचे हातातले कडे अजॅक्सला तुसते उचलता तरी आले असते की नाही याची शंकाच वाटते. ' ( Homer's heroes were pigmies to the Kurus, whose bracelet we may doubt if Ajax could have lifted—टॉडचा इतिहास Vol II. पृ. ८१. )

प्राचीन भारतीय क्षात्रियाची परंपरा रजपुतात मात्र कायम राहिली असून तीवरून प्राचीन क्षत्रियाच्या क्षात्रधर्माची बरीच स्पष्ट कल्पना करता येईल.

रजपुताइतकी शूर, इमानी व उमदी जात पृथ्वीच्या पाठीवर पूर्वीही कोणती आली नाही व पुढेंही होणार नाही. कर्नल टॉड यांनी लिहिलेल्या इतिहासा-सारखा, महाकाव्यांतच शोभतील अशा अद्भुत शौर्याच्या पण खऱ्याखुऱ्या कथांनी भरलेला, इतिहास जगांत दुसऱ्या कोणत्याही प्राचीन व अर्वाचीन राष्ट्राचा नाही. अर्थात रजपुतांच्या शौर्यादि क्षात्रवृत्तीची वरच्या सारखी उदाहरणे त्यांच्या इतिहासांतून हजारों देतां येतील. येवढेच नव्हे तर रजपुतांच्या उज्ज्वल इतिहासांत अस्सल क्षात्रधर्म मूर्तिमंत उतरलेला कोणासही दिसून येईल. रजपुतांच्या क्षात्रधर्माचें स्वरूप टॉडने दिलेल्या पुढील आशयाच्या अभिप्रायावरून कोणाचेंही सहज लक्षांत येईल. टॉडसाहेब ( इतिहास Vol I. पृ. २५९ ) लिहितात कीं, " रजपुतांचे रक्तांत जसा उत्साह तसेंच धाडसही भरपूर आहे. परंतु शत्रूचा निःपात करण्याची योग्य वेळ येईपर्यंत बाह्यतः औदासिन्यासारख्या दिसणाऱ्या खिसपणानें व सहनशीलतेनें वाट पाहण्याचेंही सामर्थ्य त्यांचे अंगीं आहे. अनेक शतकें राजकीय जुलूम, छल व पारतंत्र्य यांत दिवस कंठावे लागल्यामुळे बहुतेक जमीनदोस्त झाल्यानंतर ज्यांनी पुनः डोकें वर काढलें आणि संकटांच्या घर्षणानें जणुं धैर्य तीक्ष्ण होऊन वाडवडीलांच्या चालीरीती व धर्म आणि संस्कृति ज्यांनी कायम राखली असें मनुष्य जातीच्या इतिहासांत एकटें रजपूत राष्ट्र आहे; व याचें सर्व श्रेय त्यांच्या वरील गुणाकडेच आहे. कांहीं रजपूत मोंगलाकडे गेले, कांहीं फितुर झाले; कांहींनी धर्मांतर केलें व कांहींनी आपल्या लेकीही मोंगल बादशहास दिल्या. पण अशा अभिमानशून्य व भ्रष्ट घराण्यांचीं राज्यें नष्ट झालीं किंवा संपुष्टांत आलीं. पण ज्यानें अखेरपर्यंत स्वधर्माचें व स्वातंत्र्याचें रक्षण केलें व ज्यानें सुरक्षितपणाकरतां आपली अब्रू शत्रूस विकली नाहीं, तें मेवाडचें राज्य अद्याप अभंग कायम असून तें आपलें पूर्वचारित्र अभिमानानें संभाळीत आहे. रोमन लोकांच्या दडपणाखालीं प्राचीन ब्रिटन लोकांची काय अवस्था झाली ती पहा. त्यांनी आपलीं मंदिरें, पुरोहितवर्ग व वृक्षवनें यांचें संरक्षण करण्याचा खूप प्रयत्न केला; पण तो अखेर निष्फळ ठरला. रोमन लोकांचे मागून सॅक्सन आले, त्याजपुढेंही त्यांनी माना वाकविल्या; डेन लोक आले तेव्हांही हाच प्रकार झाला. ह्या सर्व जातींच्या लोकांपासून जन्मलेली मिश्र जातही अखेर नॉर्मन लोकांनी पादाक्रांत केली. स्वारी करणाऱ्या शत्रूनें एकाच युद्धानें सबंध राज्य जिंकावें आणि जित्याचा धर्म व समाज जेत्याच्या धर्मांत व समाजांत

पुरता बुडून मिसळून जावा, असाच प्रकार तेथें झाला. पण रजपुतांची स्थिति पहा. त्यांचीं कांहीं राज्यें नामशेष तर कांहीं संकुचित झालीं; पण त्यांनीं आपला धर्म व रीतीभाती यांचा अल्पांशही शत्रूला पादाक्रांत करूं दिला नाहीं." (How did the Britons at once sink under the Romans and in vain strive to save their groves, their druids or the alters of Bal from destruction! To the Saxons they alike succumbed: they again, to the Danes; and this heterogeneous breed to the Normans. Empire was lost and gained by a single battle, and the laws and religion of the conquered merged in those of the conquerors. Contrast with these the Rajputs; not an iota of their religion or customs have they lost though many a foot of land and some of their states have been expunged from the map.)

क्षात्रधर्मामध्यें अंतर्भूत होणारा दुसरा गुण म्हटला म्हणजे देशभक्ति हा होय. स्वामिनिष्ठा व इमान याचाही अंतर्भाव याच व्यापक गुणांत केला पाहिजे. देशभक्तिशून्य शौर्याची किंमत पातिव्रत्यशून्य सौंदर्याइतकी मानली पाहिजे. जो धन देईल तो धनी, असे मानून त्याचे सेवेस आपलें सौन्दर्य व तारुण्य अर्पण करणाऱ्या वेश्या आणि त्यास आपलें शौर्य विकणार भाडोत्री शिपाई, यांची योग्यता अर्थातच सारखी आहे. म्हणूनच व क्षात्रधर्मांत शौर्याइतकेंच किंबहुना त्याहूनही जास्त देशभक्तीस महत्त्व दिलेलें असतें. या देशभक्तीच्या गुणांतही रजपुतांचा इतिहास भारतीय क्षत्रियांच्या श्रेष्ठत्वाची ग्वाही देत आहे. 'स्वदेशभूमीचे नांवांतील अपूर्व जादूने रजपुतांचीं मनें विलक्षण रीतीनें भारून टाकलेलीं असतात. आपली धर्मपत्नी किंवा प्रेमसंबंधी स्त्री यांचा परक्या माणसानें नुसता नामोच्चार केलेला--त्याचें नुसतें नांव* काढलेलेंही -अस्सल रजपुतास खपत नाहीं; तसेंच स्वदेशाचेंही नांव आदरशून्यतेनें कोणी तोंडातून काढलें तर तेंही तो सहन करीत नाहीं. अशा वेळीं अस्सल रजपुताची तरवार

*नांव काढणें म्हणजे वाटेस जाणें, अपमान करणें; असा जो मराठींत अर्थ झाला आहे, त्याचें मुळाशीं हीच रजपूत अभिमानवृत्ति असावी.

एकदम म्यानातून बाहेर पडते ' असे कर्नल टॉड यांनीं ( राजस्थानचा इतिहास व्हा. २ पृ. ४२९. ) लिहिलें आहे ! हिंदुधर्मशास्त्रकारांनीं परदेश-गमन सर्वांस निषिद्ध केलें, यात हिंदू मनाची राजकीय अवनति व राजकीय अदूरदृष्टि दिसून येत असली, तरी अवनत स्थितींत परदेशीं जाऊन आपली मानहानी करून घेण्यापेक्षा पवित्र स्वदेशभूमींतच आयुष्य घालविणें व तेथेच देह ठेवणें, हेंच श्रेयस्कर होय व हीं दोन व्रतें जो पाळील त्यासच स्वर्गप्राप्ति होईल, ही देशभक्तिमय कल्पनाही या निषेधांत स्पष्ट दिसत आहे. रजपुतांचा सगळाच इतिहास देशभक्ति व इमान यांनीं भरलेला आहे. इंग्लंडचा राजसिंह ( पहिला रिचर्ड, )—याचे प्रजाजन जर रजपूत असते तर तो ऑस्ट्रियांतील अंधारकोठडींत इतकीं वर्षें खचित कुजत पडला नसता. मेवाडचा महाराणा प्रतापसिंह व मारवाडचा ठाकूर दुर्गादास यांच्या तोडीची देशभक्ति प्राचीन वा अर्वाचीन कोणत्याही देशाच्या इतिहासांत अत्यंत दुर्मिळच होय. प्रतापसिंहाची बिकट परिस्थिति आणि त्याच्या प्रतिपक्षीयाचें सामर्थ्य याचा विरोध लक्षांत घेता एकसारखें २५ वर्षें झगडणाऱ्या प्रतापसिंहाच्या देशभक्तीची जितकी कडक परीक्षा झाली तितकी कोणाचीच झाली नसेल व त्या परीक्षेत त्याच्या इतका कोणीच कसोटीस उतरला नसेल, असें कोणासही वाटल्यावाचून राहणार नाहीं. 'आशिआंतील प्राचीन व अर्वाचीन राजांमध्यें सर्वश्रेष्ठ ' असें नाव मिळालेला अकबरबादशहा प्रतापसिंहाचा प्रतिस्पर्धी होता. त्याला रुंद मोंगल साम्राज्याच्या सामर्थ्याचें पाठबळ होतें, येवढेंच नव्हे तर मारवाड, अंबर, बिकानेर, बुंदी वगैरे संस्थानची रजपूत राजघराणीं अकबरासच अनुकूळ होऊन त्याच्याकरितां आपल्या तरवारी व आपली मुत्सद्दीगिरी स्वधर्मीय व स्वजातीय प्रतापसिंहावर चालविण्यास एका पायावर तयार होतीं, किंबहुना खुद्द प्रतापाचाच सावत्र भाऊ सगरजी हाही अकबराचे पक्षास जाऊन मिळाला होता. इकडे प्रतापसिंहाची राजधानी चितोड ही शत्रूचे स्वाधीन झाली होती; त्याचे कांहीं आप्तस्वकीय लोभानें फितूर तर कांहीं पराभवानें निराश होऊन गेले होते. इतर कित्येकांचे डोळ्यापुढें, अकबराचे पक्षास जाऊन मिळाल्यास प्राप्त होणाऱ्या पदव्या, धनदौलत, मानमान्यता व सुरक्षितपणा यांचा मोह मूर्तिमंत उभा होता. खुद्द प्रतापसिंहास वीसपंचवीस वर्षें राण्या व राजपुत्र आणि थोडेसे निधाराचे अनुयायी यांसह पर्वतांत व अरण्यांत भटकत व कंदमुळावर उपजीविका करीत फिरावें लागलें. त्यांतच त्याला तान्हा राजपुत्र अमरा यास अरण्यांतील क्रूर

श्वापदें व क्रूरतर माणसें यांचें सहवासात वाढवावयाचें होतें. अशा विपन्न स्थितीत असताही, चितोड व मेवाड पुनः परत मिळवून आपल्या घराण्याची कीर्ति उज्ज्वल करावयाची हा आपला निर्धार त्यानें आमरणात पाळला. संधि साधेल तेव्हा पर्वतातून बाहेर पडून मोंगली सैन्यावर विद्युद्वेगानें तुटून पडून त्याचा नाश करावयाचा व पुनः अरवली पर्वताचे आश्रयास जावयाचें, असा क्रम त्यानें अव्याहत २५ वर्षें चालविला होता! तातेर बादशहापुढे बाप्पा रावळच्या वंशजानें मान वाकविणें किंवा आपल्या मुली त्याच्या जनानखान्यात घालणें ही नुस्ती कल्पनाही त्याचे मनास मरणांतिक वेदना देई. साराश, एका पक्षाकडे प्रबल महत्त्वाकांक्षा, अतुल सामर्थ्य, अपूर्व मुत्सद्दीगिरी, अमर्याद साधन–सामुग्री आणि धर्मप्रसारोत्साह असून दुसऱ्या पक्षाकडे अपूर्व शौर्य, अभंग धैर्य, अतुल इमान व अद्वितीय निष्ठा हीं असून उभयताचा संग्राम पाव शतक सारखा चालला होता. पण अखेर त्यात प्रतापाचीच अजिंक्य देशभक्ति विजयी झाली. कर्नल टाड लिहितात:—'ग्रीसवर झर्मिसची जेव्हा स्वारी झाली तेव्हां ग्रीकांनी जे शौर्य व जी देशभक्ति प्रगट केली, ती पाहून सर्व जग चकित होतें. पण अकबराचें राज्य तत्कालीन सर्व राज्यात अत्यंत बलाढ्य असून त्याचे सैन्यही संख्येनें व लढाऊ तयारीनें झर्सिसच्या सैन्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ होतें. अशा बलाढ्य शत्रूशीं अल्प सामुग्रीचे साह्यानें बिकट परिस्थितीत २५ वर्षें लढणाऱ्या प्रतापाची सर कोणासही येणार नाही. आल्पसपर्वत-तुल्य अरवली पर्वतात अशी एकही खिंड नाही की जी प्रतापानें आपल्या विजयशाली पराक्रमानें किंवा अधिक कीर्तिकर पराजयानें पुनीत केली नाही. हळदीघाट ही मेवाडची थर्मापिली व देवीरचें रणमैदान हें मेवाडचें मॅराथान होय.'

ठाकूर दुर्गादासाची स्थिति प्रतापाहून काही अंशी निराळी होती; तरी त्याचा निर्धार, देशभक्ति, शौर्य व इमान हीं प्रतापाइतकीच जाज्वल्य होती. दुर्गादास हा राजघराण्यात जन्मला नसून राठोड घराण्याचे आश्रित असलेला लहानसा सरदार-ठाकूर होता. राठोडांचा राजा जसवंत याचा काबुलास खून झाला; त्याचा अज्ञान मुलगा अजित याजवरही तोच प्रसंग यावयाचा. पण राठोडांनी या तान्ह्या राजपुत्रास गुप्त सुरक्षितस्थली नेऊन ठेवले, आणि सहा वर्षेपर्यंत हा राजपुत्र कोठे आहे, याचा त्यांना मोंगलास सुगावाही लागूं दिला नाही. राजा जसवंताचा खून झाल्या वेळेपासून तो

अजितसिंह मोठा होऊन स्वराज्य संपादन करीपर्यंतच्या ३० वर्षांच्या अवधीत राहाटोर रजपूत व ठाकूर दुर्गादास यांनी प्रगट केलेल्या अपूर्व देशभक्तीस व राजभक्तीस जगात इतरत्र कोठेंच तोड सापडणार नाहीं. या अवधीत राहाटोराचा प्रत्येक सरदार घरीं खाटेवर मरण न पावता रणशय्येवरच मृत्यु पावला आहे! तो काळ असा होता कीं, देशभक्ति व राजनिष्ठा याचा त्याग करून मोंगलपक्षाकडे जाणारांस संपत्ति, वैभव, सन्मान, अधिकार, वगैरे सर्व गोष्टी तात्काळ प्राप्त होत होत्या. दुर्गादासाचे मनापुढेंही ह्या मोहाचे जाळे पसरण्यात आले होते. परंतु शौर्य व दूरदृष्टी याचेप्रमाणेच इमान व देशभक्ति या गुणाचा पुतळा असलेल्या दुर्गादासाने तिकडे ढुंकूनही पाहिले नाही. मोंगल बादशहानीं त्यास पाच हजाराची मनसबदारी देऊं केली. तिला भुलून जर त्याने मोंगलाचा अंकितपणा स्वीकारला असता, तर त्याचा ऐहिक दर्जा पुष्कळ वाढला असता. दुर्गादासाने मोंगलाकडे येण्याबद्दल वाटेल ते मोल मागितले असते, तरी तें मोंगल बादशहानीं त्यास तात्काळ दिले असते. पण दुर्गादासाची नदेशभक्ति व राजभक्ति 'अमोलिक' होती. दुर्गादासाच्या खुद्द सख्या भावाचा खून शत्रुपक्षाने करविला होता. पण शत्रु प्रत्यक्ष हाती लागून सूड उगविण्याचा उत्तम साध आली असताही उच्च हेतूकडे लक्ष देऊन आणि औदार्य व धर्मयुद्ध नीति यास अनुसरून त्याने त्यास जीवदान दिले! शत्रूचा जनानखाना हाती लागल्यास मोंगल बादशहा कसे वागत, ते महशूरच आहे. पण मोंगल शहाजादा अकबर याचे प्राण वाचविण्यासच नव्हे तर त्याच्या जनान्याची अब्रू [illegible] दुर्गादासच कारणीभूत झाला! आग्रा येथील तिहेरी कोटाच्या राजवाड्यातील अंतःपुरात मोंगलाच्या बादशाही जनानखान्याचे पावित्र्य जितके सुरक्षित असेल, त्याहून ते राहाटोराच्या छावण्यात शतपट अधिक सुरक्षित होते. अशा प्रकारच्या ठाकूर दुर्गादासाची स्मृति राजपुतान्यात अद्यापिही जागृत आहे. घोड्याच्या घोड्यावर बसलेल्या वृद्ध पण ताकदवान दुर्गादासाची तसबीर नाही, असा चित्रसंग्रह राजपुतान्यात एकही सापडावयाचा नाहीं.

शौर्य व देशभक्ति याचेप्रमाणेच धर्मयुद्धप्रेम हा तिसरा गुणही खऱ्या क्षात्रधर्मास अवश्यक आहे. शौर्य व देशभक्ति हे गुण अंगीं असलेला योद्धा कदाचित् क्रूर, दुष्ट, निर्दय किंवा स्वार्थपरायण असू शकेल. क्षात्रवृत्तीतून ह्या दुर्विकाराचा अंश नाहींसा करण्याकरिताच धर्मयुद्धाची कल्पना अस्तित्वात आली. पशुपक्ष्यांतीलही नरजातींत युद्धप्रेम दिसून येते; पण मनुष्यांतील युद्धप्रवृत्तींतून सर्व प्राण्यास

सामान्य असलेलें हें युद्धप्रेम जितकें कमी होईल व युद्धास परोपकाराचें किंवा कर्तव्याचें स्वरूप येईल, तितकें मनुष्यत्वास अधिक श्रेयस्कर होय. दीन, अनाथ, अबला, शरणागत किंवा धर्मपरायण लोक यांचें अगर धर्म, देश, राजा यांचें संरक्षण करणें, याच हेतूनें केवळ कर्तव्य म्हणून युद्ध करणें हा अस्सल क्षात्रधर्म असून यांत अर्थातच स्वार्थास, सूड घेण्याच्या बुद्धीस किंवा शत्रूच्या द्वेषास अगर निर्दयतेस थाराच नाहीं. अशा प्रकारचे धर्मयुद्धाचे नियम पाळणारे क्षत्रिय आपल्या शत्रूच्या अडचणींचा अन्यायानें कधींही फायदा घेत नाहीं व तो पराभूत झाल्यास त्याशीं उदारपणानेंच वागतात. हे धर्मयुद्धप्रेम-किंवा इंग्रजींत ज्याला ( शिव्हलरी ) Chivalry म्हणतात ती क्षात्रवृत्ति प्राचीन भारतीय क्षत्रियांत व अर्वाचीन रजपुतांत पूर्णत्वानें वसत होती; इतकी कीं, रजपुती बाणा व धर्मयुद्ध हीं राजपुतान्यांत समानार्थी मानलीं जात, ह्या संबंधाचा पुरावा रजपुताच्या इतिहासांत हवा तितका सापडेल. युरोपांतील शिव्हलरीच्या युगांत तरुण व सुंदर स्त्रियांचें संरक्षण व सेवा करण्यांत निकडीचे शिलेदार मंडळी मोठें भूषण मानीत पण या युरोपियन मनोवृत्तींत राजस कामुकतेचा थोडा तरी अंश आहे. रजपुती शिव्हलरी याहून उच्च दर्जाची व सात्विक आहे. रजपुती वृत्तींत स्त्री तरुण किंवा सुंदर असली पाहिजे असें नाहीं; एखाद्या रजपूत वीराकडे राखी पाठविली व ती स्वीकारून त्यानें आपले हातांत बांधली कीं एवढ्या राखीबंधनानें तीं स्त्रीपुरुषें एकमेकांचीं बहिणभावंडें होत; व तो वीरपुरुष राखीबंद भाई या नात्यानें या आपल्या राखीबंद भगिनीचें संरक्षणाचें किंवा अन्य कोणतेंही कार्य प्रसंगीं प्राणत्याग करूनही आनंदानें करी. आणि यांत विशेष हा कीं, या भाऊबहिणींनी एकमेकास डोळ्यांनीं पाहिलेंही नसे ! या राखीबंधनाचे बाबतींत वय, जात किंवा वर्ण याकडेही कोणी पहात नसे. चितोडच्या महाराणी कर्णावतीनें हुमायूनला याच रीतीनें आपला राखीबंदभाई केलें होतें; व हें नातें पाळूनच हुमायुनानें निव कुमकेस येऊन चितोडला पडलेला गुजराथच्या बहादुरशहाचा वेढा उठवून त्याचें पारिपत्य केलें ' या शौर्यादि क्षात्रवृत्ति व धर्माकरतां प्राणत्यागही करण्याचा करारीपणा एकट्या रजपुतांतच आहे, असें नाहीं; तो इतर हिंदीलोकांतही आढळून येतो. एल्फिन्स्टन साहेब लिहितात ( हिंदुस्थानचा इतिहास पृ. १९९ ):—' हे लोक पुष्कळ प्रसंगीं इतकें शौर्य प्रगट करतात कीं, जगांतील कोणत्याही लढाऊ लोकांस त्याचेवर ताण करतां येणार नाहीं. धर्म किंवा अब्रू यांचे संरक्षणार्थ

अस्तित्वांत नसतें, तर आसिरियाच्या सेमिरामिस राणीच्या स्वारीची जशी धुळधाण उडाली तशी शिकंदराच्याही स्वारीची झाली असती, यांत संशय नाहीं.

मुसलमानाच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर होऊं लागल्या त्या वेळचा हिंदुराजा पृथ्वीराज हाही शूर व देशभक्त होता; व त्यानें गिझनीच्या घोरी घराण्याचे सुलतानाच्या स्वाऱ्या सात लढाया जिंकून परत फिरविल्या होत्या. पण जसें द्रौपदीचें स्वयंवर भारतीय युद्धास बीजरूपानें कारणीभूत झालें, त्याचप्रमाणें कनोजच्या संयोगितेचें स्वयंवरही भरतखंड परतंत्र करण्यास कारणीभूत झालें. संयोगितेच मनांत पृथ्वीराजास वरावयाचें होतें पण तिचा बाप जयचंद यानें त्यास स्वयंवरास बोलावलें नाहीं, येवढेंच नव्हे तर त्याचा अपमान करण्याचे इराद्यानें त्याचा पुतळा करून तो स्वयंवरमंडपाचे दरवाजापाशीं रखवालदार या नात्यानें उभा केला! पण संयोगितेनें आपल्या बापाची परवा न करतां आणि स्वयंवरासाठीं मंडपांत जमलेल्या सर्व राजांस धिक्कारून दरवाजावरच्या पृथ्वीराजाचे पुतळ्यासच माळ घातली! इतक्यांत पृथ्वीराजानें अचानक तेथें येऊन संयोगितेचें हरण केलें; आणि सर्व राजांचा पराभव करून विजयी व यशस्वी होत्साता पृथ्वीराज राजधानीस परत आला. पण यावेळच्या पांच दिवस सारख्या चाललेल्या धावत्या लढाईंत त्याचे निवडक १०० शूरवीर सेनापति मृत्यु पावल्यामुळें त्याचें सामर्थ्य कमी झालें. पृथ्वीराजाच्या या पराक्रमानें कनोजचा जयचंद व इतर राजे जितके लज्जित तितकेच क्रुद्ध होऊन पृथ्वीराजाचा नाश करण्याची संधि पाहूं लागले. त्यांतच पृथ्वीराजास एकदम मुबलक भूमिगत द्रव्य सांपडल्याचें वर्तमान ऐकल्यामुळें त्याचा मत्सराग्नी अधिकच भडकला. कनोजचा जयचंद, अन्हिलवाडा पट्टणचा राजा व हाओलीराव हमीर यांनीं संगनमत करून शहाबुद्दीनशीं गुप्त सख्य केलें व त्यास सैन्यानिशीं बोलावलें. त्यानें हिंदुस्थानावर स्वारी करून व जयचंदानें सांगितलेले डावपेच लढवून पृथ्वीराजाशीं लढाई केली. तींत तो पराभूत होऊन सुलतानाचे हातीं लागला, त्यानें त्यास कैद करून गिझनीस नेलें, व त्याचे डोळे काढून त्यास कैदेंत टाकलें! पण पृथ्वीराजाचा इमानी मित्र चंदभाट त्याचे मागोमाग गिझनीस गेला. त्यानें तेथें सुलतानाचे दरबारांत प्रवेश करून घेऊन त्याची मर्जी संपादन केली व पुढें युक्ति

प्रयुक्तीनें सुलतानासमक्ष पृथ्वीराजाच्या शब्द वेधित्वाची तारीफ करून हें त्याचें कौशल्य पाहण्याविषयीं सुलतानाचें मन वळविलें. अंध पृथ्वीराजास सुलतानाचे समोर आणून त्याचे हातीं धनुष्यबाण देण्यात आले. चंदभाट तेथे होताच. त्यानें

**चार बांस चौबीस गज अंगुल अष्ट प्रमाण ।**
**जा उपर सुलतान है मत चूके चौहाण ॥**

अशी पृथ्वीराजास इशारत दिली. तीप्रमाणें पृथ्वीराजानें बाण मारून खुद्द सुलतानाचाच प्राण घेऊन आपले अपूर्व हस्तकौशल्य दाखविलें !

तैमूरलंगाचा वंशज **बाबर** ह्यानें हिंदुस्थानावर स्वारी केली, तेव्हांही अशीच इतिहासाची पुनरावृत्ति झाली. **बाबर** स्वतः शूर सेनापति होता, त्याचे शिपाई शूर व काटक होते, आणि त्या सर्वांचे रक्तही धर्मप्रसाराचे ईर्षेनें उसळलेले होतें. पण अशा स्थितींतही **बाबरास** विजयाची आशा न वाटून तो मोठ्या फिकिरींत पडला होता. कारण दिल्ली व माळवा येथील मुसलमानी राजांशीं झालेल्या १८ युद्धांत विजयी झालेला **राणा** संगाशीं त्यास लढावयाचें होतें. अशा स्थितींत युद्ध सुरु होऊन तें ऐन रंगांत आलें असतां संगराण्याच्या आघाडीस असलेला एक तुवार सरदारच **बाबरास** जाऊन मिळाला; तेव्हां निरुपाय होऊन **राणा संगास** माघार घ्यावी लागली ! सारांश, भरतखंडावर परकीय सत्ता जरी स्थापन झाली असली, तरी त्याचें खरें कारण परकीयांनीं भरतखंड जिंकलें हें नसून, भारतीयांनीच आपली मातृभूमी स्वतःच्या हातानीं परकीयाचें हवालीं केली हेंच होय.



# प्रकरण ६ वें.



## भारतीयांचा दांपत्यधर्म.

एकादा देश किंवा राष्ट्र कितपत सुधारलेलें आहे व त्याच्या संस्कृतीचा दर्जा कोणता आहे, हें निश्चित करण्याचें एक प्रमुख साधन हर्बर्ट स्पेन्सर यानें असें सांगितलें आहे कीं, त्या देशांतील अथवा राष्ट्रांतील स्त्रियांचा समाजांत कोणता दर्जा आहे व त्यास पुरुषवर्ग कितपत मान देतो याची परीक्षा करावी, व तीवरून त्या देशाच्या व राष्ट्राच्या संस्कृतीचें स्वरूप व उच्चनीचपणा बिनचूक ठरवावा. ही कसोटी लावून पाहिली असता प्राचीन भारतीय संस्कृति किती श्रेष्ठ दर्जाची ठरते, याचें केवल दिग्दर्शन या प्रकरणांत करावयाचें आहे. दिग्दर्शन म्हणण्याचें कारण असें कीं, हा प्रश्न फारच व्यापक आणि समाजरचना व कुटुंबसंस्था यांशीं अत्यंत निकट संबंध असलेला असा असल्यामुळें तो प्रकरणापेक्षा एकाद्या पुस्तकाचाच विषय होण्याच्या लायखीचा आहे; व म्हणूनच या प्रश्नाचें विवेचन मर्यादित व केवळ दिग्दर्शन स्वरूपाचें करणें जरूर आहे.

कोणत्याही समाजव्यवस्थेच्या मुळाशीं असलेल्या मूल कल्पनांचें स्वरूप, त्या समाजाच्या धर्मसमजुती व तत्त्वज्ञान यांच्या स्वरूपावर बऱ्याच अंशांनीं अवलंबून असतें. जगाची उत्पत्ति व नैतिक व्यवस्था यांची उपपत्ति लावतांना पुरुषतत्त्व व स्त्रीतत्त्व—पुरुष व प्रकृति—यांचा जो परस्पर संबंध तत्त्वज्ञान्यांनीं ठरविलेला असेल त्याचेंच थोडेबहुत प्रतिबिंब त्या समाजांतील स्त्री-पुरुषांच्या वैवाहिक व सामाजिक संबंधांत पुष्कळ अंशांनीं पडत असतें. या दृष्टीनें विचार करतां असें दिसून येतें कीं, जगदुत्पत्तीची ख्रिस्ती, महंमदी वगैरे धर्मांत जी उपपत्ति दिलेली आहे तींत स्त्रीतत्त्वास—प्रकृतीस—मुळींच स्थान मिळालेलें नाहीं. अर्थात् त्या धर्मांतील परमेश्वर केवळ पुरुषतत्त्वात्मकच आहे. भारतीयांची उपपत्ति याहून फार भिन्न आहे. ब्रह्म—माया, पुरुष—प्रकृति, शिव—शक्ति ह्या जोडींची ताटातूट आमच्या तत्त्वज्ञानांत केलेली नाहीं. हीच कल्पना पुढें अधिक वाढून सगुण ईश्वराचें ध्यान व स्मरण यांतही हें युग्मतत्त्व कायमच राहिलें आहे. शची—पुरंदर, शंकर—पार्वती, विठ्ठल—रखुमाई, सीता—राम, वगैरे जोड्यांची ताटातूट करणें आमच्या धार्मिक मनोवृत्तीस दुःसह वाटतें. शिवशक्तींच्या देहार्धभागी—अर्ध-

नारीनटेश्वरी-स्वरूपात तर ही कल्पना विशेषच परिणत झाली आहे. तींत पूर्वोक्त देवतामधलें भिन्न-देहत्वही नष्ट झालेलें आहे! 'जगाचीं जनकें' असलेल्या शिवशक्तींचें-'देवो-देवींचें'-हें अभिन्नत्व ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवाचे प्रारंभीच अत्यंत मार्मिक व मनोहर रीतीनें वर्णिलें आहे.

**सार्धे केन च कस्यार्धे शिवयोः समरूपिणोः । ज्ञातुं न शक्यते लग्नं...... ॥ आवडीचेनि वेगें । एकएकातें गिळिती आंगें ॥ ३ ॥ जेणें देवें संपूर्ण देवी । जियेविण कांहीं ना गोसावी ॥ किंबहुना एकोपजीवी । एकएकाचीं ॥ १० ॥ जिहीं एक एकाविण । न कीजे तृणाचेंही निर्माण ॥ जिये दोघे जीवप्राण । जियां दोघां ॥ १२ ॥ स्त्री-पुरुष नामभेदें । शिवपण एकलें नांदे ॥ १७ ॥ दो दांडीं एक श्रुती । दोहीं फुलीं एक द्युती ॥ दोहीं दिवीं दीप्ती । एकचि जैवीं ॥ १८ ॥ दो ओंठीं एकी गोष्टी । दो डोळां एकी दृष्टी ॥ १९ ॥ जे स्वामीचिया सत्ता । वांचूण असों नेणें पतिव्रता ॥ जियेविण सर्वकर्ता । कांहींच ना जो ॥ २१ ॥ जे कीं भ्रताराचें दिसणें । भ्रतारुचि जियेचें असणें ॥ नेणिजती दोघेजणें । निवडूं जिये ॥ २२ ॥**

"शिव-शिवा समरूप असलेमुळें कोणाचें अर्धांग कोणाचे अर्धांगास संलग्न झालें आहे हेंच कळत नाहीं! एकमेकाविषयींच्या प्रेमामुळें एकमेक एकमेकास शरीरानें गिळीतच आहेत असें वाटतें! शिवदेवामुळेंच देवीस पूर्णत्व येतें; व देवीविण शिवगोसावीसही काहींच महत्त्व नाहीं! किंबहुना हें जोडपें परस्परोपजीवीच आहे, यापैकीं कोणाही एकास दुसऱ्याचे साह्यावाचून गवताची काडीही निर्माण करतां येत नाहीं व हे दोघे एकमेकांचे जीव कीं प्राण आहेत! साराश हे एकच शिवपण नांदत असून केवळ नामभेदानें ते स्त्रीपुरुष झालें आहे! दोन टिपऱ्यांपासून निघणारा आवाज जसा एक, दोन दिव्यांचा प्रकाश जसा एक, दोन ओठांनीं उच्चारलेला शब्द जसा एक व दोन डोळ्यांची दृष्टि जशी एक, तसेंच दोघां शिवशक्तींचें अस्तित्व एकरूपच आहे! ह्या पतिव्रता स्त्रीस पतीचें अस्तित्वावाचून असणें माहीत नाहीं; व हिच्यावाचून शिवासही सर्वकर्तृत्व नाहीं. भ्रतार दिसणें हेंच तिचें दर्शन व भ्रताराचें असणें हेंच हिचें अस्तित्व. साराश, ह्या दोघांचें एकमेकांपासून भिन्नत्व दाखवितांच येत नाहीं!" पुरुष-प्रकृति-शिवशक्ति-यांच्या आकलनेचें वर्णन करतां करतां पतिपत्नींचीही एकता इतक्या

सुंदर रीतीनें वर्णन केलेली कोणत्याही वाङ्मयांत दुर्मिळ असल्यामुळें तिची माधुरी रसिक वाचकांनीं मुळांतच मनमुराद चाखावी, अशी त्यास शिफारस केल्यावाचून राहवत नाहीं.

ख्रिस्ती धर्मांत प्रकृतितत्त्व मानीत नाहींत हें वर सांगितलेंच आहे. परंतु मनुष्यजातीचें पहिले मातापिता आडाम–ईव्ह यांची उत्पत्ति बायबलांत अशी दिली आहे कीं, ईश्वरानें स्वतःच्या स्वरूपास अनुसरून मातीचा पुतळा तयार केला, व त्याचे शरीरांत-नाकांत--आपला श्वास भरून त्यास सजीव केलें; तोच हा आडाम--आदिम पुरुष होय. पुढें त्यास एकटें राहण्याचा कंटाळा आला, म्हणून त्यानें आपल्याच मांडीचे हाडापासून एक स्त्री निर्माण केली; व तीच ईव्ह होय. स्त्रीपुरुषभेदोत्पत्तीची आमची कल्पना याहून भिन्न आहे.

> द्विधा कृत्वाऽऽत्मनो देहमर्धेन पुरुषोऽभवत् ।
> अर्धेन नारी तस्यां स विराजमसृजत् प्रभुः ॥

मनुस्मृति, अ. १।३२.

ब्रह्मदेवानेंच स्वतःच्या शरीराचे दोन भाग करून तो एका भागानें पुरुष व दुसऱ्या भागानें स्त्री झाला; व पुरुषरूपानें त्यानेंच त्या स्त्रीचे पोटीं विराट्स्वरूपी जग निर्माण केलें; असें मनुस्मृतींत सांगितलेलें आहे. ' यो भर्ता सा स्मृतांगना ' ( मनु. ९।४५ ) असेंही तत्त्व याच स्मृतींत दुसरीकडे सांगितलेलें आहे. अर्थात ही उपपत्ति किंवा वर सांगितलेली ज्ञानेश्वराची उपपत्ति ख्रिस्ती कल्पनेहून निःसंशय श्रेष्ठ प्रतीची आहे हें सांगावयास नकोच. पत्नी ही पतीची ' अर्धांगी ' ही कल्पना ख्रिस्तीधर्मांत नसली तरी समाजांत रूढ आहे. पण त्यांनीं या ' अर्धांगीस ' आणखी उत्तमत्त्वही ( better half उत्तमार्धांगी ) देऊन ठेवलेलें आहे. पुरुषरूपी अर्धांगापेक्षा स्त्रीरूपी अर्धांग उत्तम, श्रेष्ठ ( better ) आहे, असें, ख्रिस्ती लोक मानतात; अर्थात त्यांची कल्पना श्रेष्ठ, असें सकृद्दर्शनीं वाटेल; पण तें खरें नाहीं. एका दंपतीचा पतिपत्नी हीं दोन अर्धांगें म्हटल्यावर त्यांत एकापेक्षां दुसरें उत्तम म्हटल्यानें त्यांचें एकत्व नष्ट होऊन त्यांत भेदभाव अवश्यमेव उत्पन्न होतो. अर्थात् श्रेष्ठ-कनिष्ठत्व-युक्त दोन अर्धांगें या कल्पनेपेक्षां अभिन्नत्वदर्शक केवळ दोन अर्धांगें ही कल्पना व ही उपपत्ति अधिक उच्च प्रतीची आहे. दुसरें असें कीं ख्रिस्ती समाजांत ' उत्तमार्धांगी ' ची कल्पना रूढ असली तरी तींत अलंकारिकत्व आणि पोकळ व खोटें गौरव यांचा अंश बराच आहे.

ख्रिस्ती राष्ट्रांतल्या पतिपत्नीसंबंधाचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, धर्मार्थकाम या तीन पुरुषार्थांचे दृष्टीनें एकट्या कामाचे बाबतींत त्यांचें बरेंच ऐक्य असते. पण धर्म ( यास religion म्हणा कीं, duty म्हणा ) व अर्थ या बाबतींत त्यांचे थोड्याशा सहकार्यानें युक्त असें भिन्नत्वच असते. भारतीयामध्ये याच्या उलट प्रकार आहे.

**'धर्मे चार्थे च कामे च नातिचरामि नातिचरामि नातिचरामि ।'**
असें अभिवचन पति विवाहसमयीं वधूस त्रिवार देतो. यांतही आणखी विशिष्टपणा असा आहे कीं, अर्थ व काम यास गौणत्व देऊन पत्नीस तो 'सहधर्मचारिणी' चें पद देतो. या पदाचा संपूर्ण अर्थ व्यक्त करणारा एकही शब्द ख्रिस्ती लोकाच्या भाषांत नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आर्यपद्धतीप्रमाणे ख्रिस्ती विवाहविधींतही वधूचा पिता कन्यादान करीत असतो. पण हा दानविधि तो एकटाच करतो, त्यांत वधूच्या मातेस मुळींच स्थान नसतें. पण आमच्याकडे कोणताही धार्मिक विधि सपत्नीक व्हावा लागतो, हीही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ख्रिस्ती विवाहविधींत वधूवर एकमेकांस अभिवचनें देऊन प्रतिज्ञापूर्वक शपथक्रिया करतात; अर्थात् या विधीस एक प्रकारच्या कराराचें स्वरूप आहे. आर्यविवाहविधींत वधू कांहींच वचन देत नाहीं किंवा शपथक्रियाही करीत नाहीं; पण वर मात्र वधूस आत्मसमाविष्ट करताना अग्निसाक्षिक प्रतिज्ञापूर्वक अभिवचनें देतो.

पुरुषप्रकृति-तत्त्वोपपत्तिसंबंधाच्या वरील भिन्न कल्पनांचे परिणाम भारतीय व पाश्चात्य यांच्या विवाहपद्धतींत व वैवाहिक स्थितींतल्या पतिपत्नींच्या परस्परसंबंधांत याहूनही अन्य रीतींनीं दृग्गोचर होतात. पाश्चात्य पद्धतींत व भारतीय पद्धतींत पहिला मोठा व ठळक भेद हा दिसतो कीं, तिकडे प्रत्येक स्त्रीचें लग्न झालेंच पाहिजे असा निर्बंध नाहीं; पण तो इकडे मात्र आहे. दोनही पद्धतीमधील यावाचून इतर भेद म्हटले म्हणजे पाश्चात्यांत वधूवर बरेच प्रौढ असून पुरुषास स्त्रीच्या व स्त्रीस पुरुषाच्या सहवासाची प्रबळ इच्छा-कामवासना-उत्पन्न झाल्यानंतरच वधूवरशोधन सुरू होतें; व ह्या वरवधूशोधनाची मुख्य जबाबदारी सर्वांशीं त्यांचेवरच असते. आणि पुढें हा वैवाहिकसंबंध एकासही हितावह किंवा सुखावह न झाल्यास हा संबंध तोडून परस्परांस पुनः नवीन संबंधही करता येतो. भारतीयांत कामवासनेचा प्रादुर्भाव होण्यापूर्वींच बहुधा वधूवरशोधन चालू होते; पसंतीची जबाबदारी वधूवरावर मुळींच नसते; आणि घडलेला विवाह-

संबंध आमरणांत पाळावयाचा, असें उच्च ध्येय डोळ्यापुढें ठेवलेलें असते. * या दोनही पद्धतींतल्या वर सांगितलेल्या विशेषांचें याहून अधिक व्यापक व सूक्ष्म दृष्टीनें परीक्षण केल्यास त्यांचे अंतःस्वरूप व मूल-तत्त्वें वाचकांचे लक्षांत येतील. स्थूलदृष्टीनें पाहणारासही असें दिसून येईल कीं, पाश्चात्य विवाह ते लोक कराराच्या स्वरूपाचे मानीत असून भारतीय पद्धतीचा विवाह जवळ जवळ ईश्वरघटित किंवा सृष्टिकर्तृकच आहे अशी आमची सर्वमान्य समजूत आहे. उत्पत्ति व वाढ हीं सृष्टीचीं मुख्य व महत्त्वाचीं कार्यें असून त्याचे दृष्टीनें स्त्रीपुरुषाची अविवाहित स्थिति सृष्टिक्रमाविरुद्ध आहे, ती सृष्टीदेवतेचा गुन्हा आहे, तें एक प्रकारचें पातक आहे, अशी आमची समजूत असल्यामुळें प्रत्येक स्त्रीचा विवाह अवश्यमेव झालाच पाहिजे, असा आमचेमध्यें निर्बंध आहे. विवाह हा एक महत्त्वाचा धर्मसंस्कार असून तो झाल्यावाचून स्त्रीपुरुषास आमचे समाजव्यवस्थेत नियमित व मान्य असें स्थान मिळत नाहीं.

**वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकः स्मृतः ।**
**पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ॥** मनु. २।६७

या मनुवचनांत सांगितल्याप्रमाणें स्त्रियांचे इतर संस्कार पौराणिक असले तरी मुख्य विवाहसंस्कार वैदिकच असतो; आणि पुरुषांस उपनयनानंतर अध्ययनार्थ गुरुगृहवास व गृहस्थाश्रम स्वीकारानंतर अग्निसेवा हीं जशीं कर्तव्यें असतात, तसेंच विवाह हेंच स्त्रियांचें उपनयन असून पतिसेवा हाच त्यांचा गुरुगृहवास व गृहकृत्यें हींच त्यांची अग्निसेवा होय. ब्राह्मणादि वर्णांत ८ ते १२ पर्यंतच्या वयांतच स्त्रियांचे विवाह कां होतात, याचें हें सर्वांत जुनें व मुख्य कारण आहे, ही गोष्ट बालविवाहावर हल्ला करणारे पुष्कळ लोक विसरतात.

---

* हिंदुस्थानांतील कनिष्ठ वर्गांत काडी मोडण्याचें व पाटाचे प्रकार साम्प्रत सरसहा चालू आहेत. पूर्वीं हीं काडीमोड व पाट जातीचे संमतीशिवाय होत नसत. साम्प्रतच्या व्यक्तिस्वातंत्र्याचे काळांत हेंही बंधन उरलेलें नाहीं. पण या दोनही पद्धती हिंदुधर्मशास्त्राचें ध्येय व एकंदर धोरण याचे विरुद्ध आहेत. वरिष्ठ जातींत मुद्दाम घुसडला जाणारा पुनर्विवाह हाही याच कोटींत येतो. मनुस्मृतींत नियोग व विधवावेदन ( पुनर्विवाह ) हीं दोनही सारख्या योग्यतेचीं मानलीं असून 'अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो विगर्हितः' ( मनु. अ. ९।६६ ) अशी त्यांची निंदा केली आहे. आणि विवाहमंत्रांत व विवाहविधींत नियोग व विधवावेदन मुळींच सांगितलेलें नाहीं, असें याचे मागल्या श्लोकांत स्पष्ट म्हटलें आहे. 'न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद् भर्तोपदिश्यते ।' असेंही स्पष्ट वचन ( अ. ५।१६ ) आहे.

**त्रिंशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीं ।**
**त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ॥**

या श्लोकात ( अ. ९।९४ ) मनूनें पुरुषाचा विवाहकाल जरी २४ ते ३० सांगितला आहे, तरी स्त्रियांचा विवाहकाल ८ ते १२ हाच प्रशस्त व ग्राह्य म्हणून नमूद केला आहे, याचें तरी बीज वरील कल्पनेंतच आहे. सारांश, आमच्यांत विवाह हा एक महत्त्वाचा व अवश्य असा धर्मसंस्कारच मानला आहे. तसेंच त्या संस्कारात वधूवरांची इच्छा किंवा पसंती पाहण्याची आमची वहिवाट नाही. याचें एक कारण असें की,

**देवदत्तां पतिर्भार्यां विंदते नेच्छयाऽऽत्मनः ।** अ. ९।९५

पुरुषास त्याच्या इच्छेप्रमाणे नव्हे तर देवानें दिलेलीच भार्या मिळत असते. अर्थात स्त्रीसही देवदत्तच पति मिळत असतो, अशी आमची पूर्वापार समजूत आहे व म्हणूनच—

**यस्मै दद्यात्पिता त्वेनां भ्राता वानुमते पितुः ।**
**तं शुश्रूषेत जीवंतं संस्थितं च न लंघयेत् ॥**

या श्लोकांत ( मनु. अ. ५।१५१ ) पिता किंवा त्याच्या संमतीनें भ्राता आपणास ज्या पुरुषास देईल, तो जिवंत असेपर्यंत त्याची सेवा स्त्रीनें करावी. येवढेंच नव्हे तर तो मृत्यु पावल्यावरही पतिव्रताधर्माचें उल्लंघन करूं नये, अशी आज्ञा केली आहे. विवाहाचे बाबतींत वधूवरांची इच्छा किंवा पसंती यास प्राधान्य न देण्याचें दुसरें कारण असें की, ही जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडण्यास ते अपात्र असतात, अशी आमची रूढ समजूत आहे. वधूवर निवडण्याचें काम त्यांचे पसंतीवरच सोपवावयाचें म्हणजे तीं अर्थात बरींच तरुण पाहिजेत. पण अंतःस्वरूपापेक्षा बाह्य स्वरूपाचे मोहास त्वरित भुलण्याचें हें वय असल्यामुळे वधूवराकडून वास्तविक एकमेकांच्या अंतःस्वरूपाचें बहुधा नीट परीक्षण होत नाही; तीं एकमेकांच्या सौंदर्यादि बाह्य किंवा तात्पुरत्या अगर उसन्या अथवा कृत्रिम गुणास लुब्ध होतात व स्त्रीपुरुषांच्या या नैसर्गिक आकर्षणशक्तीस—एक प्रकारच्या कामवासनेस—प्रेम मानून विवाहानें बद्ध होतात, पण मग वैवाहिक स्थितींत अंतःस्वरूपें प्रगट झाल्यावर पश्चात्ताप पावून संसार दुःखानें कंठतात किंवा विवाहबंधनें तोडून टाकतात. पाश्चात्य व भारतीय समाज यांचे लक्षपूर्वक अवलोकन करणार लोक अशी ग्वाही देतात कीं, पाश्चात्यांपेक्षा भारतीय समाजांत एकंदरीत सौमनस्याचें प्रमाण जास्त असतें व त्या सौख्यानें

टिकाऊपणाही अधिक असतो. वधूवरांची पसंती त्यांचें त्यांचेवर सोपविल्यामुळें एकमेकांचे स्वभावगुण पाहूनच केलेला व म्हणून प्रेमजन्य मानलेला हा विवाह-संबंध वास्तविक कधीही न तुटणारा आणि कायमचा हितावह व सुखावह व्हाव-वयास नको काय? पण पाश्चात्यांत पुष्कळ उदाहरणांत तसा तो होत नाही. असल्या संबंधांत हनीमूनची आठवण बुजते न बुजते तोंच थोडीफार धुसफूस सुरू होते, व ती विकोपास गेल्यास विवाहसंबंधही तोडण्यांत येतो. पाश्चात्य समाजांत हल्ली फार बोकाळलेल्या व दिवसेंदिवस कायद्यानें अधिक सुलभ केल्या जाणाऱ्या घटस्फोटास वस्तुतः खिस्तीधर्माचा आधार नाही. त्याच्या विवाहांतील शपथ-विधीत ( I will love, cherish and obey you till death do us part ) 'मृत्यु आपली ताटातूट करीपर्यंत मी तुम्हांशीं प्रेमानें, एकनिष्ठेनें व आज्ञाधारकतेनें वागेन' अशी शपथ वधू घेते; व obey हा शब्द वगळून बाकीच्या शब्दांचा उच्चार वरही करतो. अर्थात खिस्तीधर्म एकाच्या मरणोत्तर दुसऱ्यास पुनर्विवाह करण्याची परवानगी देतो. पण एकमेकांचे हयातींत घटस्फोट करणें व द्वितीय संबंध करणें ही गोष्ट त्यास मान्य नाही, हें स्पष्ट दिसतें. पण खिस्ती राष्ट्रांतील बहुतेक व्यक्तींना, धर्म ही एक केवळ विश्वा-साची बाब असून त्याचा आचरणाशीं संबंध नाही, असेंच जणूं काय ठरविल्याचें त्यांचे इतर बाबतींतील वर्तनावरून दिसून येत असतें, तोच प्रकार याही गोष्टींत झालेला आहे. वधूवरांची निवड करण्याचें काम ज्याचें त्याजवरच सोंपवून जो होईल तोच विवाह अधिक सुखावह व हितावह होणार, असें म्हणणारे लोक किती तरी गोष्टी गृहीत धरीत असतात. १ प्रत्येक तरुण स्त्री, व तरुण पुरुष दुसऱ्याचें स्वभावपरीक्षण करण्यांत तरबेज व गुणज्ञ असतात २ ते हें काम निर्विकार मनानें व जबाबदारीनें करूं शकतात. ३ प्रत्येक तरुण स्त्रीपुरुष आपापलें स्वभाव व अंतः-स्वरूप गळ्यातील दागिन्याप्रमाणें किंवा अस्तनीच्या बटनाप्रमाणें सर्वांस दिसेल अशा रीतीनें दाखवीत असतो. ४ कामवासना व प्रेम यांतील भेद जाणण्या-इतकी निर्विकार मनःस्थिति त्यांची त्या वेळीं असते. ५ आणि कोर्टशिपचे–प्रेमा-कर्षणाचे–वेळीं दिसलेले स्वभावगुण हे वज्रलेप असून यांत पालट केव्हांही होत नाहीं! शेकडा ८० उदाहरणांत असंभवनीय असलेल्या या गोष्टी शक्य झाल्या तर मात्र प्रौढ वधूवरांचा परस्पर पसंतीनें होणारा विवाह सुखावह व हितावह होण्यासारखा आहे. यापेक्षा "आदौ कुलं परीक्षेत ततो विद्या ततो धनं।" ही वधूवरांचे पालकास केलेली आमच्या धर्मशास्त्राची आज्ञा किती तरी जास्त

समंजसपणाची व हितावह आहे! वधूवर पसंतीची जबाबदारी त्याचेवर न टाकण्याचें तिसरें कारण असें की, स्त्रीविषयक शुद्धतेची आमची कल्पना अधिक सक्त व सूक्ष्म दृष्टीची आहे. 'कर्मणा' च नव्हे तर 'मनसा वाचा'ही स्त्रीचा व्यभिचार होता कामा नये, असें आमचें श्रेष्ठ ध्येय आहे; व या ध्येयास अनुसरूनच स्त्रीची कामवासना एकपुरुषसंबद्धच असणें आवश्यक आहे. ही एकपुरुषसंबद्धता साध्य होण्यास कामवासना-प्रादुर्भावाचे वय येण्यापूर्वीच कामवासनेचा विषय जो पति तो विवाहानें निश्चित करून ठेवला पाहिजे. किंवा प्रौढ विवाहाची चाल असल्यास निवडीचें काम वधूवरावर सोंपवावयाचें नाहीं, एवढेंच नव्हे तर विवाहापर्यंत वधूचें मन कामवासनेचे बाबतींत अगदीं निर्विकार राहील, अशी तजवीज तरी केली पाहिजे, असा आमच्या समाजाचा कटाक्ष आहे. हिंदुस्थानांत हे दोनही प्रकार आढळतात. उत्तर हिंदुस्थानांत प्रौढविवाह अधिक प्रचलित आहे, तर तेथें गोषाही आहे; दक्षिणेत बालविवाह ज्यास्त प्रचलित आहे, व म्हणूनच तेथें गोषाची फारशी आवश्यकता नाहीं. आतां बालविवाहामुळें अकालसंभोगाचा संभव व बालविधवांचा वर्ग उत्पन्न होणें हे सामाजिक दोष उत्पन्न होतात, हें कबूल केलें पाहिजे. पण कोणतीही विवाहपद्धति घेतली तरी ती सर्वस्वीं निर्दोष अशी कधींच असत नाहीं व असणें शक्यही नाहीं. बालविवाहानें बालविधवांचा वर्ग जसा निर्माण होतो तसा प्रौढ विवाहानें वृद्धकन्यांचा वर्ग उत्पन्न होतोच होतो. विवाहबद्ध स्त्रीपुरुषास परस्पर सहवासापासून जें अवर्णनीय सुख होतें त्यास मुकणें, या दृष्टीनें आमच्या बालविधवा व पाश्चात्यांच्या वृद्धकन्या सारख्याच दुर्दैवी आहेत. बालविवाहांत अकालसंभोगाचा संभव आहे, तर प्रौढविवाहांत-विशेषतः वधूवरांच्या स्वतःच्या निवडीनें होणाऱ्या विवाहांत-कामवासनेची म्हणा, प्रेमोद्भवाची म्हणा, एकपुरुषनिबद्धता कायम रहात नाहीं. मनोभूमींत वरचेवर प्रेमांकुर उद्भवावे, व ते कांहीं कारणानें विवाहरूपानें सफल न झाले तर ते निर्दयपणानें उपटून टाकावे आणि पुनः प्रेमांकुर उत्पन्न होण्यास मनोभूमि तयार ठेवावी, असें अनेकदा करण्यांत विशेषतः तरुण स्त्रीहृदयास किती दुःख होतें व एकंदरीनें त्यांच्या मनोवृत्तींची नैतिक धार किती बोथट होते, याचा कटु अनुभव सुदैवानें भारतीयांतील स्त्रियास येत नाहीं; त्याचा भयंकरपणा पाहण्यास पाश्चात्यांतील वृद्धकन्यांच्या हृदयाचा ठाव घेतला पाहिजे. कामवासनेचें किंवा प्रेमोद्भवाचे असले अपायकारक खेळ तरुण स्त्रीपुरुषास खेळूं देण्यापेक्षा अकालसंभोगाचा संभव शतपट बरा, असें

आमचे लोकास नैतिकदृष्टीनें वाटत असते. आम्हात प्रत्येक स्त्रीस विवाहाची एक तरी संधी अवश्य मिळेल, अशी तजवीज असते. पाश्चात्यविवाहपद्धतीत पुष्कळ स्त्रियांस इच्छा असूनही एकदा सुद्धा वैवाहिक सुख अनुभविण्याची संधी मिळत नाही.

वधूवरांच्या स्वतःच्या पसंतीने होणाऱ्या पाश्चात्य विवाहपद्धतीचा दुसरा ठळक दोष म्हटला म्हणजे त्यांतील प्रेम निरपेक्ष नसते. आणि त्यास सात्विक व कर्तव्याचे स्वरूप बहुधा नसते. ह्यातील प्रेम बहुधा सौंदर्यादि बाह्य किंवा स्वभावादि अंतर्गत गुणामुळें उद्भवतें. अर्थात् हे प्रेम निरपेक्ष नसून विवाहानंतर सदरहू गुणात कमतरता उत्पन्न झाल्यास किंवा या गुणात अधिक असे स्त्रीपुरुष एकमेकास भेटल्यास आणि विवाहबंधन तोडण्याची शक्यता असल्यास ते प्रेम डळमळावयास लागण्याचा फार संभव असतो. पण पालकांनी घडवून आणलेल्या विवाहातील–विशेषतः बालविवाहातील–प्रेम गुणनिरपेक्ष, कामवासनानिरपेक्ष व सात्विककर्तव्यस्वरूपी असते. या दोन विवाहपद्धतींतील भेद थोडक्यात असा सांगता येईल की, पाश्चात्यात वधूवराचे प्रेम एकमेकावर बसते म्हणून ते विवाह करतात; आणि आमचेकडे वधूवर विवाहनिबद्ध होतात म्हणूनच ते एकमेकावर कर्तव्यबुद्धीने प्रेम करीत असतात. आई, बाप, मुले, भाऊ, बहिणी यांचीं एकमेकावरील प्रेमे अशीच गुणनिरपेक्ष असतात. आई मुलावर प्रेम करते याचे कारण ते तिचे मूल आहे या पलीकडे काहींच नसतें. पाश्चात्य तरुणीस 'तुझें आपल्या पतीवर प्रेम का जडले?' असा प्रश्न केल्यास ( He was so Kind, so generous & ) अशा प्रकारचे काहीं तरी उत्तर ती देईल. पण तोच प्रश्न कुलीन हिंदु विवाहित स्त्रीस विचारून पाहिल्यास 'हें काय तुमचे विचारणे !' येवढेंच उत्तर ती त्याला देईल. त्या उत्तराचा अर्थ असा कीं, 'पतीवर प्रेम हे केलेच पाहिजे व तें प्रेम असावयाचेच, तसें विचारण्याचें कारणच नाहीं.' आमच्या समाजांत क्वचित् पतिपत्नीचे प्रेम एकमेकावर बसले नाहीं, तरी विवाहित धर्मपत्नी या नात्याचे तिचे हक्क नवऱ्यास नष्ट करतां येत नाहींत; किंबहुना व्यभिचारादि दोषाने स्त्रिया पतित झाल्या तरी 'वस्त्रान्नपानं देयं तु वसेयुश्च गृहांतिके' त्यांस आपल्या घराजवळच ठेवून त्यांच्या अन्नवस्त्राची तजवीज करावी, अशी आमच्या धर्मशास्त्राची आज्ञा ( मनु. अ. ११।१८८ ) आहे. पण पाश्चात्यात पतिपत्नीचें परस्परप्रेम नष्ट झाले कीं, सगळ्याच संसाराची राखरांगोळी होऊन त्यांत गृहसौख्याची पूर्णाहुति पडते. आयर्लंडचे सुप्रसिद्ध पुढारी पार्नेल

याचें जें एक चरित्र त्याच्या पुनरूढा पत्नीने प्रसिद्ध केले आहे, त्यात हा दोष ठळकपणें नजरेस येतो. या बाईचे पूर्वीचे नांव मिसेस ओशी असे असून ही पार्नेलचे जिवलग मित्र कॅप्टन ओशी याची बायको होती. उभयता पतिपत्नींचे प्रेम कांहीं कारणामुळे लोपूं लागले, व याच वेळी मिसेस ओशी व पार्नेल यांचे प्रेम परस्परावर जडले. उभयतांचा हा गुप्त प्रेमसंबंध दहा वर्षें सारखा चालला होता! पार्नेल साहेब पार्लमेंटमधील होमरूलची प्रचंड लढाई लढून रोज रात्री ओशीबाईचे घरींच निजावयास जात! या संबंधापासून त्यास एक अपत्यही झाले! ही सर्व हकीकत याच बाईने या चरित्रांत सविस्तर दिली आहे; येवढेच नव्हे, तर कॅप्टन ओशीचे व माझे परस्पर प्रेम नष्ट झाल्यामुळे असल्या प्रेमशून्य विवाहाच्या बंधनानें मी किंवा पार्नेल बांधलेले नव्हतो व म्हणूनच हा विवाह-शून्य पण खराखुरा प्रेमसंबंध ठेवण्यास आम्हास मोकळीक आहे, असे आम्ही ठरविले, अशा आशयाचे समर्थनही या बाईने केले आहे!

बालविवाह आणि विवाहाचे बाबतीत वधूवरांचे इच्छेचा किंवा पसंतीचा संबंध येऊ न देणे, या पद्धतीविरुद्ध पाश्चात्यांच्या उथळ्या व उसन्या विचारांवर पुष्ट झालेल्यांचा असा आक्षेप येत असतो की, विवाहविधीचे महत्त्व व [illegible] जबाबदारी ज्याला कळत नाहीं, किंबहुना नवरा म्हणजे काय व बायको म्हणजे काय ह्याची अस्पष्ट जाणीवही ज्यास नाहीं, अशा अर्भकास विवाहबंधनानें बद्ध करणे हा अन्याय आहे; आणि जन्माच्या गांठी ज्या विवाहाने पडावयाच्या त्या-बाबतीत खुद्द त्यांचाच विचार न घेणे किंवा ही बाब त्यांचेच पसंतीवर न सोपविणे हा जुलूम आहे, असे या लोकाचें म्हणणे असतें. पण हा आक्षेप घेणारे लोक 'विवाह हा एक करार आहे' ही गोष्ट गृहीत धरून चालतात; पण ही गोष्ट भारतीय समाजव्यवस्था मुळींच मान्य करीत नाहीं, हे मात्र ते विसरतात. त्यांची अशी समजूत झालेली असते की, विवाह म्हणजे एक प्रकारची व्यावहारिक partnership ( भागीदारी ) आहे. अर्थात त्या भागीदारीची जबाबदारी शिरावर घेणारे उभयता भागीदार सज्ञान पाहिजेत, ती जबाबदारी त्यांनी स्वसंमतीने व पसंतीने स्वीकारली पाहिजे, त्या भागीदारीला शर्ती पाहिजेत, व शर्ती मोडल्यास भागीदारी बंद झाली पाहिजे, असे त्यांचे म्हणणे! पण आमचा समाज विधिवाविधि हा एक धर्मसंस्कार आहे असे मानतो, तो एक भागीदारीचा व्यवहार आहे असे मानीत नाहीं. अर्थात् त्यांचे हे सर्व आक्षेप आमच्या विवाह-विधीस गैरलागू आहेत. दुसरे असें की, संसारात व्यक्तिव्यक्तींचे जे निकटचे

संबंध जडतात, त्यापैकी एकासही सज्ञानावस्थेची किंवा परस्पर पसंतीची गरज लागत नाही. या संबंधात त्यापैकी एक किंवा दोनही व्यक्ति अज्ञानावस्थेत असतानाच हे संबंध जडतात. पतिपत्नीसंबंधाच्या जोडीस बसविण्यासारखे इतर निकट संबंध म्हटले म्हणजे आईबाप व मुले आणि भाऊ व बहिणी ह्याचे होत. हे संबंध जडण्याचे वेळी उभय पक्ष सज्ञान नसतात, या संबंधाची जबाबदारी त्यास कळत नाही, व हे संबंध जडविण्यापूर्वी उभयपक्षाची पसंती घेणे हेही अशक्य असते. असे असूनही हे संबंध जडणे म्हणजे अन्याय आहे व जुलूम आहे, असे उथळज्ञहाल सुधारकही मानीत नाहीत! आईबाप व मुलें आणि भाऊबहिणी यांचे संबंध अधिक नैसर्गिक असल्यामुळे त्यांचा न्याय पतिपत्नीसंबंधास लावता येत नाही, असे कोणी म्हणतील. पण स्त्री-पुरुष-संयोग विवाहाने निर्बंधित होणें हाच कुटुंबसंस्थेचा व सुव्यवस्थित समाजसंस्थेचा पाया आहे. हा पाया जेथे नसेल तेथे कुटुंबसंस्थाच अस्तित्वात येत नाही. व कुटुंबसंस्था नसेल तर आईबाप, मुले, भाऊ, बहीण ह्या नैसर्गिक संबंधास सामाजिक महत्त्वही येत नाही. म्हणूनच पतिपत्नीसंबंध वरील संबंधाइतकाच किंबहुना त्याहूनही जास्त सात्त्विक व केवळ कर्तव्यमूलक आहे, निदान तसा तो असला पाहिजे; तरच संसार खरा हितावह व सुखावह होईल, अशी आमची समजूत आहे. व म्हणूनच आमची विवाहपद्धति तदनुरूप बनली आहे.

परस्पर पसंतीनेच होणाऱ्या विवाहपद्धतीचा नैतिक व सामाजिक दृष्टीने फार अनिष्ट असा आणखी एक परिणाम होत असतो. तो हा की, पुष्कळ स्त्रीपुरुषास आजन्म अविवाहित स्थितीत दिवस कंठावे लागतात. कामवासना व कामव्यवहार विवाहाने नियमित व एकव्यक्तिनिबद्ध होणें हे पुरुषांच्या व स्त्रियांच्या नैतिक हिताचे दृष्टीने अधिक आवश्यक आहे. विवाहनिबंध-रहित असा कामव्यवहार—व्यभिचार—हा पापपुण्याचे दृष्टीने पुरुषास व स्त्रीस सारखाच त्याज्य व पातकावह आहे.

न हीदृशमनायुष्यं लोके किंचन विद्यते ।
यादृशं पुरुषस्येह परदारोपसेवनं ॥

मनु. अ. ४।१३४.

परदारागमनाइतकें पुरुषाची आयुष्यहानि करणारें काहीच नाही, या शास्त्रवचनाचा हाच इत्यर्थ आहे. पण या व्यवहाराकडे केवळ सामाजिक दृष्टीने पाहिल्यास तो पुरुषापेक्षा स्त्रीचीच नैतिक हानि अधिक करतो. स्वैर कामव्यवहार

करून पुरुष मोकळा होतो व त्या पातकी व्यवहाराचें दृश्यचिन्ह त्याजपाशी कांहींच राहत नाहीं; पण या पापी व्यवहाराचें स्पष्ट चिन्ह गर्भरूपानें स्त्रीजवळ राहून तिच्या बेअब्रूची टिमकी सर्व समाजात वाजते. असें होण्यास सृष्टीची घटनाच–तिला अन्यायाची म्हणा पाहिजे तर–कारणीभूत होत असते. याकरतां या बाबतींत पुरुषापेक्षा स्त्रियांस अधिक जपणें जरूर आहे. हीच गोष्ट लक्षात धरून आम्हामध्ये प्रत्येक पुरुषाचें लग्न झालेंच पाहिजे, यापेक्षा प्रत्येक स्त्रीचा विवाह झालाच पाहिजे, असा कटाक्ष विशेष ठेवलेला आहे, व तो याच दृष्टीनें हितावह आहे. असा कटाक्ष ज्या समाजांत नाहीं, तेथें अविवाहित वृद्धकन्यांचा मोठा वर्ग निर्माण होतो; त्यास उदरपोषणार्थ परस्परांशीं व पुरुषांशीं भयंकर चढाओढ करावी लागते; या चढाओढींत त्यांची शारीरिक, मानसिक व नैतिक अधोगति-निदान हानि–होते; आणि बिनवारशी व बेकायदा संततीचाही वर्ग-सामाजिक ढिलेपणाचें एक जिवंत स्मारक म्हणून–समाजांत कायमचा घुसून बसतो ! पाश्चात्य समाजांतील विचारी पुरुषास ही स्थिति स्पृहणीय वाटत नाहीं. व म्हणूनच ' इंग्लंडांतील अविवाहित स्त्रियांपैकीं शे. ५०, विधवांतील शे. ३० व विवाहित स्त्रियांतील शे. १० स्त्रियांस स्वोदरपोषणार्थ शारीरिक व मानसिक कष्ट करावे लागतात. ' असा हिशेब **लॉर्ड कोर्टने** यांनीं प्रसिद्ध करून स्त्रियांच्या या दुःस्थितीबद्दल कळवळा व्यक्त केला आहे ! परस्परपसंतीनें होणारा प्रौढविवाह सुधारकांचे इच्छेप्रमाणें आमच्या समाजांत जारीनें सुरू झाल्यास येथेंही हीच नैतिक व सामाजिक संकटें ओढवल्यावाचून राहणार नाहींत. सालीना ४।५ हजार रु. प्राप्त असणारे बॅरिस्टर, वकील, प्रोफेसर किंवा सरकारी नोकरच जोपर्यंत परस्पर पसंतीच्या विवाहाचा खेळ आपल्या तरुण मुलामुलींकडून खेळवीत आहेत, तोपर्यंत त्यांच्या अविवाहित प्रौढ कन्यांवर हा प्रसंग येणार नाहीं. पण ही सुधारणा मध्यम वर्गांत त्यांचे इच्छेप्रमाणें दुर्दैवानें शिरल्यास इंग्लंडांतील परिस्थितीची घातक पुनरावृत्ति इकडेही झाल्यावाचून राहणार नाहीं !

पुरुष-प्रकृतीच्या परस्परसंबंधाविषयींच्या आमच्यांतील तात्त्विक व धार्मिक उपपत्तींचा आमच्या विवाहपद्धतीवर कोणता इष्ट परिणाम झाला, याचें विवेचन येथपर्यंत केलें. आता या उपपत्तींचा आमच्यांतील पतिपत्नींच्या परस्परसंबंधावर काय परिणाम झाला हें पहावयाचें आहे. नवरा-बायको, पति-पत्नी असे निकटसंबंधदर्शक शब्द इतर भाषांप्रमाणें आमच्याही भाषेत आहेत. इंग्रजांतल्या

'Couple' प्रमाणें आम्हांतही 'जोडपें' हा शब्द आहे. पण पतिपत्नींचें सांसारिक व अध्यात्मिक अभिन्नत्व दर्शविणाऱ्या 'दंपती' शब्दासारखा किंवा इंग्रजींतल्या family व wife या दोन्ही अर्थांचें एकीकरण करणाऱ्या मराठी 'कुटुंब' शब्दासारखा शब्द मात्र इतर भाषांत असलेला दिसून येत नाहीं. पाश्चात्यांत Home चीं-स्वगृहाची-" Home Home, Sweet Home, There is no Place like Home," अशी स्तुति कवि गात असतात. पण आम्ही या 'मधुर स्वगृहा'ची व त्या गृहाच्या देवतेची-गृहिणीचीही-एकाच श्लोकांत मोजक्या पण खोल अर्थाच्या शब्दांनी अशी स्तुति करतो की—

**न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।**
**गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ॥**

शहाणे लोक 'गृहाला गृह न म्हणतां गृहिणीलाच गृह म्हणतात; कारण गृहिणी नसलेलें गृह अरण्याहूनही भयंकर असतें.' गृहिणीचें व गृहस्थाश्रमाचें माहात्म्य वर्णन करणारीं अशीं कितीं तरी सुभाषितें आमच्यांत असून 'धन्यो गृहस्थाश्रमः' असा आम्ही सिद्धांतच काढलेला आहे ! सारांश, पाश्चात्यांत पतिपत्नींचा जीवितक्रम एकमेकांसन्निध पण भिन्नपणें एकाच दिशेकडे जाणाऱ्या समांतर रेषांसारखा असतो. या रेषा एकमेकांस फारशा भिडत नाहींत, प्रसंगीं त्या एकमेकांस छेदून नहीं भलत्या दिशांकडे जातात. पण आम्हांत पतिपत्नींचा जीवितक्रम असा आहे कीं, भिन्न दिशेनें येणाऱ्या दोन रेषा एकदां एकमेकांस येऊन मिळाल्या म्हणजे त्या एकरूपानेंच एकाच दिशेस बहुधा सतत जात राहतात. पाश्चात्यांत पतिपत्नींचें नातें भिन्नत्वयुक्त समानतेचें असतें असें म्हटलें,तर आम्हांतलि हें नातें भिन्नत्व नष्ट करून समानतेच्या पलीकडेच जें एकत्व तें संपादन करतें !

पण असलें हें श्रेष्ठ नातेंही ममतेच्या खोट्या कल्पनेच्या नादीं लागलेल्या आमच्यांतील कांहीं सुशिक्षितांस आवडत नाहीं. 'स्त्रियांची परवशता' या मिलच्या ग्रंथांतील सगळीं प्रमाणें उतरून आणून तीं ते आमच्या पतिपत्नीसंबंधा-विषयींच्या कल्पनांवर फेकीत असतात ! पण मिलच्या या ग्रंथांतील तत्त्वज्ञान तिकडे आतां जुनेंपुराणें झालें असून तें अमलांत आणल्यानें स्त्रीसुधारणेचा व अबलोन्नतीचा प्रश्न सुटलेला नाहीं; तर विवाहबंधनाचा कंटाळा, विवाहितांचा संततीसंबंधाचा कंटाळा आणि लोकसंख्या हटत जाणें वगैरे अनेक अधिकच भानगडीचे, बिकट व नाजुक असे नवेनवे प्रश्न उपस्थित होऊं लागले आहेत.

साहेब लोकांचे जुने फर्नीचर व जुने कपडे सेकंड हँड किंवा लिलावात खरेदी करून त्यांनीं आपलीं घरें व शरीरें शृंगारणारे जसे लोक आमच्यांत आहेत, त्याचप्रमाणे इंग्लंडांत जुनी पुराणी झालेलीं व सत्यतेबद्दल संशय उत्पन्न झालेलीं मतें आमच्यांतील आळशी, निरीक्षणशून्य व स्वाभिमानशून्य मंडळी आयतीं उचलून आणून हिंदुसमाजावर त्यांचें आक्षेपण करावयास लागतात! पण उसन्या जिन्नसावर आपली मालकी कधींच स्थापन होत नाहीं; ते केव्हांना केव्हां खऱ्या मालकास परत करावे लागतात; व पुरतें कह्यांत न आलेलें अस्त्र ते सोडणारावरच उलटून असतें, हें या मंडळींनीं लक्षांत ठेवावें. "आम्ही आमच्या स्त्रियांस अज्ञानांत ठेवतों, त्यांस सन्मान मानीत नाहीं, त्यांस गुलामाप्रमाणें किंवा जनावरासारखें लेखतों; त्यांना आम्ही कसलेंही स्वातंत्र्य न देतां कायमच्या पारतंत्र्यांत व गोषांत कोंडून ठेवतों." इ. इ. आमच्यांतील दांपत्यधर्मावर या मंडळींचे आक्षेप असतात. परक्या घराण्यांतील कन्या पतिगृहीं येऊन तेथील संसाराशीं व पतीशीं एकरूप होऊन तिच्या संसाराचें स्वतंत्र अस्तित्व राहत नाहीं, या दृष्टीनें आमच्यांत पत्नीस स्वतंत्रता नाहीं ही गोष्ट कोणीही मान्य करील. पण यांत वाईट काय आहे तें मात्र कळत नाहीं. कृष्णा व कोयना नद्यांचा प्रीतिसंगम होईपर्यंत कोयनेचें स्वतंत्र अस्तित्व आहे, पण पुढें कोयनेचें नांव व स्वतंत्र अस्तित्व नष्ट होऊन कृष्णेचेंच नांव पुढील ओघास चालू राहतें. पण तेवढ्यावरून कृष्णेच्या पुढील ओघांत कोयनेचें पाणी मुळींच नसतें, असें म्हणतां येत नाहीं. याच न्यायानें परकीय कन्येचें पतिगृहीं आल्यानंतर जरी स्वतंत्र सांसारिक अस्तित्व नष्ट झालें, तरी तिला संसारांत कांहींच महत्त्व नसतें, तिची योग्यता गुलामापलीकडे नसते, हें म्हणणें खोटें आहे. स्त्रियांच्या अज्ञानाबद्दलची हाकाटी याच मासल्याची आहे. हिंदु स्त्रिया अज्ञान, अशिक्षित आहेत असें म्हणणाऱ्यांच्या आक्षेपाचा खरा अर्थ एवढाच असतो कीं, पुरुषास हल्लीं मिळतें तसलें पुस्तकी शिक्षण त्यांस मिळत नाहीं, म्हणून त्या अशिक्षित व अज्ञान होत! पण आपण साक्षरता व सुशिक्षितपणा ही एकार्थच मानून चालत आहों हें मात्र यांच्या लक्षांत येत नाहीं. आमचा सामान्य स्त्रीसमाज 'निरक्षर' असेल, पण तो तेवढ्यावरून केवळ 'अज्ञान' व 'अशिक्षित' असतो असें मात्र म्हणतां येणार नाहीं. साक्षरता हें ज्ञानाचें व शिक्षणाचें 'एक' साधन आहे; तें नसलें तरीही मनुष्य सज्ञान व शिक्षित असूं शकतो. निरक्षर असल्या आमच्या स्त्रीपुरुषांसही धर्माची, नीतीची व सदाचाराची

जाणीव व स्पष्ट कल्पना असते, त्याचें महत्त्वही कळतें व त्याप्रमाणें त्या यथामति आचरणही करतात; तर त्यास अशिक्षित किंवा अज्ञान म्हणणें अयोग्य होय. साधनकाळीं स्त्रियांनाही साक्षरतेचा, पुस्तकी ज्ञानाचा व बहुश्रुतपणाची जरूर नाहीं, असें कोणीही म्हणत नाहीं. पण आमच्या स्त्रिया व त्यांचे द्वारें आमचा समाज पाश्चात्य वळणावर नेण्याची सुधारणा घडवून आणण्याचें एक मुख्य साधन याच हेतूनें जोपर्यंत स्त्रीशिक्षणप्रसार आमच्या सुधारकाकडून करण्यांत येईल, तोंपर्यंत जुनीं ध्येयें व जुना आचार याचा अभिमान बाळगणारे लोक या शिक्षणापासून आपल्या स्त्रिया अलिप्तच ठेवणार, व तें त्यांचे करणें रास्तही आहे. मग याबद्दल सुधारकांनी त्यांस कितीही शिव्याशाप दिले तरी त्यांची ते परवा करणार नाहींत. स्त्रियांस आम्ही समान मानीत नाहीं, या आक्षेपाचें उत्तर वर दिलेंच आहे. गोषासंबंधीची ओरडही अशीच दुराग्रह, विपरीत ग्रह आणि अज्ञान यांना दापत झालेली आहे. गोषाचा खरा हेतु स्त्रीचें पावित्र्य व शुद्धता कायम राखणें हाच आहे. यांत स्त्रियांवर जुलूम करण्याचा किंवा त्यांस गुलामगिरींत काढण्याचा मुळींच उद्देश नाहीं. गुलामगिरी हा गोषाचा अवश्य परिणाम असता, तर ज्या रजपुतांत गोषा फारच सक्त आहे त्यांच्या स्त्रियांत तर गुलामगिरी-पासून उत्पन्न होणारे दुर्गुण ओतप्रोत भरलेले दिसले असते. पण रजपुत स्त्रियांचा खरा बाणा काय आहे, त्याची साक्ष देण्यास टॉड साहेबाचा रजपुतांचा इतिहास मूर्तिमंत उभा आहे. गोषांतल्या रजपुत स्त्रियांइतकें तेज, बाणेदारपणा, स्वार्थत्याग, सत्यनिष्ठा, मानीपणा, धर्माभिमान व देशाभिमान पूर्णपणें स्वातंत्र्य मिळविलेल्या पाश्चात्य स्त्रियांतही आढळून येणार नाहीं. ‘ आपल्या चालीरीती सर्वोत्कृष्ट असें मानून त्याच मापानें परकीय राष्ट्रांच्या चालींचें मोजमाप घेणारा उथळ दृष्टीचा परकीय प्रवासी किंवा ग्रंथकार परोपकार बुद्धीचा मोठा आव घालून व हिंदु स्त्रियांच्या दीन व अवनत स्थितीबद्दल अश्रु ढाळून मुखोद्गार काढीत असतो; पण खुद्द हिंदु स्त्रियांसच आपली स्थिति अवनत व दीन आहे, असें मुळींच वाटत नाहीं. ’ असा अभिप्राय देऊन पुढें कर्नल टॉड लिहितात:—

He particularly laments her want of liberty and calls seclusion imprisonment. From the knowledge I possess of the freedom, the respect, the happiness, which Rajput women enjoy, I am by no means inclined to deplore their state of captivity ( हिंदु स्त्रियांस स्वातंत्र्य नाहीं, याबद्दल या भल्या गृहस्थास विशेषच वाटतें

वाटत असतें; आणि या स्त्रियांच्या मर्यादेस व पडदपोशीस हा कैद असें नांव ठेवतो ! पण पडद्यातील रजपुत स्त्रियास वास्तविक किती स्वातंत्र्य असतें, त्या किती सुखी असतात आणि त्याजबद्दल पुरुषास किती आदर वाटतो, याची मला प्रत्यक्ष माहिती असल्यामुळें त्याच्या ह्या स्थितीस "कैद" हें नाव देण्यास मी मुळींच तयार नाहीं ! ) स्त्रियाचा गोषा म्हणजे त्याची गुलामगिरी, हे अनुमान कोणत्या तर्कशास्त्राचे आधारें आक्षेपक काढतात तेंच आधीं कळत नाहीं. मनुष्य पुष्कळ गोष्टी गुप्त ठेवतो. त्यातील कांहींचा गुप्तपणा त्याच्या हीनतेमुळे त्यास ठेवावा लागतो; पण इतर कांहींचा गुप्तपणा त्याच्या अंगच्या पावित्र्यामुळे किंवा [illegible] तो राखीत असतो. पातकाचा गुप्तपणा पहिल्या प्रकारचा आहे. घरचे देव अगदी एका बाजूस स्वतंत्र व बंदिस्त देवघरात ठेवून आत जाण्याची मोकळीक फारच थोड्यास असते. तसेच आपली धनदौलतही मनुष्य एका बाजूच्या खोलीत अवजड तिजोरीत बंद करून ठेवीत असतो. अर्थात् स्त्रियास आम्ही विशेष पवित्र मानीत असल्यामुळे व त्याच्या पावित्र्याची आम्हास फार किंमत वाटत असल्यामुळे आमच्या या गृहदेवतांस व गृहलक्ष्मीस शक्य तितकें गृहातच ठेवण्याची व त्याचा परपुरुषांशीं फारसा संबंध न येऊं देण्याची आमची वहिवाट आहे. पण आमच्या या शुद्धहेतुमूलक कृतीचा विपर्यास होऊन आक्षेपकाचे दृष्टीस गोषा व पडदपोशी याचे जागीं गुलामाचे गुलामखानेच दिसूं लागतात ! !

स्त्रियाच्या गुलामगिरीसंबंधाने ओरड करणाऱ्या या स्त्रीस्वातंत्र्यवादी लोकाचा मनुस्मृतीतील एक श्लोक फारच आवडता आहे; व या प्रश्नाच्या वादात तो ते वारंवार प्रतिपक्षाचे तोंडावर फेकीत असतात. पण हा श्लोक त्याचे तोंड बंद करण्यास समर्थ नसल्यामुळे उलट खाऊन शिवधनुष्याप्रमाणें आक्षेपकाचे छातीवर जाऊन बसतो !

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।**
**रक्षंति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ॥**

मनु. अ. ९ ३.

असा हा श्लोक आहे. याचे मदतीस 'न भजेत स्त्री स्वतंत्रताम' ( अ. ५।१४८ ) हेंही वचन कधीं कधीं देण्यात येत असते. या वचनावरून स्त्रिया स्वातंत्र्यास पात्र नाहीत, अर्थात् त्यास पारतंत्र्यात, गुलामगिरीतच ठेविलें पाहिजे असें भारतीयाचें ध्येय ही मंडळी अनुमित करतात. पण हा अर्थ साफ

चुकीचा आहे, हे संदर्भाचा विचार करणारास तेव्हाच कळून येते. ' न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' या वाक्याचे पूर्वीच्या तीन वाक्यात ' रक्षणा ' संबंधाचा त्रिवार उल्लेख केला आहे; आणि त्यात कौमार्य, यौवन व वार्धक्य या तीनही काळात अनुक्रमे पिता, पति व पुत्र यानीं स्त्रियांचे संरक्षण करावे असे सांगितले आहे. हे संरक्षण अर्थात् केवळ शारीरिक नसून मानसिक व विशेषतः नैतिक स्वरूपाचेच आहे. शिवाय त्यात पालनाबरोबर पोषणाचाही अंतर्भाव होतो. ह्या मागील तीन वाक्यांचा विचार करता ' न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' याचा खरा अर्थ, स्त्रियास गुलामगिरीत कोंडावें हा नसून, कोणत्याही स्थितीत स्वतःच्या पालन-पोषणाची जबाबदारी स्त्रियांवर टाकूं नये, त्यांचे शारीरिक, मानसिक व नैतिक पालन आणि पोषण पुरुषानीच करावें, हाच याचा खरा अर्थ आहे.

**भार्याया भरणाद्भर्ता पालनाच्च पतिः स्मृतः ।**

महाभारत, आदि. अ. १०४

भार्येचे पोषण करतो म्हणून ' भर्ता ' व पालन करतो म्हणून ' पति ' असे जे महाभारतात वचन आहे, त्यावरून हाच अर्थ सिद्ध होतो. ' भर्तव्या रक्ष-णीया च पत्नी हि पतिना सदा । ' ( म. भा. वन. अ. ६९ ) हे व्यासवच-नही हेच स्पष्टपणे सांगत आहे. स्त्रियांचे अशा प्रकारे पालनपोषण करावयाचे ते त्यांच्यावर सत्ता गाजविण्याकरता नव्हे, तर त्यांचे सामाजिक, धार्मिक व पार-लौकिक बाबतीत फारच महत्त्व आहे, याच दृष्टीने करावयाचे आहे. व या विधा-नास खुद्द मनुस्मृतीतच भरपूर पुरावा आहे. उदा० स्त्रियांना घरात कोंडून व गुलामगिरीत पचवून शुद्ध ठेवूं पाहणे नियंच नव्हे तर अशक्यही आहे, स्त्रियास स्वतःच स्वतःचे संरक्षण करण्यास समर्थ केल्यानेच त्या अधिक सुरक्षित होतात, असे मनुस्मृतीतील

**न कश्चिद्योषितः शक्तः प्रसह्य परिरक्षितुम् ।**

मनु. अ. ९।१०.

**अरक्षिता गृहे रुद्धाः पुरुषैराप्तकारिभिः ।**
**आत्मानमात्मना यास्तु रक्षेयुस्ताः सुरक्षिताः ॥**

मनु. अ. ९।१२.

या श्लोकात स्पष्ट सांगितले आहे. रक्षणीय अशा ज्या अनेक मोलवान् वस्तु असतात, त्यात स्त्री ही सर्वांहून मोलवान् आहे; व म्हणून तिचे संरक्षण चारी वर्णांच्या लोकांनी सर्वांहून अधिक केले पाहिजे: ( **चतुर्णामपि वर्णानां दारा**

**रक्ष्यतमा सदा ।** अ. ८।३५९ ) एवढेच नव्हे तर ( **सूक्ष्मेभ्योऽपि प्रसंगेभ्यः स्त्रियो रक्ष्या विशेषतः । द्वयोर्हि कुलयोः शोकमाव-हेयुररक्षिताः ॥** ) अगदी क्षुल्लक वाटणाऱ्या लहानसहान मोहोत्पादक प्रसंगा-पासूनही त्यांचे विशेष दक्षतेने रक्षण केले पाहिजे. कारण तसें न केल्यास माहेर व सासर या दोनही कुळावर दुःख व पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येईल; असा ( अ. ९।५ ) **मनुस्मृतीत** स्त्रियांच्या नैतिक संरक्षणासंबंधाने विशेष कटाक्ष ठेवला आहे, व त्यास अनुसरूनच भारतीय समाज अजूनही बहुतांशी वागत आहे.

विवाहित स्त्री-पुरुषांनी एकमेकांशी अव्यभिचारी निष्ठेनें आमरणांत राहणे हें नैतिक व सामाजिक दृष्ट्या अगत्याचें आहे, असेंच मनूचें मत असून त्यांत पुरुषाविषयीं पक्षपात दाखविलेला नाहीं. परदारागमनासारखी पुरुषाच्या आयुष्याची हानि करणारी दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं, अशा आशयाचे मनुवचन मागें दिलेच आहे.

> **संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ।**
> **यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याण तत्र वै ध्रुवम् ॥**
>
> मनु. अ. ३।६०.

> **अन्योन्यस्याव्यभिचारो भवेदामरणांतिकः ।**
> **एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥**
>
> **मनु.** अ. ९।१०१.

" भार्या व भर्ता हीं ज्या कुळांत एकमेकासंबंधाने सदैव संतुष्ट असतात, त्या कुळाचें शाश्वत कल्याण होतें. आमरणांत एकमेकासंबंधाने अव्यभिचाराचें-अनन्यत्वाचें-वर्तन असणे, हेंच विवाहित स्त्री-पुरुषांच्या श्रेष्ठ वैवाहिक नीतीचे सार आहे " असें **मनुस्मृतीत** स्पष्ट सांगितलें आहे. याबरोबरच स्त्रियांच्या नैतिक शुद्धतेसंबंधाने व पावित्र्यासंबंधाने विशेष कटाक्ष ठेवला आहे. पण तो पुरुषा-विषयींच्या पक्षपातामुळें नव्हे, तर स्त्रियांच्याच नैतिक पक्षपातामुळें ठेवला आहे. स्त्रियांचें इतक्या दक्षतेने संरक्षण का करावयाचें यासंबंधाची कारणें व हेतु हीही **मनुस्मृतींत** स्पष्ट शब्दांनीं सांगितलीं आहेत. तीं पाहिलीं असता **मनुप्रभृति** स्मृतिकार पक्षपाती नव्हते, जुलमी नव्हते व रानटीही नव्हते, हें कोणाही समंजस व विचारी माणसाच्या लक्षांत आल्यावाचून राहणार नाहीं. **मनुस्मृतींतील** हीं वचनें पुढें दिल्याप्रमाणें आहेत:—

**स्वां प्रसूतिं चरित्रं च कुलमात्मानमेव च ।**
**स्वं च धर्मं प्रयत्नेन जायां रक्षन् हि रक्षति ॥**
**पतिर्भार्यां संप्रविश्य गर्भो भूत्वेह जायते ।**
**जायायास्तद्धि जायात्वं यदस्यां जायते पुनः॥**
**तस्मात्प्रजाविशुद्ध्यर्थं स्त्रियं रक्षेत्प्रयत्नतः ॥**

मनु. अ. ९।७ ते ९.

" प्रयत्नपूर्वक पत्नीचे नैतिक संरक्षण केलें असतां आपली संतति, आपले चारित्र्य,आपले कुळ,आपण स्वतः व आपला धर्म या सर्वांचेंच आपोआप व सहज संरक्षण होतें. पति हाच स्वतः भार्येचे पोटीं प्रवेश करून गर्भरूपानें पुनः जन्मतो. अर्थात् भार्येचे पोटीं पतिच पुनः जन्म घेत असतो, म्हणूनच भार्येस ' जाया ' असें म्हणतात. यासाठीं संततीची शुद्धता राखण्याकरता पुरुषांनीं प्रयत्नपूर्वक—मोठ्या दक्षतेनें—स्त्रियांचे नैतिक संरक्षण करीत असावें." या वचनांत ' रक्षण ' सांगितलें असून रक्षणाचा हेतुही तितक्याच स्पष्ट शब्दांनीं सांगितला आहे.

**लोकानन्त्यं दिवः प्राप्तिः पुत्रपौत्रप्रपौत्रकैः ।**
**यस्मात्तस्मात्स्त्रियः सेव्याः कर्तव्याश्च सुरक्षिताः ॥**

मुलगे, नातू, पणतु इत्यादींचे उत्पादन करून तद्द्वारा आपणास स्वर्गप्राप्ति करून देणाऱ्या व लोकसमाजाची परंपरा अविच्छिन्न ठेवणाऱ्या ज्याअर्थी स्त्रियाच आहेत, त्याअर्थी त्यांचे विवाहबंधनपूर्वक सेवन करावें व त्यांचे चांगले रक्षणही करावें, असें याज्ञवल्क्य स्मृतींतही स्पष्टवचन आहे. ( अ. १।७८ ) ' योऽकामां दूषयेत्कन्यां स सद्यो वधमर्हति ' ( अ. ४।३६४ ) या मनुवचनांत कन्येवरील बलात्कारास वधाची कडक शिक्षा सांगितली आहे, तिचा तरी कटाक्ष स्त्रीशुद्धतेवरच आहे. स्त्रियांच्या नैतिक संरक्षणाचें सामाजिक व धार्मिक महत्त्व तेवढेंच सांगून मनुस्मृति स्वस्थ बसलेली नाहीं. स्त्रियांची ही शुद्धता कायम राहण्यासाठीं काय उपाय योजावे याचेंही तिनें स्पष्ट दिग्दर्शन केलें आहे; आणि स्त्रियांचे स्वभाव, नैसर्गिक मनोधर्म व शारीरिक रचना ही पूर्णपणें लक्षांत घेऊन त्यांशीं विरोध न करतां त्यांचा विकासच होईल अशा धोरणानें या उपायांची योजना केलेली आहे. यासंबंधानें मनुस्मृति स्पष्ट सांगते कीं—

**अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैव नियोजयेत् ।**
**शौचे धर्मेऽन्नपक्त्यां च पारिणाह्यस्य चेक्षणे ॥** मनु. अ. ९।११

सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ।
सुसंस्कृतोपस्करया व्यये चामुक्तहस्तया ॥
अ. ५।१५०.

पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा ।
पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥
अ. ३।५५.

" द्रव्यसंग्रह व द्रव्यव्यय, गृहादिकाची स्वच्छता, अन्नपाकक्रिया व गृहातील सामानसुमानाची देखरेख ही कामे पुरुषांनी स्त्रियांवर सोपवावी. स्वतः स्त्रीनेही सदोदित आनंदित राहून गृहकृत्यात दक्ष असावे. तसेच घरातील सर्व वस्तु स्वच्छ व टापटिपीने ठेवून खर्चही तिने काटकसरीने करावा.' अशा प्रकारें गृहकार्याकडे नियोजन केलेल्या स्त्रियास पुरुषांनी कार्यदृष्टीने स्वयंपाकीण किंवा मोलकरीण यांचे पलीकडे मान देऊं नये असे, सुधारकांच्या म्हणण्याप्रमाणे मनुस्मृति सांगत नसून उलट तीची पुरुषास अशी आज्ञा आहे की, " स्वतःचे व स्वकुलाचे कल्याण इच्छिणाऱ्या बापांनी व भावांनी, नवऱ्यांनी व दिरांनी स्त्रियास भूषणादिक द्यावे व त्यांजविषयी पूज्यभाव मनात बाळगून त्यांशी वर्तन ठेवावे. सुधारक मंडळी प्रतिपादितात त्याप्रमाणे स्त्रियास जर मनुप्रभृति स्मृतिकार गुलाम मानीत असते तर गृह म्हणजे गुलामखाने आणि संसार म्हणजे स्त्रियांची गुलामगिरी व पुरुषांची या गुलामावर बनिपणा गाजविण्याची मुभा असल्याच दृष्टीने त्यांनी स्त्रियांकडे व संसाराकडे पाहिले असते; पण तसा प्रकार मुळीच दिसत नाही. उलट स्त्रियांच्या नैसर्गिक व संपादित गुणांची आणि त्या गुणांच्या कौटुंबिक व सामाजिक महत्त्वाची त्यांनी सहृदय व मार्मिकदृष्टीने इतकी स्तुति केली आहे की, तितकी स्तुति स्त्रियांचे दास्यावमोचन करून त्यांस समानतेच्या पायरीवर ठेवणाऱ्या लोकांच वाङ्मयात तरी सापडेल का नाही याची वानवाच आहे देवीची स्तुति करणाऱ्या एका स्तोत्रकाराने तर तिला उद्देशून, " तूंच ' राजलक्ष्मी राजगेहे गृहलक्ष्मी गृहे गृहे ' आहेस ' असे म्हटले आहे. सामान्यतः स्त्रियांच्या—विशेषतः पत्नीपदारूढ स्त्रियांच्या—आमच्या स्मृतिकारांनी गाइलेल्या महात्म्याचा थोडासा मासला पुढे देत आहे, त्यावरून ही गोष्ट कळून येईल:—

यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राऽफलाः क्रियाः ॥

शोचंति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलं ।
न शोचंति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ॥

मनु. अ. ३।५६, ५७

प्रजनार्थं महाभागाः पूजार्हाः गृहदीप्तयः ।
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्ति किंचन ॥
उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् ।
प्रत्यहं लोकयात्रायाः प्रत्यक्षं स्त्रीनिबंधनम् ॥
अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा ।
दाराधीनस्तथा स्वर्गः पितॄणामात्मनश्च ह ॥

मनु. अ. ९।२६ ते २८

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्यामूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥
भार्यावंतः क्रियावंतो भार्यावंत' श्रियान्विताः ।
भार्यावंतः प्रमोदंते सभार्या गृहमेधिनः ॥
सखायः प्रविविक्तेषु भवंत्येताः प्रियंवदाः ।
पितरो धर्मकार्येषु भवंत्यार्तस्य मातरः ॥
आत्माऽत्मनैव जनितः पुत्र इत्युच्यते बुधैः ।
तस्माद्भार्यां नरः पश्येन्मातृवत्पुत्रमातरम् ॥

महाभारत, आदि. अ. ७४.

न च भार्यासमं किंचिद्विद्यते भिषजां मतम् ।
औषधं सर्व दुःखेषु ................वन. अ. ६१.

" जेथे स्त्रियास पूज्य भावाने वागविले जाते तेथे प्रत्यक्ष देवताच आनंदाने रमत असतात; पण जेथे त्यांचेविषयी पूज्यभाव नसतो तेथील सर्व क्रिया निष्फळ होतात. ज्या कुलातील स्त्रिया शोकमग्न असतात, तें कुल लवकरच नष्ट होते; पण जेथील स्त्रिया दुःखित नसतात त्या कुळाची नेहमी अभिवृद्धिच होते. प्रजोत्पत्तीचें मुख्य साधन या नात्याने या महाभाग्यशाली स्त्रियास पूज्य भावाने वागविले पाहिजे; शिवाय स्त्रिया ह्या गृह प्रकाशमय करणाऱ्या दी[illegible] आहेत; किंबहुना स्त्रिया ह्याच गृहाची शोभा व वैभव आहेत; दोहोंत फरक मुळीच नाहीं. अपत्याचे उत्पादन, जन्मलेल्याचे परिपालन किंबहुना रोजची लोकयात्रा

किंवा सामाजिक संसार हा प्रत्यक्ष स्त्रियांवरच अवलंबून आहे. अपत्योत्पादन, धर्मकार्यें, शुश्रूषादिसेवा, श्रेष्ठ प्रकारचा सात्त्विक कामोपभोग, किंबहुना आपली स्वतःची व आपल्या पितरांची स्वर्गप्राप्तिही विवाहित स्त्रियांचेच हाती आहे."

"भार्या ही मनुष्याची अर्धांगी आहे तसेंच भार्या हाच सर्वांहून श्रेष्ठ असा मित्र, धर्मादि तीन पुरुषार्थांचे मूळ व संसार तरून जाण्याचे मुख्य साधन आहे. भार्यावान् पुरुषच कर्तृत्ववान् व वैभवशाली असतो, भार्यावंतानाच खरा आनंदानुभव मिळतो, व भार्यावंतच खरे गृहस्थाश्रमी होत. भार्या ही एकांतात प्रियभाषण करणाऱ्या मित्रासारखी, धर्मकार्यांचे बाबतीत पित्यासारखी व आजारात मातेसारखी असते. आपणच आपणास जे उत्पन्न करतो त्यासच 'पुत्र' असे शहाणे लोक म्हणत असतात; म्हणून पुरुषाने आपल्या पुत्राच्या आईस स्वमातेप्रमाणेंच पूज्य मानावे. सर्वच प्रकारच्या दुःखामध्ये वैद्यासही संमत असे भार्येसारखे दुसरें औषधच नाहीं."

असेंचे स्मृतिकार पत्नीपदारूढ स्त्रियांचें माहात्म्य इतके मोकळ्या मनानें गाणारे असूनही, स्त्रियाविषयीं तिरस्कारबुद्धि व पुरुषांविषयीं पक्षपातबुद्धि मनांत बाळगूनच त्यांनी धर्मशास्त्रे रचली, असें वरचेवर प्रतिपादन करणारांचें तोंड ब्रह्मदेवासही धरता येणार नाहीं. स्त्रियांना गृहकार्यांत व अपत्योत्पादनांत गुंतवून ठेवून त्यास सांपत्तिक व इतर स्वातंत्र्य स्मृतिकारांनी दिलें नाहीं हीच गुलामगिरी होय, असें कोणी म्हणतील; पण हें त्यांचे म्हणणें अज्ञानमूलक किंवा दुराग्रहमूलक आहे, ही गोष्ट कोणासही थोड्या विचारांतीं कळून येईल. मनुष्याच्या ज्या अनेक लहानमोठ्या गरजा आहेत, त्यांत त्याच्या मूळ अस्तित्वासच कारणीभूत होणारे खाद्यपेय व त्या अस्तित्वावर घाला न येण्यास जरूर असें संरक्षण या दोन गरजा अत्यंत महत्त्वाच्या आहेत. त्याचप्रमाणें समाजाचें पोषण, संरक्षण व संवर्धन होऊन त्याची परंपरा अव्याहत राखणें, हें सामाजिक नियमांचे पहिलें व मुख्य कार्य आहे. हें कार्य चांगल्या प्रकारें पार पडेल अशा प्रकारची बंधनें समाजांतील घटकांनीं मुकाट्यानें स्वहितास्तव मान्य केलीं पाहिजेत. समाजबंधनाचें हें जें महत्त्वाचें पहिलें कार्य त्याचे दृष्टीनें विवाहशून्य व म्हणूनच पशुतुल्य स्त्रीपुरुषसंबंधास सामाजिक महत्त्व कांहींच नाहीं; उलट असले संबंध समाजाचा पाया व महत्त्वाचा मूळघटक जें कुटुंब त्याच्या उत्पत्तीस विघातक असल्यामुळें ते संबंध सामाजिकदृष्ट्या हानिकारकच आहेत. विवाहबद्ध होऊन केवळ रतिसुखावर आसक्ति ठेवून तदनुरूप वर्तन करणाऱ्या व या

मुखाचे आड येणाऱ्या संततीचा कंटाळा किंवा हयगय करणाऱ्या लोकासही सामाजिक दृष्टीनें मुळींच किंमत नाहीं. अपत्योत्पादन, अपत्यसंगोपन व अपत्य-संवर्धन योग्य प्रकारें व कर्तव्यबुद्धीनें करून कुटुंबसंस्था स्थिर, शुद्ध व अजरामर राखणारे लोकच समाजाचें अस्तित्व अखंड कायम ठेवण्यास खरी मदत करीत असतात. म्हणूनच स्त्रियाच्या इतर गुणांपेक्षा त्यांची मातृत्वशक्ति ह्या गुणाचेंच महत्त्व आम्हास अधिक वाटतें, व म्हणूनच आमचे शास्त्रकार ' न मातुः पर-दैवतं ' असें कंठरवानें सांगतात. अशा प्रकारें ' उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनं ' हें ' लोकयात्रेचे मुख्य व रोजचे निबंधन ' प्रत्यक्ष स्त्रियाचेंच हातीं असून तें योग्यप्रकारें करण्याची जबाबदारी शिरावर घेण्यास स्त्रियाच नैसर्गिक व मानसिक गुणांनी विशेष लायख आहेत. सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या ह्या कार्याचा बोजा त्यास उचलावयाचा असल्यामुळें उदरपोषणार्थ पुरुषाप्रमाणे घराबाहेरचे धंदे करण्याचा व पुरुषाशी समानत्व येण्याकरिता त्यासच योग्य असलेले सर्व शिक्षण संपादण्याचा बोजाही, सांपत्तिक स्वातंत्र्याच्या व समानतेच्या खोट्या व घातक मोहास बळी पडून, त्यांचेवर सुधारणावादी लादतील किंवा स्त्रियाच स्वतः उचलतील तर त्यांची शारीरिक, मानसिक व नैतिक हानि होईल येवढेच नव्हे, तर त्यांच्या संततीचे संगोपनावर अर्थात् समाजाच्या भावी अस्तित्वावरही अनिष्ट परिणाम झाल्यावाचून राहणार नाही. इंग्लंडादि पाश्चात्य देशात हा बिकट प्रश्न उपस्थित झाला असून तो सोडविण्यास तिकडील समाज-शास्त्रवेत्ते अटोकाट प्रयत्न करीत आहेत, तरी तो त्यांस अद्याप सुटलेला नाही. पाश्चात्यातला हा प्रकार सांप्रत मुंबईच्या गिरण्या वगैरेमध्यें जाऊन काबाडकष्ट करणाऱ्या स्त्रियामध्यें थोडाथोडा दिसून येऊं लागला असून त्यांचेमध्ये बालकाच्या मृत्यूचें प्रमाण भयंकर वाढलें आहे. तेवढ्यावर वेळींच सावध होण्याची सुबुद्धि, स्त्रियास सांपत्तिक स्वातंत्र्याचा लाभ देऊं इच्छिणाऱ्यास होणार नाहीं काय ? अपत्योत्पादन व अपत्यपरिपालन हीं कार्ये फार महत्त्वाची, फार बिकट, फार कष्टाची व फार नाजुक आहेत. हीं ज्यांचे शिरावर आहेत त्याजवर इतर सामाजिक कर्तव्याचे बोजे जितके कमी बसतील तितके समाजदृष्टीनें हितावह आहे. वरील प्रकारचें महत्त्वाचें सामाजिक कार्य करणाऱ्या स्त्रियास जर इतर कोणतें कार्य झेपण्यासारखें आणि मुख्य कार्यास सोयीचें व पोषक असें असेल तर तें गृहकार्य हेंच आहे; व तेंच आमच्या स्मृतिकारानीं त्याजवर सोंपविलें आहे. स्त्रियाची दृष्टि व्यापक व मन प्रगल्भ होऊन त्यांना बहुश्रुत होणे सध्याच

काळीं फार जरूर आहे हें कोणीही नाकबूल करीत नाही. तसेंच दुर्दैवानें बाल-वैधव्य आल्यामुळे ज्याचेवर अपत्योत्पादन व अपत्यपरिपालन ह्या कर्तव्याचा बोजा येतच नाही, त्यानीं मनमुराद सुशिक्षण संपादून इतर सामाजिक कर्तव्याचे बोजे शिरावर घेतल्यास तें सामाजिक दृष्टीनें अपायकारक नसून उलट हितावहही आहे. प्राचीन ब्रह्मचारिणींचें ध्येय डोळ्यापुढे ठेवून ज्ञानसंपादन करण्यास लायक असा आमच्या स्त्रीसमाजात जर कोणता वर्ग असेल तर हाच आहे. पण आमचे सुधारकबंधु यास पुन: संसारांत पाडण्याचाच अटोकाट प्रयत्न करीत असतात; किंवा त्यास ' सुशिक्षित ' बनवून ' अशिक्षित ' स्त्रीसमाजातून फोडून काढून सुशिक्षित स्त्रीपुरुषांशीच दळणवळण ठेवावयास लावीत असतात ! आधुनिक साधनांचा पूर्ण उपयोग करून पण प्राचीन ब्रह्मचारिणीचें ध्येय डोळ्यांपुढे ठेवून बालविधवांचा वर्ग सुशिक्षणसंपन्न केला, आणि सुशिक्षित होतांच आपल्या अशिक्षित भगिनींची संगति त्याज्य मानून सुशिक्षित स्त्री-पुरुषातच मिसळण्याची त्याची प्रवृत्ति सुटेल व अशिक्षित म्हटलेल्या संसारी स्त्रियांतच पूर्ववत् मिलाफानें तो वर्ग वागेल, तर या उत्तरोक्त स्त्रियांचीही दृष्टि व मन त्याचे सहवासानें व्यापक व बहुश्रुत होईल; आणि तेंही अनायासें व त्यांच्या मुख्य सामाजिक कर्तव्याची हानि न होतां होईल.

वरील कारणांकरितां स्त्रियास सांपत्तिक स्वातंत्र्य न दिल्यामुळें त्यांच्या पोषणाची हयगय कोणत्याही स्थितीत होऊं नये, अशीही आमच्या धर्मशास्त्रकारांनी तजवीज केलेली आहे. मुलाबरोबर मुलीनाही वडिलार्जित मालमत्तेचा वाटा मिळत नाही, म्हणून आमच्या स्त्रिया गुलाम व आमची संस्कृति खालच्या दर्जाची, असें म्हणता येत नाही. संस्कृतीच्या उच्चनीचतेची ही कसोटी खरी मानली तर आरब लोक सर्वांहून जास्त सुधारलेले आहेत असें मानावें लागेल ! मुलगे हयात असल्यावर मुली वारस होत नसल्या, तरी त्यांना मालमत्तेचा कांहींच अंश मिळत नाही, हे म्हणणें साफ चुकीचें आहे भाऊ हयात असता मुलींना जरी बापाच्या मालमत्तेचा वारसा मिळत नाही, तरी त्यांच्या व मातेच्या अभावी मुलीच वारस होतात; व बापाकडून मिळालेल्या या इस्टेटीची मालकी त्यांचे नवऱ्याकडे न जाता हयातीपर्यंत त्यांचेकडेच राहून पश्चात् त्यांचे मुलांकडे जाते. शिवाय स्त्रीधनावर स्त्रीचीच अप्रतिबद्ध सत्ता असते. त्याचा विनियोग ती स्वसंपादित मालमत्तेप्रमाणें वाटेल तसा करूं शकते. अशा विनियोगानंतर राहिलेली मालमत्ता तिचे मुलास न मिळता मुलीस मिळते. दुसरें असें

की, दीर किंवा इतर नातेवाईक यास वडिलार्जित इस्टेट काडीची जरी मिळाली नाही, तरी त्याजपासून व त्याचे अभावी इतर आप्तापासून तिला हक्काने पोटगी मागता येते. तसेच निपुत्रिक नवऱ्याच्या इस्टेटीची पत्नीच आपल्या हयातीपर्यंत मालक होत असते व तिचे अभावी मग मुलीच मालक होतात. सारांश, आमची कौटुंबिक रचना पुत्र-परंपरामूलक असल्यामुळे स्त्रियास जरी वारसदारीत गौण मानले असले, तरी सांपत्तिक किंवा इतर कोणत्याही दृष्टीने त्यास गुलामासारखी स्थिति खास पूर्वी नव्हती व हल्लीही नाही; आणि आमचा दांपत्यधर्म अनेक दृष्टीनी श्रेष्ठ दर्जाचा आहे, हे वरील विवेचनावरून कोणासही सहज दिसून येईल.

आतापर्यंत केलेल्या विवेचनात पति वगैरे पुरुषानी स्त्रियाशी कसे वागावे, या संबंधाच्या भारतीय ध्येयाचे मुख्यतः निरूपण केले. स्त्रियानी पति वगैरे पुरुषाशी कसें वर्तन ठेवावयाचे यासंबंधाचे भारतीय ध्येय जगजाहीरच आहे. हिंदु स्त्रियाची अद्वितीय व निरपेक्ष पतिनिष्ठा तर सर्व जगात मान्य व उत्तम नमूनच होऊन बसली आहे. त्याची ही पतिनिष्ठा व पतिप्रेम अलौकिक व दिव्य पदास पोचून त्या पतिबरोबर सहगमन करीत. तो प्रकार प्रत्यक्ष पाहून तर परदेशीय प्रवाशानी थक्क होऊन तोंडात बोटेच घातली आहेत !

> विशीलः कामवृत्तो वा गुणैर्वा परिवर्जितः ।
> उपचर्यः स्त्रिया साध्व्या सततं देववत्पतिः ॥
> नास्ति स्त्रीणां पृथग्यज्ञो न व्रत नाप्युपोषितम् ।
> पतिं शुश्रूषते येन तेन स्वर्गे महीयते ॥
>
> मनु अ. ५।१५४.१५५.

“ पति शीलभ्रष्ट, चैनी किंवा गुणहीन असला तरीही साध्वी स्त्रियानी पतीस देव मानून त्याची सतत सेवा करावी. पतिसेवेवाचून स्त्रियास निराळा यज्ञ, व्रत किंवा उपवास सांगितलेला नाही. तिनें पतिची शुश्रूषा केली म्हणजे तेवढ्यानेच तिची स्वर्गी मानमान्यता होते ” या मनुवचनाप्रमाणे भारतीय स्त्रिया अद्यापही वागत आहेत. पण या त्याच्या निरपेक्ष व उच्च कर्मयोगासच व्यक्तिस्वातंत्र्यवादी सुधारक गुलामगिरी हें नाव देत असतात. व्यक्तिस्वातंत्र्याचे हे तत्त्व वेदवाक्य मानून त्याप्रमाणे संसारातील वेगवेगळे संबंध व नाती मोजूं गेल्यास बालकाकरता प्राण टाकणारी माता व देशाकरतां तळहातावर शीर घेणारा देश-

भक्त आणि राजाकरता रणांत प्राणांतापर्यंत लढणारा राजनिष्ठ शिपाई हेही गुलामाच्याच सदरात येतील ! हिंदु स्त्रिया आपल्या पतीची एकनिष्ठेने जी सेवा करतात तिची किंमत व तिचें स्वरूप सुधारकास मनातून कळत नाही असे नाही; पण तें बाहेर दाखविणे त्यांस अडचणीचे व अनिष्ट वाटते. तथापि प्रसंग पडला म्हणजे ते कळत किंवा न कळत बाहेर पडल्यावाचून रहात नाही. स्त्रिया सुशिक्षित झाल्या, म्हणजे आपल्या योग्यतेची जाणीव त्यांचेमध्यें उत्पन्न होऊन त्या अधिक स्वाभिमानी होतील व मग त्या नवऱ्यापुढें बटकीप्रमाणे न वागता समान योग्यतेच्या मित्राप्रमाणें वागतील, असे सुधारक प्रतिपादन करीत असतात. पण हा त्यांचा अंदाज काही थोड्या 'सुशिक्षित' स्त्रियांचे बाबतीत खरा ठरला तरी, तो इतरांचे बाबतीत व सर्वांशी खरा ठरेल असे म्हणवत नाही. ह्याचें प्रत्यंतर पहावयाचे असल्यास श्री. रमाबाई रानडे यांचें 'आमच्या आयुष्यातील आठवणी' हे एकाद्या कादंबरीहूनही सरस असलेले व कुलीन हिंदु स्त्रीची वृत्ति प्रकट करणारें पुस्तक वाचावे. जुन्या चालीची एकादी अशिक्षित म्हटलेली स्त्री स्वयंपाकपाणी वगैरे गृहकृत्यें करून पतीचे पाय चेपणे वगैरे प्रकारची त्यांची सेवा करीत असते. पण श्री. रमाबाई ह्याही सर्व सेवा करून शिवाय न्यायमूर्तीचा शिष्य, रीडर, प्रायव्हेट सेक्रेटरी व नोकरीहि बनत; आणि न्यायमूर्तीस पुस्तके वाचून दाखविणें, त्यांची खाजगी पत्रे लिहिणे, पुरुषानी पाहावयाच्या संसारातील अनेक बाबींची तजवीज करणे, किंबहुना ते बाहेरून घरात आले म्हणजे त्यांच्या अंगावरचे कपडे स्वतः काढून जेथल्या तेथे ठेवणे हीही कामे त्या करीत ! हिंदु-ध्येय मान्य करणारे लोक या कर्तव्यमूलक वर्तनास मुळींच नांव ठेवणार नाहीत. व्यक्तिस्वातंत्र्यवादी व समानतेचे अभिमानी असलेल्या सुधारकांच्या कोटिक्रमाप्रमाणे मात्र या वर्तनास वास्तविक गुलामगिरी नाव मिळावयास पाहिजे; पण ना. गोखले यांनी या पुस्तकाचे प्रस्तावनेत ह्या वर्तनास 'उच्च प्रकारची सेवावृत्ति' असे नाव दिले आहे, व ते हिंदुध्येयाचे दृष्टीने योग्यही आहे. एका सुधारकाग्रणीच्या पत्नीच्या एकनिष्ठ वर्तनास 'श्रेष्ठ पतिसेवा' हे नाव जर द्यावयाचे तर जुन्या चालीच्या स्त्रियांनी त्याच भावनेने केलेल्या तसल्याच स्वरूपाच्या वर्तनास गुलामगिरी का म्हणावयाचे, याचा खुलासा झाला पाहिजे. पत्नी जुन्या चालीची म्हणून तिचा त्याग—निदान तिरस्कार—करणारे सुधारक पुरुष सांपडतील. पण त्यांच्या स्त्रियांकडे पाहिले तर—पतीस देव मानण्याचे वरील ध्येय पिढ्यानुपिढ्या अंगी मुरल्यामुळें—त्याही बहुतक

लवकरच स्वत: सुधारक बनतात. ज्या स्वतः सुधारक न बनता जुन्या चालीस व ध्येयास चिकटून राहतात, त्याही आपल्या सुधारक पतीचा धिक्कार किंवा त्याग न करतां त्याचे पाशींच राहून संसार करीत असतात ! हिंदु स्त्रियांच्या या श्रेष्ठ कर्मयोगाचे रहस्य व महत्त्व, स्वातंत्र्य व समता यांच्या खोट्या कल्पनांनी डोके फिरलेल्या सुधारक पुरुषास जर कळलें नाहीं तर ते त्याचेच दुर्दैव होय !

पाश्चात्य व भारतीय यांच्या दापत्यधर्मांचें आतापर्यंत जे तुलनात्मक विवेचन केलें, त्यावरून वाचकाचा गैरसमज होऊं नये, यासाठीं त्यास शेवटीं एक इशारा देऊन हें बरेंच लांबलेलें प्रकरण पुरें करतों. पाश्चात्यांचा दापत्यधर्म आमच्याहून कमी प्रतीचा आहे, असें म्हटल्यानें आमच्यांतील सगळ्याच स्त्रिया पाश्चात्यांतील सर्व स्त्रियांहून वैवाहिक नीतीनें श्रेष्ठ आहेत, असें म्हणण्याचा रोख आहे असें कोणी समजूं नये. ( एका समाजशास्त्रज्ञानें असा एक ठोकळ नियम सांगितला आहे कीं, समाजांतील बंधन किंवा इतर परिस्थिति कशीही असली, तरी त्यांतले एकतृतीयांश लोक सद्वर्तन कदापि सोडीत नाहींत आणि दुसरे एकतृतीयांश लोक असद्वर्तनी व नीतिभ्रष्टच असतात. पण मधला जो तिसरा एकतृतीयांश वर्ग उरला तो मात्र समाजबंधनें किंवा सामाजिक परिस्थिति जशी अनुकूल प्रतिकूल असेल त्या मानानें नीतिमान किंवा नीतिभ्रष्ट बनतो. अर्थात् सामाजिक निबंधन व नियमन करणाऱ्यांनीं अशीं समाजबंधनें निर्माण केलीं पाहिजेत कीं, हा मध्यमवर्ग कनिष्ठ वर्गांत न जाता वरिष्ठ वर्गांतच समाविष्ट होईल; मग अशा बंधनांनीं श्रेष्ठ वर्गांतल्या एकतृतीयांश लोकांचें व्यक्तिस्वातंत्र्य थोडेबहुत मर्यादित झालें, तरी हरकत नाहीं. या दृष्टीनें विचार करतां भारतीयांचा दापत्यधर्म पाश्चात्यांहून नीतिमत्तेस अधिक अनुकूल आहे, एवढेंच वरील विवेचनाचें तात्पर्य आहे. पाश्चात्यांचा दापत्यधर्म व स्त्रीपुरुषांचा सामाजिकसंबंध व्यक्तिस्वातंत्र्य-प्रधान आहे; तर आमचा व्यक्तिपावित्र्य-प्रधान आहे. पावित्र्यास श्रेष्ठ मानणारांचें स्वातंत्र्य बरेंच कमी होणार व स्वातंत्र्यास श्रेष्ठ मानणाऱ्यांच्या पावित्र्यासंबंधाच्या कल्पना बऱ्याच ढिल्या असणार. आमच्यामध्ये या पावित्र्यभावनेनें स्त्रीपुरुषांचें–विशेषतः तरुणपणांत–सामाजिक दळणवळण सक्त रीतीनें नियमित व मर्यादित केलेलें आहे.

**मात्रा स्वस्त्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत् ।**
**बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥** मनु. अ. २।२१५

" इंद्रियसमूह बळवान असल्यामुळे तो ज्ञात्या व शहाण्या माणसांसही बलात्काराने मोहाकडे ओढून नेतो; याकरता तरुण सावत्र आई, बहिण किंवा मुलगी याजबरोबर पुरुषाने एकांतात राहूं नये." अशा प्रकारचा सक्त नियम पाळणाराचें पावित्र्य राहिलें, तरी स्वातंत्र्य बरेंच कमी व्हावयाचें. उलट सामाजिक स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या लोकांत पावित्र्य इतक्या श्रेष्ठ दर्जाचें असणेंही अशक्य आहे. पाश्चात्यांपैकीं पुष्कळ स्त्रीपुरुषांचें पातिव्रत्य व पत्नीव्रत्य श्रेष्ठ प्रतीचें असलें, तरी योग्य वय झाल्यानंतर समाजांत मोकळेपणानें वावरूं लागणाऱ्या तरुण स्त्रिया प्रेमाकर्षणाचें—वरशोधनाचें व वरपसंतीचें—कार्य करीत असतां त्यास परपुरुषस्पर्शाचे बाबतींतच नव्हे तर चुंबनादिकामध्येंही आमच्या इकडच्याइतकी सक्त दृष्टि ठेवतां येत नाहीं, ठेवतां येणें शक्यही नाहीं व ती ठेवणें तिकडे जरूरही मानीत नाहींत. त्यांच्या मधले बॉलच्या नाचाचे प्रकार त्यास जरी निरुपद्रवी वाटत असले, तरी वरील मनुवचन शेकडो पिढ्या अंगवळणी पडलेल्या आमच्या समाजांतील पूर्ण स्त्रीस्वातंत्र्यवाद्यांसही ते नुसते पाहवणारही नाहींत, मग प्रचारांत आणण्याची गोष्ट दूरच राहिली. धर्म व नीति या बाबतींत विशेष कटाक्ष ठेवणाऱ्या पाश्चात्यांतील कांहीं पुरुषांस बॉलचे प्रकार मुळीच संमत नसून, पतिपत्नींतील वितुष्ट व अखेरचा घटस्फोट यांचीं बीजें प्रथमतः 'बॉलरूम' मध्येंच पेरलीं जातात, असें त्यांचें मत आहे. तसेंच विवाहापूर्वी स्त्रीशीं संबंध ठेवला तरी तिजशीं त्या पुरुषानें पुढें विवाह लावला म्हणजे त्याचें पूर्वीचें पातक धुवून निघालें, असें मानण्याचा तिकडे जो एक प्रघात आहे त्यावरूनही वरील गोष्ट स्पष्ट होते. स्वातंत्र्यास श्रेष्ठ मानणाऱ्या पाश्चात्यांचें पावित्र्य तुलनेनें कमी असलें तरी तो त्यांतील व्यक्तींचा बिलकूल दोष नसून समाजव्यवस्था व सामाजिक ध्येय यांचाच तो दोष आहे, व याच तात्त्विक दृष्टीनें आतापर्यंतचें तुलनात्मक विवेचन केलेलें आहे, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

---

# प्रकरण ७ वें.



## भारतीयांच्या वसाहती व परराष्ट्रसंबंध.

जगातील निरनिराळ्या देशात सांप्रत जे अनेक आर्यवंशीय लोक आहेत, त्यांचें मूळस्थान कोणतें? आणि त्या मूळस्थानापासून ते का, कसे व केव्हां देशोदेशीं वसाहत करीत गेले? यासंबंधाने प्राचीन शोधकांत तीन प्रकारच्या उपपत्ति प्रचलित आहेत. या उपपत्तींतील मुख्य मतभेद मूळस्थानासंबंधानेच उत्पन्न झालेले आहेत. उत्तरध्रुव-प्रदेश आणि काकेशस पर्वत अथवा मध्य आशिया अशीं दोन वेगळीं मूळस्थानें दोन उपपत्तींचे पुरस्कर्ते मानतात. त्या दोनही उपपत्ति खऱ्या असण्याचा संभव आहे. म्हणजे आर्यलोक उत्तरध्रुव-प्रदेशांतून हिमप्रलयामुळे जे दक्षिणेकडे निघाले ते प्रथम काकेशस पर्वत व मध्य आशियापर्यंत येऊन तेथे त्यांनी वसती केली; व तेथून पुढे कांहीं कारणानीं आर्यांची एक शाखा युरोपांत, एक शाखा असिरियापासून इराणपर्यंतच्या मुलखांत व तिसरी शाखा अफगाणिस्थान, हिंदुस्थानाकडे गेली असण्याचा संभव आहे पण या दोन उपपत्तींहून भिन्न अशी एक तिसरी उपपत्ति असून तिचेही पुरस्कर्ते बरेच आहेत. मनुष्यप्राण्याचें, निदान आर्यवंशीय मनुष्यजातीचें, मूळस्थान भरतखंडच असून येथूनच त्यांच्या वसाहती जगातील निरनिराळ्या देशात भिन्न भिन्न काळी पसरल्या, असे या उपपत्तीच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे आहे. या वसाहती परदेशीं होण्यास अतिप्राचीन काळापासून सुरुवात झाली असून ती पुढे अनेक सहस्रकें चालूच होती. अखेरची जी प्रचंड वसाहत भरतखंडातून गेली ती भारतीय युद्धानंतर लवकरच गेली, असे या उपपत्तीच्या पुरस्कर्त्यांचे मत आहे. त्यांचे मतें भारतीय युद्धानें भरतखंडाच्याच नव्हे तर सगळ्या जगाच्याच इतिहासात मोठी क्रांति घडवून आणली. भारतीय युद्धाचे मूळ कारण हस्तिनापूरच्या गादीसंबंधाचें तंटे हेंच होतें. पण या तंट्याचे पायीं भरतखंडांतील बहुतेक सर्व आर्यवंशीय क्षत्रियच नव्हे, तर म्लेंच्छ-यवन-शबर-शक या आर्येतर ज्ञातीचे क्षत्रियही नष्ट झाले; आणि त्यामुळे कलियुगास व तदुत्पन्न अधोगतीस प्रारंभ होऊन पुढील परदेशीयांच्या मोहिमा व राज्यस्थापना यांची संभवनीयता पक्की होऊन बसली. भारतीय युद्धानंतर लवकरच अनेक क्षत्रियज्ञाति थोडथोड्या

ब्राह्मणांसह देशत्याग करून परदेशांत वसाहत करावयास गेल्या; व त्यांनी इराण-पासून इंग्लंडपर्यंतच्या पश्चिमखंडांत आधुनिक सुधारणेचीं व इतिहासाचीं मूळ बीजें पेरलीं. असें वरील तिसऱ्या उपपत्तिवाद्याचें म्हणणें आहे. सदरहू वसाहती केव्हा व कसकशा होत गेल्या, त्याचा अंदाज करण्याकरितां कलियुग व भारतीय युद्ध याचा काल ठोकळ मानानें निश्चित करणें जरूर आहे. करितां या संबंधानें जुन्या भारतीय पंडितांचें काय मत आहे, तें आतां पाहूं.

भरतखंडाच्या विस्तीर्ण इतिहासांतील निरनिराळ्या गोष्टींचे काळ निश्चित करण्याचे कामीं मोठी अडचण इतिहासग्रंथांची अत्यंत उणीव ही होय. या ग्रंथांचे अभावीं तुटक वाक्यें, तुरळक उल्लेख व फुटकळ शिलालेख यांच्या पायावर कल्पनांची व अनुमानांची इमारत रचूनच कालनिर्णय करणें शोधकास भाग पडतें. पण प्राचीन इतिहासग्रंथांची भरतखंडांत उणीव आहे, यावरून भारतीयांस इतिहासलेखनाची कला अवगतच नव्हती किंवा त्यांनी इतिहास लिहिलेच नव्हते, असें मात्र कोणीं अविचारीपणानें अनुमान करूं नये. इतिहासविषयकच नव्हे, तर इतर शास्त्रकलासंबंधाचेंही आमचें प्राचीन वाङ्मय अडाणी, दुराग्रही व निर्दय परकीय मुसलमान राजांनीं हरप्रयत्न करून बुडविलें आहे. कांहीं विषयांचें वाङ्मय समूळ नष्ट झालें आहे, तर कांहींचें वाङ्मय अत्यंत छिन्न व त्रुटित स्वरूपांत अवशिष्ट राहिलेलें आहे. साराश: हल्लीं हिंदुस्थान देश दरिद्री आहे म्हणून तो पूर्वी कधींही श्रीमान् व संपन्न नव्हता, हे अनुमान जसें खोटें, तसेंच सांप्रत प्राचीन ऐतिहासिक वाङ्मय उपलब्ध नाहीं म्हणून आम्हांत पूर्वी हें वाङ्मय मुळींच नव्हतें किंवा तें लिहिण्याची कलाच आम्हांस अवगत नव्हती, हें अनुमानही तितकेंच निर्मूळ व असत्य आहे.

आरब, अफगाण, तार्तर इ० अर्ध सुधारलेल्या लोकांचा इतिहास पहा, यांनीं हिंदुस्थानच काय पण इजिप्त, ग्रीस, इराण यांतीलही जुन्या ग्रंथांचा सरसहा नाशच केला आहे. अलेक्झांड्रिया येथील पुरातन व प्रचंड ग्रंथसंग्रहालयाचा विध्वंस करून मुसलमानांनीं तिकडील संस्कृति एक हजार वर्षे मागें हटविली! पण भरतखंडांतील जुनीं ग्रंथसंग्रहालयें नष्ट करणारांनीं तर अवघ्या जगाचें अपरिमित नुकसान केलें आहे. बुद्धगया येथील प्राचीन संग्रहालयास महागंधोला ( महाग्रंथालय ) असें म्हणत असून त्याची इमारत नऊ मजली होती! तींत प्राचीन बुद्धाच्या अनेक मूर्ति बसविलेल्या होत्या. नालंद येथील 'धर्मगंज' संस्थेचें 'रत्नोदधि' नामक ग्रंथालयही नऊ मजली असून त्यांत

बौद्धधर्माच्या महायान व हीनयान पंथांचे सर्व ग्रंथ संग्रहीत केलेले होते. उदंतपुरी येथील विहारात तर बौद्ध व ब्राह्मणी धर्मग्रंथाचा फारच मोठा संग्रह असून त्याची इमारत वरील दोहोंहूनही प्रचंड होती! पण बखत्यार खिलजीचा सेनापति महंमद बनसाम याने सन १२१२ साली ह्या ग्रंथाची होळी केली! (हिंदुस्थान रिव्हयू, मार्च सन १९०६.) गुजराथेतील अन्हलवाडा पाटण येथील ग्रंथालय अल्लाउद्दीन खिलजीने जाळले! कोहाना येथील असेच एक मोठें ग्रंथालय फिरोजशहा तखलघाने जाळले, असे 'तारीख फिरोजशाही' या मुसलमानी ग्रंथात म्हटले आहे. अवरंगझेब स्वतःस सुलतान शिकंदर म्हणवी. याशी समकालीन असलेल्या सय्यद गुलाम हुसेन नामक मुसलमान इतिहासकाराने 'सैर मुताखरीन' नामक ग्रंथात लिहिले आहे की, हिंदूंचे ग्रंथ जेव्हा जेव्हा व जेथे जेथे सापडतील तेव्हा तेव्हा व तेथे तेथे तो ते जाळीत असे! साराश; युरोपात पूर्वी गॉथ व व्हँडल लोकांनी जो धुमाकूळ घातला त्याचेच अनुकरण आरब व तार्तर लोकांनी केले!

हिंदुलोक खरा इतिहास मुळींच लिहून ठेवीत नसत; इतिहास म्हणून त्यांच्यात जे ग्रंथ आहेत, त्या ब्राह्मणांनीं रचलेल्या निव्वळ भाकडकथा आहेत असे फेरिस्ताचे मत होतें. पण ते साफ चुकीचें आहे, असे मि. डौ हे आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासाचे प्रस्तावनेत लिहितात. दक्षिणेत हिंदूंनीं लिहिलेले अनेक इतिहास अजूनही आढळतात. ओरिसामध्ये अनेक बखरी स्टर्लिंगसाहेबांस आढळल्या; व टॉडसाहेबांस तर त्या राजपुतान्यात मुबलकच मिळाल्या; असे सांगून मि. विल्सन लिहितात ( Mills India, Vol. II पृ. ६७ टीप ) की, "It is incorrect to say that the Hindus never compiled history." (हिंदूंनीं कधींच इतिहास लिहिले नाहीत, हे म्हणणे चुकीचे आहे.) काश्मीरचा इतिहास ग्रथित करणाऱ्या 'राजतरंगिणी'-वरून तर असले वाङ्मय पूर्वी भरतखंडात मुबलक होतें असे दिसतें व अजूनही शोध केल्यास असले ग्रंथ आणखी सापडण्याचा संभवही आहे, असे प्रो. हीरन लिहितात. हिंदुस्थानात सर्वत्र वंशावळी व बखरी लिहिण्याची पद्धत अद्यापही कायम आहे. राजपुतान्यात तर 'जागे' नांवाच्या लोकांचा हा धंदाच असून तिकडील रजपुतास आपल्या पूर्वीच्या वीसवीस पिढ्यांतील पुरुषांची नावे व त्यांची राहण्याचीं ठिकाणें माहीत असतात! टॉडसाहेब राजपुतान्याच्या इतिहासाचे प्रस्तावनेत लिहितात:—'महंमुदाच्या

स्वाऱ्या हिंदुस्थानावर होऊं लागल्यापासून तेथे झालेल्या अनेक क्रांत्या व मुसलमानी बादशहाची निष्ठुर धर्मांधता याचा विचार करता हिंदुस्थानांत इतिहासग्रंथ शिल्लक राहिले नाहींत, याचें आश्चर्य वाटावयास नको, व हिंदूंना इतिहास लिहिणें माहीतच नव्हते, असें अशक्य अनुमानही काढावयास नको. इतर सुधारलेल्या देशांत अतिप्राचीन काळापासूनच इतिहास लिहिण्याची प्रवृत्ति दिसून येत असून ती अति सुधारलेल्या हिंदुराष्ट्रांत मात्र नव्हती, हे म्हणणें मुळींच शोभत नाहीं. सूक्ष्म व व्यापक तत्त्वांवर अवलंबून असणारी ज्योतिष-गणितादि शास्त्रे ज्यांनी पूर्णत्वास नेलीं; शिल्प, मूर्ति, काव्य, गायन ह्या कला ज्यांनीं निर्माण केल्या येवढेंच नव्हे, तर त्यासंबंधाचे अति सूक्ष्म व व्यापक नियमही ज्यानीं घालून देऊन त्याची शास्त्रे बनविलीं, त्यास राजांचे स्वभाव, त्यांचीं चरित्रें व त्याचे कारकीर्दींत घडलेल्या गोष्टी लिहून ठेवण्याची साधी व सोपी कला मुळींच माहीत नव्हती, अशी कल्पना तरी करता येईल काय ? ( Is it to be imagined that a nation so highly civilized as Hindus, amongst whom the exact sciences flourished in perfection, by whom the fine art, architecture, sculpture, poetry, music were not only cultivated, but taught and defined by the nicest and most elaborate rules, were totally unacquainted with the simple art of recording the events of their history, the characters of their princes and the acts of their reigns ? ) राजतरंगिणीचे काळीं तशाच प्रकारचे दुसरे इतिहास नव्हते असें म्हणावें तर आबूल फाझलने हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची जी माहिती दिली, ती त्यानें कशावरून घेतली याचा खुलासा व्हावयास पाहिजे. चंदाच्या 'पृथ्वीराज रासा' ग्रंथातील उल्लेखावरून असें अनुमान होतें कीं, त्याचे वेळीं असलेच दुसरेही बरेच ग्रंथ प्रचलित असले पाहिजेत. चंद वगैरे भाट अडाणी होते असें कोणी मानूं नये. राज्यकारभार, परराष्ट्रसंबंध, राजनीति वगैरे संबंधाचेही जे अध्याय चंदाचे ग्रंथांत आहेत, त्यांवरून भाट अडाणी होते असें दिसत नाहीं. राजपुतान्यांत विजयविलास, सूर्यप्रकाश, खिमात, जगद्विलास, राजप्रकाश, जयविलास, खोमानरासा, मानचरित्र इ. अनेक इतिहासग्रंथ साप्रतही उपलब्ध असून गुजराथचा प्राचीन इतिहास सांगणारी 'रासमाला' तर सुप्रसिद्धच आहे.

कलियुगारंभ, युधिष्ठिरकाल व भारतीय युद्ध हीं जवळ जवळ समकालीनच आहेत, अशी सामान्य लोकांची समजूत आहे. पण हिंदु सिद्धांतज्योतिषी यांचें यासंबंधानें थोडें निराळें मत आहे.

**यातः षण्मनवो युगानि भमितान्यन्यग्युगांघ्रित्रयं ।**
**नंदाद्रीन्दुगुणास्तथा शकनृपस्यांते कलेर्वत्सराः ॥**

असें 'सिद्धांतशिरोमणी' त वचन आहे. या श्लोकाच्या दुसऱ्या चरणांत असें सांगितलें आहे कीं, शककालारंभीं ( नंद–अद्रि–इंदु–गुण ) कलियुगाचीं ३१७९ वर्षें झाली होतीं. अर्थात् सांप्रत ३१७९+शक १८३६=५०१५ इतकीं वर्षें कलियुगाचीं झालीं आहेत.

'ज्योतिर्विदाभरण' नामक ग्रंथ संवत २४ सालीं लिहिलेला असून त्यांत विक्रमाच्या कारकीर्दीचा इतिहास दिलेला आहे. ह्या ग्रंथलेखनाचे काळीं कलियुगाचीं ३०६८ वर्षें होऊन गेलीं होतीं, असें त्यांत म्हटलें आहे. अर्थात् सांप्रत ३०६८+२४+संवत् १९७१=५०१५ वर्षे कलियुगास सुरुवात होऊन झालीं.

**आसन् मघासु मुनयः शासति पृथ्वीं युधिष्ठिरे नृपतौ ।**
**षड्द्विकपंचाद्वि ( २५२६ )–युतः शककालस्तस्य राज्ञश्च ॥**

असें वचन वराहमिहराचे वाराहीसंहितेंत आहे. युधिष्ठिरकालीं सप्तर्षि मघा नक्षत्रांत असून शककालांत २५२६ वर्षे मिळविलीं म्हणजे युधिष्ठिर शक येतो, असें हें वचन सांगतें. अर्थात् २५२६+१८३६=४३६२ वर्षांपूर्वी म्हणजे कलियुगाचीं ६५३ वर्षें झाल्यानंतर युधिष्ठिर जन्मला, असें यांत सांगितलें आहे.

**शतेषु षट्सु सार्धेषु त्र्यधिकेषु ( ६५३ ) च भूतले ।**
**कलेर्गतेषु वर्षाणामभवन् कुरुपांडवाः ॥**

असें कल्हणानें राजतरंगिणींत सांगितलें आहे, तें वरील वाराही संहितेंतील वचनास जुळतें आहे.

कलियुगारंभानंतर ६६६$\frac{2}{5}$ व ६६२$\frac{3}{5}$ वर्षांनीं भारतीय युद्ध झालें, असें अनुक्रमें पाराशर व आर्यभट्ट या ज्योतिष्याचें मत आहे. पण वृद्ध गर्गाचें मतें कलि-द्वापर-संधीला सप्तर्षि मघा नक्षत्रांत होते, अर्थात् त्याच वेळीं युधिष्ठिर झाला, असें आहे. युधिष्ठिर शकाचीं ३०४४ वर्षें झाल्यानंतर विक्रम सिंहासनावर बसला, असें ऐनी अकबरींत म्हटलें आहे. म्हणजे ३०४४+१९७१=५०१५ वर्षेंच येतात.

कलादगी जिल्ह्यांत 'ऐहोला' गांवीं नजीकच्या एका टेंकडीवर एक जैनमंदिर असून त्यावरील शिलालेखांत पुढील वचन आहे:—

त्रिंशत्सु त्रिसहस्रेषु भारतादाहवादितः ।
सप्ताब्दशतयुक्तेषु गतेष्वब्देषु पंचसु ॥ ( ३७३५ )
पंचाशत्सु कलौ काले षट्सु पंच शतासु च । ( ५५६ )
समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ॥

हे मंदिर चालुक्यवंशीय दुसऱ्या पुलकेशीनें जेव्हां बांधलें, त्या वेळीं भारतीय युद्ध होऊन ३७३५ व शककालाचीं ५५६ वर्षे झालीं होतीं, असें वरील शिलालेखांत म्हटले आहे. अर्थात् शककालापूर्वी ३७३५–५५६=३१७९ व्या वर्षी म्हणजे ३१७९+१८३६=५०१५ वर्षांपूर्वी भारतीय युद्ध झालें, असें होतें.

साराश; कलियुगास सांप्रत ५०१५ वर्षे होऊन गेलीं, या बाबतींत सर्व हिंदु ग्रंथकारांचें एकमतच आहे. पण भारतीय युद्धकालासंबंधानें मात्र ज्योतिष्यांत मतभेद आहे ते युद्ध कलि–द्वापरसंधीला न होतां कलीच्या सातव्या शकाचे मध्याचे सुमारास ( ६५३ राजतरंगिणी, ६६६८ पाराशर, व ६६२८ आर्यभट्ट ) झालें, अशीं त्यांचीं मतें आहेत.

भारतीय युद्धकालासंबंधानें लौकिक समजूत व हिंदु ज्योतिषसिद्धांतकार यांचे मध्यें व खुद्द सिद्धांतकारांत कसाही मतभेद असला तरी सुमारें ४॥ हजार वर्षांपूर्वी भारतीय युद्धानंतर हिंदुस्थानांतून पूर्व, पश्चिम व उत्तर दिशाकडे हजारों लोकांनीं दूरदूर जाऊन मोठमोठ्या वसाहती स्थापिल्या, यांत शंका नाहीं. पूर्वेकडील वसाहती ब्रह्मदेश, सयाम, चीन, जपान, जावा, सुमात्रा वगैरे बेटे व अमेरिका यांत; उत्तरेकडच्या तुर्कस्थान, सायबेरिया, स्कांदेनेविया, जर्मनी, ब्रिटन, इराण, ग्रीस, रोम या भागांत आणि पश्चिमेकडील वसाहती पूर्व आफ्रिका व इजिप्त यांत झाल्या. इजिप्शियन, असीरियन, ग्रीक, जर्मन, स्कांदिनेवियन व ड्रुइद लोकांचा धर्म, तत्त्वज्ञान, प्राचीन पौराणिक कथा व संस्कृति यांचा उगम भरतखंडांतूनच झाला आहे. असें मागें सांगितलेल्या पंथाच्या शोधक पंडितांचे मत आहे. सर वाल्टर रॅले यांनीं आपल्या जगाचे इतिहासांत ( पृ. ९९. ) भरतखंडांत प्रथमतःच मनुष्यप्राणी जन्मास आला व तेथूनच तो सर्व पृथ्वीवर पसरला, असें म्हटलें आहे. 'आरारट' हे आशियामायनरमधील प्रसिद्ध पर्वताचें नांव 'आर्यावर्त' शब्दाचाच अपभ्रंश होय, असें या पंथाच्या पंडितांचे म्हणणें आहे. कौंट जॉर्नस्टजर्ना ( Theogony of Hindus, पृ. १६८. ) व कर्नल आल्कॉट–( थिआसफिस्ट, मार्च १८८१. ) यांनींही

हिंदुस्थान हेच मानवजातीचे व मानवसंस्कृतीचे मूळस्थान होय, असे प्रतिपादन केले आहे. पायथागोरस, साक्रेतिस, प्लेटो, अरिस्टाटल, होमर, झेनो, सिसरो, व्हर्जिल वगैरेंची मतें—वेदव्यास, कपिल, गौतम, पतंजलि, कणाद, जैमिनी, नारद, मरीचि, पाणिनी यांच्या ग्रंथांतील तत्त्वांशीं तुलना करून पाहतां तीं दुसऱ्याचीं प्रतिबिंबेच दिसतात. एकमेकांचा दृढसंबंध असल्यावाचून इतकें सादृश्य उत्पन्न होणें अशक्य आहे. आणि प्राचीन इजिप्शियन लोक हिंदुस्थानांतूनच गेले असून ग्रीस-रोमचे प्राचीन पंडित ज्ञानसंपादनार्थ इजिप्तमध्येच गेलेले होते, असें आल्काटसाहेबाचें म्हणणें आहे. बिहार प्रांतास 'पलाश' असें दुसरें नांव असून त्यांतून पुष्कळ लोक युरोपांत वसाहत करण्यास गेले; व म्हणूनच ग्रीसच्या प्राचीन लोकांस 'पेलासजिक' हें सामान्य नाव मिळालेलें आहे, असें मि. पोकॉक ( India in Greece, पृ. २९-३२. ) लिहितात.

या पंथाच्या पंडितांचें व शोधकांचें आणखी एक प्रमाण ज्योतिषविषयक आहे. हिंदु, पारसीक, इजिप्शियन व चिनी लोकांचे प्राचीन पूर्वज वर्षाचे दिवस ३६५¼ व महिने १२ च मानीत; तसेंच दिवसाचे तास २४, क्रांतिवृत्ताचे विभाग १२ व आठवड्याचे दिवसही ७ च मानीत. हें विभागीकरण नियमबद्ध नसूनही या चारी प्राचीन लोकांत सारखेंच कसें झालें, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या चारी लोकांहून प्राचीन व सुसंस्कृत असें एखादें पांचवें राष्ट्र असून त्याजपासून हे विभाग चारी लोकांना उचलले असले पाहिजेत, किंवा या चारींपैकीं एकापासून तरी बाकीच्यांनीं घेतले असले पाहिजेत. या चारांहून प्राचीनतर असें पांचवें राष्ट्र जगावर असल्याचा पुरावा नसल्यामुळें दुसराच पंथ स्वीकारावा लागतो व वरील विभागीकरणाचा उगम भरतखंडांतच मानावा लागतो. वरील चार प्राचीन लोकांचें जुनें ज्योतिषवाङ्मय हें बाल्यावस्थेंत असलेलें शास्त्र दिसत नसून अतिसुसंस्कृत अशा प्राचीन शास्त्राचा अल्प असा अवशिष्ट भाग असलेलें दिसत असल्यामुळें, प्रत्येकानें आपापल्या परी स्वतंत्र रीतीनें वरील विभाग पाडले असेंही म्हणतां येत नाहीं.

भरतखंड हींच जगांतील सुधारलेल्या मनुष्यांची व त्यांच्या संस्कृतीची जन्मभूमि आहे; आणि येथूनच गेलेल्या लोकांची सर्व जगांतील निरनिराळ्या देशांत भिन्नभिन्न काळीं वसाहत झाली, असें मानणाऱ्या पंडितांचीं व शोधकांचीं या संबंधाचीं प्रमाणें पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

**१. इजिप्त व इथिओपिया**—आपण 'पंत' नामक देशांतून इजिप्तांत

आलो, असें प्राचीन इजिप्ती लोकाचें म्हणणें आहे. या मूळ देशाचे वर्णन दर-एल-बाबरी येथील हासलीटोप राणीच्या देवालयाचे भिंतीवर चित्रलिपीनें लिहून ठेवलेले आहे. या वर्णनात त्या मूळ देशातील पशु व वनस्पति-विशेषतः किंमतवान् लाकडें-यांची जीं नावें व माहिती आली आहे, ते पशु व वनस्पति निवळ हिंदुस्थानातलेच आहेत, ते इतर देशात उत्पन्नच होत नाहींत, असें दिसून येतें. अर्थात् इजिप्ती लोकांचे प्राचीन पूर्वज हिंदुस्थानातून-विशेषतः सिंधु-नदीच्या मुखाजवळच्या भागातून-तिकडे गेले असें दिसून येतें. हे लोक ८।१० हजार वर्षांपूर्वी जहाजात बसून समुद्रकिनाऱ्यानें सफर करीत जे निघाले ते बलुचिस्थान, इराण, अरबस्थान यांच्या किनाऱ्यांनीं प्रवास करीत करीत व इराणचे आखात, आरबीसमुद्र, तांबडासमुद्र, पहात पहात अखेर इजिप्तच्या न्यूबिया व इथिओपिया यांच्या पूर्व किनाऱ्यावर उतरले, असें कर्नल आल्कॉट (थिआसॉफिस्ट, मार्च १८८१.) व पोकॉक ((India in Greece, पृ० ४२.) यांचे म्हणणें आहे. अटकच्या दक्षिणेस सुमारें १० मैलापर्यंत सिंधु-नदाचे पाणी खोल व स्वच्छ असून त्याचा वेगही मोठा आहे; त्याचे खाली काळाबागपर्यंतच्या १०० मैलात तर त्याचा ओघ फारच जोरदार असून पाण्याचा रंग काळसर निळसर झालेला आहे. तेथे सिंधुनदीस ' नीलाब ' (नील+आप्) हें नाव मिळालें आहे, व याच नावाचें एक गावही अटकेचे दक्षिणेस १२ मैलावर नदीकांठीं आहे. अर्थात येथील लोकांनीं इजिप्तमध्यें वसाहत केल्यानंतर तेथील मोठ्या नदीसही तेंच ( नाईल-नीला ) नाव दिलें. याशिवाय इजिप्तमधील इतर नद्यांचीं व प्रांतांचींही नावें हिंदुस्थानच्या नद्यांचे, शहरांचे व प्रांतांचे नावावरून पडलीं आहेत; कांहीं राजांचीं नावें ( रामेसीस ) भारतीय रामवंशीयावरून पडलेलीं आहेत; उभय देशातील शिल्पपद्धतींचे विषय व स्वरूप यांचेंही निकट साम्य आहे; व बऱ्याच प्राचीन इजिप्ती शब्दांचें रूपांतर व भाषांतर संस्कृतातून सहज व स्वाभाविक रीतीनें होतें. असेंही मि. पोकॉक यांनीं (India in Greece, पृ. २०१.) म्हटलें आहे. ख्रि. पू. १७ व्या शत-काच्या सुमारास ग्रीसमधील चित्रलिपींतील एका लेखात माकडाला ' कपि ' हाच संस्कृत शब्द दिलेला आहे ! प्रो. ब्लूमेनबाश यांनीं जगांतील निरनिराळ्या वर्णाच्या लोकांच्या डोक्यांच्या कवट्यांचा संग्रह केला असून त्यांतील भारतीय व इजिप्ती लोकांच्या कवट्यांचा आकार व रंग यात विशेषच साम्य दिसून येतें. असा प्रो. हीरन यांचा अभिप्राय आहे. ( Asiatic nations Vol. II.

पृ. ३७३. ) प्राचीन इजिप्ती लोकांच्या रीतीभाती, समाजरचना, धर्मसमजुती व राजसंस्था यांचे भारतीयांच्याशी विलक्षण साम्य आहे, असेही यांचे म्हणणे आहे.

प्राचीन इथिओपियामध्ये अर्वाचीन न्यूबिया, अबिसीनिया, डोंगाला वगैरे प्रांताचा समावेश होत असे. यांतही सिंधुप्रांतातूनच जाऊन लोकांनी वसाहत केली. सिंधूला 'अबुसिन' असे ग्रीक नाव असून तेथील लोकांनी वसाहत केलेल्या प्रांतास ते सहजच 'अबुसिनिया' म्हणूं लागले. फिलॉस्ट्रेटस, युसेबियस, ज्यूलियस आफ्रिकॅनस, वगैरे प्राचीन ग्रीक ग्रंथकारांनीही असेच नमूद केले आहे. हिंदुस्थानातील एका राजाचा विश्वासघाताने खून केला म्हणून काही लोकांस भरतखंडांतून हाकून देण्यात आले व त्यांनीच इथिओपियांत वसती केली, असेही फिलॉस्ट्रेटसने लिहिले आहे. अबुसिनिया व भरतखंड यांचा व्यापारीसंबंध पुढेही पुष्कळ वर्षे चालू होता, व अनेक हिंदु व्यापाऱ्यांनी त्या भागांत जाऊन वसतीही केली होती. गँबिया व सेनिगाल नद्यांच्या खाड्यातील मुख्य व्यापारी बंदरास जी नावे आहेत, त्यांचे अंत्य 'कुंड' ( उदा० तंबा-कुंड ) असे आहे ! सांप्रत युद्ध चालू असलेल्या जर्मन ईस्ट आफ्रिकेतही मोठमोठ्या पर्वतांस मौंट शंभू व मौंट मेरू अशी नावे दिलेली आढळतात ! मंगो पार्कने आफ्रिकेत केलेल्या प्रवासाचे वर्णन लिहिले असून त्यांतील ज्या ज्या शहरे वगैरेंची नावे संस्कृत किंवा संस्कृतोत्पन्न आहेत, त्यांची एक यादच एशिआटिक जर्नल ( Vol. IV पृ. ३२८ ) मध्ये दिलेली आहे !

२. इराण—परशुरामाचे अनुयायी 'परसु' नावाचे असून त्यांचे मुख्य शस्त्र 'परशु' हे होते; यांनी भरतखंडांतून येऊन पर्शियांत वसाहत केली व त्या देशास हे नाव दिले. शिवाय युफ्रेटिस हे तेथील मुख्य नदीचे नावही 'यु-भारत-ईश' या शब्दापासूनच निघाले आहे, असे मि. पोकॉक यांचे मत आहे ( India in Greece, पृ. ४५. ). हिंदुस्थानच्या वायव्य व उत्तर भागांतून येऊन प्राचीन इराणी लोकांनी इराणांत वसती केली; आणि 'आर्य' हा शब्दच नव्हे तर काही अंशी धर्मविधिही त्यांनी झोरोआस्ट्रियन धर्मांत शुद्ध स्वरूपांत राखले, असे मॅक्स मुलरही म्हणतात ( Science of Language, २३२-२५३. ) प्राचीन इराणी किंवा 'पल्हवी' जातीचे लोक मूळचे भारतीय क्षत्रियच असून कर्मलोपाने वृषल झाले, असे मनुस्मृतीत ( अध्याय १०, श्लोक ४३-४५. ) म्हटले आहे. संस्कृत व झेंद भाषांचे अत्यंत निकट साम्य

आहे. झेंदच्या कोशांतल्या दहा शब्दांतले निदान सहासात तरी शब्द शुद्ध संस्कृत असतात, हे पाहून सर विल्यम जोन्स यास फार आश्चर्य वाटलें. चंद्रवंशीय बुधाचा पुत्र पुरूरवा. या पुरूरव्यास त्याच्या आईच्या ' इला ' नावावरून ऐल किंवा ऐर म्हणतात. त्याचे वंशज आपणास ऐरान् म्हणवूं लागले, आणि यांनीच इराणात वसती करून त्यास इराण हे नाव दिले. इराण व तुराण यांचे मध्ये मोठी युद्धें झाल्यानंतर प्राचीन इराणी लोक इराणांत वसाहत करण्यास आले, असे इराणचे जुने इतिहासकार लिहितात. याचा अर्थ असा की, (इराणी) ऐरान् व ( तुराण ) सूर्यान्–चंद्रवंशी व सूर्यवंशी–राजाची मोठी युद्धे झाल्यानंतर पराभूत झालेले ऐरान् इराणात रहावयास आले. तैग्रीस नदीवर ( Cosseoei ) ' कौसी ' नावाचे लोक प्राचीन काळी रहात होते, ते काशीहून तेथे गेलें असे इतर शोधकाचे मत आहे. ब्राह्मणी धर्मातील कांहीं बाबींसंबंधानें मतभेद आला व तो पुढें तीव्र होऊन त्यावर धार्मिक रण माजली; आणि त्याचे अखेरीस प्राचीन इराणी लोक इराणात जाऊन राहिले, असे दोनही लोकांचे देव, देवता, विभूति, यज्ञविधि, गृह्यसंस्कार यांची तुलना करून मि. हॉग यांनी मत दिले आहे ( Essays on the Parsees, पृ २८७–२८८. ) अजमीढ व नीला किंवा नीलिनी यास पाच पुत्र होते; त्यांपैकी फक्त दोघाचे वर्णन पुराणात आहे, इतराचे नाहीं. अर्थात् हे तिघे व त्याचा वंश दूर देशी गेला असावा अजमीढाच्या या तीन पुत्राचे वंशजच आसीरियातील ' मीडी ' लोक असावेत. या मीडी लोकांचे सांकेतिक चिन्ह ' मेढा ' ( अज ) हेच दिलेलें आहे, हें लक्षात ठेवण्यासारखे आहे, असे टॉड लिहितो. ( राजस्थानचा इतिहास, Vol. I. पृ. ४१. ) इराणांत वसती होऊन बरीच वर्षे झाल्यानंतर झोरोआस्टर–जरदुष्ट्र–जन्मास आला त्याचा काल ग्रीक लेखकांनी निरनिराळा दिला आहे ट्रोजन युद्ध ख्रि पू. १८०० चे सुमारास झाले. त्याचे पूर्वी सुमार ६०० वर्षे हा जरदुष्ट्राचा काल, असे ख्रि. पू ४७० तला ' झंथुस ' ग्रंथकार लिहितो. आरिस्टॉटलचे मते प्लेटोचे आधी ६००० वर्षे व इतराचे मते ट्रोजन युद्धाचे पूर्वी ५००० वर्षे असे त्याचे काळ आहेत. बाबिलोनियाचा ग्रीक इतिहासकार बेरोसोस यानें हा काल ख्रि. पू. २२०० असा दिला आहे. तथापि इराणची वसाहत भारतीय युद्धापूर्वी बरीच काळ झालेली होती, असे ठोकळ मानानें म्हणता येईल. ' मनुष्यप्राण्यास मी अत्यंत सुपीक भूमि दिली; ही भूमि ( इराणचे ) पूर्वेस उंच भागी आहे. तेथून जमशेद आपल्या अनुयाया-

सह इराणात आला; तेव्हां तेथें ग्राम्य किंवा वन्य पशु अगर मनुष्यप्राणी मुळीच नव्हता ' असें हुरमज्द-ईश्वर-जरदुष्ट्राला सांगत असल्याचें ' वेंदिदाद ' मध्यें वर्णन आहे. वरील सुपीक, पूर्वेकडील व उंचावरची भूमि म्हणजे काश्मीर व अफगाणिस्थान हीच होय, असें ( Theogony of the Hindus ) कौंट जार्नेस्टजर्ना हे लिहितात.

३. आशियामायनर.—या प्रांतातले प्राचीन ' खाल्डियन ' लोक हे हिंदुस्थानचेच प्राचीन आर्य होते. ' कुल-देव ' नामक ब्राह्मणांनीं वसाहत केलेला जो देश तो ' अपभ्रंश होत होत ' खालडिया ' बनला. ' प्राचीन खाल्डियन व बाबिलोनियन लोकांची संस्कृति हिंदुस्थानातूनच आलेली होती ' असें कौंट जौर्नस्टजर्ना लिहितात. ( Theogony of the Hindus, पृ १६८. ) साम्प्रतच्या युरोपियन ... ट्रोजन महायुद्धांत ' अवंती ' ( Abanti ) नावाच्या एका जातीचे योद्धे सामील झाले होते; ते माळव्यांतील सुप्रसिद्ध ' अवंती ' च्या राज्यांतलेच होत, असें मि. पोकॉक यांचे मत आहे. ( India in Greece, पृ. ३३. ) असीरियनांचा प्राचीन राजा ' बेल ' किंवा ' बेल ' ( Boal, Bel ) या नावाचा होता. हा राजा म्हणजे भरतखंडावर व कांबोडियापासून ग्रीसपर्यंतच्या देशावर प्राचीनकाळीं ज्याचे विस्तीर्ण साम्राज्य होतें तो ' बलि ' राजाच होय, असें कित्येक ग्रंथकारांचें म्हणणें आहे. पालेस्टाइनमधील इस्रायली लोकांच्या पूर्वजांची वसती तार्तार देशांतून आलेली असून तार्तार व हिंदुस्थान यांतली गांवें वगैरेंची पुष्कळ नावें एकसारखींच आढळतात. यहुदापूर्वीच्या पॉलेस्टाईनमधील लोकांची व हिंदुस्थानच्या प्राचीन लोकांची मूर्तिपूजा सारख्याच स्वरूपाची आहे; आणि पॉलेस्टाईनमधील प्राचीन क्षत्रिय व भरतखंडांतले रजपूत यांचेमध्येंही चालीरीतींत विलक्षण साम्य आढळून येतें. म्हणून पॉलेस्टाईनमधील प्राचीन लोक हिंदुस्थानांतून निघून तार्तर देशांतून तेथें वसाहतीस गेले असावे, असें मि. पोकॉक यांचें अनुमान आहे. ( India in Greece, पृ २२९. )

४. ग्रीस—ग्रीक व संस्कृत या दोनही भाषा बहिणीबहिणी असून त्यांची जननी निराळीच असावी, असें म्हणणाऱ्या शोधकांचा एक पक्ष आहे. पण ग्रीक भाषा संस्कृतोत्पन्न आहे, असें पुष्कळ भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे. ग्रीक भाषा जर संस्कृतोत्पन्न तर ग्रीक लोक मूळचे भरतखंडांतलेच, हे अनुमान ओघानेंच निघतें. ग्रीक लोकांचें मूळस्थान भरतखंडच होय, हे मत प्रथमतः कर्नल टॉड

व कर्नल विल्फोर्ड याना प्रतिपादिलें; व पुढे अनेक पुरावे गोळा करून मि. पोकॉक यांनीं याच मताची परिपूर्ति करून ' India in Greece ' नावाचा एक स्वतंत्र ग्रंथच लिहिला. होमरचे काव्यात वर्णिलेल्या समाजव्यवस्थेचे सूक्ष्म व विस्तृत परीक्षण केल्यावर, ही व्यवस्था आशिआटिक–विशेषतः भारतीय–स्वरूपाची आहे, येवढेच नव्हे तर दोन्ही देशातील भाषा, धर्म, तत्त्वज्ञान, राजसंस्था, किंबहुना पर्वतांची व नद्यांची नावें यातही विलक्षण साम्य आहे. असे मि पोकॉक यांनीं सिद्ध केलें आहे. ग्रीसमधील वसाहती मुख्यतः मगध देशातूनच येऊन भारतीयांनीं केल्या. मगधाची राजधानी ' राजगृह ' त्यावरून तेथील या लोकांचे ' राजग्रैहिक ' किंवा नुसते ' ग्रैहिक असे नाव पडले. या ' ग्रैहिक ' नावावरूनच क्रमाने ग्रैकोस, ग्रीकस् व ग्रीक हीं नावें उत्पन्न झालीं आहेत. ग्रीकांचे आधीं ग्रीसमध्ये जे आले त्याचे नाव ' पेलासजी ' असे होतें; बहार प्रांताचे प्राचीन नाव ' पलाश ' असे आहे. अर्थात् सदर पेलासजी लोकाचे मूळस्थान ' पलाश ' देशच होय. या लोकाचा पहिला राजा पिलासगस हा ( Gaia ) गैयापासून झाला, असे एशियस नामक प्राचीन ग्रीक कवि म्हणतो बहारचा राजधानी ' गया ' याशीं याचे विलक्षण साम्य आहे. याचप्रमाणे ( मॉसिडोनिया–माकेडान–मगध; यूबिया, यू–बाबू–याज,–यु–बाहुजाः ) मासिडोनियात मगधानी व युबियात बाहुजानीं-क्षत्रियानी-वसाहती केल्या. ' कैलास ' हे नाव देवाचें वसतिस्थान या अर्थी ग्रीकात ' सिलास ' व ' कैलॉन ' आणि रोमनात ' कॉर्लाम ' अशी रूपांतर पावले आहे. बहुत् ( झेलम ) नदीवरील लोक ग्रीसमध्ये विओशियन बनले. त्याचप्रमाणे काश्मीरचा मूळ संस्थापक काश्यप यावरून ' कासोपी ' लोकांनी आपले नाव ठेवले. क्षत्रियईन क्षात्रयेन हे ग्रीसमध्ये कस्ट्राइन बनले. हेलपाचे ' हेलिपास ' व हेल देशाचे ' हेलेडास ' अशी रूपांतरे झालीं हेलनामक पर्वताची मोठी ओळ बलुचिस्थानात असून त्याचे भोवतालच्या प्रदेशास हेल आणि तेथील लोकास व राजास हेल-ईन हेलेन म्हणत, याचे ग्रीक रूपांतर ' हेलेनीस असे झाले आहे. उत्तर कुरूंचेही ओटोरोक्युरी असे ग्रीक रूपांतर झालें अशा प्रकारची अनेक साम्ये दाखवून त्यावरच मि. पोकॉक यांनी ' India in Greece. ' ह्या ग्रंथाची इमारत उभारली आहे.

' २ रोम—प्राचीन ग्रीकाप्रमाणे प्राचीन रोमन लोकाच्या देवदेवता ह्या दुसऱ्या कोणी नसून हिंदुस्थानातल्या प्राचीनतर वीरपुरुषांचीच तीं दैविक रूपा-

तरें होत. रोमन लोक ज्या ट्रोजनाचे वंशज ते स्वतःही हिंदुस्थानातून आलेल्या आर्यवसाहतवाल्यांचेच वंशज होते. 'रोम' नाव वास्तविक लॅटिन नाहीं त्याचे मूळचे रूप 'राम' हे आहे ! संस्कृतातील 'आ' चा लॅटिनमध्ये 'ओ' होतो, असें मि. पोकॉक म्हणतात ( India in Greece, पृ १४२ व १६६ ). ग्रीसमध्ये भारतीयाची वसाहत झाली, त्याच काळाचे सुमारास त्यांचे पैकीं कांहीं लोकांनीं इटालीतही वसती केली; व हेच प्राचीन 'इस्टुस्कन' लोक होत. यांचा धर्म व त्यांतील अनेक धर्मविधि यांचे इजिप्शियन व हिंदु धर्मविधींशी विलक्षण साम्य आहे, असें काउंट जॉर्नस्टजर्नाप्रभृतींचे मत आहे.

८. तुर्कस्थान व सायबेरिया—शापग्रस्त तुर्वसु व त्याचे वंशज हे तुरानियनांचे प्राचीन पूर्वज होत, असें मॅक्स मुलर यांचे मत आहे. ( Science of language, पृ २४२ ) कित्येकांचे मतें तुर्क तुरुष्कांचे वंशज होत. चंद्रवंशाच्या यादव व बाल्हीक शाखांनीं भारतीय युद्धानंतर खोरासानमध्ये राज्यें स्थापिलीं, असें जेसलमीरच्या रजपुती इतिहासात लिहिले आहे. श्रीकृष्णाचे पुत्र प्रद्युम्न, गद व सांब यांनीं वज्रपुराचा राजा लढाईत मारला गेल्यावर तेथें अनेक ब्राह्मण-क्षत्रियासह जाऊन राज्य स्थापलें. व श्रीकृष्ण निजधामास गेल्यावर यादवांचे सांत्वनार्थ ते भरतखंडांत पुन. एकदा आले होते, असें हरिवंशांत ( विष्णुपर्व, अ. ९७. ) वर्णन आहे. हे वज्रपूर आलताई पर्वताचे उत्तरेस होतें. सायबेरियांतील स्यामोयदोज व जोर्दास जातीचे लोक या श्याम यादवांचेच वंशज असून त्यांची भाषा संस्कृताला जवळ आहे. सायबेरियात जाताना वाटेत मध्यआशियात ते जेथे थांबले, त्यास अद्याप यदूकी-डांग ( टेकडी ) असें म्हणतात ! यादवांच्या कांहीं शाखा झाबुलीस्थान व समरकंद या भागांत गेल्या व गजनीही त्यांनीच वसविली. ( टॉडकृत राजस्थानचा इतिहास, Vol. I. पृ. ८५. ) हिरातचे प्राचीन नाव 'हरी' असें असून सीस्तानचे शीत-स्थान हे मूळरूप आहे, असेंही टॉड लिहितो इराण, सायबिरिया व तुर्कस्थान यांतील कांहीं शहरांतून कांहीं हिंदु अद्यापही तुरळक आढळतात. देवमिता व अजाश्व याचा पुत्र 'अश्व' हा चंद्रवंशीय असून त्याचे नावावरून 'अस्सी' ही ग्रीक जात झालेली आहे; व एशिया हे नावही याच लोकांवरून पडले आहे, असेंही त्याचे म्हणणें आहे. युरोप-याचे प्राचीन मूळरूप यूरूप ( संस्कृत सु-रूप ) असें आहे. संस्कृत सु व ग्रीक यू याचा अर्थ एकच आहे.

७. **जर्मनी**—जर्मन लोक 'ट्यूटान' वंशाचे असून या वंशाचे मूळ पुरुष (**Manus**) 'मेनस्' होता असें जर्मनपुराणकथात म्हटलें आहे. भारतीय आर्यांतही 'मनुः' हाच साप्रतच्या मन्वंतरातला आदिपुरुष मानला आहे. इंग्रजींतील 'Man' व जर्मनमधील 'Mann' हे शब्द संस्कृतातील 'मनुः' शब्दापासून झालेले असून जर्मनमधील 'Mensch' व संस्कृतातील 'मानुष' हे शब्द एकच होत. (मॅनिंगकृत Ancient and Mediaeval India, Vol. I. पृ. ११८.) प्राचीन जर्मनाचा सैल व फैलावलेला झगा आणि डोक्यावर आणून गाठ देऊन बांधलेले सडक केस हे दोनही प्राचीन ब्राह्मणाच्या सारखेच होते तसेच प्राचीन जर्मन लोकात सकाळी निजून उठल्याबरोबर शौचमुखमार्जनानंतरचे पहिले कृत्य म्हटले म्हणजे प्रातःस्नान हे असे. ही चाल अर्थातच जर्मनीसारख्या थंड देशात उत्पन्न होणे शक्य नसून ती आशियाखंडातील उष्णदेशातूनच आलेली असावी, असे कर्नल टॉड यांचे अनुमान आहे. (राजस्थानचा इतिहास, भाग १, पृ. ६३ व ८०.) प्राचीन जर्मन सूर्य, चंद्र, अग्नि यांची उपासना करीत; प्रेतें न पुरता दहन करीत; त्यांच्यात सतीची चाल असून पुनर्विवाह नव्हता, असें 'टॅसिटस' या ग्रीक इतिहासकाराने नमूद केलें आहे! ब्राह्मणाच्या प्राचीन नावाचे पुढे बहुधा 'शर्मा' असे पद लावीत असत. ब्राह्मणापासून 'ब्राह्मण्य' हे जसे भाववाचक किंवा समुदायवाचक नाम झाले, तसेच 'शार्मण्य' हेही नाव बनले. श, ज, य हा तीन अक्षरे पुष्कळ शब्दात समान मानतात व म्हणूनच 'शार्मण्या' चे 'जर्मन' झालेले आहे, असे काही भाषणपंडिताचे मत आहे! अर्वाचीन हंगेरियन लोकही तेथील प्राचीन हिंदु वसाहतवाल्यांचेच वंशज असून त्यांची भाषा, चालरीत व वंश यांचे मूळ संस्कृतातच सापडेल असे, तिबेटी भाषेचा कोश तयार करणाऱ्या एका युरोपियन पंडिताने त्यांचे प्रस्तावनेंत लिहिले आहे. जर्मनीतील 'सॅक्सन' लोकही वास्तविक भरतखंडाच्या वायव्यभागात रहाणाऱ्या शकांचेच वंशज होत. 'शकसूनुः' व 'सॅक्सन' यांचे सादृश्य उघडच आहे. शिवाय प्राचीन सॅक्सन लोकात स्वर्गास 'हिम्मेल' (Himmel) असे नाव असून ते 'हिमालया' पासूनच झालेले स्पष्ट दिसत आहे. इंग्लंड वगैरे देशातल्या अत्यंत प्राचीन सॅक्सन प्रार्थनामंदिरावरील जुन्या चित्राचे हिंदुस्थानातील कन्हैया व गोपी यांच्या चित्राशी असलेले सादृश्य पाहून कर्नल टॉड यांचे असे मत झाले आहे की, सॅक्सन लोकांचे पूर्वज असलेल्या स्कँडिनेवियातल्या 'अश्वी' लोकांना भरत-

खंडांतून जातांनाच हीं चित्रे बरोबर नेलीं असावीं. ( राजस्थानचा इतिहास, Vol. I. पृ. ५७. )

८. स्कांदिनाविया—( स्वीडन-नॉर्वे ) या देशांतील लोकांचे प्राचीन पूर्वज हिंदुस्थानांतूनच आलेले क्षत्रिय होत. ' स्कंदनाभी ' पासून वरील नाव निघालें आहे. ' स्कंद ' ही क्षत्रियांचीच देवता असून ' स्कंदनाभि ' हे एखाद्या क्षत्रिय कुळाचे नांव असावें स्कांदिनीवियन लोकांचा प्राचीन धर्मग्रंथ ' एद्द ' ( Edda ) नावाचा असून त्याचे ' वेदा ' शीं असलेलें साम्य स्पष्टच दिसत आहे, असें कौंट जॉर्नस्टजर्ना म्हणतात. ( Theogony of the Hindus, पृ. १०८. ). त्या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, स्कांदिनावियांत प्रथम वसाहत करावयास ' जीटी ' किंवा ' जित् ' ( Getes किंवा Jits ) लोक आले असून त्यांचे दुसरे नाव ' अशी ' ( Asi ) असें होतें, व त्यांचे मूळस्थान ( Asigard ) ' असिगर्ड ' होतें. असिगर्ड म्हणजे असिगड होय. ख्रि. पू. ५०० चे सुमारास ' ओडिन ' स्कांदिनावियांत आला व त्याचा वारस ' गोतम ' होय. अखेरचा बुद्ध ' महावीर ' असून ( ख्रि. पू. ५३३ ) त्याचाही पट्टशिष्य गौतमच होता. स्कांदिनावियनांची प्राचीन वीररसप्रधान पुराणें व काव्यें यांचें इकडील तसल्या वाङ्मयाशीं पुष्कळच साम्य आढळतें. ( राजस्थानचा इतिहास, Vol. I. पृ. ६४, ६८. )

साती वारांस नावें देण्याची तऱ्हा भरतखंड व स्कांदिनीविया यांत सारखीच दिसून येते; हे खालील कोष्टकावरून कळून येईल.

| भारतीय नांव. | स्कांदिनीवियन नांव. |
|---|---|
| आदित्यवार | Sondag ( Son=सूर्य. ) |
| सोमवार | Mondag ( Mon=चंद्र ) |
| मंगळवार | 'is-dag ( This-एक वीरपुरुष. ) |
| बुधवार | Ons-dag ( oden=वोडन. ) ( बोद्धम्, बुद्ध. ) |
| बृहस्पतिवार | Thors-dag ( Thor-मुख्य देवता. ) |
| शुक्रवार | Frej-dag ( Freja=सौंदर्य देवता. ) |
| शनिवार | Lor-dag ( Loger=स्नान. ) |

यावरून स्कांदिनीवियन-पुराणकथांचा मूळ उगम भरतखंडच होय, असें कौंट जार्नस्टजर्ना—हे स्वतः स्कांदिनीवियन आहेत—म्हणतात ! ( Theogony of the Hindus, पृ. १६९. )

" आशिया व युरोपखंडांचे उत्तरेस राहणारे प्राचीन ' **हायपरबोरियन** ' लोक हे मूळ **खैबरपुराहून** येऊन वसाहत करून राहिलेले होत. खैबरपुरी लोकांची दुसरी वसाहत **थसली** प्रांतात **फोनिक्स नदीचे** तीरी झाली होती; व ते लोकही आपणास ' खिफारा ' किंवा ' **खिफेरा** ' म्हणवीत. **हायपरबोरि-यनांच्या** शेजारचे लोक ' पेशवारन ' ( pashwaran ) हे असून यांनी To-Mars ( तो-मारोस ) पर्वताचे दक्षिणेस वसाहत केली होती. तो-मारोस म्हणजे सुमेरु; व पेशवारन लोक पेशावरचे असून त्याचे **ग्रीक** भाषेत Pass-aron (पासारोन ) असे रूप झालेले आढळते. " असे मि **पोकाक** ( India in Greece, पृ. १२७,१२९. लिहितात.

९. **ग्रेटब्रिटन**—या देशांतल्या प्राचीन लोकांचा पहिला सुगावा ' ड्रूइड ' **नांवाचे** जे मठवासी असत, त्यांचे हकीकतीत सांपडतो. **पोकाक** वगैरे शोध-कांच्या **मते** हे मूळचे **बौद्धधर्मीय** ब्राह्मण असून **काश्मीर** वगैरे प्रांतांतल्या **रज-पूत** जाती बरोबर घेऊन **ब्रिटनमध्ये** वसाहत करण्यास गेले. ड्रूइड लोक पूर्वजन्म व पुनर्जन्म मानीत. विश्वाची उत्पत्ति, पालन व क्षय करणाऱ्या तीन भिन्न देव-ताही यांच्यांत होत्या. धर्मज्ञानरक्षण व त्याचे अध्यापन यांनाही सर्वस्वी आपणा-कडेच ठेवले होते. हे ड्रूइद लोक राजाचाही मुलाजा न ठेवता त्यास शाप देत; ' कोयत्याचे अपाट्यापुढे गवत जसे तुटून पडते तसे राजे लोक ड्रूइदाच्या शापा-मुळे जमीनदोस्त होत ' असे वर्णन आहे ! ( Theogony of the Hin-dus, पृ. १०४ ) **ब्रिटनांतील** लोकांचा सुप्रसिद्ध जयघोष ' हुरा ! हुरा ' हा तेथलि प्राचीन रजपुतांच्या ' हरा ! हरा ! ' ( हरहर ) या सिंहनादाचाच अप-भ्रंश होय, असे मि. **पोकाक** यांचे म्हणणे आहे ! ( India in Greece, पृ. ११४. ) ब्रिटनांतील ' **स्टोन** हेंज ' नांवाचे इमारतींचे प्राचीनावशेष हे या **बौद्धधर्मीय** लोकांचेच होत. ड्रूइड–ड्रूइद–द्रुइ-देश–द्रुह्युदेशीय अशी यांची पीठिका असावी, असे कित्येकांचे **अनुमान** आहे. ड्रूइद लोक अर्धचंद्र चिन्ह वापरीत यावरून ते इंदुवंशीय असावे असे **पोकाक** प्रभृतींचे म्हणणे आहे. **रोमन** लोकांनी **ब्रिटन** जिंकल्यानंतर हे **ड्रूइद** लोक ' आइल ऑफ मॅन ' मध्ये जाऊन राहिले त्या **नांवाचे प्राचीन** रूप ' आइल ऑफ मान ' किंवा ' मानचे बेट ' असे होते. ' **मान** ' –Saint असा अर्थ **असून** तो संस्कृत ' मुनी ' सारखाच आहे. अर्थात् ' आइल ऑफ् **मन** ' म्हणजे ड्रूइदाचे ' मुनिद्वीप ' च होय ! कित्येक **पाश्चात्त्य** पंडितांनी ' **केल्टिक** ' व ' **संस्कृत** ' भाषांचे व त्यांतील प्रयोगांचे विलक्षण साम्य

दाखवून त्या भाषा बोलणाराचा निकट संबंध सिद्ध केला आहे. हिंदुस्थानांतून जाऊन ब्रिटनात वसाहत केलेल्या प्राचीन हिंदूंचेच ड्रुइक लोक हे उपाध्याय होते. असे मत गॉडफ्रे हिगिन्स या ग्रंथकाराने " Celtic Druids " या ग्रंथात सप्रमाण प्रतिपादले आहे.

१० पूर्वआशिया—भरतखंडातून पूर्वदिशेकडे गेलेल्या वसाहतींनी ब्रह्मदेश, कांबोडिया, जावा-सुमात्रादि बेटे, चीन, आस्ट्रेलिया व दक्षिण अमेरिकेतील पेरू वगैरे देश व्यापले होते. ब्रह्मदेशातील लोकांच्या चालरीती, धर्मनीति व समाजव्यवस्था याचे जसे चिनी तसेच हिंदी संस्कृतीशीही साम्य आहे. ब्रह्मी लोक मूळचे भरतखंडातले म्हणून व बौद्ध धर्माचा प्रसार चिनात झाल्यापासून त्यांशी निकट संबंध आल्यामुळे ब्रह्मी लोकात या दोन्ही संस्कृतींचे मिश्रण झालेले आढळते. मुसलमानी अंमलानंतर हिंदुसमाजात जारीने सुरू झालेली सक्त पडद्याची चाल ब्रह्मी लोकात न शिरता ते तिजपासून अलिप्तच राहिले, याचे तरी कारण हेच होय. मनुस्मृतीवरील एक विस्तृत टीका हा ब्रह्मी लोकाचा धर्मशास्त्र ग्रंथ असून त्यास ते ' धर्मसाथ ' म्हणतात असे आवा येथील ब्रह्मी राजाकडे गेलेले इंग्रज वकील सिम याना लिहिले आहे. तिबेटी व ब्रह्मी संस्कृतीचा उगम भरतखंडातच आहे, असे विल्सनसाहेबही म्हणतात. जसा ब्रह्मदेश तसाच कांबोडिया हा शब्दही उघड उघड संस्कृतोत्पन्न आहे. ' कांबोज ' पासूनच ' कांबोडिया ' रूप बनले आहे एरियन नामक ग्रीक इतिहासकाराने ' कंबिस्थोली ' असे एका जातीचे नाव दिले आहे. त्याचे मूळरूप अर्थातच ' कंब-स्थळ ' असे असले पाहिजे. अर्थात् या कंबस्थळातील लोकांनी कंबजानी-कांबोजानी-कांबोडियात वस्ती केली असली पाहिजे. ( Wilsons Vishnu purana, Vol. II. पृ. १८२. ) सदरहू कांबोडियात १८८२ साली एका मोठ्या हिंदु देवालयाचे अवशेष एका फ्रेंच शोधकाने जमिनीतून उकरून काढले. चीनची वसाहतही मूळची हिंदुस्थानातील लोकांनीच केली. चीन व तातरी यातील प्राचीन वंशावळीत मूळ पुरुष ' अवर ' हा दिलेला असून तो पुरूरव्याचा पुत्र होता. ( राजस्थानचा इतिहास, Vol I. पृ. ३५ ) फोही नामक पुरुषाबरोबर चिनी लोकांचे प्राचीन पूर्वज लि. पू. २९०० चे सुमारास पश्चिमेकडील डोंगराळ व उंच प्रदेशातून येऊन चिनात वसती करून राहिले, असे ' शू-किंग ' नामक चिनी ग्रंथात लिहिले आहे. अर्थात् चीनची वसाहत काश्मीर, लदक, तिबेट व पंजाब येथील लोकांनी वसविली असे

दिसून येते. चिनी लोकांचा धर्म व संस्कृति याचा उगम भरतखंडातच आहे हें सांगावयास नकोच; खुद्द ' चीन ' हें नाव संस्कृतच असून बायबलात त्याचें रूप ' सिनिम ' असें आढळतें. ' मगध ' शब्दाचें चिनी रूपांतर ' मो–किआतो ' असें झालें आहे. मगधाच्या राजधानीस कुसुमपूर व पाटलीपुत्र अशीं दोन नावें होतीं. यांचीं ' किआ–सो–मो–पानलो ' व ' पाटोली–त्से ' अशीं रूपांतरें चिनी लोकांनीं केलीं. शेवटल्या शब्दातल्या ' त्से ' पदाचा अर्थ ' पुत्र ' ( मुलगा ) असाच आहे. ( रॉयल ए. सो. जर्नल, Vol. V. ) नावांचीं रूपांतरें किंवा अपभ्रंश करताना चिनी लोकांनीं अशीं भाषांतरें केल्यामुळें पुष्कळ नांवांचा संस्कृत मागमूस उरलेला नाहीं. चीन व हिंदुस्थान यांचा फार प्राचीन काळापासून संबंध होता, याबद्दल हवे तितके पुरावे आहेत. कालीदासानें रेशमी वस्त्र या अर्थी ' चीनांशुक ' असा योजलेला शब्द सुप्रसिद्धच आहे. चिनी दरबारात हिंदुस्थानांतून अनेकदा वकील आल्याचे उल्लेख जुन्या चिनी इतिहासकारांचे ग्रंथांत आहेत.

अमेरिकेतील पेरूकडे जाणाऱ्या लोकांनीं आरंभीं जावा व सुमात्रा द्वीपसमूहात वसती केली होती. हे लोक सूर्य-सूर्यवंशीय क्षत्रिय–होत; आणि त्यांच्या पुराणकथा व ऐतिहासिक वीरकथा अजूनही तिकडील देवालयात चित्रित केलेल्या व ग्रंथांत लिहिलेल्या आढळतात. कलिंगांतील ब्राह्मणादि लोकांनी प्रथमतः जावाबेटात वसती करून मूळचे लोक सुधारून राज्यें स्थापलीं. तेथे त्यांचा जुना शक अद्याप चालू असून त्याचा आरंभ ख्रि. पू. ७५ हा आहे. ( एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास, पृ. १६८. ) या बेटांतील दुसरी वसाहत सातव्या शतकाचे आरंभीं गुजराथेंतील एका राजानें केली; त्याजबरोबर आरंभीं ५००० व मागाहून २००० लोक तेथें रहावयास गेले. ह्यांचा धर्म बौद्ध होता व त्यांनीच त्या बेटात या धर्माचा प्रसार केला. ( रॉयल एशि. सोसा. चे जर्नल, १९०३ पृ. ४०२ ) चौथ्या शतकात या बेटात प्रवास केलेल्या चिनी प्रवाशांसही तेथें हिंदूंचीच वसती आढळली. या बाजूचें सर्वांत मोठें बेट बोर्निओ हे आहे. हिंदुपुराणांतील कथाप्रसंगांचीं चित्रें काढलेलीं अनेक देवळें या बेटांतील अंतर्भागींही आढळतात. किनाऱ्यापासून ४०० मैल आत असलेलीं देवालयें तर फारच श्रेष्ठ शिल्पकलेचीं दर्शक आहेत. जावाचे पूर्वेस असलेल्या ' बली ' द्वीपात तर अद्यापही प्राचीन हिंदु वसाहतवाल्यांचे वंशज रहात असून त्यांचे मध्यें भारत-रामायणाच्या कविभाषेंतल्या प्रतीही आढळतात. आपला मूळपुरुष सवार गदिंग हा

होता, व तो आपला मूळ धर्मसंस्थापक ' बैतारा गुरु ' याचा पुत्र होय, असे सॅलिबीज बेटातले बुगीलोक सांगतात. धर्मसंस्थापकाचे वरील नाव उघड भारतीय दिसत आहे. सुमात्रा बेटातही अंडरसन नामक मिशनऱ्यास अनेक जुनी हिंदु देवालयें व जुन्या भग्नमूर्ति आढळल्या. आस्ट्रेलियात सापडणारे बरेच अवशेष भरतखंडाशी संबंध असलेले आढळतात. तेथील रानटी लोक 'बूमरँग' नावाचे एक लाकडी हत्यार वापरतात. याचा आकार बाकदार व एका टोकाकडे चपटा असून ते शत्रूस प्रहार करून फेकणाराकडे पुन्हा परत येतें ! शत्रूस प्रहार करून पुन्हा वर्तुळाकार गतीने परत येणाऱ्या व भारतात वर्णिलेल्या बाणाची ही ओबडधोबड नक्कल असावी तथापि आस्ट्रेलियात फार वर्षे न राहता भारतीय लोक तेथून निघून दक्षिण अमेरिकेत पेरूदेशात गेले असावे, असे अनुमान आहे.

११. अमेरिका—प्राचीन काळी बहुतेक उत्तर अमेरिकाखंड दाट जंगलाने व्याप्त झालेले होते; पण मध्य व दक्षिण अमेरिकेची स्थिति तशी नव्हती. प्राचीन शहरे, किल्ले, पूल, तलाव, पाट, रस्ते याचे अवशेष बॅरन हंबोल्ट प्रभृति प्रवासी व इतर शोधक यास तिकडे इतके सापडले आहेत की, प्राचीन काळी या खंडात अत्यंत सुधारलेले लोक राहत होते, याबद्दल आता संशय राहिलेला नाही. या अवशेषाच्या शिल्पाचे स्वरूप भारतीय शिल्पपद्धतीशी फारच जुळून आहे. प्राचीन अमेरिकनाच्या धार्मिक चालीरीती व समजुती यातही असेच साम्य आढळते. ( १ ) भारतीय लोक ज्याप्रमाणे धरित्री माता किंवा पृथ्वी माता ही एक देवता मानतात; त्याचप्रमाणे प्राचीन अमेरिकन मानीत. ( २ ) बौद्ध, हिंदु व मारवाडी लोक ज्याप्रमाणे बुद्ध, कृष्ण व अजयपाळ यांच्या दगडावर उमटलेल्या पावलांची पूजा करतात, तीच तऱ्हा मेक्सिकन लोकात आहे. ( ३ ) ग्रहणकाली राहु व केतु, चंद्र-सूर्यास गिळतात. ह्या इकडच्या कल्पनेप्रमाणेच अमेरिकनाची समजूत असून त्याचा राहु-केतु ' माल-ओयो ' नावाचा आहे. ( ४ ) इकडील शिव, काली याचेप्रमाणे अमेरिकन धर्मसंस्थापकांचे व उग्र गायाच्ये चित्रातही गळ्याभोवती सर्पाची वेटोळी काढतात. ( ५ ) ' गजवदन गणेशाच्या मूर्तीची पूजा मेक्सिकन लोकातही आढळते. हा प्रकार पाहून बॅरन हंबोल्ट यानी असे लिहिले आहे की, ' It presents some remarkable and apparently not accidental resemblance with the Hindus Ganesh ' ( ही मेक्सिकन देवता हिंदूंच्या गणेशासारखी थेट दिसत असून हें आश्चर्यकारक साम्य केवळ काकतालीयन्यायाने आलेले दिसत नाही. ) ( ६ ) जलप्रलयाची कल्पना अमेरिकनातही आहे. ( ७ ) पृथ्वी एका प्रचंड

कूर्माचे पाठीवर असून हें कासव समुद्रावर पोहत आहे व हे जेव्हां समुद्रात बुडतें, तेव्हा पृथ्वीवर जलप्रलय होतो, ही कल्पना उत्तर अमेरिकेतील इंडियनात आहे. ( ८ ) सर्प व नाग यांची पूजा हिंदु व प्राचीन अमेरिकनातच नव्हे तर इजिप्शी, असिरियन, ग्रीक, चिनी व स्कांदिनेवियन या लोकांचेही पुराणग्रंथांतूनही आढळते. प्राचीन अमेरिकन लोक पूर्वजन्म व पुनर्जन्मही मानीत. मूळच्या अमेरिकन लोकांचा पेहेराव हिंदूंप्रमाणेच असून ते वाहाणाच वापरीत; त्यांच्या स्त्रियांची लुगडें नेसण्याची तऱ्हा तर थेट भारतीय होती म्हणतात! दक्षिण अमेरिकेची ही वसाहत केव्हा झाली ते नक्की कळत नाही. पण ही वसाहत रामाचे कालानंतर केव्हा तरी झाली असली पाहिजे कारण पेरु देशातल्या मूळच्या अमेरिकनांचा मोठा उत्सव उत्तर हिंदुस्थानातल्याप्रमाणे रामलीलेचाच आहे. येवढेंच नव्हे तर या उत्सवास ते 'राम-सित्वा' असेच म्हणतात! राम हा सूर्यवंशीय असून त्याच्या आईचे नाव कौसल्या व पत्नीचे नाव सीता, असेंच पेरूवियन लोक मानतात; हे पाहून सर विल्यम जोन्सप्रभृति शोधकास फार आश्चर्य वाटलें. पेरूवियन लोकांचे मूळस्थान भरतखंड याबद्दल त्यास संशय राहिलेला नाही! ( Asiatic researches Vol. I, पृ. ४२६. )

मनुष्यजातीचे, निदान आर्यवंशीय लोकांचे, मूळस्थान हिंदुस्थानच असून येथूनच त्यांच्या वसाहती जगातील निरनिराळ्या देशात आल्या, अशा उपपत्तीचे पुरस्कर्ते तिच्या समर्थनार्थ जे पुरावे पुढे आणतात, त्याचा गोषवारा आतापर्यंत वर दिला. भरतखंडातील प्राचीन पौराणिक परंपरा पाहिली तर ती याच उपपत्तीस अनुकूल असलेली दिसून येते. 'पृथ्वीवरील सर्व मनुष्यांनी आपापला सदाचार भरतखंडातील ब्राह्मणापासून समजून घ्यावा' अशी जी मनूची आज्ञा ( अध्याय २, श्लोक २०. ) आहे, ती जगातील सर्व देशात चातुर्वर्ण्यविशिष्ट—निदान चातुर्वर्ण्य मानणारा—समाज अस्तित्वात होता त्या काळास अनुलक्षून केलेली आहे. पृथ्वीवरील दूर दूर देशांत पसरलेल्या शेकडो क्षत्रिय जातींचा ब्राह्मणाशी संबंध तुटला, त्यांचा सदाचार व धर्माचारही सुटला व त्यामुळे या सर्व जाती आर्यधर्मास व समाजव्यवस्थेस आचवल्या. पण त्यांचेपैकी कांहीं आर्यभाषा बोलणार राहिले, इतर मात्र भाषाही म्लेंच्छ बोलूं लागले व सर्व दस्यु बनले, असे आमच्या धर्मशास्त्रकाराचे मत आहे. एका प्राचीन संस्कृत ग्रंथकाराने

आर्येतर मुख्य भाषा पारसीक, यवन, रोमन व बर्बर या आहेत, असें लिहिले आहे. यांपैकीं पहिल्या तीन फारशी, ग्रीक व लातिन या होत; पण चौथी कोणती तें कळत नाहीं, असें मि. कोलब्रुक यांचें म्हणणें आहे. मनुस्मृति व महाभारत यांत ( मनु. अध्या. १०; म. भा. अनुशासन पर्व, अ. ३४; शांतिपर्व, अ. ६४; व हरिवंश. ) अशा क्षत्रियजातींचा नामनिर्देश आला आहे. पौंड्रक, चौड, द्रविड, कांबोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन, किरात, दरद, खश, कथिंद, पुलिंद, उशीनर, कोलिसर्प, माहिषक, मेकल, लाट, कोन्वशिर, शौंडिक, दर्व, चौर, शबर, बर्बर, गांधार, तुशार, कंक, आन्ध्र, मद्रक, पुलिन्द, रमठ, केरल वगैरे, सुमारे ३२।३३ परदेशीय पण आचारभ्रष्ट आर्य क्षत्रियजातींचा उल्लेख वर सांगितलेल्या ग्रंथांत आला आहे. विष्णुपुराणांत तर हूणादि इतर मिळून २०० जातींची याद दिली आहे ! सगरानें आपला पिता बाहुक याचेबद्दल सूड उगविण्याकरतां सर्व हैहयवंशाचे लोक ठार मारले. शक, यवन, कांबोज, पारद व पल्हव यांजवरही हाच प्रसंग आला होता. पण ते वसिष्ठास शरण गेले; व त्यांचे आज्ञेवरून सगरानें वेदाध्ययन व वषट्कार यांची त्यास मनाई केली. ( अ. ३२६. ) आणि यवनांनां शिर मुंडावें, शकांनीं निमें डोकें मुंडावें, पारदांनीं डोक्याचे केस सबंध ठेवावे व पल्हवांनीं दाढ्या राखाव्या, अशी सगरानें आज्ञा केली, आणि त्यास आर्य समाजांतून हांकून दिलें, असें विष्णुपुराणांत वर्णन आहे. वरील पांचांत कोलिसर्प, माहिष, दर्व, चोल व केरळ या आणखी पांच जातींचा समावेश करून हीच कथा हरिवंशांतही दिली आहे. या वरील इतर जाति म्हणजे कोणत्या, त्यांचे अर्वाचीन वंशज कोण व त्यांनीं कोणत्या देशांत वसाहती केल्या, या संबंधानें अनेकांनीं अनेक तर्क केले आहेत, पण सर्वांची निश्चित ओळख अद्याप झालेली नाहीं. यवन ( ग्रीक ), पल्हव ( पहलवी भाषा बोलणारे मीडो ), कांबोज ( कांबोडियांतले ), चीन ( चिनांतले ), वगैरे कांहीं स्थळें मात्र निश्चित झालीं आहेत. भारतीयांच्या प्राचीन पूर्वजांस पृथ्वीची भौगोलिक स्थूल माहिती होती यांत संशय नाहीं. ' सप्तद्वीपा वसुंधरा ' हें वचन महशूरच आहे. हीं द्वीपें म्हणजे जंबु, प्लक्ष, पुष्कर, क्रौंच, शाक, शाल्मलि व कुश हीं होत. येथे द्वीप म्हणजे बेट असा अर्थ नसून इंग्रजींत ज्यास ( continent ) किंवा मराठींत खंड म्हणतात, त्या अर्थी हा शब्द योजलेला आहे. जंबुद्वीपाचा एक लहान भाग भारतवर्ष आहे, असें सांगितलें आहे, त्यावरून हेंच सिद्ध होतें. ह्या सात द्वीपांचीं वर्णनें पुराणांतून विस्तृत रीतीनं

केलेलीं आहेत; पण त्याजवरून हीं द्वीपें म्हणजे खंडें कोणतीं याचा बिनचूक उलगडा होत नाहीं. त्यासंबंधानें अनेकांनीं अनेक तर्क मात्र केलेले आहेत. पृथ्वीच्या साप्रतच्या अवस्थेचा भौगोलिक दृष्टीनें विचार केला तर उत्तर अमेरिका, दक्षिण अमेरिका, आफ्रिका, आशिया-युरोप, आस्ट्रेलेशिया आणि दक्षिण व उत्तर ध्रुव-प्रदेश अशीं सात खंडें होतील. आशिया-युरोप यांचें भिन्नत्व भौगोलिक नसून भाषा व वर्ण या दृष्टीचेंच आहे. या सात खंडांसच वरील द्वीपांचीं नांवें दिलेलीं आहेत, कीं हीं द्वीपें आतां जुनीं असून जलप्रलयामुळें त्यांतलीं कांहीं बुडून व कांहींचें स्वरूप बदलून हल्लींचीं खंडें निर्माण झालीं आहेत, हें निश्चयात्मक रीतीनें ठरविण्यास तूर्त कांहींच साधन नाहीं.

भरतखंड हें मनुष्यजातीचें किंवा आर्यवंशाचें मूळस्थान नव्हे, त्याचें मूळस्थान मध्य आशिया किंवा उत्तर ध्रुव प्रदेशच होय, अशा उपपत्तींच्या पुरस्कर्त्यांचेंच म्हणणें खरें आहे असें मानलें किंवा सिद्ध झालें तरी भारतीयांचा इतर सुधारलेल्या परराष्ट्रांशीं प्राचीनकाळापासून निकट संबंध आहे, ही गोष्ट निःसंशय पुराव्यावरून सिद्ध होण्यासारखी आहे. सुदास राजापासून सगळें जग व त्यांतील सर्व देश जिंकलेले होते, असें ऐतरेय ब्राह्मणांत वर्णन आहे. ' त्रयोदश समुद्रे यो द्वीपा आसन् पुरूरवाः ' असें महाभारताचे आदिपर्वांत वचन आहे; त्यावरून पुरूरव्याचा अमल समुद्रांतील १३ बेटांवर चालत होता, असें कांहींनीं अनुमान केलें आहे. तसेंच सगर व त्याचे ६० हजार पुत्र यांचे कथेवरून, ह्या राजाचें सागरावर वर्चस्व असून त्याचे जवळ ६० हजार खलाशी होते, असा अर्थ कर्नल टॉड यांनीं काढला आहे ( राजस्थानचा इतिहास, Vol. I. पृ. ६०२. ) आतांच्या पुराणकाळीं या राजाजवळ सर्व पृथ्वी जिंकण्यास जरूर इतके शूर शिपाई कोठून आले ? असा कोणी प्रश्न करतील. पण भारतीय युद्धांत झालेला भयंकर संहार व त्यानंतर लवकरच भरतखंडांतून बाहेर वसाहती करण्यास गेलेले लक्षावधि लोक, याचा विचार करितां भारतीय युद्धकाळाचे पूर्वीं भरतखंडाची लोकवसती पुष्कळच अधिक होती, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. ब्रिटिश जनरल सर हामिल्टन यांनीं रूसो-जपानी युद्ध प्रत्यक्ष पाहून त्यासंबंधानें कांहीं टिपणें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांत ते लिहितात कीं, "There is material in North of India and in Nepal sufficient and fit, under good leadership to shake the artificial society of Europe to its foundation." ( उत्तर हिंदुस्थानांत व नेपाळांत शूर व लढवय्ये जातीचे पुरेसे व लायक लोक

असून ते चांगल्या सेनापतींचे नेतृत्वाखालीं दिले तर युरोपांतील कृत्रिम समाजव्यवस्थेची इमारत पायापर्यंत गदगदा हलवितील ! ) सन १८८८ सालांतील ' कॉंटेंपोररी रिव्ह्यू ' मासिकाचे जूनचे अंकांत मि. टौनशेंड यांनी दिलेला अभिप्राय तर याहून स्पष्ट आहे. प्रशियांतील सक्तीच्या लष्करी शिक्षणाची पद्धति हिंदुस्थानात अंमलात आणली, तर बेटें व स्थानिक सैन्य वगळून २५ लक्षाचे खडें सैन्य हिंदुस्थानात तयार होऊन त्यांत दरसाल ८ लक्ष नवे लोक लष्करी शिक्षण मिळविण्यास येतील; असें कळवून मि. टौनशेंड म्हणतात कीं, " A force with which not only Asia but the whole world might be subdued " ( या सैन्याचे बलावर आशियाखंडच नव्हे, तर सगळेंच जग जिंकता येईल ! ) साम्प्रतच्या हिंदुस्थानवासीयांच्या संबंधानें जर ही स्थिति तर प्राचीनकाळच्या मुबलक लोकवसतीच्या क्षात्र काळांत जग जिंकणें ही गोष्ट अशक्य होती, असें म्हणता यावयाचें नाहीं.

हा अतिप्राचीन काळ सोडून देऊन थोडें अलीकडच्या काळांत आल्यास प्लिनी नामक ग्रीक इतिहासकाराचे सांगण्यावरून असें कळतें कीं, एका काळीं इराणचा तीन चतुर्थांश भाग भारतीयांचे अंमलाखालीं होता. इराणचा बराच मोठा भाग मासिडोनियन लोकांना हिंदूंनीं दिला होता, असें स्ट्रॅबोही सांगतो. अफगाणिस्थानांतील गझनी शहर गजसिंग नामक यादववंशीय राजानेंच मूळ वसविलें होतें. व ही गोष्ट शहराचे नांवांतही स्पष्ट दिसते. जेसलमीरच्या यादववंशाच्या जुन्या बखरींतून असें सांगितलें आहे कीं, भारतीय युद्धानंतर यादववंशीय लोक पश्चिमेकडे गेले, त्यांनीं गझनीपासून समरकंदपर्यंत राज्य स्थापिलें; पण मुसलमानी धर्माचा उदय झाल्यावर त्यांना पुन्हा सिंधुनदीचे अलीकडे येऊन वसती केली. मेवाडच्या राण्याचा मूळपुरुष बाप्पा रावळ यानें चितोड येथें आपला राजवंश स्थापल्यावर खारासानला जाऊन तेथेंही राज्य स्थापिलें. मुसलमानी धर्म स्थापित होण्याचे सुमारास अफगाणिस्थान, इराण व मध्य आशियांत हिंदूंचीच राज्यें होतीं, असें कर्नल टॉड यांनीं ( राजस्थानचा इतिहास, Vol. II. पृ. २२२–२३१. ) अनुमान काढलें आहे.

सेल्युकसचा वकील मेगस्थनीस, ॲंटिओकस व डायोनिशिअस यांचा डिमेकस व दुसऱ्या टॉलमीचा बासिलिस हे वकील चंद्रगुप्त व त्याचा मुलगा अमृतघट यांचे दरबारीं आले होते. ख्रि. पू. २१० चे सुमारास ॲंटिओकस ( धि ग्रेट ) यानें यादवकुलांतील सुभगसेन राजाशीं संयोग–संधि केला होता; पण पुढे

दोघात वितुष्ट आले, व अखेर यादवराजाने ॲंटिओकसचा पराजय करून त्यास लढाईत ठार मारले. (राजस्थानचा इतिहास, Vol. II. पृ. २३०.) ग्रीकराजा सेल्युकस याने तर आपली कन्या चंद्रगुप्तास दिली होती. या ग्रीक राजकन्येबरोबर ग्रीसमधून अनेक तरुण व सुंदर दासी पाटलीपुत्रास आल्या होत्या. तेव्हांपासून या यवनीस दासी म्हणून ठेवण्याची चाल भारतीय राजानी पाडली. या यवनी मोल देऊन आणीत किंवा खंडणी म्हणून घेत. नेहमी राजाबरोबर राहून त्याची हरएक कामे या करीत. इराणचा राजा नशिरवान यानेंही आपली मुलगी चित्तोडच्या महाराण्यास दिली होती. उज्जयिनीच्या राजाचा ऑगस्टसशी पत्रव्यवहार होता, असें जस्टिन नामक ग्रंथकार लिहितो. या ऑगस्टसला सामोस येथे भरतखंडातून आलेले वकील भेटले; व त्यांनी त्यास हत्ती, मोती व हिरे याचे नजराणे भारतीय राजातर्फे दिले. आणखी एकदा क्लॉडियसकडे हिंदुस्थानातून ४ वकील असेच आल्याचे प्लिनी सांगतो. याच वकिलाकडून प्लिनीला लंकेची माहिती कळली व ती त्याने आपल्या ग्रंथात लिहिली. ट्राजन व अँटोनियस पायस या रोमन बादशहाकडेही हिंदुस्थानातून दोनदा असेच वकील आले असून रोम व भरतखंड याचा हा दरबारी संबंध इसवी सन ५३० पर्यंत अखंड चालला होता. पांड्याचे राज्याची स्थापना दक्षिण हिंदुस्थानात ख्रि. पू. ५ वे शतकात झाली. यानंतर काही वर्षांनी या राज्यातून एक वकील ऑगस्टसकडे आला व उभयतांची मुलाखत सिरियात झाली, असे स्ट्रॅबो लिहितो. या वकिलाबरोबर एक ब्राह्मण अथेन्सला गेला होता; तेथें काही कारणाने या ब्राह्मणाने अग्निकाष्ठ भक्षण केले, तें पाहून ग्रीकास अत्यंत आश्चर्य वाटलें. सिरियाचा अँटिओकस, इजिप्तचा टॉलमी फिलेडेल्फास, मासिडोनचा अँटिगोनस गोनेटस, कारिनीचा मगस व एपिरसचा दुसरा अलेक्झांडर, इतक्या ग्रीक राजाची नावें अशोकाचे शिलालेखात आलेली आहेत.

भारतीय युद्ध [illegible] भरतखंडात कलियुग सुरू होऊन त्याची अनेक बाजूंनी सारखी अवनति होत होती, तरीही त्याचेबद्दल बाहेरच्या जगात एक प्रकारचा पूज्यभाव, आदरबुद्धि व दरारा वाटत होता. पडत्या काळी सुद्धा अलेक्झांडरचे स्वारीपर्यंत हिंदुस्थानाने अनेक परकीयांच्या मोहिमास दाद दिली नाही. असिरियाचे साम्राज्याच्या वैभवाचा कळस सेमिरामिस राणीचे काळी झाला. तिने तीन वर्षे जंगी तयारी करून हिंदुस्थानावर स्वारी केली. तिज-

बरोबर ३ लक्ष पायदळ, ५ लक्ष स्वार व २००० नावा असून उंटांच्या पाठीवर घालून तिने पुष्कळ कृत्रिम हत्तीही बरोबर घेतले होते म्हणतात! पण अखेर ह्या सैन्याचा पूर्ण मोड होऊन त्यातले पुरें ⅓ सैन्यही परत गेलें नाही! कित्येकांचे मतें सेमिरामिस राणीही याच लढाईत मारली गेली. अलेक्झांडरशी लढण्यात भारतीयांनी कसा पराक्रम दाखविला आणि अखेर आपसातील फूट व भाऊबंदकी यांनी ग्रस्त झाल्यामुळें भरतखंड परकीय सत्तेखालीं कसे गेलें, त्याचे वर्णन पूर्वी एका प्रकरणात केलेंच आहे.

## भारतीयांची भाषा, लिपी व वाङ्मय.

जगातील कोणत्याही राष्ट्री लोकांच्या जीवनक्रमाकडे पाहिलें असता असें दिसून येतें कीं, त्यांचेमध्यें भाषा अगदीं आरंभीं उदयास येते. भाषेतील भिन्न-भिन्न ध्वनींचीं भिन्नभिन्न चिन्हे करून भाषेची लिपी बनावयास बराच काळ लोटावा लागतो. हा काळ लोटून लिपी बनली म्हणजे तो समाज संस्कृतींत बराच उच्च दर्जास पोंचला आहे, असें खास समजावें. भाषा व लिपी यांचा हा प्रचार पुष्कळ काळ चालू राहिला म्हणजे त्या लोकांत हळूहळू वाङ्मय निर्माण होत जातें. सारांश: कोणत्याही राष्ट्राची संस्कृति, बुद्धिवैभव व मोठेपणा याचें नक्की मोजमाप करावयाचें असल्यास त्याची भाषा, लिपी व विशेषतः वाङ्मय यांची रचना, स्वरूप व योग्यता ठरविणें हें एक मुख्य व अचूक साधन आहे. राष्ट्राची विद्वत्ता, शहाणपण, संस्कृति, विद्याकला व सुधारणा या सर्वांची नोंद वाङ्मयात झालेली असते; वाङ्मय हे राष्ट्राच्या बुद्धिवैभवाचें व मनोरचनेचें स्पष्ट चित्र असतें; आणि राष्ट्राचे विचार, उद्गार व आचार हीं त्याच्या वाङ्मयात आरशाप्रमाणें स्पष्ट पहावयास सापडतात. म्हणूनच राष्ट्राची बरीवाईट स्थिति आणि त्याच्या संस्कृतीचा दर्जा व स्वरूप ठरवितांना त्याची भाषा, लिपी व वाङ्मय यांचाच विचार समाजशास्त्रवेत्ते व इतिहासकार नेहमीं प्रथमारंभीं करीत असतात. भारतीयांची संस्कृत भाषा, लिपी व वाङ्मय आणि तिजपासून निर्माण झालेल्या हिंदुस्थानातील अनेक देशी भाषा, लिपी व वाङ्मयें यांची जगातील कोणतीही प्राचीन व अर्वाचीन भाषा, लिपी व वाङ्मय यांशीं तुलना करणारास भारतीयांच्या श्रेष्ठत्वाचा सहज व तात्काळ प्रत्यय पूर्वी आलेला आहे व पुढेंही येईल.

संस्कृत वाङ्मयाच्या युरोपियन पंडितात सर विल्यम जोन्स हे बुद्धीची कुशाग्रता व मर्मज्ञता या गुणात सर्वांहून श्रेष्ठ होते. ते संस्कृत भाषेसंबंधानें

लिहितातः—" संस्कृत भाषेचें स्वरूप व घटना हीं आश्चर्यकारक असून तिची रचना ग्रीक भाषेहून परिपूर्ण व तिची शब्दसंपत्ति लॅटिनहून जास्त आहे, आणि शिवाय या दोहोंहूनही तींत अद्वितीय सुसंस्कृतता आहे. (More perfect than the Greek, more copious than the Latin and more exquisitely refined than either. Asiatic Researches, Vol I. पृ. ४२२ ). संस्कृत भाषेइतके दीर्घ समास जगातील कोणत्याही भाषेत नाहीत, कित्येक समास तर १५६ अक्षरांचे आहेत ! " ( Asiatic Re. Vol. I. पृ. ३६० ). अनेकभाषाकोविद प्रो. बॉप् लिहितात कीं, " ग्रीक व लॅटिन भाषाहून संस्कृत भाषा अधिक परिपूर्ण व शब्दसंपन्न असून त्या दोहोंहून तींत सौंदर्य व वक्तृत्व जास्त भरलेलें आहे. " (एडिंबरो रिव्ह्यू, व्हा ३३, पृ.४३). प्रो. मॅक्सम्युलर म्हणतात कीं, " संस्कृत ही भाषाचीं भाषा (Language of Languages ) आहे ! ज्योतिषाशीं गणिताचा जो संबंध तोच संस्कृत भाषेचा भाषाशास्त्राशीं आहे, हें विधान अगदीं खरें आहे. " ( Science of Language, पृ. २०३.). सदरहू प्रो. बॉप् यांनीं सन १८४८ सालीं संस्कृत व इतर आर्य भाषा यांचे तुलनात्मक व्याकरणावर एक ग्रंथ लिहिला, तेव्हापासूनच पाश्चात्यांचे तौलनिक भाषाशास्त्र निर्माण झालें. अर्थात्, संस्कृत भाषा व वाङ्मय यांचा युरोपियनास परिचय झाल्यामुळेंच हें शास्त्र जन्मास आलें आहे, ही सर विल्यम हंटर यांनीं दिलेली कबुली ( गॅझिटियर, इंडियन, पृ. २६४. ) यथार्थच आहे. प्रो. हीरन लिहितातः—" जगांत अत्यंत संपन्न व सुसंस्कृत अशा ज्या भाषा आहेत, त्यात संस्कृत भाषेची गणना केली पाहिजे. शिवाय या भाषेची वाङ्मयसंपत्तिही फार मोठी आहे. तिच्यांतील काव्यें जितकीं मनोहर व सुंदर आहेत, तितकेंच तिच्यातील तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयही संपन्न आहे; कारण अत्यंत सूक्ष्म अमूर्त कल्पनांचे निदर्शक असे हजारों पारिभाषिक शब्द त्यात आहेत ! " ( Historical Researches, Vol. II. पृ. १०९-११० ) संस्कृत भाषेच्या लॅटिनहून श्रेष्ठ अशा शब्दसंपन्नतेचा गौरव करतांना लॉपेरां पाओलिनो नामक ग्रंथकारानें असें लिहिलें आहे कीं," या भाषेंत एकाच वस्तूचे दर्शक अनेक शब्द असे आहेत. उदाहरणार्थ; सूर्यवाचक ३०, चंद्रवाचक २०, गृहवाचक २०, दगड या अर्थी ६, पर्णवाचक ५, कविवाचक १० व गाईचे वाचक ९ वेगवेगळे शब्द आहेत ! " पाओलिनोच्या या मतावर टीका करून मिल इतिहासकारानें हिंदूंविषयींचा आपला दुराग्रह व भ्रष्ट अभिरुचि प्रगट

केली आहे. " एका वस्तूचा दर्शक एकच शब्द असावा, जास्त असूं नये, हा भाषेचा मोठाच गुण मानला पाहिजे. " असें हे साहेब म्हणतात. पण यावर प्रो. विल्सन याचा असा सवाल आहे की " भाषेत एकवस्तुवाचक अनेक शब्द आहेत म्हणूनच तींत सौंदर्य, विविधता, सौष्ठव व ओज येतें. याउलट जी भाषेत एका वस्तूचा वाचक एकेकच शब्द असता तर तींत काव्य, वक्तृत्व, वाङ्मय, बुद्धिविलास यांपैकीं काय वरें शिल्लक राहील ! " ( मिल्कृत हिंदुस्थानचा इतिहास, Vol. II. पृ. ९१ ) सुप्रसिद्ध जर्मन पंडित श्लेजल लिहितात कीं, " संस्कृत भाषा खरोखरच ' सुसंस्कृत ' व परिपूर्ण आहे. घटना व व्याकरणनियम आणि शब्दसंपत्ति यामध्यें ती ग्रीक भाषेसारखीच आहे; पण तिची रचना ग्रीकहून अधिक प्रमाणबद्ध व म्हणून जास्त सोपी आहे. ग्रीक भाषेचें घटनासौंदर्य आणि कोणताही अर्थ थोड्या शब्दांत बिनचूक सांगण्याचें लॅटिनचें सामर्थ्य संस्कृत भाषेत आहे. शिवाय तिचे मूळ धातु फार्शी व जर्मन भाषेतल्या धातूंशी साम्य असून या दोनही भाषांतील उत्साह व ओज हीं तिजमध्यें आहेत. ग्रीक भाषेची शब्दसंपन्नता, रोमनचें माधुर्य व ओज आणि हिब्रू भाषेतील दैविकस्फूर्ति हीं संस्कृतांत आहेत. व्याकरणदृष्टीची प्रमाणबद्ध घटना आणि परिपूर्णता या दृष्टीनीं विचार करतां संस्कृत भाषा ग्रीक व लॅटिनहूनही श्रेष्ठ ठरते. " श्लेजलकृत ( History of Literature, पृ. १०५, १०६, १०७ ). मि. हॅलरनामक ग्रंथकार लिहितो, " अनेक राज्यक्रान्त्या व कालपरिवर्तनें आलीं तरीही, हिंदुस्थानांत संस्कृतसारखी अद्वितीय, संपन्न व विविधस्वरूपी भाषा कायम आहे. युरोपांतील ज्या लॅटिन, ग्रीक वगैरे भाषांस आम्ही ' क्लासिकल ' ( अभिजात ) मानतो, त्या सर्वांची ती जननी आहे, व तीमुळेच ग्रीक भाषेतील लवचिकपणा व रोमन भाषेतील ओज याचा उगम संस्कृतांतच आहे. ही गोष्ट जेव्हां युरोपला प्रथमतः कळून आली तेव्हां ते आश्चर्यानें थक्कच झाले. " ( रॉ. एशि. सोसा. जर्नल, Vol. II. १८३४ ).

" पश्चिम आशिआखंडांतील सर्व प्रकारच्या वर्णमालांचा उगम ' देवनागरी ' लिपींतच आहे " असें सर विल्यम जोन्स हे लिहितात (Asiatic researches, Vol I. पृ. ४२३ ). अर्थात् भारतीयांचें तत्त्वज्ञान, विद्वत्ता व संस्कृति यांचा तिकडे व पुढें युरोपांत प्रसार होण्यास वर्णमालांचा हा संबंधच कारणीभूत झाला. जगांतील ज्या भाषांस इंडोयुरोपियन ही संज्ञा आहे, त्या सर्वांची जननी

**संस्कृतच** आहे. या भाषातले मूळ धातु व इतर आवश्यक शब्द **संस्कृतपासूनच** निघाले आहेत. इंडो-युरोपियन भाषांतील जो काही भाग सर्वांत सारखा आहे, तो त्यास **संस्कृतपासूनच** मिळालेला आहे. **ग्रीक** व **इराणची** प्राचीन भाषा **झेंद** या **संस्कृतापासूनच** झाल्या आहेत, असे मि. **पार्कोक**, डा. **प्रिचर्ड** व प्रो. **हीरन** याचे मत आहे. **झेंद** भाषेच्या कोशांतल्या प्रत्येक दहा शब्दांत निदान ६।७ शब्द **संस्कृतोत्पन्न** आहेत ! एकपासून दहापर्यंतच्या अंकांची जुन्या भाषांतील नावेही **संस्कृतोत्पन्नच** आहेत.

| **संस्कृत.** | **लॅटिन.** | **ग्रीक.** |
|---|---|---|
| एक | युन् | हेन |
| द्वि | डु | डु |
| त्रि | ट्रि | ट्रि |
| चतुर | क्वाटुर | तसर |
| पंच | क्विक | पोट |
| षष्ठ | सेक्स | हेक्स |
| सप्त | सेप्तम | हेप्त |
| अष्ट | आक्टो | ऑक्टो |
| नव | नोवम | एनया |
| दश | डेसेम | डेका. |

| **संस्कृत.** | **झेंद.** | **ग्रीक.** ( डॉरिक ) | **लॅटिन** |
|---|---|---|---|
| प्रथम | फ्रथमा | प्रोटा | प्रायमा |
| द्वितीय | बित्य | डुटेरा | आल्टेरा |
| तृतीय | थ्रित्य | ट्रिटा | टर्शिया |
| चतुर्थ | तुरीय | टरटार्टा | क्वार्टा |
| पंचम | पुग्धा | पेम्पटा | क्विटा |
| षष्ठ | क्षत्व | हेक्टा | सेक्सटा |
| सप्तम | हप्तथ | हेब्डोमा | सेप्तिमा |
| अष्टम | अष्टमा | ओग्डोआ | आक्टेवा |
| नवम | नौमा | एनोटा | नोवा |
| दशम | दशमा | डेकाटा | डेसिमा |

इतर काही शब्दांची व रूपांची साम्यें पुढील कोष्टकावरून कळून येतील.

| संस्कृत. | झेंद. | ग्रीक. | लॅटिन. |
|---|---|---|---|
| तिष्ठामि | हिस्टामि | हिस्टॅमि | स्टो |
| तिष्ठति | हिस्टोति | हिस्टॅटि | स्टाट |
| ददामि | दधामि | डिडॉमि | डो |
| ददाति | दधेति | डिडॉटि | डाट |
| अस्मि | अहमा | एस्मि | सुम् |
| अस्ति | आष्ट | एस्टि | एस्ट |
| भरामि | बरामि | फेरो | फेरो |
| भरति | बरैति | फेरई | फर्ट |
| वहामि | वझामि | एखो | व्हेहो |

| संस्कृत. | लॅटिन. | संस्कृत. | लॅटिन. |
|---|---|---|---|
| स्थातुं | स्टटम् | अक्तुं | अॅक्टम |
| दातुं | डेटम | स्वानतुं | सोनिटं |
| जातुं | नोटम | वामतु | व्होमिटं |
| पातुं | पोटम् | पक्तुं | पिष्टं |
| एतुं | इटम | जानतुं | जेनिटं |

सारांश, अति प्राचीनकाळी जगातील सर्व आर्यजाति संस्कृत भाषा बोलत असून सांप्रतच्या सर्व आर्यभाषांची जननी संस्कृतच आहे, ही गोष्ट सर्व प्रमाणांनी सिद्ध होत असून ती डॉ बालंटाइन प्रो. बॉप्, क्युंइस, मिस कार्पेंटर, मेक्स म्युलर वगैरे ग्रंथकारांनी व पंडितांनीही मान्य केली आहे.

भारतीयांची असामान्य वाक्शक्ति आणि त्यांची आश्चर्यकारक कल्पनाशक्ति या दोहोंच्या सहाय्यानें त्यांनी संस्कृत भाषा निर्माण केली. ह्या भाषेची पुढें इतकी वाढ झाली कीं, त्यांच्या बुद्धिवैभवास व बुद्धिविलासास ती सर्वतोपरी साजूं लागली; इतकेंच नव्हे तर संस्कृत वाङ्मयांत अद्वितीय सुसंपन्नता, व्यापकता व उदात्तपणा उत्पन्न करण्यासही या भाषेचें फारच साहाय्य झालें. या भाषेची वाढ व परिणति शास्त्रशुद्ध पायावर प्रमाणबद्ध झाली असल्यामुळे जगांतील कोणत्याही जुन्या नव्या भाषाहून ती अधिक परिपूर्ण असून ' देववाणी ' हे तिला मिळालेलें नाव नावाचें नसून सर्वांशीं सार्थच आहे. संस्कृत भाषेचें हे अद्वितीय स्वरूप पाहून ही भाषा कधीं काळीं सामान्य लोकांच्या बोलण्यातली नसून अर्वाचीन ' एस्परंटो ' भाषेप्रमाणें ही ब्राह्मण पंडितांनीं कृत्रिम बनविली

असावी, असेही अनुमान पाश्चात्य पंडित काहीत असत, परंतु हा त्यांचा निव्वळ भ्रम किंवा दुराग्रह असून पाणिनिकाली व तत्पूर्वी संस्कृत ही भाषा सामान्य लोकांच्याही नित्य व्यवहारातली होती असे पंडित श्यामजी कृष्णवर्मा यांनी सन १८८१ साली बर्लिन येथे भरलेल्या ओरिएंटालिस्ट काँग्रेसपुढे वाचलेल्या निबंधात सिद्ध केले आहे. संस्कृत भाषेला 'मृत भाषा' असेही कोणी कोणी म्हणतात; पण त्यातही फारसे तथ्य नाही. हिंदुस्थानातल्या हिंदी, बंगाली, मराठी वगैरे निरनिराळ्या देशी भाषा संस्कृताचीच रूपांतरे आहेत ही गोष्ट सोडून दिली, तरी काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत जुन्या परंपरेचे पाईत हीच भाषा आपसांतील संभाषणात व पत्रव्यवहारात उपयोजीत आहेत ही गोष्ट प्रसिद्धच आहे. मॅक्स म्युलर म्हणतात.—( India, what can it teach us? पृ. ७८, ७९ ). "हिंदुस्थानच्या भूत व वर्तमान काळात इतकी पूर्ण संगति व सातत्य आहे की अनेक सामाजिक क्रांत्या, धर्मक्रांत्या व राज्यक्रांत्या झाल्या तरी अद्याप हिंदुस्थानात सर्वत्र बोलली जाणारी संस्कृत हीच भाषा आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. इंग्रजी राज्य व इंग्रजी विद्या यांचा प्रसार होऊन एका शतकाहून ज्यास्त काळ लोटला आहे, तरीही डान्टे कवीचे काळी युरोपात लॅटिनचा जितका प्रचार होता त्याहून अधिक प्रचार संस्कृत भाषेचा अद्यापही हिंदुस्थानात आहे."

भाषा व लिपी यांचा परस्परसंबंध कोणता, हे आरंभी थोडक्यात सांगितलेच आहे. आकाशातील सूर्य या वस्तूचा 'स्' व 'र्य' या दोन संयुक्त ध्वनींचा लागोपाठ केलेला उच्चार हा निदर्शक अर्थ प्रतिनिधि होय. पुनः या दोन ध्वनींच्या उच्चाराची 'सू' व 'र्य' या दोन अक्षरांना बनलेली संयुक्त आकृति निदर्शक अर्थ प्रतिनिधि होय. म्हणजे देव, त्याची मूर्ति व मूर्तीचे चित्र यांचा जो परस्परसंबंध तोच—मूळ वस्तु, ध्वन्यात्मक शब्द व वर्णात्मक शब्द यांमध्ये आहे. ध्वनि व वर्ण किंवा भाषा व लिपी यांचा हा संबंध लक्षात आणल्यास शास्त्रीय दृष्टीने कोणती लिपी किंवा वर्णमाला श्रेष्ठ व निर्दोष आणि कोणती कनिष्ठ व सदोष यांची कोणासही सहज कल्पना करता येईल. लिपीमध्ये पहिला गुण हा असला पाहिजे की, भाषेत जितके मूळ ध्वनि असतील तितकी अक्षरे किंवा वर्ण लिपीत असले पाहिजेत. हा गुण देवनागरी लिपीत पूर्णपणे आहे. म्हणजे संस्कृत भाषेत स्वरात्मक व व्यंजनात्मक मूळ ध्वनि अनुक्रमे १६ व ३६ आहेत, तर तिच्या लिपीतही तितकेच वर्ण आहेत. इंग्रजी लिपी या दृष्टीने फार सदोष

आहे; कारण तींतील ४३ भिन्न भिन्न मूळ स्वनींचे चिन्हीकरण फक्त २६ च वर्णांवर भागवावें लागतें ! या एका दोषामुळेच इंग्रजी व इतर सर्व युरोपियन लिपींत दुसरेही अनेक दोष उत्पन्न झाले आहेत. लिपीमध्ये दुसरा गुण हा पाहिजे की, एका स्वनीचें दर्शक एकच चिन्ह किंवा वर्ण असला पाहिजे; व अर्थातच एका चिन्हाचा एकच उच्चार झाला पाहिजे. देवनागरी लिपींत 'क' स्वनीचा दर्शक 'क' हा एकच वर्ण आहे, व 'क' या वर्णाचा अन्य ध्वनि किंवा उच्चार कदापि होत नाही. आता या गुणाच्या दृष्टीनें इंग्रजी वर्णमाला किती सदोष आहे पहा. पहिली गोष्ट ही की, इंग्रजी वर्ण स्वनींचे मानानें एकीकडून अपुरे आहेत तर दुसरीकडून जरूरीहून ज्यास्त आहेत. उदाहरणार्थ: C या इंग्रजी अक्षराच्या 'स' या स्वनीचें कार्य S नें होत आहे; या वर्णाच्या 'क' स्वनीचे कार्य K नें होत आहे व X या वर्णाच्या 'क्स' या स्वनींचे कार्य KS या वर्णांनी होत आहे. अर्थात C व X हे वर्ण इंग्रजी वर्णमालेत फालतु आहेत ! असा फालतु वर्ण देवनागरीत मुळीच नाही. इंग्रजींत g चा उच्चार कधी 'ग' होतो तर कधी 'ज' होतो ! इंग्रजींतील a, e, i, o, u, या स्वरांच्या उच्चारसंबंधानें तर अनिश्चयच घोटाळा आहे. a या वर्णाचे उच्चार अ, आ, ऑ, दीर्घ ए वगैरे अनेक होतात ! पुढच्या स्वराचाही हेच प्रकार. but बट का ? व put पुट् का ? हे प्रश्न तर सुप्रसिद्धच आहेत ! देवनागरी लिपींत असला भोंगळपणा मुळीच ठेवलेला नाही. तिनें एका स्वनीस एक वर्ण निश्चित व कायमचा करून दिलेला आहे. अ, आ इ व उ या मूळस्वरांचीच नव्हे तर त्यांच्या दीर्घांची आणि ए, ऐ, ओ, औ या संयुक्त स्वरांचीही वेगळीं चिन्हे नियमित करून लिपींत ज्यास्त सुगमता व शास्त्रशुद्धता आणली आहे. इंग्रजीप्रभृति वर्णमालेचा क्रमही शास्त्रशुद्ध नाहीं; देवनागरींत आधी मूळ स्वर, नंतर संयुक्त स्वर, नंतर कंठापासून क्रमानें ओष्ठापर्यंतच्या अवयवांच्या साहाय्यानें उच्चारली जाणारीं व्यंजनें व पुढें इतर व्यंजनें असा क्रम असून पुन: त्यांतही मृदु, कठोर, महाप्राणादि शास्त्रीय भेद व क्रमही दाखविले आहेत. इंग्रजी वगैरे वर्णमालेत या प्रकाराचा अभावच आहे. हे सर्व दोष लक्षांत आणूनच डावडसन व ऑलकॉक या इंग्रज वैय्याकरणांनी "English alphabet is redundant, defective and inconsistant." ( इंग्रजी वर्णमाला फालतु, सदोष व असंबद्ध आहे. ) असा सूत्रात्मक अभिप्राय दिलेला आहे !

देवनागरी लिपीच्या श्रेष्ठत्वासंबंधानें विचार करतांना भारतीय आर्यांस

लेखनकला केव्हापासून अवगत झाली, ह्या प्रश्नाचा पाश्चात्य पंडित वारंवार खल करीत असतात. युरोपियन सुधारणेचा उगम ग्रीक वाङ्मयापासूनच झालेला आहे; तेव्हा संस्कृत लिपी ग्रीक लिपीहून प्राचीन आहे, अशी कबुली देण्यास युरोपियन पंडिताचे मन वरेंच कचरते. पण या बाबतीत विशेष आश्चर्याची गोष्ट ही की, मॅक्स म्युलरसारख्या विद्वान्, शोधक व समदृष्टि पंडितांच्याही बुद्धीची या बाबतीत चुकभूल झाली असून ख्रि. पू. ३५० च्या पूर्वी भारतीयास लेखनकला अवगत नव्हती, असें त्यांनी विलक्षण प्रतिपादन केले आहे ! मॅक्स म्युलरखेरीज दुसऱ्या एकाद्या पंडिताने जर असें मत प्रतिपादिलें असतें, तर त्यास इतरांनी वेड्यातच काढलें असतें ! ' भारतीयास लेखनकला फार प्राचीनकाळापासून माहीत होती ' असें प्रो. वेबर याचें मत आहे. ( Indian Literature पृ. ५ ) प्रो. विल्सन याचे मतें तर भारतीयाची लेखनकला त्यांच्या वाङ्मयाइतकीच प्राचीन आहे. ( मिल्कृत हिंदुस्थानचा इतिहास, पृ ४५ ). प्रो. हीरन याचेंही असेंच मत असून, ' प्राचीन काळीं भरतखंडांत लेखनकलेचा उपयोग शिलालेख, ताम्रपटापुरताच होत नसून लोकांच्या रोजच्या सामान्य व्यवहारांतही तो होत असे ' असेंही त्याचें म्हणणें आहे. ( हीरनकृत Historical Researches Vol. II, पृ.२०२ ). " हिंदु लोकांस लेखनकला ख्रि. पू. २८०० वर्षांपासून अवगत असून, त्याजजवळ हस्तलिखित धर्मग्रंथ त्या काळापासून होते " असें कौंट जार्नस्टजर्ना म्हणतात ( Theogony of the Hindus, पृ २६ ). वैदिक वाङ्मयांतल्या ' प्रातिशाख्या ' च्या काळापुढें हस्तलिखित ग्रंथ होते, असें प्रो. गोल्डस्टकर, बोथलिंग, व्हिटने व रॉथ याचेंही मत आहे.

प्रो. मॅक्स म्युलरप्रभृतींचें स्वपक्षसमर्थनाचें मोठें प्रमाण म्हणजे हें कीं, वेदांस ' श्रुति ' हें नाव आहे; ( श्रु ऐकणें ) अर्थात् संहितांचें अध्ययन निवळ श्रुतिद्वारा तोंडीं चालत असून, वेदकाळीं लेखनकला माहीत नव्हती. पण असला कोटिक्रम लढवूं लागल्यास ' स्मृ=आठवणें ' या धातूच्या अनुरोधानें स्मृतिकाळींही लेखनकला माहीत नव्हती, असें मानावें लागेल ! पण स्मृतिकारास लेखनकला अवगत असल्याचे स्पष्ट व निर्विवाद उल्लेख स्मृतिग्रंथांतून शेकडों सापडतात. दुसरें असें कीं, लेखनकलेवांचून वाङ्मयाचें केवळ तोंडीं अध्ययन होण्यास वाङ्मय पद्यमयच असावें लागतें. पण मॅक्स म्युलर यांनी ठरविलेल्या ख्रि पू. ३५० च्या पूर्वी संस्कृत वाङ्मयांत शास्त्रीय विषयावरही कित्ती तरी

गद्य ग्रंथ झालेले होते ! ' बेली ' नामक ज्योतिष्याच्या गणितावरून ख्रि. पू. ३००० वर्षांच्या काळीं भारतीयात ज्योतिष व भूमिति हीं शास्त्रें फार श्रेष्ठ पदास पोचली होतीं, असें सिद्ध होतें. प्रो. मॅक्स डंकर यासही मॅक्स म्युलर याचें वरील मत मुळीच मान्य नाहीं. ' ब्राह्मण ' ग्रंथाचा काळ पाश्चात्य पंडित सामान्यतः ख्रि. पू. ८०० ते ३०० याचे दरम्यानचा मानतात. " या ग्रंथात ' शब्दा ' चाच नव्हे तर ' अक्षरा ' चाही जर उल्लेख आला आहे, तर ख्रि. पू. ८०० वर्षांच्या पूर्वीच वेदसंहितांचे हस्तलिखित ग्रंथ झाले होते व ते ' ब्राह्मण ' कर्त्यांच्या समोर होते असे मानावेच लागते." असें प्रो मॅक्स डंकर लिहितात. ( History of Antiquity, Vol. II. पृ १५६ १५७.)

ऑक्सफोर्डच्या बेलियल कॉलेजचे ओरिएंटल लेक्चरर पंडित श्यामजी कृष्णवर्मा हे हिंदुस्थानसरकारचे प्रतिनिधि या नात्याने सन १८८३ साली ' लंडन ' येथे भरलेल्या ओरिएण्टलिस्ट कांग्रेसला हजर होते. त्यांनीं त्या वेळीं याच विषयावर एक निबंध वाचून मॅक्स म्युलर प्रभृतींच्या तर्कांचे मार्मिक व व सप्रमाण खंडण केले आहे; व लेखनकला भारतीयास वैदिककालापासूनच माहीत आहे, असे सिद्ध केले आहे. त्याच्या विवेचनांतील पहिला मुद्दा हा आहे कीं, पाणिनिकाळीं व त्या पूर्वीही गद्य वाङ्मय बरेच निर्माण झाले होते; किंबहुना वैदिक वाङ्मयांतील ऋग्वेदसंहिता खेरीजकरून इतर बहुतेक सर्व ग्रंथ गद्यात्मकच आहेत. अर्थात् एवढे विस्तृत वाङ्मय काहीं तरी कृत्रिम लेखनाचे साधन असल्याशिवाय कसे निर्माण झाले व कायम राहिलें, याचा खुलासा व्हावयास पाहिजे. दुसरी गोष्ट अशी कीं, यज्ञयागात लागणाऱ्या वेदी व कुंडे यांच्या रचनेचे जे सूक्ष्म नियम सांगितले आहेत, त्यावरून व वेदांगज्योतिषावरून त्या काळीं भूमिति, गणित व ज्योतिष हीं शास्त्रेंही बरीच श्रेष्ठ दर्जास पोचलीं होतीं, असे स्पष्ट दिसून येते. मग भूमिति, गणित व ज्योतिष हीं शास्त्रे लेखनकलेशिवाय इतक्या उर्जित दशेस कशीं आलीं, हे गूढ मॅक्स म्युलर-प्रभृतींसही उकलता यावयाचे नाहीं ! ' यत्र पंचत्वमापन्ना लेखकः सहसाक्षिभिः ' ( दस्तऐवजाचा लेखक व साक्षीदार हे जेव्हां हयात नसतील ) असे कात्यायनाचे वचन आहे. नारद, याज्ञवल्क्य व इतर स्मृतींत दस्तैवजाचा उल्लेख आला आहे. सूत्रकारास लेखनकला अवगत होती, असे खुद्द मॅक्स म्युलर यासही कबूल करावे लागले आहे. पण लेखनकला याहूनही प्राचीन आहे, असे दाखविता येते.

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ॥**

असें ऋग्वेदात ( मंडळ १० वें, सूक्त ७१।४ ) म्हटलेलें आहे. " वाणीला पहात असूनही ती एकाला दिसत नाहीं; व वाणीला ऐकत असून ती दुसऱ्यास ऐकूं येत नाहीं—" ( उदाहरणार्थ, निरक्षर माणसानें लेख पाहिला तरी तो न पाहिल्यासारखा होतो; तसेंच वेदवचन ऐकलें तरी तें न ऐकल्यासारखेंच असतें, कारण त्याचा त्यास अर्थ कळत नाहीं. ) असा या वचनाचा अर्थ आहे. ' वाणी पाहणें ' ही पदें सार्थ होण्यास ह्या सूक्तरचनाकाळीं लेखनकला व ग्रंथ अस्तित्वांत असणें जरूर आहे. लेखनकला ज्ञात होण्यापूर्वी ग्रीक लोकांत १० हजार आकड्यापर्यंतच संख्यावाचक पारिभाषिक शब्द होते, व रोमन लोकांत फक्त १००० पर्यंतच होते ! पण शुक्ल यजुर्वेदांत दशलक्षापर्यंत संख्येची प्रत्यक्ष मोजदादच असून दश लक्ष, दश कोटि किंबहुना दश सहस्र कोटिसंख्येपर्यंत पारिभाषिक नावेंही आलेलीं आहेत. संख्यांना अशीं नावें मिळणें व त्यांची मोजदाद होणें ही गोष्ट संख्यावाचक कांहीं दृश्य चिन्हें अस्तित्वांत आल्यावांचून शक्य नाहीं. वैदिक वाङ्मयांत ' कांड व पटल ' असे शब्द ' भाग, प्रकरण, अध्याय ' या अर्थी येतात; त्यावरूनही ह्या वाङ्मयास ग्रंथाचें रूप पूर्वीच प्राप्त झालें होतें असें दिसून येतें. पाणिनीचे काळीं अनेक हस्तलिखित ग्रंथ उपलब्ध असले पाहिजेत; कारण त्याखेरीज त्याम अष्टाध्यायीसारखें अद्वितीय व्याकरण रचतांच आलें नसतें. शिवाय यास खुद्द अष्टाध्यायींतही पुरावे आहेत. अष्टाध्यायींतील ' अधिकार ( प्रकरणाचे शिरोलेख ) स्वरित ' दाखविलेले आहेत. यावरून पाणिनीनें आपलें व्याकरण तोंडी न सांगतां लिहून काढलें होतें, असें सिद्ध होतें. शिवाय, तींत ' अष्टकर्णी, पंचकर्णी ' गाईंचा उल्लेख आला आहे, अर्थात लोक आपल्या गाईंच्या कानावर खुणेसाठीं आठ व पांच हे आकडे टांगीत, असें स्पष्ट दिसतें. ' निष्क व रूप्य ' या नाण्यांचा उल्लेख आणि ' लिपि व लिबि ' हे दोन शब्दही अष्टाध्यायींत आले आहेत; त्यावरून पाणिनिकाळापूर्वी पुष्कळ काळ लेखनकला प्रचारांत येऊन चुकली होती असेंच म्हणावें लागतें.

भारतीयांच्या लिपीचें सौंदर्य ग्रीक लोक नेहमीं वाखाणीत. ( Strabo Lib, XV. पृ. ४९३ ) मैलाच्या दगडावर अंतर व धर्मशाळा दर्शविण्यासाठीं भारतीय लोक अक्षरांचा उपयोग करतात, असें मॅगॅस्थिनीस म्हणतो. ' भारतीय लोक झाडाच्या मऊ सालीवर लिहितात ' असें कर्टियस लिहितो. ' कापूस चोपून घट्ट करून त्यावर भारतीय लोक लिहितात ' असें नीर्कस

म्हणतो. ' ख्रिस्ती शतकापूर्वीपासून आर्यावर्तांत कापसाच्या कागदाचा उपयोग करीत आहेत ' असें फादर पॉर्टिनो याने लिहिले आहे. ( Historical Researches, Vol. II. पृ. १०७ ).

संस्कृत भाषा व लिपी याचेप्रमाणेंच संस्कृत वाङ्मयासंबंधानेंही युरोपियन पंडितांनीं आश्चर्याचे, आदराचे व आनंदाचे उद्गार काढले आहेत ! मि. टेलर लिहितात कीं, " संस्कृत भाषेतील तत्त्वज्ञानाचा जुनेपणाचे दृष्टीनें विचार केला, तर त्याचे पुढे पायथागोरसचे तत्त्वज्ञान कालपरवाचेंच ठरेल; आणि कल्पनेच्या व बुद्धीच्या उच्च भराऱ्याचे दृष्टीने तुलना केली तर प्लेटोच्या उच्चतम कल्पनाही नीरस व सामान्य भासतील. आपणास पूर्वी माहीत असलेल्या सर्व काव्याहून संस्कृत काव्यात शुद्धबुद्धीचे विलास ज्यास्त दिसून येतात. त्या भाषेतील शास्त्रें तर इतकीं प्राचीन आहेत की, त्यांचा कालनिर्णय करताना ज्योतिषशास्त्रासही हात टेकावे लागतात ! अशा प्रकारच्या या प्रचंड वाङ्मयाचे खरें स्वरूप वर्णन केले तरीही तें अतिशयोक्तीचें व फाजील घमेंडीचें वाटण्याचा संभव आहे ! पण हें वाङ्मय आपल्या स्वतंत्र व श्रेष्ठ पदावर दुसऱ्या कोणच्याही आधारावाचून आरूढ होऊन आज तागायत तेथेंच उभें राहिलें आहे ! संस्कृत भाषा व वाङ्मय यात प्रावीण्य मिळविण्यास जवळ जवळ जन्मभर परिश्रम करावे लागतात. कारण त्याचें वाङ्मय अमर्याद असल्याचा भास होतो. मनुष्यानें आपली कल्पनाशक्ति कितीही ताणली, तरी त्यास संस्कृतातील पुराणकथाच्या अमर्याद विस्ताराची कल्पनाही करता येणार नाहीं. संस्कृत तत्त्वज्ञानात मानसशास्त्रातील प्रत्येक गूढ व बिकट प्रश्नाचा विचार केलेला आहे. संस्कृतातलें धर्मशास्त्रही, तें ज्याचेकरता रचिलें त्या ज्ञातीइतकेंच, विविधस्वरूपी आहे. "

( A philosophy, compared with which, in point of age, the lessons of Pythagoras are but of yesterday, and in point of daring speculation Plato's boldest efforts are tame and common-place. A poetry more purely Intellectual than any of those of which we had before any conception; and systems of science whose antiquity baffled all power of Astronomical calculation. This literature with all its colossal proportions, which can scarcely be described without the semblance of bombast and exaggeration, claimed of course a place for itself--it stood alone and it was able to stand alone. To acquire the mastery of this language is almost the labour of a

life, its literature seems exhaustless. The utmost stretch of imagination can scarcely comprehend its boundless mythology. Its philosophy has touched upon every metaphysical difficulty; its legislation is as varied as the caste for which it was designed रॉयल एशि. सोसा. चे जर्नल, Vol. II १८३४ ).

कौंट जॉन्स्र्जर्ना लिहितात ( Theogony of the Hindus, पृ० ८५ ):–" हिंदुस्थानचें वाङ्मय प्राचीन काळांतील एका थोर राष्ट्राचा आपणास परिचय करून देतें; आणि या राष्ट्रानें विद्येची प्रत्येक शाखा हस्तगत केली असून मानवी सुधारणेच्या इतिहासांत या राष्ट्रांत सदैव श्रेष्ठ पदच मिळेल अशीहि तें आपली खात्री पटवितें." मि. ब्रौन नामक लेखकानें तर असें लिहिलें आहे कीं, ( दि डेली ट्रिब्यून–सॉल्टलेक सिटी, ता०२०।२।१८८४ ) " जगांतील निरनिराळीं सर्व वाङ्मयें व धर्मकल्पना यांचा मूळ जनक भारतीय राष्ट्रच आहे!" प्रो. मॅक्स म्युलर लिहितात.—" विद्येची व ज्ञानाची कोणतीहि शाखा घ्या, हिंदुस्थानांतील प्राचीन वाङ्मयानें तीवर नवीन प्रकाश पाडला नाहीं किंवा तींत नवें चैतन्य उत्पन्न केलें नाहीं, असें घडलेंच नाहीं. पण त्यांतले त्यांत जगांतील निरनिराळे धर्म व पुराणकथा याजवर या वाङ्मयामुळें पडलेला प्रकाश तर फारच अपूर्व महत्त्वाचा व अत्यंत उज्ज्वल आहे यांत संशय नाहीं." ( India what can it teach us ? पृ. १४० ). जनरल कनिंग हॅम हे आपल्या शीखांचे इतिहासांत लिहितात कीं, " भारतीयांचें प्राचीन गणितशास्त्र इतकें पूर्णावस्थेस पोंचलें होतें व ज्योतिषविषयक गणित तर ते इतकें बिनचूक करीत कीं, सूर्यचंद्राचे गमनमार्ग व गति हीं त्यांना अचूक मापलीं होतीं. सामान्य जनसमूहाच्या धर्मकल्पना व थोड्या विद्वानांचें तत्त्वज्ञान यांची इतर देशांत बहुधा फारकत असते, पण भरतखंडांत विद्वानांचें तत्त्वज्ञान सामान्य जनसमूहाचे धर्मकल्पनांत पूर्णपणें मिसळून गेलें आहे. ईश्वराचें एक-मेवाद्वितीयत्व व सृष्टिकर्तृत्व, आत्म्याचें अमृतत्व व जीवाची कर्मबद्धता हीं भारतीय तत्त्वज्ञानांतील चार मूलतत्त्वें सामान्य लोकांच्या धर्मांचीही मूलतत्त्वें बनलीं आहेत. ज्या पुनर्जन्मतत्त्वाचा मोझेसनें मुळींच उल्लेख केलेला नाहीं किंवा केला असेल तर फारच संदिग्ध व अस्पष्ट केला आहे; तसेंच ईश्वराचें जें एकत्व व सर्व शक्तिमत्त्व अनेक देवतावादी ग्रीक व रोमन सामान्य जनसमूहास किंवा द्वैती मिश्रेइक धर्मशास्त्रकारासही अज्ञात होतें तें तत्त्व गंगानदीतीरावरील ऋषींनीं भरतखंडांतील सगळ्या जनतेस पूर्वींच पटविलें होतें. शिवाय पापाचरणाबद्दल फार भयंकर

शासन होते हा सिद्धांत सामान्य जनसमूहाचे मनात ठसवून त्यांची पापभीरुता जाज्वल्य राखण्याचे कामी त्यासारखी प्लेटोवरही ताण केली आहे.' **प्रो. हीरन** यांनी असा अभिप्राय दिला आहे की, "**संस्कृत** वाङ्मय—शास्त्रीय विषय, गद्य आणि पद्य—या सर्व शाखांतही सुसंपन्न आहे.' "भारतीय वाङ्मयाच्या एक दोन शाखांचे संपूर्ण अध्ययन करूं म्हटले तरी त्यास एक जन्माचे संबंध आयुष्य पुरे होणार नाही' असे **सर विल्यम जोन्स** यांनी मत दिले आहे. 'ज्यांचीं हस्तलिखितें सांप्रत उपलब्ध आहेत, असे **संस्कृत** भाषेत दहा हजार निरनिराळे ग्रंथ आहेत' असा, **मॅक्स म्युलर** यांनी हिशेब केला आहे! '**ग्रीस** व **रोम** या दोनही देशांचे सर्व प्राचीन वाङ्मय एकत्र केले तरीही येवढी ग्रंथसंख्या भरणार नाही" असे **मॅक्स म्युलर** ( India what can it teach us? पृ. ८४ ) म्हणतात. **र. वाड** लिहितात ( Antiquity of Hinduism Vol. IV. Conclusion ) की "**भारतीयांत** बहुतेक प्रत्येक शास्त्राचें अध्ययन चालू होतें, असें त्यांच्या वाङ्मयावरूनच **दिसून** येतें. शिवाय त्यांची त्या त्या विषयांची प्रतिपादनशैली पाहिली तर विद्वत्तेंत ते कोणत्याही लोकांस हार जाणार नाहीत, ह्याचाही प्रत्यय येतो. त्यांचें तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय व धर्मशास्त्र यांचे जसजसें परिशीलन करावें, तसतशी त्यांच्या विद्वत्तेची व शहाणपणाची खात्री पटत जाते.' **मिसेस मानिंग्ज** ( Ancient and medieval India Vol. II पृ. १४२ ) लिहितात की 'मानवी मन व बुद्धि यांची मजल जेथपर्यंत पोचणे शक्य आहे, तेथपर्यंतचा पल्ला **भारतीयांच्या मनो**-बुद्धीने खास गाठला आहे.' "

सारांश, **भारतीयांच्या** बुद्धीचें व मनोगुणाचें प्रभुत्व इतकें होतें की, त्यांचे हातून फार मार्मिक व उदात्त असेंच वाङ्मय काही झालें तरी निर्माण झालें असतें. पण त्यांच्या या मनोबुद्धिगुणास आपला प्रभाव दाखविण्यास **संस्कृतसारखी** सर्वांगपरिपूर्ण, कर्णमनोहर व शब्दसंपन्न भाषा मिळाल्यामुळें तर त्यांचें **संस्कृत** वाङ्मय सर्वांत **सुसंपन्न** व सुंदर निर्माण झालें. येवढेंच **नव्हे** तर त्यांची व्यापकता व **सूक्ष्मता** ही पाहून सगळ्या जगानें आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें, तर त्यांत नवल तें काय?

---

# भाग २ रा.

## प्रकरण १ लें.



### भारतीयांचें वाङ्मय.

एकाद्या राष्ट्राच्या इतिहासाचा योग्य बोध होण्यास ज्याप्रमाणें त्या राष्ट्राची संस्कृति, त्याचें ध्येय, त्याची विचारपरंपरा, त्याचें सृष्टिनिर्मित कर्तव्यक्षेत्र आणि शील याचें ज्ञान असणें जरूर आहे. त्याचप्रमाणें वाङ्मयाचीही स्थिति आहे. वाङ्मय हें राष्ट्राच्या विचारांचें प्रतिबिंब असतें. वाङ्मयाचें ज्ञान सुबोध होण्यास इतिहासाचा फारच उपयोग आहे.

इतिहासाचे कालमानानें व विषयमानानें भाग पाडले म्हणजे तें आकलन करण्यास जसा सोपा होतो, त्याचप्रमाणें वाङ्मयाचेंही वर्गीकरण विषय समजण्यास फार सोईचें असतें.

संस्कृत वाङ्मयाचा परिच्छेद तीन प्रकारें करतात (१) वैदिक वाङ्मय, (२) पौराणिक वाङ्मय व (३) ललित वाङ्मय. आतां ह्या अंगाचा निरनिराळीं उपांगें आहेत त्यांचा क्रमशः विचार करूं.

### वैदिक वाङ्मय.

वैदिक वाङ्मयाचे वेद, ब्राह्मणें व सूत्रें असे तीन प्रकार आहेत.

ऋक्, यजुस् , साम आणि अथर्व असे वेदांचे चार भाग आहेत. परंतु त्यापैकीं ऋग्वेद आणि यजुर्वेद हे फार महत्त्वाचे आहेत. जडसृष्टि, मन व आत्मा यांचें सत्यरूप ज्ञान संपादन करून त्याचा उपयोग कसा व कोठें करावा हाच या दोन वेदांचा प्रतिपाद्य विषय आहे. संस्कृत वाङ्मयांतच नव्हे तर जगांतील सर्व वाङ्मयांत वेदग्रंथांचा अत्यंत श्रेष्ठ दर्जा आहे. मॅक्सम्युलर साहेब म्हणतात कीं, "मानव वंशाच्या शिक्षणरूप ग्रंथांत वैदिक वाङ्मयाचा एक स्वतंत्र भाग असून त्याला कोठेंच तोड नाहीं."

प्राचीन भारतवर्षांत ज्ञानाच्या सर्व शाखांचा पूर्ण विकास झाला होता व त्यावर ग्रंथरचनाही भरपूर झाली होती, परंतु महत्त्वाचे असे सर्व शास्त्रांवरील

ग्रंथ सर्वभक्षक काळाच्या उदरात लुप्त होऊन गेले आहेत, व त्याचा मागमूसही लागण्याची आशा नाही. असे असता त्या सर्व श्रेष्ठ ग्रंथांतील रत्नें असे जे वेद, ते पूर्ण सुरक्षित व शाबूद रहावे हा एक दैवी चमत्काराचाच प्रकार आहे असें म्हणावें लागतें. धर्मग्रंथांतील फार जुना असा मनुस्मृति ग्रंथ, व त्या काळांतील इतर ग्रंथ, रामायण, महाभारत वगैरे सर्वमान्य व श्रेष्ठ ग्रंथ ह्यामध्ये कित्येक ठिकाणी पाठभेद, पाठलोप व नवीन भर असे प्रकार घडून आले आहेत, परंतु वेदांच्या अतुल भाषासौंदर्याने आणि अप्रतिम विषयगांभीर्याने त्यामध्ये असा प्रकार घडून येणेंच अशक्य झाले.

वेदाचा उगम केव्हा झाला हें अद्यापही एक मोठें कोडें आहे आणि याच कारणामुळें त्यास कालमर्यादा नाही व ते अपौरुषेय आहेत असें हिंदु लोक मानतात. ज्ञानगंगेचा उगम वेदांत असून, जगांतील सर्व वाङ्मयाचें जनकत्वही याकडेच आहे, वेदांतील तत्त्वें आधुनिक सूक्ष्मशास्त्राच्या ( True science ) प्रमेयांशीं पूर्णपणें जुळतात याचा एक मजेदार मासला खालीं दिला आहे.

स्वामी दयानंद सरस्वतींच्या टीकाधारें लाहोरचे पंडित गुरुदत्त यांना वेदांतील कांही थोड्या मंत्रांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला होता. ऋग्वेदाच्या दुसऱ्या सूक्तांतील सातव्या मंत्राचा अर्थ लावतांना त्यास खालील चमत्कारिक शोध लागला व याबद्दल त्यास पराकाष्ठेचें आश्चर्यही वाटलें. तो मंत्र असा आहे:—

**मित्रं हुवे पूतं दक्षं वरुणं च रिशादहम् । धियं घृताचीं साधन्ता**

ऋ. अ १ । सू २ । मंत्र ७

पंडित गुरुदत्त म्हणतात की, "धनाचा व साधन्ता या दोन द्रव्यांच्या मिश्रणापासून पाणी कसें तयार होतें याची पद्धति त्यांत दिली आहे. साधन्ता शब्दाच्या द्विवचनावरून असें दिसतें की पाणी दोन भिन्न मूलद्रव्यांच्या संयोगापासून तयार होतें. ही दोन मूलद्रव्यें कोणतीं, हें ठरावणें हेंच फार महत्त्वाचें आहे. या दोन मूलद्रव्यांचीं मित्र व वरुण अशीं नांवें या मंत्रांत दिली आहेत.

मित्र या शब्दाचा मूळ अर्थ मोजणारा असा आहे व पुढें ज्या पदार्थांस हें मोजण्याचें कार्य करावें लागे त्यास 'मित्र' हें नांव देण्यांत येऊं लागलें व तेंच पुढें परिमाण बनलें.

मित्र हें किंमत अथवा धनता याचें परिमाण आहे.

मित्र याचा दुसरा अर्थ जोडीदार असा आहे, व तोच या मंत्रांत अभिप्रेत आहे. मित्र हा वरुणाचा जोडीदार आहे असें या मंत्रांत म्हटलें आहे. आतां

वरुण म्हणजे " आक्सीजन " वायु हा अर्थ कसा ते पाहूं. हायड्रोजन हा सर्वांत हलका वायु असून इतर वायूंची घनता मोजण्याचे तो परिमाण आहे. आक्सीजनपाशीं याचा फार शीघ्र संयोग होतो, म्हणून मित्र यास वरुणाचा–म्हणजे आक्सीजनचा–जोडीदार असें म्हटलें आहे. वेदांतील मित्र व वरुण हेच आधुनिक शास्त्रांतील हायड्रोजन व आक्सिजन असावेत, असें त्याच्या गुणधर्माच्या अनुमानावरून व तुलनेवरून दिसून येते. वेदांत कित्येक ठिकाणीं मित्र हा शब्द उदानवायूच्या समानार्थी योजलेला दिसतो, आणि हलकेपणा व उड्डाणक्षमत्व ह्या दोन अर्थांनी तो सर्वश्रुत आहे.

" त्यानंतर आपणास वरुण या तत्त्वाचा विचार करणें प्राप्त आहे. वरुणाची सर्व सजीव प्राण्यास फार जरूरी आहे. कारण त्याशिवाय प्राणधारणाचें कार्य होणार नाही. अशोधित धातूवर गंज चढणें, दहनक्रिया होणें, शरीरशास्त्रदृष्ट्या रक्ताशीं संयोग होऊन तें शुद्ध रहाणें व शरीरांत जीवनकला चालू रहाणें इत्यादि विज्ञानदृष्ट्या ( Science ) याचे धर्म आहेत. परंतु रिशादस याच अर्थाकडे येथे विशेष कटाक्ष आहे. मुख्यत्वेंकरून हा अर्थ व वर दिलेले इतर अर्थ या सर्वांचा विचार केला असतां वरुण म्हणजे आक्सीजन असला पाहिजे असा त्यांना पटतें.

याच मंत्रांत आणखी ' पूत–दक्ष ' असा एक शब्द योजलेला आहे. त्यापैकी पूत—म्हणजे शुद्ध, सत्स्वभाव व दक्ष म्हणजे सामर्थ्य, शक्ति.

या मंत्राचा संपूर्ण अर्थ असा आहे — ज्या कोणाचा दोन मूलपदार्थांच्या संयोगापासून पाणी तयार करण्याची इच्छा असेल त्यानें अत्यंत तप असा शुद्ध मित्र वायु ( Hydrogen ) व रिशादसधर्मी वरुणवायु ( Oxygen ) घेऊन त्यांचा संयोग करावा म्हणजे पाणी तयार होतें.

वेदांचे प्राचीनत्व सर्वमान्य आहेच, परंतु सर्व ज्ञानजनकत्व, त्रिकालसत्यसिद्धान्त–धारणसामर्थ्य, भाषासौष्ठव, परमात्मज्ञानसंग्रह, पटुता व प्रसन्नपणा मानववंशाचा प्राचीन इतिहास इत्यादि गुणांच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व अत्यंत थोर आहे. परंतु दुर्दैवानें भरतभूमींत त्याचा अभ्यास बंद पडला आहे, सूत्र व वेदांगें हीं वेदार्थाची मुख्य साधनें असून त्यांचें ज्ञानही फार थोडयास आहे. अशी स्थिति असल्यामुळें हिंदुलोकांतील अत्यंत विद्वान म्हणून वाखाणलेल्या फारच थोड्या लोकांस ते समजतात अशी शोचनीय स्थिति आम्हांस कोणीं आणून घातली आहे; त्यांतून पार पडावें. अशी परमेश्वरी इच्छा दिसते, आणि

आमच्या हलगर्जीपणाबद्दल योग्य शासन मिळावें, म्हणून आमच्या पूज्य ग्रंथाबद्दल आम्हास इशारारूप सूचना पाश्चात्य पंडितांनीं आपआपल्या ग्रंथांत दिल्या आहेत एवढ्यानें तरी आमचे डोळे उघडून आपल्या खऱ्याखुऱ्या स्थितीचा बोध व्हावा व खऱ्या कार्यास लागावें अशीही ईश्वरी-इच्छा असेल, ज्यांच्या चालीरीति भिन्न, विचारपरंपरा निराळी, संस्कार अत्यंत विसदृश आणि नैसर्गिक गोष्टी व परिस्थिति यांच्यामध्येंही एकरूपता मुळींच नाहीं, अशा पाश्चात्य पंडितांनीं आजन्म परिश्रम करून वेदार्थ समजून घ्यावा, त्यांतील अत्यंत थोर विचारांनीं मोहून जावें, गंभीर तत्त्वज्ञानानें त्यांचे डोळे दिपून जावे, मोहक, शुद्ध व गोड भाषासरणीनें व सरस-काव्यमाधुर्यानें ज्यांना आपल्या आयुष्यांतील सर्व दुःखे विसरून जातात त्याकडून वेदांबद्दल अत्यंत प्रशंसापर उद्गार निघाल्यास आश्चर्य नाहीं. मात्र आम्हास आमच्या हलगर्जीपणाबद्दल अत्यंत लज्जा वाटावी हेंच युक्त. झाल्या गोष्टीस इलाज नाहीं. आतां तरी यापुढें आमचे ग्रंथ आम्हीं अभ्यासिल्यास फार मदत होईल व त्यांचा अर्थ समजण्यास पाश्चात्य विद्वानांचे श्रमही सहाय्यभूत होतील आम्हीं पाश्चात्य ग्रंथांची मदत घेतलीच पाहिजे. अशीही दैवी इच्छा असेल व तदनुरूप वागण्याशिवाय आम्हास इलाजच नाहीं. आम्हीं स्वतः त्यांचे अध्ययन करण्यास सुरवात केली कीं, त्यांतील तत्त्वावबोध व आनंद हीं आपोआपच आम्हास प्राप्त होतील. सध्या पाश्चात्य पंडितांचे निवडक प्रशंसापर अभिप्राय उद्धृत करितों.

सर हंटरसाहेब म्हणतात कीं, "ह्या पूज्य ऋग्वेदाचा काळ अगम्य आहे," मानवजातीच्या पुस्तकसंग्रहांतील वेद हे अत्यंत जुने ग्रंथ आहेत असा मॅक्स म्युलर साहेबांचा अभिप्राय आहे. हीरन नामक प्रोफेसरास हा अभिप्राय मान्य आहे.

यजुर्वेदाची एक प्रत जेव्हां व्हॉल्टेअर यास अर्पण करण्यांत आली तेव्हां तो म्हणाला कीं, ही देणगी खरोखर अमूल्य असून त्याबद्दल पौरस्त्य राष्ट्रांचे पाश्चात्य राष्ट्रांना अखंड ऋणींच राहिलें पाहिजे. वेदांच्या गांभीर्यानें व श्रेष्ठत्वानें लेऑन डलबॉस साहेबांचा उत्साह व आनंद अमर्याद होऊन ते म्हणतात कीं, "ग्रीस व रोममधील प्रत्येक स्मारकाची योग्यता ऋग्वेदाच्या खालींच लागेल." शेवटीं मॅक्स म्युलर साहेबांचा सर्वांस असा कळकळीचा उपदेश आहे कीं, "इतर कोणत्याही भाषेंतील ग्रंथानें जें काम झालें नसतें तें वेदांनीं जगाच्या इतिहासांत केलें आहे; सबब ज्याला ज्याला म्हणून स्वतःचा, पूर्वजांचा व आपल्या इति-

हासाचा अभिमान आहे व जो आपल्या बौद्धिक विकासाची इच्छा करतो, त्या प्रत्येकाने वेदाचा अभ्यास करणे जरूर आहे." वेद हे ईश्वर-प्रकाशरूप ( revelation ) असल्यामुळे त्याचे ज्ञान प्रत्येकास असणे फार अगत्याचे आहे असे हिंदु लोक मानतात.

भारतवर्ष व संस्कृत भाषा ह्या दोघांखेरीज तिसऱ्यास अशा प्राचीन व मूल्यवान् ठेव्याची बढाई मारता येणार नाही. ज्याच्या सौंदर्ययुक्त भव्यपणाची सर इतरास येणार नाही, आणि ज्याची ओजस्विताही इतरास दुष्प्राप्य आहे अशा त्या पवित्र वेदरूपी जिनगीवर जगातील हिंदु-राष्ट्राखेरीज इतरास हक्कही सांगता येणार नाही. आपल्या अतुल तेजाने सर्व मानव्याच्या प्रगतीस दिव्य प्रकाश देत हे वेद एकटेच असे चिरंतन रहाणार यात बिलकुल संशय नाही.

वेदाच्या खालोखाल ब्राह्मणास महत्त्व आहे. ब्राह्मण हे ग्रंथ वेदांचेच भाग आहेत असे कित्येक मानतात, परंतु ही त्यांची चूक आहे हे ग्रंथ टीका अथवा भाष्य या स्वरूपाचे आहेत. यज्ञयागाचे वेळी कोणते मंत्र केव्हा म्हणावे, अगर यज्ञक्रियेला आरंभ कोणत्या देवतेच्या आवाहनाने करावा, यज्ञाची अधिष्ठात्री देवता कोणती असावी, ती तशी का मानावी यासंबंधी दृष्टांतपूर्वक माहिती या ग्रंथात दिलेली आहे एवंच कर्मकांडाचे आचरण कसे करावे, याचे ज्ञान होण्यास हे फार उपयोगी पडतात आणि वैदिक वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्यास याचे ज्ञान असणे अवश्य आहे. प्रत्येक वेदाचे असे टीकारूप ब्राह्मणग्रंथ आहेत. उदाहरणार्थ: ऐतरेय अथवा आश्वलायन आणि कौषितकी अथवा सांख्यायन हे ऋग्वेदाचे, शतपथ हा यजुर्वेदाचा इत्यादि. ब्राह्मणग्रंथांची रचना ज्या काळी झाली त्यासंबंधी प्रो. वेबर म्हणतो, " ज्या काळी मानवी मनाला अत्यंत कठिण अशा वाटणाऱ्या विषयांचे विवेचन व उद्घाटन करण्यात ब्राह्मण मोठ्या उत्साहाने व आनंदाने मग्न असत. आणि वेदांतासारख्या पवित्र विषयातील सिद्धान्त स्त्रियापुढे मांडण्यात येऊन त्या आपल्या उत्साहयुक्त कळकळीने व ज्ञानजिज्ञासेने त्या सिद्धान्ताच्या गूढ प्रदेशात शिरून व मर्म हुडकून काढून पुरुषासही विचाराच्या गांभीर्याने, खोलपणाने व वजनाने आश्चर्यचकित करून सोडीत त्या काळाची प्रतिमा या ग्रंथात उठलेली आपणास दिसते."

सूत्र हा वैदिक वाङ्मयातील तिसरा व शेवटचा भाग आहे. त्याचे सहा भाग खाली दिल्याप्रमाणे आहेत.

१ शिक्षा ( स्वर-विधि संहिता. ) २ छंदस् ३ व्याकरण. ४ निरुक्त ( वेदशब्द—प्रकाश. ) ५ ज्योतिष. ६ कल्प. ( वैदिककर्मांची विधिसंहिता. )

सूत्रे हा वेदाचे एक अंग असून त्याचाही वेदार्थबोध होण्यास फार उपयोग होतो. त्याचे सहा विभाग पाडले आहेत व ते वर अनुक्रमाने दिले आहेत. त्यापैकी आपण व्याकरण हा भाग घेऊं, व त्याचा वैदिक काळी किती ऊहापोह झाला होता तें पाहूं. त्या एका भागाची वैदिक काळात आलेली चर्चा पाहिली म्हणजे प्राचीन आर्यांच्या ज्ञानाभिरुचीचें किती कौतुक करावे असे होते, व त्याची ज्ञानलालसा व शास्त्राभ्यास केवढा जबर होता आणि त्या मानानेच त्या काळाची संस्कृति किती थोर होती याची कल्पना सहज करता येईल. याचे अध्ययन त्या काळी चार पांच प्रकारे झाले होते. व्याकरण हे स्वतंत्र शास्त्र मानण्यात येत असे व त्याकरिता अभ्यासशील ऋषींनी आजन्म खटपट केली होती व व्यासंग ठेवला होता असे दिसून येते व्याकरणाचे ( १ ) स्वरशास्त्र, ( २ ) स्वर व व्यंजने याचे योग्य वर्गीकरण, ( ३ ) व्याकरणाची यथायोग्य व सुबोध परिभाषा, ( ४ ) शब्दव्युत्पत्तिशास्त्र,( ५ ) शब्दजातिभेद इत्यादि प्रकारे त्याचे फार खोल व सूक्ष्म विवेचन झाले होते असे दिसते. शिक्षेचा प्रातिशाख्य म्हणून एक पोटविभाग आहे, त्यामध्ये वेदांतील स्वरांच्या संबंधी फार बारकाईनें विचार केला असून, त्यांच्या स्थानासंबंधी अर्थाच्या दृष्टीने किती काळजी घेतली पाहिजे हें दाखविले आहे. स्वराचे स्थान चुकल्यास किती अर्थहानि होते हेही त्यात फार विस्तृतपणे सांगितले आहे. प्रत्येक वेदावर असे एकेक स्वरावबोधक प्रातिशाख्य आहे. प्रो. विल्सनसाहेब प्रातिशाख्यासंबधाने म्हणतो, " इतर कोणत्याही राष्ट्राच्या वाङ्मयात मानवी भाषाशास्त्राच्या स्वरूप–लक्षणाचे इतके सूक्ष्म, व्यापक, खोल आणि विस्तृत विवेचन झालेले नाही."

" प्रातिशाख्यात नाम, क्रियापद, सर्वनाम, विशेषण, अव्यय इत्यादि व्याकरणाच्या सर्व अंगाचा विचार अत्यंत विस्तृतपणे व सावधानतेनें झालेला आहे. परंतु प्रातिशाख्यानंतर किती तरी काळाने ग्रीक लोकास अशा वर्गीकरणाची आवश्यकता भासली! प्लेटोचे सर्व काम नाम व क्रियापद याजवरच भागलें. त्याचा शिष्य ॲरिस्टॉटल यालाही बराच वेळपर्यंत यापलीकडे जाण्याची आवश्यकता भासली नाही. परंतु भाषाशास्त्राचे विवेचन व नियमसंघटना करताना, त्यास उपपदे व उभयान्वयी अव्यये यांची भर घालावी लागली. झेनोडोटस याने सर्वनाम व ॲरिस्टार्कास् याने शब्दयोगी अव्ययांची भर घातली."

आग्रा कॉलेजचे मुख्याध्यापक व प्रसिद्ध शब्दव्युत्पत्तिशास्त्रज्ञ थॉमसन याच्यामते संस्कृतातील व्यंजनव्यवस्था अपूर्व असून मानवी बुद्धिमत्तेच्या विलासाचा तो एक उत्कृष्ट मासला आहे. युरोप या बाबतीत अशा विज्ञानशास्त्रप्रकर्षाच्या ( Scientific age ) काळी २५०० वर्षे मागे आहे व सर्व ध्वनींचा वाचक अशी अक्षरें इंग्लिश भाषेत नाहीत. याबद्दल त्यानी खेद व्यक्त केला आहे. रे. वॉर्ड म्हणतो की, आर्यांच्या शब्दव्युत्पत्तिशास्त्राने तर इतर प्राचीन व अर्वाचीन राष्ट्रावरही मात केली आहे.

प्राचीन भारतामध्ये भाषाशास्त्राच्या व्याकरण या अंगाची इतकी वाढ झाली होती की त्याची तुलना करणेच अशक्य आहे. अथवा साहित्यशास्त्राच्या इतिहासातील तो एक चमत्कारच आहे असे म्हटल्यास काही अतिशयोक्ति होईल असे वाटत नाही पाणिनि हा व्याकरणशास्त्राचा प्रवर्तक आहे व त्याचा ग्रंथ म्हणजे मानवी मनाच्या अत्यंत प्रगल्भतेची कसोटीच आहे. साहित्यप्रासादातील अत्यंत मान्य व पूज्य सिंहासनावर जगातील सर्व पंडितानी मोठ्या कृतज्ञतेने, थोर प्रशंसेने आणि उदार बुद्धीने त्यास आरूढ केले असून त्यास तेथून पदभ्रष्ट होण्याची भीति आहे असे कोणाही विद्वानास वाटत नाही. पाणिनीची अलौकिक व असामान्य बुद्धिमत्ता पाहून पाश्चात्य पंडित किती भारून गेले आहेत. त्यांचे मन आदर व आश्चर्य यानी कसे भरून गेले आहे. त्याच्या प्रखर बुद्धितेजाने ते कसे दिपून गेले आहेत व त्याचे गुणवर्णन करून अल्पांशाने तरी ऋणमुक्त व्हावे म्हणून कसे उत्सुक झाले आहेत, हे खालील एक दोन उताऱ्यावरून व्यक्त होईल. प्रो. वेबर म्हणतो. "पाणिनीचे ग्रंथ उघडताच असे वाटते की, आपण एका अत्यंत भव्य प्रासादात शिरलो आहो. त्या भव्य मंदिराच्या द्वारतोरणावरील कर्त्याचे नामलेख पाहिला म्हणजे मन क्षणभर आश्चर्याने व कौतुकाने भरून येते. भाषा-सृष्टीतील सर्व प्रसंगाचे यथायोग्य व समर्पक स्पष्टीकरण केलेले पाहून त्या पुरुषाची आश्चर्यकारक कल्पकवृत्ति व आपनमानुभूतीने सखोल व परिपूर्ण आकलन यांविषयी पूर्ण खात्री पटते व मनावर त्याच्या बुद्धिप्रकर्षाबद्दल सकौतुक आदराचे फार वजनदार दडपण पडते."

सर हंटर म्हणतो. "विधानाचा बिनचुकपणा, धातुपृथक्करणाची परिपूर्णता, आणि शब्दघटनातत्त्वाची शुद्धता या तीन बाबतीत जगातील सर्व व्याकरणग्रंथात पाणिनीचा ग्रंथ अत्यंत श्रेष्ठ आहे. कित्येक ठिकाणी थोडी दुर्बोधता आली आहे, तेवढी सोडून दिली तर बीजगणितासारखी परिभाषा निर्माण करून त्याने

आपल्या ग्रंथात जो खोचदार संक्षिप्तपणा आणला आहे तो तर केवळ निरुपमच आहे. मानवी प्रयत्नाने व कल्पकतेने केवढी उज्ज्वल कामगिरी करता येते याचे त्याने संस्कृत भाषेतील सर्व गोष्टीचा तार्किक पद्धतीने जो मेळ घालून दिला आहे त्यावरून प्रत्यंतर येते. संस्कृत भाषामंदिरातील शब्दनिर्मितीचे असंख्य नियम व स्वरभेद, अनेकावयवी साधित शब्द, दहा गण, बहुविध भूतकाळ व काळाची एक लांबच लांब रांग इत्यादि बहुविध गोष्टींचा पसारा पाहिला म्हणजे कधी काळी ही व्यवहाराची भाषा होती किंवा नाही, अशाबद्दल जबरदस्त शंका येऊ लागते."

भाषेची प्राणभावना व उपासना ज्या व्याकरणाच्या थोर व उदात्त तत्त्वांनी होते त्याचा अजून यूरोपास मागमूसही नाही. अशा स्थितीत पाणिनीची अर्वाचीन पाश्चात्य व्याकरणकाराशी तुलना करणे म्हणजे शुद्ध अन्यायाचे आहे.

मॅनिंगबाई म्हणतात. "यूरोपातील व्याकरणकारांचे समाधान ज्या प्रकारच्या व्याकरणग्रंथाने होते त्यापेक्षा संस्कृतातील व्याकरणग्रंथ निःसंशय कितीतरी पटीने श्रेष्ठ आहेत."

हंटर व प्रोफेसर मॅक्स म्युलर यांच्या मते "व्याकरणातील पृथक्करण" व "मानवी भाषाशास्त्रातील तत्त्वांची मांडणी" या दोन बाबतीत प्राचीन आर्यांचा हात धरण्याचे साहस व योग्यता कोणाही अर्वाचीनाच्या अंगी नाही.

पाणिनीसारखा अद्वितीय व्याकरणकर्ता निर्माण होण्यापूर्वी व्याकरणाच्या भूमीची मशागत 'आपिशली', 'काश्यप', 'गार्ग्य', 'गालव', 'शुक्रवर्मन', 'भारद्वाज', 'शाकटायन', 'शाकल्य' 'स्फोटायन' इत्यादि व्याकरणकारांना करून ठेविली होती. व त्यात पाणिनीसारखे सुरूप कलम तयार होऊन त्यापासून पुढे भव्य व जगड्व्याळ वृक्ष तयार झाल्यास त्यात काही विशेष आश्चर्य नाही.

पाणिनीच्या व्याकरणावर वृत्तिकाकार कात्यायन याने भाष्य लिहिले व व्याकरण महाभाष्यकार पतंजली याने साधकबाधक टीका लिहिली. पाणिनि, पतंजली व कात्यायन या त्रिमूर्ति व्याकरणशास्त्रात अधिकारसंपन्न व जगमान्य आहेत. या त्रिकुटाने व्याकरणशास्त्रास असामान्य ऊर्जितावस्थेस आणून, त्याची शास्त्रीयदृष्ट्या जी थोरवी वाढविली आहे, त्याबद्दल त्यांच्या वंशजांनी व अखिल जगाने त्यांचे ऋणी आले पाहिजे हेच सरळ व न्याय्य आहे

व्याकरणाप्रमाणेंच कोशग्रंथाचीही प्राचीन कालीं वाढ झाली होती. संस्कृतामध्यें लहान मोठे असे ५२ कोश आहेत असें म्हणतात; परंतु त्यापैकीं फारच थोडे प्रचारात आहेत. निघंटु, मेदिनी, हेमचंद्र, वाचस्पत्य, अमरकोश इत्यादि प्रमुख असून व्यवहारात याचाच उपयोग नेहमी करतात. कोशवाङ्मयासंबंधीं रेव्हरंड वार्ड म्हणतो, "प्राचीनकाली संस्कृत भाषा किती परिणतावस्थेस आली होती हें कोश ग्रंथावरून स्पष्ट दिसून येते आणि याबद्दल हिंदु विद्वान लोक अत्यंत थोर आदरास पात्र आहेत."

---

# प्रकरण २ रें.

येथवर वैदिक वाङ्मयाचा विचार झाला. आता भारतीयांच्या काव्यसंपत्तीकडे वळूं. ही काव्यसंपत्ति एवढी अफाट आहे की, परकीय लोकास त्याबद्दल राहून राहून अत्यंत आश्चर्य वाटतें. प्रो० मॅक्स मुंकर म्हणतो की, संस्कृतामधील काव्य-भांडाराचा मुळीं ठावच लागत नाही. परंतु भारतीयांची नैसर्गिक प्रवृत्ति काव्यमय असल्यानें त्यांच्या हातून इतके असंख्य काव्यग्रंथ निर्माण झाले यांत काय आश्चर्य ? सध्या उपलब्ध असलेल्या ग्रंथसंख्येनें जर आपण इतके मोहित झालों, तर पुच्छ विषाणहीन नरपशूंच्या धार्मिक अत्याचारास बळी पडून ज्यांची राख-रांगोळी झाली, त्या ग्रंथांची नक्की संख्या आम्हास माहीत झाली तर आमच्या आश्चर्यास सीमाच उरणार नाही. नैसर्गिक काव्यप्रवृत्ति हीच या अफाट ग्रंथसंपत्तीचें कारण होय. कायदेशास्त्र काव्यमय, ज्योतिषशास्त्राची उभारणी काव्याच्या पायावर, इतर विज्ञानशास्त्रांची भाषा काव्य-युक्त धर्मशास्त्र काव्यवाणीनें बोल-लेले, सारांश कोणत्याही लेखनाचें कामी काव्याचा सहज लीलेनें उपयोग कर-ण्याचें त्यास मुळींच जड जात नसे. जे ऋषी त्रिकाल सर्ववेद आपल्या अत्यंत रसाळ, सरळ, मोहक आणि काव्यरसानें थबथबलेल्या वाणीनें बोलले त्यांच्या वंशजास कवित्वशक्ति परंपरेनें प्राप्त झाली असल्यास त्यात नवल तें कोणतें ! काऊंट जानस्टर्ना म्हणतो,—" भरतभूमीत काव्याचेंच साम्राज्य आहे; अमूर्त भावनामय शास्त्रांचीच नव्हे तर धर्मग्रंथांची सुद्धा भाषा काव्यछटेनें रंगलेली असून शिवाय त्यात काव्याचा मोहकपणा आणि आकारसादृश्य हे दोन गुणही कांहीं कमी नाहींत. "

प्रो० हीरनच्या मते हिंदुलोक हे निसर्गतःच काव्यप्रवृत्त आहेत; यास्तव अशा लोकांच्या हातून काव्याची विलक्षण वाढ आणि विकास झाला व निरनिराळ्या शाखांचे संवर्धन, होऊन ती विलक्षण पूर्णत्वास पोचली, तर त्यात काय आश्चर्य ? वृत्तान्तपर, नाट्यविषयक, भावपूर्ण, बोधपर, आख्यायिकात्मक इत्यादि शाखांची संस्कृतकाव्यात पूर्ण वाढ झालेली आपणास दिसते, आणि त्या त्या शाखामध्ये अत्यंत श्रेष्ठ प्रतीची ग्रंथफलेही भरपूर निर्माण झालेली होती.

एल्फिन्स्टन साहेब म्हणतो—ज्यानी ज्यानी संस्कृतामधील वीररसप्रधान काव्ये वाचली आहेत, त्यांना त्यांनी हर्षभरित चित्ताने व मोठ्या प्रेमाने त्यांचे गुणवर्णन करून फारच वाहवा केली आहे. स्वतः त्याच प्रकारचे काव्ये रचण्याची ज्यास शक्ति आहे अशा तज्ञ व रसिकवर्यांचा त्या काव्यांचा रसाळपणा व सौंदर्याविषयीचा अभिप्राय फारच स्पष्ट व हृदयस्पर्शी आहे. केवळ पौर्वात्यभाषांचा चिकित्सक दृष्टीने अभ्यास करणाऱ्या विद्वानानाच संस्कृत वाङ्मयाने मोहून टाकले आहे असे नाही; तर इतर पाश्चात्य पंडितही प्रत्यक्ष संस्कृत ग्रंथ न वाचता, केवळ भाषान्तरादि इतर रीतीने मिळालेल्या ज्ञानाने लुब्ध होऊन गेले आहेत. विल्सन जोन्स या संस्कृत पंडिताइतकेच मिल्मन आणि श्लेजेल हेही संस्कृत वाङ्मयाची तारीफ करण्यात रंगून जातात. कोणापासून सरळ भाषासरणी, ऋजुता व स्वतंत्र विचारशक्ति, तर कोणापासून गांभीर्य, सौंदर्य व हृदयभेदी कारुण्यभाव हे आम्हास शिकता येतील. संस्कृत नाटकातील पात्रांचे नैसर्गिक धीरोदात्त वर्तन, आचारातील धार्मिक पवित्रपणा व ग्रंथकाराचे गाढ कल्पनाचातुर्य इत्यादि गुण इतर अनेक पाश्चात्य पंडितांना निदिष्ट केले आहेत.

**यानंतर आपण महाकाव्याकडे वळूं:-**

भारतीय वाङ्मयात महाकाव्यांचा भाग बराच आहे. लहानमोठा अशी विविध महाकाव्ये संस्कृत वाङ्मयाकाशात सूर्य चंद्र व तारकाप्रमाणे चमकताना व प्रकाशताना पाहून अखिल मानवजातीस कौतुक व आनंद वाटला, तर त्यात आश्चर्य ते कोणते ? रामायण व महाभारत ही त्यापैकी दोन अत्यंत श्रेष्ठ आहेत. जगातील इतर कोणत्याही वाङ्मयात त्यांच्या तोडीची महाकाव्ये मिळणार नाहीत.

ग्रीक भाषेतील दोन विख्यात महाकाव्ये "इलियड" व "ओडिसी" होत. परंतु प्रोफेसर मोनियर विल्यम्ससारख्या आंग्लपंडिताने असे म्हटलें आहे की, "या दोन ग्रीक महाकाव्यांना रामायण व महाभारत यांच्या पंक्तीस केव्हाच

बसविता येणार नाही. त्याची व याची तुलना करणे, हे नगाधिराज हिमालया-तील बर्फाच्छादित प्रदेशात उगम पावून ठिकठिकाणी लहानमोठ्या नद्यानाल्यांच्या संयोगाने विस्तृत होणाऱ्या, कांही ठिकाणी अफाट उथळ पात्रातून वहाणाऱ्या तर कित्येक ठिकाणी भिन्न दिग्गामी, खोल, अनेक प्रवाहात रूपांतरित होणाऱ्या ' गंगा ' ' यमुना ' यासारख्या महानद्याना व ' ऑटका ' आणि ' थेसाली ' प्रांतातील डोंगरी ओढ्याना एकाच माळेत ओवण्यासारखेच आहे. संस्कृत वाङ्मयाच्या इतर शाखांमध्ये जशी अफाट ग्रंथसंपत्ति आहे तीच गोष्ट महा-काव्याची परंतु यूरोपातील विद्याप्रिय मनुष्यांच्या दृष्टीला एवढा अफाट ग्रंथ-समूह अपरिचित असल्याने त्यास संस्कृतातील ग्रंथभांडार पाहून फार अचंबा वाटतो. "

अशा महाकाव्यांपैकी, रामायण हे जुने असून महाभारत हे अत्यंत विस्तृत आहे. काव्यविषयक अत्युच्च गुणासंबंधाने तर बोलावयासच नको. कारण त्याची बरोबरी करणे हे काम इतर कोणत्याही भाषेतील वाङ्मयाच्या अवसानाबाहेर आहे, परंतु पाश्चात्य मार्मिक पंडिताना ह्या दोन ग्रंथांच्या विस्तारानेच कोडे अजून सुटत नाही. कारण ' महाभारताच्या ' २२०००० ओळी आहेत व ' रामायणाच्या ' ४८००० ओळी आहेत. परंतु होमरच्या ' इलियडच्या ' फक्त १५६९३ ओळी आहेत तर व्हर्जिलच्या ' ईनियडच्या ' फक्त ९८०८ च ओळी आहेत. होमरच्या दोन्ही ( इलियड व ओडिसी ) महाकाव्यांच्या ओळींची संख्या अवघी ३०००० भरते. अर्थात रामायण यांच्या दिडपटीपेक्षा मोठे आहे. हे निराळे सांगणे नकोच.

आता रामायणाच्या अंतरंगाकडे वळू. रामायण हा ग्रंथ कोणासंबंधी लिहिला आहे, त्यातील कथाभाग काय आहे, त्यात कोणती तत्त्वे कवीस सांगावयाची होती, व त्या ग्रंथापासून समाजावर काय परिणाम झाला आहे, हे सांगण्याची मुळीच गरज नाही. कारण हिंदुलोक त्या ग्रंथास वेदाप्रमाणे पूज्य मानतात व त्याची शिकवण कथा, पुराणे, प्रवचन इत्यादि मार्गांनी प्राचीन कालापासून सुरू आहे. कोणाही कुणब्यास विचारले, तरी सुद्धा त्यास राम-चरित्र माहीत नाही असे कधीही होणार नाही; आणि समाजात त्या काव्या-तील नायक, नायिका व इतर लक्ष्मण, बलभीम, अंगद ह्या उपपात्रास देवा-प्रमाणे मानण्याची चाल आहे. उत्तर हिंदुस्थानात तुळसीदास, आपल्या इकडे रामदास व इतर अनेक साधुसंतांनी आपल्या रसाळ, भक्तिप्रचुर, मोहक व

प्रासादिक वाणीने रामममहिमा गाऊन समाजास अनेक धर्मकाल्यातून सुखरूप पार नेले आहे. व लोकांची धार्मिकबुद्धि कायम ठेऊन त्याचे ठिकाणी परचक्राचे, जुलुमाचे व इतर आपत्तीचे आघात सहन करण्यास समर्थ केले आहे. तेव्हा या ठिकाणी मूलग्रथाचे सार अथवा त्यांतील मुख्य पात्राचे सविस्तर गुणवर्णन न करता फक्त या ग्रंथासंबंधी पाश्चात्य पंडितास केवढा आदर वाटतो व त्याचें राम व सीता यासंबंधी काय म्हणणे आहे, हे थोडक्यात देण्याचे योजले आहे. कारण की, मानसिक दौर्बल्य व परवशता आपल्या समाजात फार वाढल्याने प्रत्येक गोष्ट—चांगली अगर वाईट—पाश्चात्याच्या दृष्टीने पाहण्याची आम्हास संवय जडली आहे. आमच्या संस्था, संस्कार, रितीभाती, धार्मिक चाली, आमचे धर्मग्रंथ, आमचे वाङ्मय व इतिहास, आमचे वीर, राष्ट्रपुरुष, साधु, धर्मसंस्थापक इत्यादि राष्ट्रसंवर्धनाच्या ज्या ज्या बाबी आजपर्यंत घडल्या, अथवा ज्यायोगे आमचे राष्ट्र हीन स्थितीप्रत पोचले, त्याविषयी स्वतः विचार करुन, त्यासंबंधी चर्चा करुन उपाय चिंतनाच्या व योजनेच्या मार्गास आमच्या समाजातील फारच थोडे पुढारी लागले आहेत. जरी गेल्या १०–१२ वर्षांच्या अवधीत थोडी इष्ट मार्गाने सुधारणा चालू आहे व लोकांत स्वाभिमानाची अंधुक ज्योत पेटली आहे, तरी त्या पूर्वीच्या काळात वर निर्दिष्ट केलेली मानसिक अवस्था फार प्रामुख्याने आढळून येत होती. आणि अद्यापीसुद्धा तिचा पगडा समाजात बराच आहे; तरी तिचा निरास व्हावा व पाश्चात्य ग्रंथकार जे जे म्हणतील, ते ते वेदवाक्य असे मानण्याची प्रवृत्ति पार नष्ट व्हावी अशी इच्छा असणे अगदी स्वाभाविक आहे, व त्यासच अनुसरून या पाश्चात्य पंडिताच्या अभिप्रायाने काही विवेक-शून्य व विचार-शून्य लोक असतील त्यांच्या डोळ्यात अंजन पडावे व आमच्या अवतारी राष्ट्रपुरुषाबद्दल योग्य अभिमान उत्पन्न व्हावा, म्हणून त्याचे काही अभिप्राय उद्धृत करणार आहो.

रामायण ग्रंथामध्ये कोठेही परस्पर भेद आढळून येत नाही. भाषा अत्यंत सुंदर असून कल्पना तर फारच बहारीच्या आहेत. सर मोनियर विल्यम्स म्हणतात की, " संस्कृत वाङ्मयामध्ये रामायणाइतके मोहक काव्य दुसरे कोणतेच नाही. भाषेतील साधेपणा, स्पष्टता व निर्दोषत्व हे अभिजात काव्यातील गुण, शुद्ध काव्यभावनेच्या सुंदर छटांची विपुलता, वीररसात्मक प्रसंगांची अक्षरशः वर्णने, सृष्टीतील अत्यंत भव्य देखाव्यांची शब्दचित्रे, मानवी चित्तातील निरनिराळ्या विचारांचे कसकसे युद्ध चालते, याविषयी पूर्ण ज्ञान आणि त्यातील

अत्यंत विशुद्ध भावनांशी पूर्ण परिचय इत्यादि गुणांनी जगांतील कोणत्याही भागांत, कोणत्याही काळीं निर्माण झालेल्या अत्यंत सुंदर व मनोरम काव्यामध्यें याची ( रामायणाची ) योग्यता फारच मोठी आहे. निसर्गप्राप्त वाढीनें भरारलेल्या व विस्तारलेल्या उपवनाची उपमा रामायणास दिल्यास खरोखर काहींही वावगें होणार नाहीं. गोड व सुंदर उपदेशपर श्लोक हींच कोंवळीं फलपुष्पें, त्रिकालाबाधित सत्य तत्त्वें हेंच चिरंजीव, अच्छादकाचे झरे व परस्परान्वयीं विस्तृत व उदात्त कथाभाग हीं गर्द वृक्षराजी अशाप्रकारें ही उपमा किती तरी सार्थ होणार आहे बरें ! रामचरित्र तर किती उत्तम रीतीनें रेखाटलें गेलें आहे ! रामचरित्रांत अव्वलपासून अखेरपर्यंत जें निखालीं वर्तन दृग्गोचर होत आहे, त्यावरून त्याची मानुषी जीवनक्रमाबद्दल मनांत मोठी शंका येऊन हा खरोखर परमेश्वरी अंशच असला पाहिजे, अशी मनाची समजूत होते. त्याच्या अतिमानुष कृत्यांनीं कधीं कधीं आमच्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति होऊन काहीं वेळ तर मन केवळ भांबावून जातें. परंतु असे प्रसंग फार वेळ टिकत नाहींत निदान पूर्व भागांत तरी एकाद्या शूर, उदारमनस्क, पवित्र व सद्गुणी मनुष्यापेक्षा कवीनें जास्त असें रामचरित्रांत मुद्दामच दाखविलें नाहीं. आज त्याचें शौर्य, निर्लोभता, औदार्य, पित्राज्ञाप्रामाण्य, विमल पत्नीप्रेम, सहोदरप्रेम व क्रोधमय विचाराचा पूर्ण अभाव इत्यादि गुणांची मात्र जितकी तारीफ करावी तितकी थोडीच होणार आहे. आपल्या सापत्न मातेच्या क्रोधास जेव्हां तो बळी पडतो, तेव्हां त्याच्या मुखावाटे एकही रागाचा शब्द निघत नाहीं; जेव्हां त्याचा पिता त्यास वनवासास पाठविण्याचें ठरवितो, तेव्हां तो हूं का चूं सुद्धां करीत नाहीं; आपल्या पित्याच्या माथीं प्रतिज्ञाभंगाचें पाप येण्यापेक्षा आपल्या स्वतःच्या सुखाची होळी करण्यास तो तयार होतो. व सीतेविषयीं तर बोलावयासच नको, कारण ती केवळ गृहलक्ष्मीच होय व तिजमध्यें सद्गुण मूर्तिमंतच अवतरले होते असें दिसतें."

स्त्रीजातीला सीता हा उत्तमोत्तम आदर्श आहे. तिची थोर पतिनिष्ठा, तिचें अमर्याद प्रेम, पतिपत्नीच्या शाश्वत व दैवी संबंधाविषयीं तिची अत्युच्च कल्पना इत्यादि बाबतींत कवीनें जीं ध्येयें कल्पिलेलीं आहेत, तीं श्रेष्ठपणाच्या व उदात्तपणाच्या दृष्टीनें इतर कोणत्याही भाषेंत अगर वाङ्मयांत कोठेंही पहावयास मिळणार नाहींत

प्रोफेसर डाउडन, प्रिन्सिपॉल ग्रिफिथ, मिस् मेरी स्कॉट इत्यादि विद्वानांनी व विदुषींनी राम व सीता या दांपत्याच्या गुणवर्णनपर काव्यांनी आपल्या प्रेममय व स्तुतिपूर्ण निर्झरास वाट मोकळी करून आपले सहृदयत्व व गुणग्राहकत्व प्रकट करून रामायण काव्याची थोरवी, संस्कृत भाषेची प्रभुता व कवीचे अलौकिक रचनाचातुर्य, अप्रतिम शब्दचित्रकौशल्य व गाढविज्ञान इत्यादि गोष्टी आपल्या ग्रंथात ठिकठिकाणी कबूल केल्या आहेत.

आतापर्यंत दिलेल्या उताऱ्यावरून रामायणाबद्दल पाश्चात्याच्या हृदयात केवढी पूज्यबुद्धि आहे, त्याचे अध्ययन युरोपियन पंडित व विदुषी किती आस्थेने करीत आहेत, त्यांना रामायणाच्या कर्त्याबद्दल केवढा आदर आहे व खुद्द ग्रंथातील प्रत्येक पात्रोपपात्राचा स्वभावपरिपोष, सृष्टिनिरीक्षण, नीतिशिक्षण रसपरिपोष, वाग्योजनाचातुर्य इत्यादि दृष्टीने त्याचा त्या ग्रंथाचा अभ्यास कसा काळजीपूर्वक व आस्थेने चालला आहे हे दिसून येईल.

आता आपण महाभारत ग्रंथासंबंधी पाश्चात्य व अमेरिकन पंडित, वर्तमनपत्राचे संपादक व इतर विद्याव्यासंगी लोक काय बोलतात तें थोडक्यात पाहूं.

महाभारत ग्रंथाची निर्व्याज स्तुति करण्याच्या भरात डॉक्टर हेसलर नामक अमेरिकन पंडित म्हणतो की, " दैवी स्फूर्तीने भारलेले प्राचीन आर्यावर्तातील अत्यंत थोर महात्मे यांनी जो महाभारत नामक ग्रंथ निर्माण केला आहे, त्याच इतका थोर ग्रंथ आजपर्यंत माझे पाहण्यात दुसरा नाही, व माझ्या पूर्व आयुष्यातील अनुभवावरून मी असे म्हणतो की, या ग्रंथाने मला जितके वेड लावून सोडले, तितके वेड मला इतर कोणत्याही ग्रंथाचे यापूर्वी लागले नाही. या ग्रंथाचा अहर्निश अभ्यास करून मी त्यातून एक हजारावर उतारे घेऊन माझ्या पुढील आयुष्यातील अभ्यासाकरिता त्यांची मांडणी केली आहे. महाभारत म्हणजे एक अभिनव सृष्टीच आहे असे मला वाटते व त्यातील सत्पक्षप्रीति, ज्ञान, चातुर्य व सत्य इत्यादि गुणसमुच्चयाचे वर्णन वाचून तर मी अगदी तल्लीन होऊन जातो परंतु एवढ्यानेच त्याचा मोठेपणा संपला असे नाही, तर माझ्या मनाने परमात्मा व जगदुत्पत्ति यासंबंधी जे काही सिद्धान्त बांधले होते, तेच या ग्रंथात सुंदर व स्पष्ट भाषेत सांगितलेले पाहून मला या ग्रंथाबद्दल फारच आदर वाटू लागला, व त्याची थोरवी किती गाऊ असें मला होऊन गेले आहे. "

हॅमिल्टन डेली स्पेक्टेटर या पत्राच्या ३१ मे १८८८ च्या अंकांत खालील उतारा आहे:--"हें काव्य म्हणजे धर्म, नीति, मानसशास्त्र, तत्त्वज्ञान व राजकारण इत्यादि विषयामधील तत्त्व-रत्नांचा कथारूप सूत्रामध्ये गुंफलेला हारच होय. दोन हजारांपेक्षा अधिक वर्षांपूर्वी आर्यावर्तातील लोकांचा जीवनक्रम रीतीभाती, राजकारण, धर्म व तत्त्वज्ञान यांचे हुबेहूब चित्र आम्हास या ग्रंथा-तून पहावयास मिळतें. एवढेंच नव्हे तर अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें काव्य आणि अत्यंत थोर व गहन विचारांची पैदास जी या जगावर झालेली दिसते, त्यापैकीं बरेंच या ग्रंथांत आढळून आल्यानें याची अपूर्वता व महती फार वाटते.

बाबू पी. सी. रॉय यांनी मोठ्या नेटानें महाभारताचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध करण्याचें काम चालविलें होतें व त्या वेळीं त्यास अमेरिकेंतील जेरेमिआ-कर्टिन नामक मानववंशशास्त्रज्ञाकडून असें पत्र आलें कीं, ' महाभारताचे २४ भाग साद्यंतपणें व काळजीपूर्वक मी नुकतेच वाचून संपविले आहेत, व त्यावरून माझी खरोखर अशी समजूत झाली आहे कीं, या ग्रंथाइतका श्रेष्ठ ग्रंथ दुसरा नाहीं, व यापासून मला जेवढा आनंद झाला, तेवढा इतर कोणत्याही ग्रंथामुळें आजन्मांत आला नाहीं. आर्यांच्या बुद्धिमत्ताविषयीं व सत्य शीलाविषयीं या ग्रंथवाचनानें सर्व लोकांच्या नेत्रांत चांगलेंच अंजन पडेल. तुम्ही जें कार्य हातीं घेतलें आहे त्यायोगें केवळ हिंदुस्थानचेंच हित होईल असें नाहीं, तर सर्व आर्य-वंशाचेंही कल्याण त्यायोगें होणार आहे, महाभारत ही एक फार विशाल खाण आहे व तीमधील संपत्तीचा अदमास अजून जगाला लागलेला नाहीं. यांतील रत्नें जसजशीं बाहेर येतील तसतसें यांचें महत्त्व जगास कळूं लागेल. या ग्रंथांतील माहितीनें आर्यवंशाचा इतिहास कळावा, अशी ज्यास तीव्र लालसा आहे त्याचें समाधान होईल, व दुर्बळ मानव आणि अत्यंत शक्तिमान सर्वव्यापी परमात्मा यांचें काय नातें आहे याचाही बोध स्पष्टपणें यावरून होणार आहे. '

१९८६ च्या सप्टेंबरच्या अंकांत सानुहिलेर बार्थेलिमी नामक एक फ्रेंच मासिककार म्हणतो कीं, ' सुमारें १०० वर्षांपूर्वी विल्किन्स नांवाच्या गृहस्थानें महाभारतांतील कांहीं वेंचे छापून प्रसिद्ध केले, आणि भगवद्गीतेच्या प्रसंगानें या प्रचंड ग्रंथाचा परिचय जगास करून दिला. या ग्रंथाचा भव्यपणा पाहून सर्व पाश्चात्य जग थक्क झालें. होमर हा महाभारतकार व्यास यांजपुढें कःपदार्थ असें सर्व लोक मानूं लागले व आर्यावर्त ग्रीसपेक्षा श्रेष्ठ आहे, अशी सर्वांची खात्री झाली, आणि गतकालीन मानवी बुद्धिमत्ता व परिश्रम यांचें हें भार-

आरोपीत केलेले आहे, जितकी जितकी एकादी कल्पित
दिसेल, तितकें तितके तिच्यामध्ये सत्यासत्य युद्धाचे गहन ' गोष्ट जास्त असंभाव्य
तेने प्रतिपादलेले आढळून येईल; व आत्मसंयमन, इंद्रि तत्त्व अत्यंत मार्मिक-
इत्यादि गोष्टींनी परिकरबद्ध चिरंजीव सत्याच्या भयंकर यविजय, आत्मशाविन्य
व विजयाची आशा सोडून लढत कशी चालू ठेविली पा युद्धामध्ये सज्ज होऊन
फार सुंदरपणे यात दिलेले आपणास आढळेल. मनुष्याने इजे, याचेही शिक्षण
भावनामय झाले पाहिजे, असा सर्वत्र कटाक्ष दिसून येतो व चे जीवन सात्त्विक-
मधील रानटी, क्रूर मनोभावना कोणत्याही प्रकारे उत्तेजित ह म्हणूनच मनुष्या-
फार खबरदारी घेण्यात आली आहे. सर मोनियर विल्यम्स एक नयन म्हणून
' गार्हस्पत्यधर्म व पतिव्रताधर्म या दोहोंचे उद्घाटन यात फारच सुंद म्हणतो की
अनेक प्रकारच्या उदाहरणांनी हे धर्म मनावर बिंबवण्याचा अत्यंत श्लाघ्य आ
सफल झाला आहे कौटुंबिक व सामाजिक सुखाचे मनोहर व मर्मस्पर्शी ,
तर फारच बहारीचे आहे. सर्वत्रसिद्ध व सर्वकाल सत्य अशा मानवी स्वभा-
वातील सर्वजनसामान्य भावना व स्फूर्ति यांचे यथायोग्य निदर्शन व कौटुंबिक
प्रेमप्रसंगाचे चित्रकर्म ह्या बाबतीत संस्कृत महाकाव्याची सर कोणासच येणार
नाही, आतापर्यंत निरनिराळ्या पंडितांच्या अभिप्रायाचा जो गजरा विणण्यात
आला, त्यावर जरतारीच्या सूत्राचें आच्छादन घालण्याकरिता आपण असे
म्हणूं की, मानवी बुद्धि-सुंदरीच्या अत्यंत विशुद्ध व सुंदर विलासाचे महाभारत
म्हणजे केवळ क्रीडांगणच होय.

मधुर, दिव्य गीर्वाण भाषेतील जी अत्यंत श्रेष्ठ अशी दोन महाकाव्ये, यांचा येथवर विचार झाला. आता यापुढे महाकाव्याच्या जातीचे अर्थात महाकाव्याचे गुणधर्म कमी अधिक प्रमाणाने असलेली इतर जी काही आहेत त्यांचा फक्त जाता जाता नामनिर्देश करूं. रघुवंश, शिशुपालवध, किरातार्जुनीय भट्टिकाव्य, कुमारसंभव, नलोदय, राघवपांडवीविजय व नलदमयंती इत्यादि काव्यामध्ये वर निर्दिष्ट केलेले गुण कमी अधिक प्रमाणाने आढळून येतात.

वरील काव्यामध्ये जे जे गुण अथवा रस कवींच्या अचाट बुद्धिसामर्थ्याने, अलोट कल्पनाशक्तीने, संस्कृत भाषेच्या अनुपम प्रगल्भतेने व माधुर्याने परिपक्व दशेस आणले गेले आहेत, ते पाहून यूरोपियन पंडितांची बुद्धि कुंठितच होऊन जाते. याला कारण त्यांचे ठिकाणी बुद्धिप्रकर्षाचा अभाव आहे असे नाही परंतु हा भेद दोन राष्ट्रांतील परिस्थितिभिन्नत्वामुळे उत्पन्न झाला आहे. भिन्न

विचारसरणी, व संस्कृति याचाही थोडाबहुत परिणाम या कामी झाला असलाच पाहिजे. ग्रीस, रोम व आर्यावर्त यांच्या नैसर्गिक माडणीकडे लक्ष दिले तर आपणास असें आढळून येईल की, या कामी निसर्गाची भारतीयास फार मदत झाली आहे. ज्या परिस्थितीत आपण वाढतो, तत्सदृश होणे हा स्वभावसिद्ध धर्मच आहे. यादृष्टीने पाहिल्यास संस्कृत महाकाव्यातील पात्रे अद्भुत शक्तिमान्, महातेजस्वी, अग्नितुल्य पवित्र, पर्वताप्रमाणे धैर्यवान्, पृथ्वीप्रमाणे सहनशील, सत्वाला जागण्याकरिता जीवावर उदार, या प्रकारची आपणास आढळून येतात, प्रत्येक गुण घेऊन तो पराकोटीला पोचविला आहे. असेच पात्रांच्या वर्णनावरून दिसते. या कामी आर्यग्रंथकारांच्या अप्रतिहत कल्पनाप्राचुर्याची व मनचक्षूंच्या अफाट पल्ल्याचा जरी बरीच मदत झाली असली, तरी सभोवतालच्या परिस्थितीचाही तितकाच उपयोग झाला आहे.

आर्य—आचार्य, कवि व ऋषि याचा अखंड सहवास गगनभेदी पर्वत, प्रशांत, गंभीर व विस्तृत पात्रे आणि सभोवार पसरलेला अफाट व अमर्याद भूभाग, ह्या नैसर्गिक वस्तूंशी जडल्यामुळे त्यांच्या स्वरूपाची प्रतिक्रिया यांच्या काव्यनिर्भर मनावर आल्याशिवाय राहिली नाही ती कशा प्रकारची झाली याची साक्ष संस्कृत वाङ्मयावरून मिळतच आहे. यूरोप व आर्यावर्त यामधील निसर्गभिन्नत्व सर्वप्रसिद्धच आहे. यूरोपातील भूमीवर वाढलेल्या पाश्चात्याच्या बुद्धीत संकुचितपणा व तनुत्व फार आहे, याचे कारण नैसर्गिक स्थितीच होय. कारण काहीही असो त्याची विचिकित्सा करण्याचे हे स्थळ नव्हे. परंतु यूरोपियन पंडिताच्या ग्रंथावरून असे स्पष्ट दिसते की, त्याना प्रत्येक भारतीय वस्तु वैभवसंपन्न, श्रेष्ठ, विशाल व कौतुकपूर्ण दिसते. प्रोफेसर हीरनसारखा विद्वान म्हणतो की, हिंदूच्या पौराणिक कथा इतर राष्ट्रांतील कथाप्रमाणे भरपूर तर आहेतच. पण शिवाय सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीने त्या अत्यंत सरस असून, काव्यगुणाची, भाषासौंदर्याची, नीतिबोधाची तर त्यात अगदी रेलचेल आहे.

आता शेवटी एका गोष्टीचा विचार करून हे बरेच लांबलेले प्रकरण पुरे करू. असा एक वाद बरेच दिवसापासून प्रचलित आहे की, इलियडचा कथाभाग रामायणावरून घेतला आहे, आणि त्याच्या पुष्ट्यर्थ निरनिराळ्या पंडितानी त्या दोन काव्यामधील पात्रांची अनेक दृष्टीनी तुलना करून ही गोष्ट सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. 'आर्यांच्या वसाहती' या प्रकरणामध्ये असे स्पष्ट दाखविण्यात आले आहे की, त्रॉयमधील लोक मूळचे आर्यावर्तातील होते आणि ही

गोष्ट एकदां मान्य केली म्हणजे मग हिंदु लोकांच्या पौराणिक कथांवरून आणि महाविख्यात व दुय्यम प्रतीच्या महाकाव्यावरून स्वपरिस्थितीला साजेल, चालिरितीला जमेल व संस्कृति, लोकरुचि याला पटेल अशा स्वरूपात त्यांचे रूपांतर झाले असेल यांत कोणासही शंका येणार नाही. दुसरी गोष्ट अशी कीं, ग्रीक लोकांच्या वाङ्मयामध्यें एक जो विशेष आढळून येतो, तो इतर वाङ्मयांत कोठेंही दिसत नाही. वाङ्मयाची भूमिका बरेच दिवस कसावी लागते, अप्रसिद्ध लेखरूपी असंख्य कृषीवलांनी बहुत कष्ट करून व बरीच मशागत करून ती महाकाव्याच्या पिकाला तयार करावी लागते. वाल्मिकी व व्यास हे महाकवि निर्माण होण्यापूर्वी किती तरी दिवस संस्कृत वाङ्मयाची मेहनत सुरू होती. रोमन लोकांमध्ये व्हर्जिल व इंग्लिश लोकांमध्ये मिल्टन हेच रोमन व इंग्लिश वाङ्मयाचे आद्यजनक नसून त्यांच्यापूर्वी फार दिवस या दोन्हीं भाषेमध्ये तत्पूर्व ग्रंथकारांचे परिश्रम चालू होते, आणि व्हर्जिल व मिल्टन यांना आपलीं काव्यें रचण्यास व अभिप्राय प्रसिद्ध करण्यास त्या तयार झाल्या होत्या. ग्रीक लोकांच्या वाङ्मयाशी येऊन पोचलो म्हणजे मात्र सर्वच उलट दिसून येतें. होमरच्यापूर्वी कोणीही कवि झाला नसून, त्यानेच ग्रीक वाङ्मयाचा पाया घातला व त्यानें जीं काव्यें निर्माण केलीं तीं अपरिपक्व, अप्रगल्भ व असंस्कृत भाषेमध्ये लिहिलीं नसून, महाकाव्याचे सर्वगुण पूर्णपणे व छानदारपणे धारण करणाऱ्या भाषेमध्ये लिहिलीं आहेत. परंतु ही गोष्ट सृष्टिक्रमाच्या व इतर वाङ्मयाच्या वृद्धीच्या इतिहासाला सोडून असल्यामुळे वर जो सिद्धान्त मांडला आहे, त्याला बळकटी येते. ग्रीक काव्यामधील व इतर गद्य प्रबंधामधील पात्रें, कथासूत्रें व प्रसंग यांची संस्कृत ग्रंथामधील पात्रांशी, प्रसंगांशी व कथासूत्रांशी इतकी एकरूपता आहे कीं, संस्कृतावरील हा ग्रीक पोशाख असावा अथवा निदान संस्कृतामधील पुष्कळ विचार तरी घेतले असावे हे खास. कर्नल विल्फोर्ड, कौंट, जॉनस्टर्ना व प्रोफेसर मॅक्स डंकर या पाश्चात्य पंडितांच्या मतानें ही गोष्ट जवळ जवळ सर्वसंमत झाली आहे. ते असे स्पष्ट म्हणतात कीं, रामायण व महाभारत या ग्रंथांमधून पुष्कळ कथाप्रसंग घेऊन प्राचीन ग्रीक लोकांनीं आपल्या भाषेत, आपल्या रुचीप्रमाणे, देशरिवाजाप्रमाणे व संस्कृतीला धरून त्यांवर पुष्कळ काव्यें लिहिलीं आहेत.

येथवर दाखविल्याप्रमाणे महाकाव्यें जितकीं महत्त्वाचीं, सुंदर व मननीय आहेत तितकेच संस्कृतामधील नाट्यग्रंथही आहेत. हिंदुस्थान म्हणजे सर्व जगाचा लहान मासला आहे, असें मानण्याचा बराच प्रघात आहेत अर्थात् जगातील

लहान मोठी प्रत्येक वस्तु, वनस्पति, सर्व प्रकारची हवा, सर्व रुचीचें पाणी, बहुतेक सर्व धान्ये, नानाप्रकारचे रमणीय देखावे, बहुतेक प्रकारचे धातू वगैरे जिन्नस हिंदुस्थानांत पैदा होतात ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. वर वर्णन केल्याप्रमाणें जरी स्थिति असली, तरी काव्य व नाटकें याविषयीं बोलताना फक्त हिंदुस्थानांतील भूभाग व नैसर्गिक परिस्थिति हींच स्पष्टपणें अभिप्रेत असली पाहिजेत; आणि याचें प्रत्यंतर आपणास संस्कृत काव्यें व नाटकें वाचून येणारें आहे. सृष्टि-वर्णन हा संस्कृत कवींचा विशेष गुण आहे व त्याचें संवर्धन संस्कृत वाङ्मयामध्यें जितकें झालेलें आढळेल, तितकें प्राचीन अथवा अर्वाचीन इतर कोणत्याही वाङ्मयामध्यें झालेलें आढळणार नाहीं. हिंदुलोकांत असलेली सौंदर्याभिरुचि व कौतुकास्पद सूक्ष्म निरीक्षणशक्ति, यांच्या योगें सृष्टींतील अत्यंत विस्मयकारक देखावे व मनोवेधक रमणीय स्थळें याजकडे त्यांचें लक्ष आकर्षिलें जावें हें अगदीं साहजीक आहे. परंतु हिंदुलोकांमध्यें जरी हे गुण असले, तरी यांच्यापेक्षा श्रेष्ठ प्रतीचे इतरही गुण त्यांचेमध्यें आहेत व त्या सर्वांमध्यें अत्यंत श्रेष्ठ म्हटला म्हणजे मानसीक परिस्थितीचें संशोधन व विचार आणि भावना यांचें सूक्ष्म पृथक्करण करण्याची तीव्र लालसा.

याच गुणाच्या बळावर मानवी मनाच्या अंधकारमय कोठडीमध्यें अज्ञात असलेल्या वांच्छा, भावना, विचार, आवडीनावडी, प्रेमविषय, प्रवृत्ति, गुणावगुण यांचा मार्मिक परिपाक व बरोबर चित्र नैसर्गिक काव्यप्रचुर प्रतिभेनें काढलेलें, आपणास संस्कृतामधील ग्रंथांत ठिकठिकाणीं पहावयास सापडतें. म्हणून या बाबतींत संस्कृत वाङ्मयाची बरोबरी इतर कोणत्याही वाङ्मयास करितां न आल्यानें तें सर्व जगास अत्यंत वंदनीय झालें आहे यांत कांहीं नवल नाहीं. निसर्गधर्माचें यथास्थित आकलन करून त्याचें बरोबर शब्दचित्र उठविणें, हा संस्कृत नाटकाचा विशेष गुण आहे. त्याचप्रमाणें पात्रांचा स्वभावपरिपोष यथासांग पूर्ण करून, प्रत्यक्ष सृष्टींत दिसणाऱ्या परिस्थितीशीं किमपि विरोध कधींही घडलेला दिसावयाचा नाहीं. अप्रस्तुत वर्णन, विषमता आणि अतिक्रम हे अवगुण पात्रांच्या स्वभावांत अथवा कथानकांत कोठेंही आढळून येणार नाहींत. या कडक शिस्तीमुळें वाङ्मयप्रदेशाचें यथास्थित आचरण केल्यामुळें फक्त शेक्स्पियरखेरीज इतर कोणत्याही पाश्चात्य कवींना संस्कृत कवींची बरोबरी करितां आली नाहीं.

भाषेची तर गोष्टच काढावयास नको. कारण सौंदर्य व गांभीर्य या बाबतींत

इतर भाषांना गीर्वाणवाणींचे प्रभुत्व मान्य केलेच पाहिजे, अशी तिची योग्यता आहे याबद्दल कोठेही द्वैतमत आढळून येणार नाही.

येथवर सामान्यपणे संस्कृत नाट्यकर्त्यांचा प्रतिभा-विशेष वर्णन केल्यावर नंतर नाट्यसंपत्तिकडे वळणे हे ओघानेच प्राप्त होते. खिस्ती शकाच्या पूर्वी एक शतक विक्रमादित्य हा साहित्यप्रेमी व विद्वज्जन पुरस्कर्ता राजा होऊन गेला. याचे कारकीर्दीत कवि, तत्त्वज्ञानी, गणिती इत्यादि गुणीजनांच्या बुद्धिसामर्थ्याचे योग्य चीज होऊन एकंदर वाङ्मयाची सर्वांगीण वाढ होण्यास बरीच मदत झाली असली पाहिजे. प्रोफेसर हीरनच्या मते कालिदास उत्पन्न होण्यापूर्वी पुष्कळ वर्षे सर्व राष्ट्राची बौद्धिक प्रगति बरीच झाली असली पाहिजे. कारण अशा जगद्विख्यात कवि-कृतींचा रसास्वाद घेण्यास राष्ट्रामध्ये एक प्रकारची लोकांची तयारी असावी लागते. एरवी असे कवि निर्माण होणे व त्यास उत्तेजन मिळणे अशक्य असते. कालिदास होण्यापूर्वी पुष्कळ थोर कवि होऊन गेले असले पाहिजेत. आणि त्यांपैकी दंडी हा एक होय. परंतु दुःखाची गोष्ट ही की, त्याच्या ग्रंथापैकी आज एकही उपलब्ध नाही, व याबद्दल सर्व सुधारलेल्या गुणज्ञ जगाला अखंड वाईट वाटून, ते आपल्याला दुर्दैवी समजेल यात काही शंका नाही. साहित्याच्या इतर शाखा व विज्ञान यांची त्या रसशून्य व नाशप्रिय काळाने ज्या प्रकारची संभावना केली तीच दंडीच्या ग्रंथाची केली असली पाहिजे. काळाच्या हातून जे काही चुकून राहिले होते, त्याची वाट मुसलमानांनी लाविली. यावरून आपणास असे म्हणता येईल का, ह्या देशी मुसलमानांचे आगमन होण्यापूर्वी काळाच्या तडाक्यातून जे काही शिल्लक राहिले होते. त्याचा विध्वंस करण्यात मुसलमानांनी आपल्या गुरुवर उत्तमच ताण केली अर्थात आता जे शिल्लक राहिलेले दिसत आहे, ते वरील दोन मानुष व अमानुष संहारकाच्या हातून. परंतु सर विल्यम जोन्सच्या मते ही अवशिष्ट ग्रंथसंख्यासुद्धा यूरोपातील एका आधुनिक वाङ्मयाच्या कितीतरी पट आहे ! यावरून संस्कृत ग्रंथसंपत्तीची विपुलता किती होती याचा कोणासही अदमास करता येईल. परंतु नष्ट संपत्तीची मोजदाद जरी बुद्धिसामर्थ्याचा त्याग घेण्यास उपयोगी पडली तरी शेवटी मनुष्यस्वभावानुरूप दुःख होणे हे साहजिकच आहे. मनाची अशी विव्हल स्थिति बाजूला सारून प्रत्यक्ष असलेल्या ग्रंथसंपत्तीचा उपभोग घेणे, व गुणावगुणांची चर्चा करणे, त्यात तल्लीन होऊन जाणे, हेच समाधानाचे साधन आहे. याकरिता आपणसुद्धा तेच काम हाती घ्यावे हे बरे.

प्रोफेसर विल्सन म्हणतो की, " जे थोडे नाट्यग्रंथ उपलब्ध आहेत ते केवळ आपल्या स्वतःच्याच तेजाने व सामर्थ्याने काळाच्या कात्रींतून निसटले असले पाहिजेत. अशाच नाट्यविषयक ग्रंथापैकी ' दशरूपक ' या नावाचा ग्रंथ आज हयात आहे. संस्कृतमध्ये नाटकाला रूपक असे नाव आहे. या ' दशरूपक ' ग्रंथात नाटकाचे दहा प्रकार दिले आहेत. त्यावरून हिंदुलोकामध्ये या शास्त्राची केवढी वाढ झाली होती हे स्पष्ट दिसून येईल.

प्राचीन ग्रीक वाङ्मयामध्यें नाट्यविषयाची चांगलीच वाढ झाली होती; परंतु तिची बरोबरी संस्कृत नाट्यशास्त्र व ग्रंथसंपत्ति याजपाशी केव्हाही करितां येणार नाही. संस्कृत नाट्यशास्त्रांत खाली दिलेले ठळक महत्त्वाचे गुण आढळतात.

( १ ) संस्कृत नाट्यशास्त्रात नऊ रस सांगितले आहेत:--शृंगार, वीर, करुण, भयत्सा, भानक, भीम, हास्य, अद्‌भुत, शांतरस

( २ ) संस्कृत नाटकांतील शृंगार इंद्रियविशिष्ट नसून भावनाजन्य आहे. अर्थात् इंद्रियादि सौष्ठवामुळे त्याची उत्पत्ति नसून केवळ शुद्ध प्रेमरूप भावनेमुळेच असते. तसा प्रकार ग्रीक अथवा लातीन भाषेतील आनंदपर्यवसायी नाटकांत आढळत नाही.

( ३ ) संस्कृतांतील वीररस विवेकहीन नसून प्रशांत व स्वाधीन असतो.

( ४ ) स्त्रीपात्राच्या बाबतीत भूमिकांतराचा प्रकार क्वचितच आढळेल.

( ५ ) योग्य प्रसंगी व कथासूत्रास धरून नाटकाचे अंक पाडण्याची पद्धति ग्रीक लोकांना केव्हांही ठाऊक नव्हती.

( ६ ) आधुनिक नाटकामध्ये " स्वगत " " एकीकडे " इत्यादि प्रकार रंगभूमीवरील कामाकरितां ज्याप्रमाणें उपयोगांत आले आहेत, तसेच ते संस्कृत नाटकांतही त्याच कार्याकरितां उपयोगांत आणलेले आहेत.

( ७ ) शोक व गांभीर्य यांचे हास्यविनोद व लघुता—याजबरोबर असलेले अव्याहत व अवश्य साहचर्य संस्कृत नाटकामध्ये उत्तम रीतीनें रंगविलेले सर्वत्र दिसेल.

( ८ ) नाट्यकलेपासून थोर उद्देश व मोठे परिणाम घडून येणे शक्य आहे, या गोष्टीची संस्कृत नाटककारास केव्हांही विस्मृति झालेली नाही, आणि संस्कृत नाटकाची थोरवी आहे ती यांतच. प्रोफेसर विल्सन एक उदाहरण घेऊन असे म्हणतो की, परस्त्री हा नाटकांतील कृष्णकारस्थानाचा, कपट कृत्याचा

अथवा नाट्यविलासाचा विषय झाला आहे, असे संस्कृत भाषेत एकही नाटक आढळून येणार नाही. या जगांत भुकेच्या खालोखाल देहधर्मामध्ये शृंगाराची योग्यता आहे, व जगातील प्रत्येक नाट्यवाङ्मयाचा तर तो केवळ प्राणच आहे. मिसेस मॅनिंग नावाची विदुषि म्हणते कीं, भारतीय काव्याखेरीज जोरदारपणे परंतु मार्दवानें शृंगाररसाची मांडणी केलेली इतरत्र आढळून येणे दुरापास्त आहे.

वर दिल्याप्रमाणें संस्कृत नाटकाचे आठ विशेष गुण आहेत, व प्रोफेसर विल्सनप्रभृति पाश्चात्य पंडितासुद्धा संस्कृत नाट्यशास्त्राची सर्वांगीण वाढ किती मान्य आहे, हें याच्या अभिप्रायावरून कळून येईल. यापुढे आपण जगमान्य संस्कृत नाटककार कालिदास व भवभूति यासंबंधाने पाश्चात्य पंडित प्रेमाने, आदराने, कौतुकाने व अंतःकरणपूर्वक काय काय म्हणतात तें सहज थोड-क्यांत पाहूं.

खिस्ती शकाच्यापूर्वी एक शतक राजा विक्रमादित्य याचे कारकीर्दीत कालि-दास होऊन केला व त्याचे नंतर बऱ्याच शतकांनीं भवभूति निर्माण झाला. कालिदास हा या जगात अत्यंत श्रेष्ठ नाटककार होऊन गेले, त्यापैकी एक होता असे सर्वांचे मत आहे. ' शाकुंतल ' ही त्याची अत्यंत श्रेष्ठ कृति होय त्यातील कथाभाग महाभारतातून घेतलेला आहे हे हिंदी वाचकास नव्याने सागणे नकोच. ह्या नाटकाची कीर्ति अत्यंत लाबवर पसरलेली आहे. यातील सौंदर्य, मोहकपणा, कोमलता, व सृष्टीची बरोबर नक्कल इत्यादि गुणानी जगांतील नाट्यवाङ्मयात ते प्रमुख स्थानी जाऊन बसलेले आहे. प्रोफेसर हर्रान नामक पंडित आनंदातिरेकाने म्हणतो की, " कालिदास जन्माला येऊन त्याने आपल्या राष्ट्राचेंच नाव अजरामर केले, असे नसून सर्व सुधारलेल्या जगाच्या कीर्तीत त्यानें अपूर्व भर टाकली."

आगस्टस श्लेजेल, अलेक्झांडर हंबोल्ट, गटे इत्यादि गीर्वाण भक्तांनी कालि-दासाच्या शाकुंतल कृतीविषयी अंतःकरणपूर्वक अत्यंत प्रशंसोद्गार काढलेले आपणांस सर्वत्र ऐकावयास सांपडतात.

शकुंतलेचा शोक व प्रेम यावर गटे नामक महाविख्यात जर्मन कवीने, एक काव्य रचलें आहे. एकंदरींत संस्कृत नाटकाच्या भाषेविषयी प्रोफेसर विल्सन म्हणतो कीं, कालिदास व भवभूति यांच्या नाटकांतील श्लोकाची भाषा इतकी

मंजुळ, सुस्वर, भारदस्त व उदात्त आहे की, त्याप्रमाणें दुसरी भाषा कोठे पहावयास मिळेल अशी आशा करणें हें सुद्धा वेडेपणाचे होईल.

ख्रिस्ती शकाच्यापूर्वी एक शतक अथवा त्याहून पूर्वीच्या काळांतील नाट्य वाङ्मय आपणास उपलब्धच नसल्याने त्याच्या गुणावगुणासंबंधी काही बोलताच येत नाही. परंतु ज्या काळातील अत्यंत जुनें म्हणून नाट्य–वाङ्मय आपणास मिळालें आहे, त्यावरून पाहतां भाषा, व काव्यरचना याच्या अभ्यासाची परमावधि झालेली आपणास पहावयास मिळेल, आणि प्रोफेसर हरिनच्या मतें विक्रमादित्याची कारकीर्द म्हणजे जगविख्यात कवीच्या अत्यंत थोर कृतींचा प्रसवकाळच होय.

शाकुंतलच्या खालोखाल विक्रमोर्वशी या नाटकाची योग्यता आहे. प्रो. विल्सन यानें ह्या दोन नाटकाची फार बारकाईने तुलना करून असा अभिप्राय दिला आहे की, " दोन्ही नाटकांतील वर्णनसौन्दर्य, भावनामार्दव, कोमलविचार, चारुता व भाषासरणींतील अत्यंत श्रेष्ठ थाटमाट, हे गुण दोहोमध्ये सारखेच आहेत. कोणाला सरस ठरवावे हा प्रश्न फार अवघड आहे. परंतु विक्रमोर्वशीच्या कथेची रचना इतक्या चातुर्यानें व खुबीनें झाली आहे, आणि त्यातील प्रसंग एकामागून एक असे इतक्या नैसर्गिक पद्धतीनें व क्रमानें आले आहेत की, क्षणभर शाकुंतलसुद्धा त्या बाबतींत मागे पडेल. त्याचप्रमाणे दुसरा प्रमुख गुण म्हटला म्हणजे त्यांतील काव्य हा असून एकंदर गोष्ट परिस्थिति व पात्रे या बाबतींत उच्च प्रकारचे कल्पना-प्रभुत्व दिसून येते उर्वशीची गोष्ट कालिदासानें काढून घेतली व मुळातील पुराणकथेत त्यानें नाटकाच्या दृष्टीनें काय काय फरक केले, हें पाहिले म्हणजे त्याच्या बुद्धि-चातुर्याबद्दल, कविकल्पनेबद्दल व नूतन रचनाकौशल्याबद्दल मन अगदी आश्चर्यस्तंभित होऊन जाते.

आता थोडेबहुत भवभूतीकडे वळणें बरें. याची " उत्तररामचरित " व " मालतीमाधव " अशी दोन फार प्रख्यात नाटकें आहेत. पैकी पहिल्यांत म्हणजे " उत्तररामचरितांत " करुणरसावर फार भर दिलेली आहे. ह्याच्यांतील विशुद्ध व नैसर्गिक करुणरसासारखा करुणरस इतर संस्कृत नाटकात कोठेंच पहावयास मिळणार नाहीं कुसुमकोमल भावनाचे अद्भुत हातोटीनें केलेलें प्रदर्शन खेरीज करून रणशूर राजपुत्राच्या आदर्शभूत स्वभावाचें चित्रही फारच मार्मिकपणें व सुबकपणें काढलेलें आहे. राम व सीता या जोडप्याच्या जीवनक्रमास,

अत्यंत सफाईनें या नाटकांत जो तेजोमयपणा व देदीप्यपणा आणलेला आहे, त्यापेक्षा जास्त आणणें, हे मानवी काव्यकारागिरीच्या शक्तीबाहेरचें काम आहे. सरळपणा व सौंदर्य या दृष्टीनें पाहिलें असता, ह्या नाटकांत आणखीही जी निरतिशय व थोर प्रभेचीं विचाररत्नें सर्वत्र विखुरलेलीं दिसतात त्यांना तर इतर कोणत्याही वाङ्मयांत तोडच नाहीं.

अत्यंत दुराराध्य, असें जरी कोणाचें मन असलें, तरीसुद्धां त्याचें या नाटकानें क्षणभर समाधान झाल्यावाचून राहणार नाहीं. हे नाटक व युरोपांतील इतर निरनिराळ्या भाषेंतील बरींच नाटकें, याजमध्यें एक प्रकारचें मजेदार साधर्म्य आहे. त्यांचा व याचा समानधर्म मनोविकारांत आहे. युरोपियन लेखकांना आशियामधील लोकांविषयीं लिहितांना ते फार मनोविकारवश असतात. त्यांचीं मनें बेताल असून त्यांवर विवेकाचें दडपण फारच थोडें असतें, इत्यादि प्रकारें लिहिण्याची फार दुष्ट खोड लागलेली आहे, ती या नाटकाच्या अभ्यासानें व यांत दाखविलेल्या समतोल मनोविकारानें बरीच दूर होईल, अशी आशा करण्यास बरीच जागा आहे. मालतीमाधवामध्यें अनुरागाचें जे रमणीय, जोरदार, उठावदार व स्पष्ट चित्र काढलेलें आहे, तशासारखें इतरत्र आपणास कोठेंच पहावयास मिळत नाहीं.

येथवर अतिश्रेष्ठ अशा कवींच्या दोन शृंगारप्रधान कृतींतील उत्तमोत्तम गुणांचें कथन केलें. आतां हिंदूंच्या चालीरीती व राजकीय जीवनक्रम ज्यांत प्रतिबिंबित झाला आहे, असें विशाखदत्ताचें मुद्राराक्षस नाटक पाहूं. शहरांतील गजबजाट व कार्यमग्नता, राजकीय व दरबारी कारस्थानामध्यें दिसून येणारी अफाट कल्पकता; आणि सेवकजनांची निस्सीम व स्वामिनिष्ठा इत्यादि प्रकार या नाटकांत परिपूर्ण आहेत. आधुनिक काळांतील कपटनीतीचा प्रख्यात पुरस्कर्ता माकिएव्हेली याला प्राचीन काळांतील आर्यचाणाक्य असें म्हणतात. ह्या आर्यचाणाक्याची राजकीय कणिकनीति ह्या नाटकांत उत्तम रीतीनें दाखविलेली आहे. दुय्यम प्रकारच्या अनेक कथानकांचा उपयोग करून मुख्य कथानक रंगविण्याची अप्रतिम हातोटी यांत दिसून येते. वरील नाटकांच्या खालोखाल मृच्छकटिक, प्रबोधचंद्रोदय, वेणीसंहार, इत्यादि फार चांगलीं नाटकें अगदीं अलीकडील काळापर्यंत निर्माण होत होतीं. ही सुंदर नाटकनिर्माणपरंपरा मुसलमानांच्या ह्या देशावर स्वाऱ्या होऊन त्यांची वस्ती व राज्य या देशांत चालू होईपर्यंत अव्याहत सुरू होती, परंतु पारतंत्र्यशृंखलेनें राष्ट्र शरीर जखडून

गेले म्हणजे मनसुद्धां खुरटूं लागतें व चलनवलन व्यापाररहित पाणी ज्याप्रमाणे नासून जातें, त्याप्रमाणे हे प्रत्यहीं खुरटणारें व जीवनक्रियेच्या जोरदार प्रवाहाच्या अभावामुळे तें रोगट होत जातें म्हणतात. त्याचा उत्तम मासला आपणांस येथें पहावयास मिळतो अस्तु. यापुढे स्वाभाविक प्रेरणेने उत्पन्न होणारी ग्रंथाची वाढ का बंद पडली त्याचे विवेचन येथें अप्रस्तुत होणार आहे. मात्र सुज्ञ वाचकांच्या एवढें ध्यानांत येईल कीं, स्वातंत्र्य नष्ट झाल्याबरोबर स्वतंत्र ग्रंथही उत्पन्न होण्याचें बंद पडलें, व याचें प्रत्यंतर संस्कृत नाटकाच्या अभ्यासावरून मिळणार आहे.

---

# प्रकरण ३ रें.



## गीर्वाण वाङ्मय.

### वीणाकाव्यें.

वीणाकाव्यें रचताना कथासूत्र फारच लहान असल अथवा क्वचित् एखाद्या वस्तूच्या दर्शनानें—उदाहरणार्थ नदी, नाला, मेघावडंबर, पर्वत, नीलशिखरें, धबधबा, पक्षी, कूजित, रम्य उपवन, कोमल बाल, फूल इत्यादि इत्यादि कवीच्या प्रतिभेला धक्का बसून त्यास स्फुरण आलें, तर वर्ण्यविषयाच्या तनुत्वामुळे त्याचीं वीणाकाव्यें फारच लहान होतील व त्रुटितही असतील. आणि श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर म्हणतात त्याप्रमाणे " असल्या वीणाकाव्यामधून कवीच्या प्रतिभेचें तेज चमकून गेलें, तरी त्याच्या मनाचा विस्तार किंवा खोली यांची कल्पना त्यावरून करता येत नाहीं. एका सुवर्णाच्या कणांतील सोनें आणि सबंध सोन्याच्या लगडींतील सोनें हीं कसाला सारखींच भरतील, परंतु सोन्याची लगड पाहून त्याविषयीं जी महत्त्वबुद्धि वाटते ती कसोटीच्या दगडाच्या पृष्ठभागास चिकटलेला एखादा कण पाहून वाटत नाहीं. " हा आरोप अर्थात आधुनिक वीणाकाव्याच्या त्रुटित कवितांवरील होय व तो त्यांना यथार्थपणें लागू पडतो पण आपणास येथें मराठी वीणाकाव्याचें परीक्षण करावयाचें नसून संस्कृत वीणाकाव्य संबंधी पहाणें आहे.

या ठिकाणीं ज्या संस्कृत वीणाकाव्यासंबंधीं लिहावयाचें आहे, तीं 'गीतगोविंद' 'ऋतुसंहार' व 'मेघदूत' होत. हीं काव्यें बरीच विस्तृत असून त्यांतील वर्ण्यविषय चिरपरिणामी आहे (Impressive). ह्या काव्यांचे कर्ते सरस्वतीच्या कंठांतील हारामधील अत्यंत उज्ज्वल रत्नें आहेत. त्यांची कीर्ति आखिल अवनीवर दुमदुमून गेली आहे व त्यांच्या काव्यांनीं जगाच्या सर्व भागांतील विद्वानांस वेड लावलें आहे.

जी गोष्ट प्रथम विचारांत घेणें अत्यंत अगत्याचें आहे ती ही कीं, ह्या जगद्वंद्य काव्याच्या भाषांतरानें त्याची मूळ गोडी कळणें अशक्य आहे. तीं मुळांतच वाचलीं पाहिजेत. नाहीं तर त्यांची यथार्थ कल्पना होणें बाजूस राहून भलताच ग्रह होणें संभवतें. ज्या संस्कृत भाषेत हीं काव्यें रचलेलीं आहेत, ती भाषा अत्यंत मधुर व काव्यमय आहे. हिंदूंचीं हीं वीणाकाव्यें सर्व जगतीतलावर आपल्या अतुल तेजानें व लखलखाटानें केवळ निरुपम अशीं झालेलीं आहेत.

आर्यांच्या विशिष्ट चालीरीति, जीवनक्रम, भावना व चारित्र्य यांचा भाषांतरांत हुबेहूब ठसा उमटणें अशक्य होतें, व त्यामुळें यूरोपियन लोकांना अशा काव्याचें संपूर्ण आकलन होत नाहीं, व त्याची माधुरी चाखणें ही गोष्ट त्यांच्या आवाक्याबाहेरील होते. वरील गोष्टीचीं आपण १।२ उदाहरणें घेऊं, म्हणजे तिची यथार्थता पटल्याशिवाय राहणार नाहीं. 'राम वनवासास निघून गेल्यावर भरत त्याच्या पाठोपाठ जातो व त्यास परत फिरण्याचा आग्रह करतो' ही गोष्ट हिंदूंना इतकी साधी व सहज वाटते कीं, त्याबद्दल कोणासच आश्चर्य वाटत नाहीं; उलट बंधुप्रेमाचें उदात्त उदाहरण म्हणून आम्ही त्याची वाहवा करतों. परंतु "टाल्बाईस् व्हीलर" यासारखे हिंदुस्थानचे इतिहासकार यास ही गोष्ट मानवी मनोधर्माच्या अगदीं विरुद्ध दिसते. रांचवांचिच्याचा व भिन्न संस्कृतीचा हा परिणाम आहे, याखेरीज ह्या आरोपाचें आपण कसें परिमार्जन करणार ? कैकयीला वचनबद्ध झालेला दशरथ, राम वनास जाण्यास निघालेला पाहून जेव्हां धाय मोकलून रडूं लागतो तेव्हां तो हें निव्वळ ढोंग करतो, असा यूरोपियन इतिहासकार व्हीलर याच्या दृष्टीस भास होतो. परंतु हें सुद्धां वर सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थानच्या संस्कृतीचें सर्वस्वी अज्ञान होय. एरवीं इतका तीव्र विरोध कसा उलगडावयाचा ? सबब ज्यास एखाद्या राष्ट्राच्या काव्याचें यथार्थ अध्ययन करावयाचें असेल, त्यानें केवळ शब्द व व्याकरण यांचें ज्ञान

संपादून पुरे करीन म्हटले तर भागणार नाहीं. त्याने त्या राष्ट्रामध्ये राहून तेथील देशस्थिति, आचारविचार, रीतिभाति नैतिक व धार्मिक समजुती आणि ईश्वरज्ञानकल्पना याचें पूर्ण अध्ययन केले पाहिजे व सर्वस्वी तन्मय बनले पाहिजे; तेव्हाच त्यास परकीय काव्याचे पूर्ण आकलन होईल, व त्याच्या शब्दास कांही मोल येईल. नाहीं तर हल्लीं ज्याप्रमाणें आपण पहातों, त्याप्रमाणे केवळ गौरवर्ण हा कांहीं सर्वज्ञतेचा निष्कर्ष नव्हे; एका काळी भारदस्त व प्रमाणभूत म्हणून मानलेल्या ह्या परकीयाच्या [illegible] त्यांच्या कागदाइतकी सुद्धा हल्लीं कोणी किंमत देत नाहीं. स्वतःचा जीव धोक्यात असला, तरीसुद्धा विनय-दृष्टीने आपल्या जिवलग माणसाशीं बोलणे हें लौकिक नीतीच्या आड येते असे वाटल्यास मरण पतकरून अशा प्रकारें बोलणे हे अप्रशस्त असें ठरविण्याच्या अर्थे स्त्रियांना पाहून परकीय पंडितांना काय बरें वाटेल? विनय, आज्ञाधारकपणा, कर्तव्यजागृति इत्यादि बाबतींत हिंदूंच्या कल्पना इतर लोकांप्रमाणे अगदीं सध्या, कामचलाऊ व सोयीच्या स्वरूपाच्या नसून जरा जास्त गुंतागुंतीच्या, क्लिष्ट व गूढ स्वरूपाच्या आहेत. सबब अपूर्ण ज्ञानाने परकीय इतिहासकार व पंडित आम्हांविषयीं बोलताना ज्या चुका करतात, त्यामुळें आमच्या संस्कृतिवर टपका येत नसून उलट पक्षी त्यांची विद्वत्ताच नकली व बेगडी दिसते, असे म्हणणे ओघानेच प्राप्त होते. परंतु एकंदरीत पाहता वीणाकाव्यासंबंधीं यूरोपियन पंडितांचे मत फार उदार व स्तुतिप्रचुरच आहे. त्याचे थोडे मासले खालीं दिले आहेत.

'गीतगोविंद,' हा हयात असलेल्या अत्युत्कृष्ट वीणाकाव्याचा एक सुंदर मासला आहे व त्याच्या सारखे सौंदर्य व माधुर्य दुसऱ्या कोठेंही पहावयास मिळत नाहीं ग्रिफिथ म्हणतो की, "हे काव्य मूळ संस्कृतामधून वाचल्याखेरीज त्याच्या कवितेची समग्र सुस्वरता प्रत्ययास येणार नाहीं." सर विल्यम जोन्स व जर्मन पंडित लासेन, रुकर्ट, श्लेजेल इत्यादिकांनीं या काव्यावर अत्यंत परिश्रम करून ते समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे; त्यापैकीं श्लेजल म्हणतो की, "कोमल व नाजूक भावना आणि Elegaic love याच्या प्रखर प्रभेचे विशाल आवरण हिंदूंच्या काव्यावर पडलेले दिसते." प्रोफेसर हीरेन म्हणतो की, "नियम-कपणा व अनुप्रास ह्या बाबतींत ग्रीक वीणाकाव्ये हिंदूंच्या वीणाकाव्याबरोबर केव्हाच तुलनेत टिकणार नाहींत. गद्य भाषांतराने मूळकाव्याच्या रूपाची केवढी हानि होते याचे वर्णन करणे अगदीं अशक्य व अस्थानीं आहे. परंतु असे गद्य

भाषांतर वाचून सुद्धा "गीतगोविंदाचा" परिणाम मनावर झाल्याशिवाय रहात नाहीं. अशा भाषांतरात सुद्धा कवीच्या कल्पनेची अत्यंत विपुलता व सुंदर, मोहक वस्तूंच्या विषयीं असलेली तीव्र, निर्दोष व कोमल लालसा यांचे जोरदार व रसरशीत वर्णन आपणास पदोपदीं दिसून येते.

ऋतुसंहार हें दुसरें वीणाकाव्य असून त्याचेवर ग्रिफिथ, मिसेस मॅनिंगबाई, सर विल्यम जोन्स, हंटर प्रभृति पंडितांनीं फार व्यासंग केला आहे. त्यापैकीं जोन्स म्हणतो कीं, "सृष्टिविषयक सुंदर व हुबेहुब वर्णनांनीं हे काव्य भरलेलें असून त्याचे माझ्या हातून पूर्ण भाषांतर होत नाहीं, याबद्दल वाईट वाटते." वीणकाव्याची कला आर्यावर्तांत फारच पूर्णावस्थेस गेली होती. सर हंटर म्हणतो कीं, "मध्ययुगांतील ब्राह्मणांनीं ईश्वरस्वरूपज्ञान ( theology ) वीणाकाव्यें इत्यादि बाबतींत विस्मयकारक दीर्घोद्योग केलेला आढळतो." एकंदरींत मॅनिंग बाईच्या मतें हिंदूंनीं जें "प्रेमवृत्तीचें कित्येक स्थलीं नाजूकपणें व कित्येक स्थलीं फार जोरदारपणें वर्णन केलें आहे, तें तर केवळ अपूर्व होय."

वर्णनपर काव्याचा मेघदूत हा उत्तमोत्तम मासला होय.

मॅनिंगबाई म्हणते कीं, "असल्याप्रकारच्या काव्यामध्यें हे फारच महत्त्वाचें आहे व सर्व यूरोपियन लोकांना तें फार आवडलें आहे."

शेवटीं प्रोफेसर विल्सनसाहेबाचा अभिप्राय देऊन विराम पावणें बरें. मेघदूतामध्यें समासाचा भरणा बराच आहे; परंतु तेणेंकरून त्यांत कसलाही दोष आलेला नाहीं व एकंदर वाक्यरचना अगदीं साहजिक व सरळ आहे. सुस्वरपणा व भारदस्तपणा यांचे विलक्षण संमिश्रण मेघदूताच्या वृत्तानें फारच उठावदार व गोड झालेलें आहे. कोणत्याही मृत अथवा चालू भाषेमधील समवृत्तविषयक काव्याशीं या मेघदूत काव्याची तुलना केल्यास हें सर्व तऱ्हेनें श्रेष्ठ ठरेल यांत तिलप्राय शंका नाहीं.

---

## नीतिबोधपर काव्यें.

कथासरित्सागर, वेतालपंचविशी, सिंहासनद्वात्रिंशती, शुकसप्तति, हितोपदेश, पंचतंत्र इत्यादि जीं नीतिबोधपर काव्यें आर्यपुरुषांनीं रचलीं, त्यावरून त्यांची लोकोत्तर बौद्धिक श्रेष्ठता सर्व जगाच्या निदर्शनास आली आहे. वाङ्मयाच्या सर्व बाजूंबरोबर याही भागाची आर्यांनीं केलेली वाढ पाहून सर्व जग आश्चर्यानें तोंडांत बोटें घालीत आहे. या वाङ्मयानें यूरोप, अमेरिका इत्यादि जगाच्या

दूर कोपऱ्यात असलेल्या प्रदेशांत सुद्धां प्रवेश केला आहे, व यांची तेथील लोकां-वर पडलेली छाप व त्यांच्या मनावर बसलेला जबरदस्त अम्मल पाहिला. म्हणजे या काव्यजनकाच्या बुद्धीच्या सर्वग्राहकतेचें कौतुक करावें तेवढें थोडेंच असें वाटतें.

प्रोफेसर विल्सन म्हणतो कीं, सुस्थितींत असलेल्या व उत्कर्षाभिमुख समाजा-मधील लोकांचे खाजगी व सार्वजनिक व्यवहार सर्व बाबतींत सुयंत्रित चालून समाजाचा सर्व बाजूनें उत्तम विकास व्हावा याकरितां कांहीं तरी नीतिनियमांची जरूरी असते व याकरितां अनेक शास्त्रशाखांपैकीं त्याची एक स्वतंत्र शाखाच करावी लागते. अशा प्रकारची नीतिशास्त्राची उभारणी संस्कृतामध्ये सुरस कल्पित कथांवर केलेली आहे व त्यायोगें दररोजच्या व्यवहारामधील वर्तन कसें असावें याबद्दल सुंदर उपदेश केलेला आहे. अशा प्रकारच्या कल्पित कथांमध्ये राजपुत्र, राजकन्या, मंत्री, साधु, यति व कित्येक ठिकाणीं अगदीं हलके लोक, पशुपक्षी इत्यादिकांमध्ये संभाषणाचे प्रसंग मोठ्या चातुर्यानें घालून त्यायोगें राजपुत्र, दरबारी लोक व साधारण व्यवहारांतील माणसें यांनीं कसें वर्तन ठेवावें याचें फार मार्मिक विवेचन केलेलें आहे या गोष्टींचे विषय वर सांगितलेले आहेत तेवढेच नसून आंतरराष्ट्रीय संबंध, साम, दान, भेद, दंड, जीवनयात्रेंतील निरनिराळ्या अडचणी व प्रसंग इत्यादि कालचक्राच्या परिक्रमणामध्यें आपण कसें वागावें, धर्म कोणता, अधर्म कोणता, कर्तव्य काय इत्यादि बाबींची चर्चा गोष्टीरूपानें व सहज रीतीनें बोधप्रद करण्याची हिंदूंची हातोटी कांहीं अजब आहे खरी."

हल्लींच्या दळणवळणाच्या साधनविपुलतेमुळें व इंग्लिश भाषेसारख्या जगमान्य भाषेच्या योगानें दुसऱ्या राष्ट्रांत अशा प्रकारचें वाङ्मय कसकसें वाढत गेलें आहे हें समजणें फार सोपें झालें आहे. इतर राष्ट्रांतील अशा प्रकारचें वाङ्मय भाषा-तरावरून वाचलें असतां एक चमत्कारिक गोष्ट आमच्या प्रत्ययास आल्यावाचून रहात नाहीं; ती अशी कीं, त्यांतील पुष्कळशा कल्पना, प्रसंग व पात्रें हीं आमच्या कथांमधूनच घेतलीं आहेत असें वाटतें व कित्येक ठिकाणीं तर शब्दशः अनुवाद केलेला आढळतो. तर हें असें कसें झालें आमच्या गोष्टींवर परप्रांतांतील अथवा देशांतील समजुतींचा चालीरितींचा, कल्पनांचा, देशपरिस्थितींचा पोषाख कसा चढला; आमच्या समाजांत तरुण मुलांमुलींकरितां जो उपदेशपर, मनोरंजक व चटकदार कथासंग्रह तयार झाला होता तो यूरोप अगर अमेरिका यासारख्या दूरदूरच्या देशामध्यें जाणें संभवनीय आहे काय. इत्यादि विचार परकीय देशां-तील याच प्रकारच्या वाङ्मयाचा अभ्यास सुरू केला असतां डोक्यांत घोळूं

लागतात व पूर्ण विचारांती ही गोष्ट शक्य आहे असें आपणास मानण्यास काही हरकत वाटत नाहीं व ही गोष्ट आपण प्रत्यक्ष प्रमाणांनीही सिद्ध करूं, परंतु असें करण्यापेक्षा परकीय भाषेंतील पंडितांची जर कबुली मिळाली तर आपल्या संशयाचे आपाआप निरसन होईल व त्यांनीं आपल्या पूर्वजाविषयीं सकौतुक व आदरपूर्ण काढलेले उद्गार वाचले म्हणजे धन्यताही वाटेल व थोडीबहुत स्वाभिमानाची स्फूर्तीही होईल; याकरिता त्यांचेच अभिप्राय येथे देणे जास्त श्रेयस्कर आहे.

पंचतंत्र हा कल्पित गोष्टींच्या वाङ्मयामधील अत्युत्कृष्ट ग्रंथ आहे. केवळ हिंदुस्थानातच हा सर्वोत्कृष्ट ठरला आहे असें नसून जगाच्या कल्पित कथा-वाङ्मयामध्यें सुद्धां हा अपूर्व असल्याने सर्व विद्वज्जनास त्याने माना तुकवावयास लाविल्या आहेत. सर्व जगांतलि कल्पित गोष्टी याच ग्रंथाच्या कमिअधिक आधारानें रचलेल्या आहेत असेही म्हणावयास हरकत नाही. एलफिन्स्टन म्हणतो की, " कल्पित गोष्टी व इतर प्रकारच्या नीतिपर कथा रचण्याच्या कामीं हिंदु लोक सर्व जगाच्या गुरुस्थानीं बसण्यास सर्व प्रकारें योग्य आहेत असें दिसते. पाश्चात्य राष्ट्रांत अत्यंत पुराणकालीन गोष्टी म्हटल्या म्हणजे बिडपाईच्या. परंतु त्याचें काळजीपूर्वक निरीक्षण केलें असता असें दिसते की भाषा खेरीज करून विचार, कल्पना इत्यादि बाबतींत त्या सर्व तऱ्हेने हिंदीच आहेत. यूरोपियन भाषेच्या झिरझिरित पोपाखातून त्याचे स्वाभाविक हिंदी रूपच जास्त स्पष्टपणे नजरेत भरते.

कोलब्रुक, बॅरन् डी सासी, प्रो विल्सन इत्यादि पंडितांनी अत्यंत परिश्रमपूर्वक असें सिद्ध केले आहे की, यूरोपांतील सर्व देशाच्या कल्पित नीतिबोधपर वाङ्मयांत ज्या ज्या गोष्टी कथन केलेल्या आहेत त्या कमिजास्त प्रमाणात बिडपाईच्या गोष्टींचा भिन्न भिन्न रूपेच होत व पर्यायानें अर्थात त्याचाही अपत्यसंबंध पंचतंत्राशींच येतो.

डॉ. सर डब्ल्यू हंटर म्हणतो की, " इसॉपच्या काळापासून आज तागायत पाश्चात्य राष्ट्रांमध्ये प्राण्यासंबंधी ज्या गोष्टी प्रचलित आहेत त्याचे मूलस्थान हिंदुस्थानातच आहे. ग्रीक भाषेंतील सिंह व खोकड यांची जी गोष्ट आहे ती वस्तुस्थितीस धरून नाही; परंतु संस्कृतामधील सिंह व कोल्हा याच्यामधील संबंधाचा आधार घेऊन त्यावर ती रचलेली आहे. पंचतंत्राचे प्रथम भाषांतर प्राचीन इराणी भाषेमध्यें झाले आणि त्यावरून आशियामायनर व यूरोप यांतील देशाच्या भाषांत

त्याचीं निरनिराळीं रूपांतरें झालीं. हिंदुस्थानांत अत्यंत प्राचीन काळीं निरनिराळ्या प्राण्यांवरून ज्या कल्पित गोष्टी रचिलेल्या आहेत त्याच सांप्रत काळीं इंग्लंड व अमेरिका या देशांतील प्रत्येक घरांत लहानपणीं मोठ्या प्रेमानें मुलास सांगितल्या जातात. वनदेवता, अप्सरा, यक्ष, किन्नर इत्यादि देवकोटींतील उपदेवतांवरून ज्या गोष्टी बसविलेल्या आहेत त्यांत हिंदूंच्या बुद्धिप्रभावाचें सुंदर चित्र उमटलेलें आहे, व इराण, अरबस्थान आणि ख्रिस्तधर्मीय देश यांच्या वाङ्मयांत पुढें ज्या अशाच प्रकारच्या गोष्टी गुंफल्या गेल्या त्यांच्या मातृस्थानीं संस्कृतांमधील मूळ गोष्टीच आहेत."

प्रो. मॅक्समुल्लर म्हणतो कीं, "इराणचा राजा खुस्रु नौशेरखान (५३१–५७९) यानें बारझोईनामक आपला राजवैद्य पाठवून पंचतंत्राचें पल्हवी भाषेमध्यें भाषांतर करविलें." आणि मॅनिंगबाईच्या मतें जगांतील साधारण विख्यात भाषेमध्यें ज्या ज्या म्हणून बोधपर गोष्टी आहेत त्या सर्व हितोपदेशांतून घेतलेल्या आहेत. हिंदुस्थान व ग्रीस या दोन देशांमधील कल्पित गोष्टी बहुतेक एकाच ठिकाणीं उगम पावलेल्या आहेत; त्यावरून त्या किती प्राचीन काळीं रचल्या गेल्या असतील याची कोणासहि सहज कल्पना येईल. " वर ज्या प्रकारच्या गोष्टीसंबंधानें ऊहापोह केला त्याच प्रकारच्या परंतु थोडा विषय बदलून वनदेवता, यक्षिणी, डाकिणी यासंबंधीं अद्भुतरसानें भरलेल्या गोष्टीहि संस्कृतवाङ्मयांत फार आहेत; आणि त्यामध्यें हिंदूंच्या सुविकसित बुद्धीची विशिष्ट चारुता व विचारकौशल्य हे गुण फारच ठळकपणानें दृष्टीस पडतात." असें प्रो. वेबर लिहितो. शेवटीं पंचतंत्रासंबंधीं आणखी एकच अभिप्राय नमूद करून आपण इतर ग्रंथाकडे वळूं.

मॅनिंगबाई म्हणते कीं, "पंचतंत्रांतील प्रत्येक गोष्टींत ऐहिक जीवनक्रमांतील विविध प्रसंगाचें सोदाहरण उपपादन केलेलें आहे अथवा आचारधर्मांतील निरनिराळीं तत्त्वें घेऊन तीं गोष्टीरूपानें शिकविण्याचा फारच नामी प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें ह्यांतील गोष्टी असंबद्ध रीतीनें व अव्यवस्थितपणें मांडलेल्या नसून त्यांची एका विशिष्ट क्रमानें व हेतूनें मांडणी केली असून एकांतील कथासूत्र दुसऱ्यांत गोवून दिलेलें आहे. अथवा कांहीं तत्त्वें अनेक कथांच्या साखळीनें एकत्र केलेलीं आहेत व त्यांचें प्रतिपादनही क्रमप्राप्त व पद्धतशीर आहे असें आढळून आल्याशिवाय रहाणार नाहीं."

'आरबी भाषेतील सुरस गोष्टी' या पुस्तकाचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास असें आढळून येईल कीं, त्या पुस्तकांतील गोष्टी जरी इराणी विशिष्ट पेहरावांत व चालिरीतींनीं रंगलेल्या अशा दिसल्या तरी मुळांत त्या हिंदीच आहेत व त्यांतील विचारांचा एकंदर रोख व कल्पनाचें मूळस्वरूप भारतीयच आहे. काउंट जॉनस्टर्नी व लासेन ह्या पंडितद्वयाचें असेंच मत असून त्यापैकीं पहिला म्हणतो कीं, ह्या पुस्तकाचें संस्कृत नांव बृहत्कथा असें आहे. प्राच्यविद्याकोविदांनीं 'अरेबियन नाइट्स' बद्दल असें सप्रमाण सिद्ध केलें आहे कीं, त्याचा मूळ उगम संस्कृतवाङ्मयातून झालेला आहे आणि हें संस्कृतवाङ्मय इराण, अरबस्थान वगैरे देशांत कसें व कोणी नेलें याबद्दलहि ऐतिहासिक भरपूर पुरावा आहे. परंतु एवढ्यावरच न थांबतां अंतःप्रमाणावरून असें सिद्ध करतां येईल कीं, या प्रकारच्या वाङ्मयशाखेचा धडा प्राचीन आर्यावर्तानें सर्व जगास घालून दिलेला आहे. अर्थात् हिंदुस्थानाकडे गुरुपणाचा मान येणें हेंही अगदी साहजीक आहे. जरी कोणी विकारवशतेनें अथवा सांप्रतच्या सुस्थितीनें, भरभराटीनें, विद्याधनमदानें, हिंदुस्थानच्या दुःस्थितीमुळें व पडत्या काळामुळें ही गोष्ट छपवून ठेवली व आपल्या ज्ञानाचा टेंभा व संस्कृतीची दिवटी सर्व जगभर नाचावण्याचा प्रयत्न केला तरी त्याची ती घमेंड प्रत्यक्ष प्रमाणापुढें जिरलीच पाहिजे. 'अरेबियन नाइट्स' मध्ये टिटवीच्या जोडप्याची जी गोष्ट आहे तीवरून वरील विधानास फारच पुष्टि मिळते. अरेबियन नाइट्समध्यें ही गोष्ट आहे काय? आरबीभाषेंत टिटवी हा शब्द आहे; परंतु त्याचा मूलार्थ काय, तो कोणत्या शब्दापासून सिद्ध झाला ह्याचा काहीच समाधानकारक तपास लागत नाहीं. परंतु संस्कृतमधील टिट्टिभ शब्दशीं त्याचें निकट साम्य दिसतें. बंगाली टिटिव व हिंदुस्थानी टिटेहरी हीं रूपें जशीं टिट्टिभ शब्दाचीं अपभ्रष्ट आहेत त्याचप्रमाणें टिटवी हें सुद्धां असेल असें मानण्यास हरकत नाहीं. दुसरी गोष्ट कलाल व दम्न ही घेतली तरी हें नांव सुद्धां संस्कृत नामाशीं बरेंच जुळत आहे. बरोबर उच्चार काय आहे? पंचतंत्रातील गोष्टींत बैलाचें नांव 'संजीवक' असें असून त्याचें आरबीमध्यें 'शान्झेबेह' असें रूपांतर झालें असलें पाहिजे; आणि कोल्ह्याचीं नांवें करटक, दमनक अशीं आहेत त्यापासून कलाल दम्न अशीं रूपें होणें अगदीं साहजीक आहे.

अहंमद व प्यारीबानू या गोष्टींतील प्यारीबानू हा शब्द हिंदी नाहीं असा कोणासच संशय येणार नाहीं. हुसेन राजपुत्राला नूरन निहरची प्राप्ति होण्या-

करिता अशी एक अट होती की, त्यानें आजपर्यंत माहित नसलेली अशी एकादी अद्भुत व लोकविलक्षण वस्तु पैदा करावी; याकरिता तो भटकत असतां अत्यंत धनाढ्य व लोकांनीं अतिशय गजबजलेल्या अशा विसानगर नामक शहरीं तो येऊन पोंचला. या गोष्टींतील ' विसानगर ' शहर हे हिंदुस्थानांत नसेल असे कोणालाहि म्हणता येणार नाहीं.

डेस्लॉगशॅम्पस म्हणतो कीं, " सिंदबाद दर्यावर्दी याची गोष्ट मूळची संस्कृतच आहे; आणि त्याशिवाय पुढे दिलेल्या तीन गोष्टी याही मुळांत संस्कृतच असल्या पाहिजेत. ( १ ) आरबी राजा, राजपुत्र, खुशामत्ये व सात वजीर ( २ ) हिब्रूभाषेंतील सेंडेबारची गोष्टीरूप अद्भुत कथा ( ३ ) ग्रीकभाषेतील सिंटीपासची काल्पतकथा. दुसऱ्या गोष्टीच्या आधारें रोमनभाषेत लिहलेले " सातसाधु " नामक पुस्तक तीन शतकें फार लोकप्रिय झालेले होते. "

प्रो. विल्सन असे लिहितो कीं, " ब्रिटिश म्युझिअममध्ये सेंडेबारच्या गोष्टींच्या पुस्तकाची हस्तलिखित प्रत होती. त्याला लाटीन भाषेत लिहिलेल्या ज्या टिपा जोडलेल्या होत्या त्यांत असे स्पष्ट म्हटलेले होते कीं, हे पुस्तक हिब्रभाषेंत आरबी अथवा इराणी यांपैकीं एकांमधून भाषांतरित केलेले आहे. परंतु आरबी व इराणी भाषेमध्ये जेव्हा ते लिहिण्यात आले तेव्हा त्यास आधार संस्कृताचा हिंदी भाषेतून घेतलेला होता अशी या पुस्तकाची थोडक्यात पूर्व-पीठिका आहे. "

मसूदी नामक प्रख्यात आरबी लेखकानें आपल्या 'मिराजुल झेहब' नावाच्या पुस्तकांत एक प्रकरण हिंदुस्थानांतील प्राचीन राजे या विषयाला खर्ची घातले आहे; त्यांत तो लिहितो कीं, कुरुश राजाच्या समकालीन सिंदबाद नामक हिंदू तत्त्वज्ञानी होता व त्यानें " सात वझीर, अध्यापक, राजपुत्र व राणी " या नावाचें एक पुस्तक लिहलें होते आणि यावरूनच सिंदबाद दर्यावर्दी याची गोष्ट लिहिलेली असली पाहिजे.

प्रो. विल्सन यानें ' सिंटीपास, ' ' सेंडेबादचे दृष्टान्त ' या पुस्तकाचें मनो-रंजक विवरण करून ती सुद्धा आर्यांच्याच मेंदूरूप खाणीतून निघालेली आहेत असे सिद्ध केले आहे. याखेरीज आणखीही पुष्कळ पुस्तकांचें माहेरघर हिंदुस्था-नच आहे असे त्यानें सप्रमाण दाखविले आहे. सर जॉन मालकम् म्हणतो कीं, " प्राच्य राष्ट्रांत ज्यांचीं नांवें बुद्धिप्रकर्षाबद्दल सर्वतोमुखीं झालेली आहेत अशा कवींनीं आपल्या बुद्धीची सर्व करामत नीतिबोधपर कल्पित कथा रचण्यांत खर्ची

घातलेली आहे; व ज्या नीतितत्त्वांचा पुरस्कार करण्याची त्याची इच्छा होती त्याच्या सौंदर्यांत इतकी भर घालून त्यावर असे सुंदर ग्रंथ रचले कीं, जगांतील प्रत्येक देशाच्या पुस्तकसंग्रहालयात त्यांचा प्रवेश होऊन त्यास फार उच्च स्थान मिळाले आहे. "

सोनारानें कान टोचले म्हणजे हूं का चूं होत नाहीं; सर्व कांहीं मुकाट्यानें चालतें. त्याचप्रमाणें पाश्चात्य ग्रंथकारांनीं स्पष्ट दिलेले कबूलीवजा अभिप्राय वाचले म्हणजे आम्हामधील आत्मनिंदकांचीं निदान तोंडे तरी बंद होतात व ज्यांचे ठिकाणीं स्वाभिमान सुप्तावस्थेत असतो त्यास अशा प्रयत्नानें जागृत केल्याचें श्रेय मिळते व उद्दिष्ट हेतु थोड्याबहुत अंशानें साध्य होतो. म्हणून वर दिलेला मार्ग आम्ही मुद्दाम पत्करला, जरी त्यायोगें त्यास उच्छिष्टत्वाचे किंचित् स्वरूप आलें तरी पत्करले; परंतु दुष्काळात जिवावर प्रसंग आला म्हणजे नेहमींचे सर्व नीतिनियम बाजूस ठेवून प्रथम आत्मसंरक्षण करावें लागते. त्याचप्रमाणे हल्ली आपल्यामध्ये स्वाभिमानाचे व आत्मनिष्ठेचे प्राणोत्क्रमण सुरू असता त्यास वर दिलेल्या जलपानाच्या घुटक्यांनीं शुद्धीवर आणले म्हणजे क्षणभर उच्छिष्टत्वाचा आरोपसुद्धां पत्करण्यास दिक्कत वाटत नाहीं; याच हेतूनें वर भरपूर उतारे घेतलेले आहेत व त्यावरून वाङ्मयाच्या या शाखेमध्ये आर्यांच्या बुद्धीनें केवढी अलौकिक कामगिरी बजावली आहे हें स्पष्ट दिसून येईल. प्राचीन, अर्वाचीन, यूरोपीय अथवा आशियामधील कोणत्याही राष्ट्रानें केव्हांहीं अशा प्रकारचें बुद्धिकौशल्य, रचनानैपुण्य, उपदेशलालसा आणि नीतिप्रेम यांचें प्रदर्शन पुष्कळ ग्रंथ रचून त्यांत केलेलें दिसत नाहीं.

प्रो. हीरन म्हणतो कीं, " हिंदूंच्या काव्यात नीतीची जी मजेदार शिकवणूक आहे तशी अन्यत्र कोठेही पहावयास मिळत नाहीं. या जगात नवीं नवीं तत्त्वें शिकणे व शिकविणे हेंच मानवजातीचें पवित्र कार्य आहे. अखिल जीवनावधीत हीच आमची इतिकर्तव्यता आहे आणि ऐहिक जीवनाचें हेंच रहस्य आहे; हें आर्यांनीं जसें ओळखिलें तसें इतर कोणीही ओळखिले नाहीं.

---

## पुराणें.

उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयामध्ये पुराणांनीं फारच मोठें स्थान पटकाविलें आहे. यातील विषय एकच नसून नानाविध आहेत. त्याची मुख्य कामगिरी धार्मिक बाबतीत दिसून येते. ईश्वरविषयक चर्चा, ईश्वरोत्पत्ति, निरनिराळे अव-

तार, सृष्ट्युत्पत्ति, नीतिबोधचर्चा व धार्मिक प्रवचनें इत्यादि विषयांचें विवेचन यांत केलेले आहे. हिंदुलोक या ग्रंथांस श्रेष्ठ धार्मिक ग्रंथ असें मानतात. परंतु खरोखर पहाता यांस संस्कृत ज्ञानकोष हेंच नामाभिधान बरोबर शोभेल. परमेश्वरस्वरूपज्ञान, ( ईशस्वरूपज्ञान ) प्राचीन कथा, इतिहास, युद्धनीति, राजनीति, तत्त्वज्ञान, भौतिक शास्त्रें, ( विज्ञान ) कला इत्यादि विषय प्रसंगाप्रसंगानें सुबोध व रसाळ भाषेत यांत प्रतिपादलेले आहेत. वर दिलेल्या विषयाची चर्चा अत्यंत भारदस्तपणें केलेली जरी यात आपणास दिसते तरी वेदांचे महत्त्व या ग्रंथास केव्हाही देता येणार नाहीं. परंतु आर्य जातीच्या अवनतीचा काळ जसजसा डोकावूं लागला, अ यांच्या प्राचीन उदात्त कल्पना, जोरदार व तेजस्वी प्रार्थना व अत्यंत तेजस्वी अशा अंतःकरणात उचंबळणाऱ्या सर्व विषयांसंबंधी कल्पना व विचार जसजसे खुरटत जाऊन त्याचा भरधाव ओघ ओसरूं लागला आणि साधी रहाणी व विशाल विचारसरणी हा त्याच्या जीवन–क्रमातील मनोधर्म नष्ट झाला तेव्हा ते पुराणाना जास्त महत्त्व देऊं लागले. वेद, उपनिषदे या दिव्य ज्ञानाच्या खाणीतून अमूल्य विचाररत्नें काढण्याची शक्ति जसजशी कमी होत गेली तसतशी या ज्ञानकोशरूपी पुराणावर जास्त जास्त भिस्त ठेवणें बरें असे त्यास वाटूं लागलें. व कालातराने विचार करण्याची, स्वतंत्र स्फूर्तीने ग्रंथ रचण्याची आणि मूळ असलेलें अवलोकन करण्याची हिंमत पूर्णपणे नाहींशी झाली व पुराणें सर्व वैदिकधर्माचें रहस्य होऊन बसलीं. वेदातील देवता मागे पडून नवीन नवीन देवता पुराणात घुसूं लागल्या. त्याची उन्नति, त्याची अन्योन्यश्रेष्ठता, त्यांची वर्गवारी, त्यांच्या आवडीनिवडी, इत्यादि गोष्टी, त्याचप्रमाणें व्रतें, वैकल्ये, नेमधर्म, यात्रा, जत्रा, या गोष्टींस फाजील महत्त्व चढून खरा धर्म मागें पडला. या नवीन बोजड परावलंबी आचारविशिष्ट व कर्मकांडात्मक धर्माने मूळच्या अध्यात्मिक व शास्त्रशुद्ध वैदिकधर्मास हुसकून लावून जिकडे तिकडे आपला अंमल बसविला. समाजशास्त्र, पौराणिक कथा, ईशस्वरूपज्ञान इत्यादि प्रकारानीं बनवलेली पुराणें ही एक गोधडीच आहे असे वाटल्याशिवाय रहात नाहीं.

परराष्ट्रांतील लोकांच्या टोळधाडी जेव्हा हिंदुस्थानावर पडूं लागल्या तेव्हा तत्कालीन नेत्या पुरुषाना असें वाटलें कीं आपली क्रियाकर्मे बरोबर चालणें अशक्य आहे; वेद, उपनिषदें इत्यादि ज्ञान लुप्त होऊन जाणार; अधर्म प्रबल होणार; सर्व राष्ट्र क्षत्रियकामामध्यें गढून गेल्यामुळे देवदेवतादिकांची पूजाअर्चा

बरोबर होणार नाही. सबब ह्या कारणानें होणारा ईश्वरीकोप टाळावा आणि अपौरुषेय वेद व परंपरागत संचित झालेलें ब्रह्मज्ञान यांचें योग्य संरक्षण व्हावें म्हणून त्यांनीं हें काम ब्राह्मणवर्गाकडे सोपविलें. हें काम फार जोखमीचें, मेह-नतीचें, बुद्धिमत्तेचें, दृढनिश्चयाचें, असल्यानें ब्राह्मणाखेरीज तें उचलण्यास कोणी पुढें झाला नाही हें साहजिक आहे. कामाच्या रंगरूपाप्रमाणें तें अंगावर घेणा-ऱ्याच्या ठायीं तत्सिद्ध्यर्थ व तत्पोषक गुणही असावे लागतात. अर्थात् ते गुण त्याकाळीं ब्राह्मणाचे ठायीं असल्याशिवाय इतर वर्णांनीं तें त्याच्याकडे सोपविलें असें म्हणता येणार नाहीं. ब्राह्मणांनीं ते काम फार चोख रीतीनें बजाविलें याबद्दल सर्व जग आज त्यास धन्यवाद देत आहे. व केवळ त्याच्याच परिश्रमानें जगातील अत्यंत प्राचीन धर्म आपल्या सर्व धर्मग्रंथासह व तत्त्वज्ञानग्रंथासह आज हयात असून आजपर्यंत अनेक धर्मप्रवर्तकाना त्यानें स्फूर्ति देऊन जगामध्ये नवीन ज्ञानाची भर घातली आहे. लोकानीं वेळोवेळीं नवीन धर्मसंस्थापनेच्या रूपानें मनःशुद्धि केली आहे व आपण शेवटीं सर्व जगातील अर्ध्यापेक्षा जरा कमी लोकाचा मोक्षमार्ग बनून शिवाय जगास आज तत्त्वज्ञान शिकवीत आहे. धन्य आहे तुझी आर्यधर्मा ! असंख्य कालचक्राच्या फेऱ्यातून सुटून तुझें मूळ रूप इतकें विशुद्ध व इतकें तेजोमय कसें राहिलें, म्हणून आज सर्व जग आश्चर्यानें तोंडात बोट घालीत आहे. परंतु या कामीं तत्कालीन ब्राह्मणाचे निरपेक्ष श्रम, श्रद्धा, ऋचिर्भूतपणा इत्यादि कडकडीत गुणच कामीं आले यात संशय नाहीं. अशा गुणिजनाना इतर वर्गातील लोकांनीं मान दिला व देवासमान मानिलें म्हणून कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु मनुष्यानें ही मर्त्यभूमि जोंपर्यंत सोडली नाहीं, तोंपर्यंत त्यास अखंड देवत्व येणें अशक्यच आहे. याच न्यायानें कांहीं कालांतरानें मूळच्या तेजस्वी, कडकडीत, तपोनिष्ठ, व स्वाध्यायरत ब्राह्मणांचे वर निर्दिष्ट केलेले गुण लोपले व त्याचे ठिकाणीं स्वार्थाची पुंजी वाढत चालली स्वार्थ व परार्थ हे पूर्वपश्चिम दिशांप्रमाणें अगदीं भिन्न असल्यानें स्वार्थाची सरशी होण्या-बरोबर परार्थानें मागें पाय काढला व त्याबरोबरच तदनुषंगिक दैवी व सात्त्विक गुण अस्तंगत झाले. परंतु चमत्कार असा झाला कीं, पूर्वकालीन ब्राह्मणांचा दरारा, वचक व वजनही समाजात कायम राहून गुण मात्र तेवढे नष्ट झाले; तेणेकरून उत्तरोत्तर स्वार्थाची बेसुमार वाढ होऊन ब्राह्मणांनीं इतर वर्णांतील लोकांच्या हयगयीपणामुळें ह्या ब्रह्मज्ञानाचा ठेवा आपल्याकडे ठेवून दिला. मनु-ष्याचा स्वभावच असा आहे कीं, त्यास देणें व दुखणें ही दकाराची दुक्कल नको,

असते. तशांत ब्राह्मणांनीं हा ठाव परिश्रमानें संपादन केलेला, जतन करून वाढविलेला, तेव्हां त्याबद्दल त्याचे ठिकाणीं ममत्व उत्पन्न होऊन त्यावर परक्यांनीं हक्क सांगू नये असें वाटणें मनुष्यस्वभावास धरूनच आहे. दुसरें कारण असें आहे कीं, हें वेदपठनाचें काम अत्यंत दगदगीचें, सोशिकपणाचें, निष्कामाचरणाचें, व किफायत तर मुळींच नाहीं; तेव्हां इतर वर्णांनीं तिकडे दुर्लक्ष केलें यातही कांहीं मुळीच्कमार सांडून आहे असें नाहीं; कोणी म्हणतील कीं, जर ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरु असे मानले जात होते, तर त्यांनीं गुरुच्या ठिकाणीं असणाऱ्या शिष्यप्रेमानें इतर वर्णांस त्यांनी न विचारतां हें अध्यापनाचें काम करावयास पाहिजे होतें; व सर्वांस सारखेंच सज्ञान ठेवावयास पाहिजे होतें. परंतु हें म्हणणें अगदीं अनुचित आहे. कारण ‘ शीक ’ ‘ शीक ’ म्हणून पाठीस लागल्यानें कोणी शिकत नसतो व जेव्हां हें गुरुपण एकाद्या वर्णाकडे असतें तेव्हां त्या संबंध वर्णानें इतर वर्णांस शिकावण्यासाठीं त्याच्या पाठीस लागावें हें सयुक्तिक दिसत नाहीं.

अशा रीतीनें इतर वर्णांची हयगय व ब्राह्मणाचा वाढता स्वार्थ याचा परिणाम असा झाला कीं, ब्राह्मणास हें ज्ञान म्हणजे खासगत मालमत्ता असें वाटूं लागलें; व त्याची पूर्ण मालकी पुढें या उभयविध कारणांनीं त्याचेकडेच राहिली. पुढें चालीरीतींचे अभेद्य तट पडून विचारसरणीही दूषित झाली आणि निकृष्टवर्गांनीं वेदविद्येचा अभ्यास करूं नये अशी समाजांत दुष्ट चाल पडली. मात्र याला कारण सर्वस्वीं ब्राह्मणच होते असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं.

पुराणाचा जरी कोणीं वर वर अभ्यास केला तरी सुद्धां त्यास त्यांतील रहस्य कळून आल्याशिवाय रहाणार नाहीं व त्याची वास्तविक योग्यता केवढी आहे हेंही सहज प्रत्ययाला येईल. तरी अशा पुस्तकांचा योग्य अभ्यास होऊन त्यांतील ज्ञान सर्व जनतेला मिळावें हेंच सर्वांचें म्हणणें असणार दुसरें काय?

जगाच्या सुधारणेचा गाडा फार भरधाव सुटला आहे. विचारांत भयंकर क्रांति होऊन एकंदर जीवनक्रमाला फार निराळें वळण मिळालें आहे पूर्वींच्या कल्पना व आचार आतां अक्षरशः पाळणें अशक्य असून तसें करण्याचा कोणी अविचार केल्यास त्याचें अपरिमित नुकसान झाल्याशिवाय रहाणार नाहीं. हिंदुस्थान देश निसर्गतःच सर्व बाजूंनीं नैसर्गिक मर्यादांनीं परिवेष्टिलेला आहे, आणि त्यांत शास्त्रांनीं परदेशगमन बंद केलें! देश धनधान्यसमृद्ध असून सर्व तऱ्हेनें आत्मतंत्र व स्वावलंबी असा होता तेणेंकरून लोकांस बाहेर जाणें अवश्य नव्हतें. परंतु

सांठलेलें फार खोल पाणी सुद्धां बिघडतें, तशी स्थिति या भारतभूची झाली! लोक अडाणी, व संकुचित दृष्टीचे झाले; दळणवळणानें खळबळ व हालचाल सुरू असते ती बंद झाल्यानें आचारविचारांत शैथिल्य आलें; नवीन विचारांचे झरे कोंदाटले; संघट्टण, घर्षण व सहवास यांनीं विचारांची अदलाबदल होऊन सफाई होते व अध्यात्मिक जीवन सतेज व पुष्ट राहतें; परंतु या देशाची स्थिति सर्व उलट. येथें परका म्हणजे तो अतिशूद्रापलीकडे मानण्याचा प्रघात पडला; लोक चालिरीतींचे गुलाम बनले. मग परदेशस्थ प्रवाशाची वास्तपूस्त घेणे अर्थातच बंद झालें दुराग्रह व हेका असा कीं ते अतिशूद्र, चांडाल; सर्व ज्ञान काय तें आम्हापाशी! स्वदृष्टीच्या टप्याबाहेर जग आहे, तेथे येथल्याप्रमाणें व्यवहार चालतात, लोक विचारी, धनवान्, नीतिमान्, अभ्यासशील, विद्याप्रिय आहेत ही जाणीव कोणाला? अशा रीतीनें अहंभाव वाढून सुधारणेचे, बुद्धीच्या सफाईचे, नूतन संस्काराचे व ज्ञानवृद्धीचे सर्व मार्ग बंद झाले; स्वदेशात खालील वर्ग जास्त पतित होत चालले; असा भयंकर अधःपात झाला तरी राष्ट्रांतील कर्त्या वर्गाचे डोळे उघडूं नयेत हें आश्चर्य होय! विचारी वर्गाची अशी दिशाभूल होऊं नये व सामर्थ्याची हानि बंद व्हावी, इजिप्त, इराण, बॅबिलोनिया ग्रीस या राष्ट्रांची जी अवस्था झाली व काळाच्या उदरांत त्याचा स्मृतिरोपरहित जसा बळी पडला, तसा प्रसंग आपल्या आर्यावर्तावर येऊं नये याकरिता ऋषिकालीन केवढी भरभराट व समृद्धि होती, चालू काळ कसा पूर्ण दैन्यवाणा आहे व योग्य समयीं उपाययोजना न झाल्यास वरच्या राष्ट्रप्रमाणें आपलीही गति झाल्याशिवाय रहाणार नाहीं. अशा रीतीचें यथार्थ दर्शक व भडक चित्र राष्ट्रापुढें मांडून त्यास सन्मार्गावर आणणे हाच एक उपाय आहे. निकृष्ट वर्गास वरिष्ठ वर्गानें वधूप्रमाणें हाताशीं धरून एकमेकांनीं एकमेकास साहाय्य करून राष्ट्राच्या जीवनसंवर्धनाचे उपाय योजिले पाहिजेत, त्यास पूर्वींच्या कीर्तीस शोभेल असे वागविलें पाहिजे, प्रगतीच्या मार्गावर आणून सोडलें पाहिजे, आणि कोणाच्याही मागें न राहता हल्लीं जगांत जे जोरदार प्रवाहाचे आंदोलन सुरू आहे त्यात आपणही सामील होऊन आपलें प्राक्कालीन श्रेष्ठत्व प्रस्थापित करणें आणि हल्लींही आपणामध्यें तसेच अपूर्व वैशिष्ट्य आहे व यापुढें अभूतपूर्व कामगिरी करण्याचे सामर्थ्य आहे हें दाखविणें हेंच उचित आहे. या कामीं अनेक रसप्रधान पुराणांचा उपयोग करून घेणे हें किती बरें प्रशस्त आहे? पुराणें झालीं तरी वेदोपनिषदांचींच विकृत, मलिन व अपकृष्ट रूपांतरें आहेत. त्यामध्ये कांहीं हीन भाग

आहे ही गोष्ट खरी; परंतु लोकाना त्याचा आज फार दिवसापासून परिचय असल्यामें त्यास दूर लोटून चालावयाचे नाहीं. शिवाय यांत सुद्धा तात्त्विक व ब्रह्मज्ञानाचा भाग काहीं थोडा नाहीं म्हणून त्यांच्याच साहाय्यानें त्यासच धरून, त्यांच्याच द्वारें लोकास उपदेश करून, शहाणे करून वेद व उपनिषदें यानीं घालून दिलेलीं थोर व पवित्र नीतितत्त्वें व सिद्धान्त आपलेसे करून घेणे हे चालू काळांत अत्यंत शहाणपणाचें व धोरणीपणाचे काम आहे; आणि त्याविना अन्य गति नाहीं हें निश्चित आहे.

व्यास, वाल्मिकासारख्या जवद्वंद्य महाकवींच्या हातून पुराणाची रचना झाली नाहीं ही गोष्ट खरी आहे. परंतु एकंदरीनें पाहता प्रस्तुत पुराणाच्या रचनाकारांनीं शक्य तेवढी मेहनत घेऊन आपल्या अहर्निश वाचनाचा, विद्याव्यासंगाचा व त्या योगाने प्राप्त झालेल्या ज्ञानाचा उत्तम ठसा यांत उठवून दिला आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. पुराण या शब्दाचाच अर्थ गत काल असा आहे; आणि एकंदर ग्रंथाचा रोख असा आहे की, सार्वजनिक उत्सवप्रसंगीं ते पाठ म्हटले जावे व लोकाना सर्व विषयाचे ज्ञान सहज प्राप्त व्हावे. पद्यात्मक रचना असल्याकारणाने तीं पाठ करण्यास सोपीं जात व लोकांच्या तोंडात साखरी घोळत राहिल्याने नैतिक व धार्मिक उपदेशाचे कार्य सुलभ होई. त्यांत सांख्य व वेदान्त तत्त्वज्ञानाचा सुंदर मिलाफ करून वैदिक क्रियाकर्मांच्या व कायद्याच्या नियमाचा पद्धतशीर संग्रह केलेला आहे.

बऱ्याच प्राचीन कालापासून या ग्रंथाच्या रचनेचें कार्य चालू आहे. ते काम अनेक व्यक्तींच्या हातून भिन्नभिन्न काळीं झालेले आहे; व विचारात जे जे फरक पडले ते सर्व यात सहजच अंतर्भूत झालेले आहेत. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य या साख्य धर्मप्रवर्तकाच्या मतांचा यात संग्रह केला आहे. ग्रंथाचें स्वरूप संभाषणात्मक असून लोमहर्षण अथवा सोमहर्षण या व्यास शिष्यानें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें म्हणून तीं लिहिली आहेत.

या पुराणाचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन भाग आहेत व प्रत्येक भागामध्यें विवक्षित पुराणें नमूद केलेलीं आहेत तीं अशीः—

सात्त्विकः—विष्णुपुराण, नारदपुराण, भागवतपुराण, गरुडपुराण, पद्मपुराण व वराहपुराण.

राजसः—ब्रह्मांड, वैवर्त, मार्कंडेय, भविष्य, वामन, ब्रह्म.

तामसः—मत्स्य, कूर्म, लिंग, शिव, स्कंद आणि अग्नि.

सात्विकपुराणें वैष्णवमताचीं आहेत, तामस शैव आहेत व राजस गोस्वामी व वल्लभाचार्य याचीं मतें प्रसार करणारीं आहेत.

वर दिलेल्या अठरा पुराणांखेरीज इतर १८ उपपुराणें आहे; व सर्वांची श्लोकसंख्या लौकिक समजुतीनें एक कोटी आहे; परंतु प्रत्यक्ष गणनेनें ती चार लक्षावर आहे.

अठरा उपपुराणाचीं नावें खालीं दिल्याप्रमाणें आहेत:—

१ सनत्कुमार, २ नारदीय, ३ शिव, ४ वरुण, ५ औसनस, ६ आदित्य, ७ नारसिंव्ह, ८ पराशर, ९ कपिल, १० साब, ११ कलिक, १२ भागवत, १३ दुर्वास, १४ महेश्वर, १५ मनव, १६ नंदी, १७ सौर, १८ वशिष्ठ.

श्रीभागवत पुराणात वृत्रासुर याच्या हननाची कथा दिली आहे. गायत्री मंत्राची प्रारंभीच चर्चा केलेली आहे. सारस्वतकल्पांतील लोकाचाराचे यात उत्तम विवेचन केले आहे. त्यानंतर वराह, प्रल्हाद, ध्रुव, वेन, पृथा, मन्वंतराची व प्रजापतींची उत्पत्ति, कपिलावतार, मत्स्यावतार, समुद्रमंथन, कृष्णावतार, यादव–निषूदन, उद्धवोपदेश कलियुगचर्चा इत्यादि विषयाचें यात वर्णन आहे. त्याचप्रमाणें अग्निपुराणांत ईशानकल्प, रामकृष्णवतार, शिवपूजेचे गूढ प्रकार, पृथ्वीचें वर्णन, निरनिराळे वंश, वैद्यक, भाषा, अलंकार, व्याकरण, लष्करी हालचाली इत्यादि विषयाची हकीकत यात आलेली आहे. अग्निपुराणांत शस्त्रविद्या व धनुर्विद्येचे विवेचन आलेलें आहे व धनुर्वेदाची जी हानि झालेली आहे, त्यामुळें या पुराणास फार महत्त्व आलेलें आहे. देवपुराणात ब्रह्मास्त्र, पद्मपुराणात भारतीय विस्तृत भूगोल व एकंदर विश्वाचा सामान्य भूगोल, गरुडपुराणात सामुद्रिक व फलज्योतिष, काहीं पुराणात कला व उद्योगधंदे; अशा रीतीनें निरनिराळ्या पुराणात निरनिराळ्या विषयांची हकीकत आलेली आहे. पुष्कळ भरकट व निरुपयोगी गोष्टींची यांत गर्दी झालेली आहे हें खरें; परंतु तत्त्वार्थी व शोधक मनुष्यास निःसत्त्व पदार्थांचे भूस व कोंडा काढून सुद्धां यात बरेंच तथ्य मिळेल. गतकालावर बराच प्रकाश पडेल व तत्कालीन सर्व गोष्टीचा संग्रह या दृष्टीनें तर त्याचा फारच उपयोग आहे. एकादा चित्रकार ज्याप्रमाणे कुरूप मातीच्या ढेकळांना आपल्या कौशल्यानें सुंदर रूप देतो. त्याप्रमाणेंच या पुराणांचा उपयोग करून घेतला पाहिजे. व्यर्थ नाकें मुरडून उपयोग नाहीं. वाडवडिलांना फुकट दोष कोणासही देतां येईल, कारण त्यास श्रम पडत नाहींत; परंतु या पर्वतप्राय ग्रंथसंपत्तीचा मननपूर्वक अभ्यास करून त्यातील तत्त्वांचा,

उपयुक्त गोष्टींचा व ज्ञानकणांचा संग्रह करण्यास असामान्य चिकाटी, उद्योग व बुद्धीची तरतरी लागते. या गोष्टी ज्याचे ठायीं असतील व ज्याने असा व्यासंग केला असेल, त्यासच फक्त अधिकारानें बोलता येईल. नाहीं तर 'मुखमस्तीति वक्तव्यं' यांत कांहीं अर्थ नाहीं.

शेवटीं प्रोफेसर विल्सन याचें मत देऊन पुरें करणें बरें. त्यांच्या मतें यांतील कांहीं गोष्टी ख्रिस्ती शकाच्या तीन शतकें पूर्वींच्या काळातील आहेत. इतर राष्ट्रांतील तत्कालीन लोकांचे धर्मसमज, चमत्कारिक संस्था व नानाप्रकारच्या अतर्क्य गोष्टी यांची उत्पत्ति होण्यापूर्वी यांपैकीं कांहींची रचना झालेली आहे.

---

# प्रकरण ४ थें.



## आर्यांचें तत्त्वज्ञान.



मनुष्य जातीनें आजपर्यंत हजारों साम्राज्यें निर्माण केलीं; परंतु कालानें केवळ लीलेनें तितकींही जमीनदोस्त केलीं. मानवी कर्तबगारीचा अवशेष कोणत्याही रूपांत राहूं नये असा दुष्ट कालाचा कटाक्ष दिसतो. आजतागायत प्राचीन कलांचे, वाङ्मयाचे व बुद्धिविलासाचे बरेच अवशेष शाबूत आहेत; परंतु 'काल निरवधि व पृथ्वी विपुला' असल्यानें ह्यांपैकीं पुढें किती शिल्लक राहतात याबद्दल मन फारच साशंक रहातें. कारण काळाच्या दुर्विलसिताची हौस वधीं शमेल असें, आजपर्यंतच्या अनुभवावरून, अनुमान करवत नाहीं. मात्र एका गोष्टीपुढें कालास हात टेंकावे लागले व काल जर जडरूप असता तर त्याजपासून मानवजातीनें ह्या बाबतींत आजिंक्यपत्र चोपून घेतलें असतें. अशी कोणती जबरदस्त वस्तु मानवी हातामध्यें सांपडली असेल असा पुष्कळ जणास संशय येईल! प्रत्यक्ष इंद्राचें वज्र जरी येथें मानवजातीच्या मदतीस येतें तरी तें काळाच्या माऱ्यापुढें बोथट होऊन निरुपयोगी झाल्याशिवाय रहातें ना. मग जेथें इंद्राच्या वज्राचा पाड नाहीं तेथें इतर सर्व हत्यारें लटपटतील यांत काय आश्चर्य? परंतु परमेश्वरी लीला पाहण्यास मिळते ती येथेंच. मनुष्याच्या जड इंद्रियांचा जर कोणी आधार घेईल तर त्याची

फसगत झाल्याविना राहणार नाहीं. कारण मानवी देह बोलूनचालून नश्वर. जोडीस जोड मिळाल्याशिवाय कोठें शत्रु चीत झाला आहे काय? काळ अदृश्य व कल्पनागम्य सबब त्याच्याच रूपाचें मानवी मन जेव्हा त्यास विरोध करण्यास भेटलें, तेव्हा मात्र काळानें हात टेकले. मानवी मनाच्या परिश्रमाचें फळ तें तत्त्वज्ञान. या एका हत्यारानें मात्र काळास बरेंच पाणी दाखविलें व आपलें पृथ्वीवरील साम्राज्य आजपर्यंत अबाधित टिकवलें आहे. इतर सर्व साम्राज्यें गेलीं; परंतु याचें मात्र जसेंच्या तसेंच टिकून त्याचा उत्तरोत्तर उत्कर्षच चालू आहे. अशा साम्राज्यानें मानवजातीस घेरून टाकावें व त्याच्या मनावर अम्मल चालवावा यांत काय आश्चर्य? यच्चावत् प्राणी तत्त्वज्ञानरूप सम्राटापुढें प्रणिपात घालीत आहेत. लहान असो, थोर असो, प्रबल असो, निर्बल असो, राव असो, रंक असो; सर्वांसच हा सारखा प्रिय आहे. याचा अंमल फार करडा, अनियंत्रित व बिनहरकत असला तरी, प्रजेस सुख, समाधान व शांति भरपूर लाभत आहे. हा अजातशत्रु असून याच्या राज्यांत सर्वत्र प्रेमळपणा व आनंदच पसरलेला आहे.

महान् महान् तत्त्ववेत्ते व सर्वांगपरिपूर्ण तत्त्वज्ञान-पद्धति यावरून राष्ट्रांचा मोठेपणा ठरविणें योग्य असेल तर त्या बाबतींत हिंदुस्थानास फारच उच्च स्थान मिळालें पाहिजे हें कोणीही समबुद्धीचा माणूस कबूल केल्याशिवाय रहाणार नाहीं. तत्त्वज्ञानाचा उगम केव्हा होतो व त्याची वाढ होण्यास राष्ट्राची स्थिति कशी असावी लागते, याबद्दल प्रोफेसर मॅक्स-म्यूलर यानें एक सिद्धांत काढला आहे, तो असा:—राष्ट्रांत जिकडे तिकडे शांतता असून धनधान्याची समृद्धि आहे; कांहीं ठळक ठळक कुटुंबाजवळ विपुल संपत्ति साठलेली आहे; सर्व लोकांना विद्या व कला यांचें ज्ञान होण्यास लागणारीं विद्यालयें व विद्यापीठें भरपूर आहेत; अशा स्थितींत पोटाकरितां अहर्निश झटणाऱ्या लोकसमूहामधून थोड्यांना विद्या-कला अशा सारख्या गोष्टींकडे लक्ष देण्यास सवड मिळते व त्यांतूनही फारच थोड्यांना त्याचा ध्यास लागलेला असतो. अशा अल्पसंख्येंतून भावी तत्त्वज्ञानी व सर्व जनांच्या चित्तांना आल्हाद व शांति देणारे तत्त्वज्ञानी निर्माण व्हावयाचे असतात. हाच नियम जर हिंदुस्थानास लावला तर तो पूर्णपणें खरा ठरलेला पाहावयास मिळतो; आणि येथील जगद्विख्यात तत्त्वज्ञान्यांची मोजदाद केल्यास वरील नियमान्वयें हिंदुस्थान सर्व जगाच्या गुरुस्थानींच शोभेल यांत कांहीं संशय नाहीं.

येथील भूमींत तत्त्वज्ञानाचें बीज उत्तम प्रकारें रुजून त्यापासून निरनिराळे तत्त्वज्ञानपद्धतिरूपी प्रचंड वृक्ष सर्व जगापुढें उभे आहेत. सारांश—भरतभूमि म्हणजे

तत्त्वज्ञान्यांची खाणच आहे. बुद्धिप्रागल्भ्य व श्रेष्ठ संस्कृति या दोन बाबतीत प्राचीन व अर्वाचीन लोकांपेक्षा हिंदु लोक निःसंशय श्रेष्ठ आहेत व त्याच्या विचाराचे क्षेत्र अमर्याद आहे असा मॅनिगसाहेबाचा अभिप्राय आहे.

श्लेजेल म्हणतो की, " हिंदूंच्या विचारांत तडफ, भारदस्तपणा व विशुद्धता फार आहे ग्रीक लोकांना ज्या ज्ञानाबद्दल फार अभिमान वाटतो, तो हिंदूंच्या ज्ञानापुढे केवळ फिका पडल्यावाचून रहाणार नाही; आणि या दोघास सूर्य व काजवा यांचीच उपमा शोभेल. "

प्रो. वेबर, मॅक्सम्यूलर व श्लेजेल या तिघांनी हिंदूंची अगाध बुद्धिमत्ता, अचाट कल्पनाशक्ति, लोकविलक्षण तात्त्विक पृथक्करण, निसर्गदत्त प्रगल्भता, जन्मसिद्ध शोधकबुद्धि इत्यादि गुणांविषयी फारच तारीफ केलेली आहे व तत्त्वज्ञान आणि व्याकरण या शास्त्रात त्यांनी जे परिश्रम केले आहेत त्यांची थोरवी त्यांनी आपल्याकडून होईल तेवढी गाइली आहे.

आर्यावर्तातील सर्व सृष्ट पदार्थ व प्राचीन आर्यांच्या कला व शास्त्रें ज्याप्रमाणे अत्यंत विशाल आहेत, त्याचप्रमाणे त्याचे तत्त्वज्ञानही जगद्व्याळ आहे. त्यात सर्व मताचा, सर्व तर्कपद्धतींचा, सर्व विचारप्रवाहाचा समावेश झालेला आहे. जगातील इतर कोणत्याही भाषेत प्रतिपादन झालेले मत आर्यतत्त्वज्ञानांत नाही असे कधीच झाले नाही. महाभारतात नाही असे काहींच नाहीं. ॥ यदिहास्ति तदन्यत्र, यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥ असे वाक्य महाभारतासंबंधीं लोकविश्रुत आहे. परंतु तेच जरी बरोबर आर्यतत्त्वज्ञानास लावले तरी तंतोतंत लागू पडेल.

हंटरच्या मते " बुद्धि, मन, जड इंद्रियें, आत्मा, दुःखोत्पत्ति, आत्म्याचे आत्यंतिक सुख, नियतिवाद, प्रयत्नवाद, सृष्टि व सृष्टिकर्ता यांतील परस्परसंबंध, परमेश्वराचे कारुण्य व मानवी प्राण्याचे दुःखमय जीवन, सुखदुःखविषमता इत्यादि अत्यंत कठिण विषयाचे विवेचन आर्यतत्त्वज्ञानात विस्तारपूर्वक केलेलें आहे. ग्रीक, रोमन, मध्यकालीन व अर्वाचीन शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ याच्या बुद्धीस वर दिलेले व त्याच जातीचे इतर विषय फारच अवघड व गूढ वाटले व त्याची तें सोडविण्याकरितां फार प्राचीन कालापासून धडपड चालू आहे. आर्यतत्त्वज्ञान्यानीं आपल्या बुद्धिप्रकर्षाने, वक्तृत्वपूर्ण वाणीने व शोधक मनाने त्याचे कोडे प्राचीन कालीच उकलून ठेवले, आणि ह्याच प्रयत्नाचे फल म्हणजे पाश्चात्य राष्ट्रातील तत्त्वज्ञानाची वाढ होय. असें म्हणणे कदाचित् प्रथम धाडसाचें वाटेल;

परंतु याच प्रकरणांत ते कसें सत्य व वस्तुस्थितीस धरून आहे हें दाखविण्यात येईल.

आर्यांचें तत्त्वज्ञान सर्वव्यापी आहे. जगातील सर्व तत्त्वज्ञानमतें आर्यतत्त्वज्ञानाच्या पोटांत समाविष्ट झालीं आहेत. आर्यतत्त्वज्ञानाचा पाया उपनिषदावर रचलेला आहे. उपनिषदामध्ये जगामधील सर्व प्रचलित मते संग्रहीत झाली आहेत. त्यांपैकीं कित्येक विचारपद्धति फोल असून त्यांच्या खटाटोपापासून प्रत्यक्ष फायदा फारच थोडा झालेला आहे. बरीच ग्रंथसंख्या असले शुष्कवाद माजविण्यात व्यर्थ खर्ची पडलेली आहे. विनाकारण अनेक पंथ उत्पन्न झाले ह्या गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी मानसशास्त्रदृष्ट्या असे म्हणता येईल कीं, केवळ एकाद्या विचारी पुरुषाच्या डोक्यात एकादी कल्पना आली म्हणजे तिचा अखेर निर्णय होईपर्यंत दरम्यानच्या स्थितीत मानवी बुद्धि कसकसे खेळ करते, तिच्या कसरती कशा चालतात, आत्मसमर्थनाचे कसकसे प्रकार असतात व केवळ अदृष्ट कल्पनामय विचारसृष्टींत मनुष्याच्या बुद्धीस किती उंच भराऱ्या मारता येतात हें पाहिले, म्हणजे मन क्षणभर स्व-सामर्थ्याच्या जाणीवेने उल्हसित होते.

अशा प्रकारच्या तेजस्वी आर्यबुद्धीने प्रकट केलेला सर्वेश्वरवाद, स्पिनोझा व हेजेल याचा तत्त्वज्ञानवाद, विश्वरूपी परमेश्वर, अध्यात्मज्ञान व अध्यात्मिक आचरण, जीवात्म्याचे परमात्म्यात निमीलन, जन्ममरणाचे रहाटगाडगें इत्यादि विषयावर पूर्वी जो प्रकाश पडला आहे त्यापेक्षां आधुनिक तत्त्वज्ञान्यांना त्यात कोणतीही भर घातलेली नाहीं. अशा थोर तत्त्वज्ञानी आर्यांबद्दल सर वुइल्यम जोन्स त्यास हस्तगत झालेल्या माहितीवरून असे म्हणतो कीं, " न्यूटनसारख्या जगद्विख्यात तत्त्वज्ञान्याची कोणत्याही तऱ्हेने कांहीइतकी अप्रतिष्ठा करण्याची माझी इच्छा नाहीं; परंतु त्याचे ईश्वर-स्वरूपज्ञान व त्याच्या तत्त्वज्ञानाचा कांहीं भाग हीं उपनिषदापेक्षां कोणत्याही बाबतीत निराळी नाहीत अथवा उपनिषदातील तत्त्वज्ञानाचा तो अगदी लहानसा भाग शोभेल. त्याचप्रमाणे सर्व सृष्ट पदार्थांमध्यें अदृष्ट असलेली सूक्ष्म चिच्छक्ति व जिच्या योगाने आकर्षण, प्रतिसारण, उत्सर्ग, प्रतिबिंब, वक्रीभवन, विद्युत्, चेतना, स्नायूंची हालचाल इत्यादि क्रिया घडतात, तिला प्राचीन आर्यतत्त्वज्ञानात पाचवें आकाशतत्त्व असें मानलेले आहे. हें आकाशतत्त्व परब्रह्मापासून निघाले असें उपनिषदात स्पष्ट म्हटलेलें आहे. आकाशापासून अग्नि, अग्नीपासून जल, या उत्क्रांततत्त्वाला त्याचाच मुख्य आधार आहे. सबब ह्याही शोधाबद्दल न्यूटनला विशेष बहुमान दिला पाहिजे असे नाहीं. "

प्राचीन कालीं ह्या देशांत तत्त्वज्ञानाचा इतका कसून अभ्यास झाला कीं, तें केवळ वादाचा विषयच न राहता त्याचें व्यवहारातही संक्रमण झालें असावें असें कोणासही वाटेल; व हा तर्क हिंदूंच्या आचाराचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास खरा आहे अशी खात्री पटते. मॅक्सम्यूलर म्हणतो कीं, हिंदू लोक तत्त्वज्ञानाची चर्चा रस्त्यात करतात. दीर्घ संस्कार असल्याखेरीज ही गोष्ट शक्य नसते हे निराळें सांगणे नको. स्वामी रामतीर्थ, विवेकानंद यांचे हेच म्हणणें असून त्यांना तें सिद्धही केले आहे. आणि त्याच्या श्रमाचे फल आज प्रत्यक्ष पहाण्यास मिळत आहे. आत्म्याचें अमरत्व ही गोष्ट हिंदूंच्या हाडींमाशीं इतकी खिळल्यामुळेंच त्यास तत्त्वज्ञान म्हणजे तळहातावरील मळ वाटतो. प्राचीन काळी ग्रीक व रोम शहरामधील पंडितास ही गोष्ट सर्वस्वीं मान्य नव्हती. साक्रेटीस, प्लेटो, याना शेवटीं नाइलाजानें ती गोष्ट मान्य करावी लागली; परंतु याच्या उलट स्थिति हिंदुस्थानात पहावयास मिळेल. चंद्रमौळी खोपटामध्ये राहणारा कुणबी, स्वयंपाक-गृहातील कामगिरी बजावून धर्माचरणाची सिद्धता करण्याकरिता वार्तांचे ढीगच्याढीग पाडणाऱ्या व पुराण श्रवण करणाऱ्या विधवा, संसाराची दगदग पार पाडता पाडता भेटाकुटीस आलेला व जीवनयात्रेचा अर्धाअधिक पल्ला गाठल्यानें अध्यात्मिक विचाराचें डोकावणें ज्याच्या पलित डोक्यामध्यें सुरू झालें आहे व कधीं कधीं अशाच बुद्धीनें कथा-पुराणाचा ओझरता परामर्ष घेणारा वयातीत गृहस्थ, अशा प्रकारच्या संसाराच्या सर्व स्थितींतील हिंदी माणसाना आत्म्याच्या अमरत्वाबद्दल कोणतेंही आश्चर्य वाटणार नाही; इतकेंच नव्हे, तर इतरही वेदान्तांतील तत्त्वें तीं भराभर म्हणूं लागतील अशी वेदान्ताची हिंदुस्थानात स्थिति आहे; आणि याच कारणानें अर्ध्या अधिक जगातील लोकसंख्येवर आर्यतत्त्वज्ञानाचा पगडा बसला आहे व बाकीच्या लोकांना कमी अधिक प्रमाणात याची गोडी लागली आहे.

इतका दीर्घ व्यासंग ज्या लोकाचा होता व ज्यांना तत्त्वज्ञान म्हणजे जीवनाचा एक भाग आहे असेंच वाटत होतें अशा हिंदूंना जगाच्या गुरुत्वाचा मान मिळावा हें साहजिक आहे. प्राचीन ग्रीक व इजिप्सियन लोक हिंदुस्थानात येऊन अभ्यास करून परत जात आणि ग्राक तत्त्वज्ञान म्हणजे आर्यतत्त्वज्ञानाच्या कांहीं भागाचे प्रतिबिंबच आहे असे पौर्वात्य भाषाकोविदांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. काउंट जॉनस्टन, कोलब्रूक वगैरे पंडितांनीं ही गोष्ट सिद्ध करून आर्यतत्त्वज्ञानाचा संचार युरोपात कसकसा होत गेला व पाश्चात्य तत्त्वज्ञान

म्हणजे आर्यतत्त्वज्ञानाचें अपत्य आहे हें मोठ्या खुबीदार व खात्रीलायक प्रमाणानीं आपल्या ग्रंथात विशद करून ठेवलें आहे.

आर्यावर्तांतील तत्त्वज्ञानास जगद्गुरुत्वाचा मान सर्व देशातील पंडितांनी मोठ्या आनंदानें दिला आहे. पतिपत्नी, जनन्यपत्य ह्या जोड्या जशा आपण व्यवहारात पाहतो, तशीच गुरुशिष्याचीही जोडी मानण्याचा प्रघात आहे. शिष्याविना गुरूचें महत्त्व फोल होय. संपत्ति जरी पुष्कळ असली, तरी सुवर्णालंकारांनीं शरीर जर सुशोभित केले नाही, ऐहिक सुखोपभोग मर्यादेत अनुभाविले नाहींत अथवा दानधर्मानें तिचा सव्यय केला नाहीं, तर जमिनीच्या पोटात अशोधित अवस्थेंत ती असली काय व लाकडी भिंतीच्या अंधार कोठडींत ठेविली काय सारखीच ! उपभोग, सद्व्यय, दान इत्यादि प्रकारांनीं संपत्तीच्या अस्तित्वास उजळा येऊन तिचे तेज जसें वाढीस लागते त्याचप्रमाणें ज्ञानसंपत्तीचें दानक्रिया, अध्यापन इत्यादि प्रकारानें प्रदर्शन झाले पाहिजे. केवळ मनाच्या पेटींत ठेवून उपयोग काय ? अध्यापनानें तिचे सौंदर्य, महत्त्व व खानदानीपणा सर्व जगाच्या दृष्टीस पडला पाहिजे. आर्यांच्या तत्त्वज्ञानानें जो जगभर संचार केला तो उत्तमोत्तम शिष्याच्या बळावर केला. सर्व जगाचें विद्यापीठ प्राचीनकाळीं आर्यावर्त होतें. याच विद्यापीठातून ग्रीक आद्य तत्त्ववेत्ता पायथागोरस तत्त्वज्ञान शिकून गेला व त्याने तें मायभाषेतून सर्व पाश्चात्य जगास शिकविलें. पायथागोरसनें हिंदुस्थानात येऊन आर्यतत्त्वज्ञानाचा अभ्यास केला व पुनर्जन्मवाद शिकून तो स्वदेशीं गेला. डा. एनफिल्डच्या मते पायथागोरस, अनाक्झारकस, पायऱ्हो इत्यादि तत्त्ववेत्ते हिंदुस्थानातूनच शिकून गेले. या मतास डॉ. एनफिल्डखेरीज उतर्ग्हि विद्वानाचे पाठबळ आहे. स्वीडनमर्धाल काउंट, पोकॉक, श्लेजेल, प्रिन्सेप, सर मोनियर विल्यम्स, अलेक्झांडर पोलिस्टर, वॉर्ड इत्यादि बडीं बडीं धेंडे या गोष्टीबद्दल स्पष्ट कबूली देत आहेत; तेव्हां यापुढे आणखी जास्त पुरावा देण्याचें कारणच दिसत नाहीं. पायप्लॉनिझम, मिथ्राइक इत्यादि नास्तिक वादाचे जे प्रकार आपण पाश्चात्य देशांत पाहतों, ते सर्व गौतमाच्या उपदेशापासून निघालेले आहेत. कारण पायथागोरस, पायऱ्हो, गौतम हे सर्व समकालीन होते असें वॉर्ड, प्रिन्सेप यांचें म्हणणें आहे. व हें जर खरें तर गौतमासारख्या जगत्श्रेष्ठ धर्मसंस्थापकांची तत्कालीन पाश्चात्य तत्त्वज्ञान्यावर छाप पडली व त्यांनीं गौतमाचें अनुकरण केलें या गोष्टी अशक्य आहेत असे मानण्याचें कोणासच कारण नाहीं. प्राचीन ग्रीक लोक आर्यतत्त्वज्ञानाचा अभ्यास

करण्यासाठीं इकडे येत असत हें वरील विवेचनावरून स्पष्ट होत आहे. आतां ते कोणत्या मार्गानें येत असत व ग्रीक लोकांशिवाय इतर कोणकोणते लोक आर्यलोकांशीं कोणकोणत्या बाबतीत दळणवळण ठेवीत हे आपण पाहूं. प्रोफेसर विल्सन म्हणतो कीं, " ख्रिस्ती धर्माच्या उदयकाली तांबड्या समुद्राच्या मार्गानें युरोप व हिंदुस्थान याचे दळणवळण चालू होते व ज्ञानसंपत्ति आणि व्यापाराचे सर्व जिन्नस हे हिंदुस्थानातून अलेक्झांड्रिया येथे आणले जात." डेव्हिसच्या मते " स्किथॲनस या नावाचा मनुष्य हिंदुस्थानाशीं व्यापार करीत असे. तो ख्रिस्ताच्या बारा प्रमुख शिष्यांशी समकालीन होता. व्यापार करीत असतांना त्याने तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला व जेव्हा जेव्हा तो हिंदुस्थानात येई, तेव्हा तेव्हा येथील तत्त्वज्ञानाचाही पाठ घेऊन परत जात असे. असा क्रम चालू असता त्याचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास बराच वाढला. त्याने एक चार भागाचें पुस्तक रचले, त्यावरून पुढे मानिचीच्या मताचा प्रादुर्भाव झाला, जसा एपिफॅरियस, युसेनियस, एपिफॅनियस व सिरिल याचा त्याजवर मोठा आरोप आहे.

याच वेळीं अमोनियस् सॅकस् याने अलेक्झांड्रिया येथें प्लेटोचे नूतनानुयायि मंडळ स्थापले. या दोघावरही तत्कालीन समाजाच्या कल्पनेप्रमाणे चेटकीपणा, भोंदूपणा, कापट्य असे नानाप्रकारचे आरोप आले. कारण की, समाजात रूढ असलेल्या तत्त्वज्ञानाच्या प्रदेशात न वावरता हे नवीन तत्त्वे प्रसृत करूं लागले. त्या काळी परमतासहिष्णुता फार प्रबल असल्याने त्यांचेवर असे आरोप आले यात काहीं नवल नाही. मात्र आपणास वरील मुद्याच्या दृष्टीने एवढेच पाहावयाचे की, ही नवीन मतें त्यांची स्वतःची नसून हिंदुस्थानातील दळणवळणाचा तो परिणाम होता; व ती आपण हिंदुस्थानापासून शिकलो ही गोष्ट त्या तत्त्ववेत्त्यांनीं सुद्धा आपल्या ग्रंथांतरीं नमूद करून ठेविली आहे. असा हा प्रत्यक्ष पुरावा सापडल्याने युरोप व हिंदुस्थान याच्या दरम्यान दळणवळण चालू होतें की नाही हा संशयच रहात नाहीं; त्याचप्रमाणें खऱ्या तत्त्वज्ञानाचा उदय कोठें झाला याबद्दल वादहि रहात नाही. आत्मा अविनाशी व अनंत असून जीव विनाशी व क्षणभंगुर आहे; परमेश्वर अंशरूपानें प्रत्येक प्राणिमात्रात वास्तव्य करितो, अशा प्रकारची आर्यांच्या तत्त्वज्ञानाची रूपरेखा आहे.

खरोखर मानवी मनाच्या वाढीच्या इतिहासांत हे वेदना-विचार अगदीं क्रांतिकारकच समजले पाहिजेत व त्याच्या उत्पादकाचे नांव प्रत्येकास अत्यंत प्रिय व ईश्वरनामतुल्य वाटावे यात काय आश्चर्य ? प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत

वास करणाऱ्या परमेश्वरी अंशास ब्रह्म असें मानावें, हा शोध प्रथम शांडिल्य मुनीनें लावला. याच ब्रह्माचें वर्णन, विवेचन व उद्घाटन उपनिषदांत केलेलें आहे. गोल्डस्टकरच्या मतें उपनिषदांशिवाय त्याच्याच तोडीचे संस्कृत ग्रंथ असंख्य होते; परंतु कालौघामध्यें ते गडप होऊन गेल्यामुळें मनुष्यजातीची फार हानि झालेली आहे. याच नष्ट झालेल्या ग्रंथाच्या आधारें हल्लींचीं षड्दर्शनें तयार केलेलीं आहेत. याशिवाय निरीश्वरवादी, अज्ञेयवादी जैन व बुद्ध मतप्रतिपादक असंख्य ग्रंथ आज हयात आहेत; परंतु आपण षड्दर्शनाकडेच प्रथम वळूं. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्व व उत्तरमीमांसा हीं त्या दर्शनांचीं नांवें होत.

## न्यायदर्शन.

या दर्शनाचा कर्ता गौतम हा आहे व याच्या मतें पदार्थमात्राचें सत्य व यथार्थज्ञान होणें हाच मुक्तीचा खरा मार्ग आहे. पदार्थांचे खालीं दिल्याप्रमाणें त्यानें भाग पाडिले आहेत.

( १ ) प्रमाण ( २ ) प्रमेय ( ३ ) संशय ( ४ ) प्रयोजन ( ५ ) दृष्टान्त ( ६ ) सिद्धान्त ( ७ ) अवयव ( ८ ) तर्क ( ९ ) निर्णय ( १० ) वाद ( ११ ) जल्प ( १२ ) वितंड ( १३ ) हेत्वाभास ( १४ ) छल ( १५ ) जाति ( १६ ) निग्रहस्थान. वरील पृथक्करणानंतर प्रमेय, प्रमाण, त्याच्या भिन्न भिन्न जाति आणि आत्मा, शरीर, मन, इंद्रियें इत्यादि गोष्टींचा त्यानें विचार केला आहे. यानंतर शरीर व आत्मा याच्या सर्व व्यापार मनातर्फें होत असतात; आत्म्यास पुनर्जन्म घ्यावा लागतो; परमेश्वर सर्वसाक्षी व सर्वज्ञानी असून तो अनंत जीवापासून अगदीं भिन्न आहे; वेद हे प्रत्यक्ष परमेश्वरी आदेश आहेत व त्याच्या शिकवणीप्रमाणें मनुष्यमात्रास वागलें पाहिजे; अविनाशी परमाणूंचें जगत् बनलेलें आहे इत्यादि सिद्धान्त त्यानें आपल्या ग्रंथांत स्पष्टपणें सोडवून दाखविले आहेत. सरतेशेवटीं नास्तिक मताचें खंडण करून परमेश्वरावर आपण विश्वास कां ठेवला पाहिजे याचें विवेचन केलें आहे. या दर्शनाचा संपूर्ण अभ्यास न करणारास असें वाटेल कीं, अनेक तर्कपद्धतींपैकीं ही एक होय. परंतु असें मानणें चुकीचें होईल. कारण न्यायदर्शनपद्धति ही एक वेदान्ततत्त्वज्ञानाची स्वतंत्र व संपूर्ण शाखाच आहे. हीमध्यें बुद्धि, स्पष्ट ध्वनि, जाति, नानाविधपणा, व्यक्तित्व इत्यादि गोष्टींचें व्याख्यान फारच बहारीचें व अधिकारयुक्तवाणीनें केलेलें आढळेल. व यांत कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, त्या युरोपियन पंडिताच्या अद्यापि लक्षांतही आल्या नाहींत. मॅनिंगबाई म्हणते कीं, " तर्कगम्य मानवी

मनांतील अत्यंत गूढ प्रश्न गौतमानें साध्या व्यावहारिक भाषेनें सोडविलेले पाहिलें म्हणजे त्याच्या अफाट बुद्धिसामर्थ्याचें कौतुक करावें तेवढे थोडेंच असें वाटतें. " शास्त्रीय परिभाषेचे व शब्दांचें प्रथमतः योग्य वर्गीकरण करून त्याच्या पायावर विवेचनरूपी वरील इमारत उठवलेली आहे. असें युरोपांतील तर्कशास्त्राच्या अभ्यासावरून मत बनणे स्वाभाविक आहे; परंतु न्यायदर्शनांतील विवेचनपद्धति अगदीं स्वाभाविक व स्फूर्तीजन्य आहे. त्याचा प्रथम अभ्यास करून नंतर त्यांतील परिभाषेचें व शब्दांचें पृथक्करण करणें जरूर वाटल्यास करावें; नाहींपेक्षा त्याची मुळींच गरज नाहीं. मासल्याकरिता एक उदाहरण घेऊं ' राजे लोक मर्त्यजीवाच्या वर्गांतील असल्यानें ते सुद्धा मर्त्यच आहेत. ' हा सिद्धांत युरोपियन व आर्यतत्त्वज्ञान या दोहोंस सारखाच संमत आहे. कारण मर्त्यपणा व मनुष्यपण हे दोन धर्म दोघानाही सारखेच मान्य असल्यानें वरील सिद्धांत कोणासच खोटा म्हणता येणार नाहीं. परंतु त्याची मांडणी करताना युरोपियन तर्कशास्त्र म्हणेल कीं, ' सर्व लोक मर्त्य आहेत ' व हिंदु तर्कशास्त्र म्हणेल कीं, ' जेथे मनुष्यत्व हा धर्म आहे, तेथे मर्त्यपणा हा असलाच पाहिजे. ' दोघांचाही युक्तिवाद जरी एकच असला तरी हिंदूंची पद्धत जास्त सोपी व परिणामकारक आहे असे वाटल्यावाचून रहाणार नाहीं. श्लेजेल म्हणतो कीं, गौतमाचें न्यायदर्शन कल्पनावादाचेंच एक स्वरूप असून त्याचे प्रतिपादन फारच सोपें व तर्कानुगामी असे आहे. ग्रीक लोकांस ही कला केव्हांच अवगत झाली नव्हती त्याचप्रमाणे मॅक्सम्यूलर व एलफिन्स्टन म्हणतात कीं, आधुनिक कालानें गौतमापेक्षा अजून कांहीं जास्त शोधून काढले नाहीं. व ग्रंथसंख्येच्या दृष्टीनें पाहिले तर ब्राह्मणांनीं या शास्त्रावर असंख्य ग्रंथ तयार केले होते असें कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

## वैशेषिक.

न्यायदर्शन व वैशेषिक दर्शन या दोघामध्ये कोणताही तात्त्विक फरक नसून तीं एकमेकांचीं पूरकच आहेत असें म्हटल्यास चालेल. न्यायदर्शनाचा विशेष विस्तार वैशेषिक दर्शनांत केलेला आढळतो. या दोन दर्शनाचा समावेश मनःशास्त्रात होतो. वैशेषिक दर्शनाचा कर्ता कणाद आहे. विश्वामधील सर्व वस्तूंचे सात प्रकारें वर्गीकरण कणादानें केलें आहे. ते सात प्रकार असेः—( १ ) द्रव्य ( २ ) गुण ( ३ ) कर्म ( ४ ) सामान्य ( ५ ) विशेष ( ६ ) समवाय व ( ७ ) अभाव.

कणादाच्या ग्रंथाचे दहा भाग आहेत. न्यायदर्शनांत पदार्थमात्राचे १६ प्रकार दिले आहेत. ते ६ पाहिजेत असे पहिल्या भागात प्रतिपादन केले असून अभाव जो सातवा प्रकार त्याने नवीन सांगितला, त्याचे विवेचनही दिले आहे. कणादापूर्वी पदार्थांचे सहा प्रकार मानले जात होते. त्यात कणादाने सातव्याची भर टाकली. आपल्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात द्रव्य, तिसऱ्यात आत्मा व अंतःकरण, चवथ्यात व पाचव्यात बाह्यसृष्टीचा मानवी शरीरावर घडणारा परिणाम, सहाव्यात वैदिक धर्माचे मंडण, सातव्यात गुण व समवाय, त्याचे धर्म, जाति व परिपाक, आठव्यात पारमार्थिक ज्ञान, नवव्यात बुद्धि व विशेष, आणि दहाव्यात आत्मा व त्याचे गुण याप्रकारे अनुक्रमे विषयाचे विवेचन केलेले आहे. न्याय व वैशेषिक या दोन दर्शनामध्ये फरक नाही असे मागे सांगितले; परंतु विचारसरणींत जो दोन ठिकाणी फरक आहे तो असा:—

( १ ) न्यायदर्शन विश्वातील वस्तूंचे १६ भाग पाडते तर वैशेषिकात फक्त सातच आहेत. ( २ ) न्यायदर्शनात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द अशी चार प्रमाणे सांगितली असून, वैशेषिक दर्शनास प्रत्यक्ष व अनुमान एवढी दोनच मान्य आहेत. यापेक्षा या दोन दर्शनामध्ये आणखी फरक नाही.

भाषापरिच्छेदाच्या प्रस्तावनेत डॉ. रुअर म्हणतो की, कणादाचे परमाणुतत्त्व ग्रीक तत्त्वज्ञानापेक्षा फारच उच्चदर्जाचे आहे. आणि मॅनिंगबाईच्या मते वैशेषिक दर्शनाची विचारसरणी अतींद्रिय शास्त्रापेक्षा जडशास्त्राकडे ज्यास्त झुकलेली दिसते. आधुनिक युरोपातील विज्ञानदृष्टीने पाहिले असता ध्वनिशास्त्राचा प्राचीन आर्यावर्तात जो विचार झाला तो योग्य असून सांप्रत प्राप्त असलेल्या उपकरण-सामुग्रीच्या अभावी त्यांना हें कार्य त्या वेळी कसे करता आले याबद्दल मन बुचकळ्यात पडते व त्याच्या बुद्धिमत्तेबद्दल राहून राहून आश्चर्य वाटते. भाषा-परिच्छेदाचा कर्ता विश्वनाथ हा स्पष्ट व अस्पष्ट ध्वनि याचे योग्य स्पष्टीकरण करून असे म्हणतो की, काहींच्या मते ध्वनि म्हणजे एक प्रकारची हवेत उत्पन्न होणारी तरंगपरंपरा आहे. व दुसऱ्याच्या मते ध्वनि हा कदंबकलिकेप्रमाणे आहे. याच मतसांप्रदायाचा दुसरा एक सिद्धान्त तर्कसंग्रहात दिलेला आहे तो असा:- आकाश अनंत व सर्वव्यापी असून त्यात ध्वनीचा धर्म आहे. आतां वर दिलेले ध्वनिसंबंधीचे दोन सिद्धांत आधुनिक जडशास्त्राच्या निष्कर्षावर लावून पाहिले असता कोणत्याही प्रकारें हिणकस ठरत नाहीत. यावरून त्या काळी आर्यांच्या चौकस व जिज्ञासु बुद्धिचा किती विकास झाला होता याचा कोणालाही तर्क

बांधता येईल. आर्य रसायनशास्त्राच्या इतिहासकर्त्याने असे म्हटले आहे कीं, " कणादाच्या ध्वनिसिद्धाताने सर्वांस सादर विस्मय वाटल्यावाचून रहाणार नाही. उष्णता व प्रकाश ही एकाच मूल पदार्थाची दोन भिन्न दृश्य स्वरूपे आहेत. ह्या त्याच्या शोधाबद्दल तितकाच आदर व विस्मय प्रत्येकाचे हृदयांत उत्पन्न होईल. सांख्यदर्शनाचा कर्ता कपिल याने कणादाच्या काही सिद्धांतांचे त्याच्या पूर्वीच कथन केले आहे. "

न्याय व वैशेषिक या दोन्ही दर्शनास अनुमानाचे पाच प्रकार मान्य आहेत. ते असे:— ( १ ) प्रतिज्ञा ( २ ) हेतु ( ३ ) उदाहरण ( ४ ) उपनय व ( ५ ) निगमन.

उदाहरणार्थ:— ( १ ) वान्हिमान् पर्वतः
( २ ) यतःस धूमवान्
( ३ ) यत्र यत्र धूमस्तत्र तत्र वन्हिः
( ४ ) अयं धूमवान
( ५ ) तस्मात् उक्तपूर्वेण प्रकारेण अयं वन्हिमान

पंचप्रमाणात्मक अनुमानपद्धतीवर अपुरेपणा व व्याख्येची सदोषता असे दोन आरोप केले जातात; परंतु त्यात विशेष अर्थ नाही. कारण नैय्यायिकाच्या मनाचा निष्कर्ष या पंचप्रमाणात्मक अनुमानपद्धतीत आला आहे. या अनुमान-पद्धतीचा ते फार अवलंब करतात. कारण तर्कशास्त्र व वक्तृत्वशास्त्र ही एकमेकाचा साहाय्यक आहेत. चिकित्सापूर्वक जे तत्त्व शोधून काढलेले असते ते लोकास पटवून देण्याकरिता—त्याची सत्यता सिद्ध करण्याकरितां—वक्तृत्वाचे अंग असणे अवश्य आहे व त्याचकरिता न्यायशास्त्राबरोबर वक्तृत्वशास्त्राची वाढ आर्य व ग्रीक तत्त्वज्ञानात झालेली आपणास पहावयास मिळते. प्रथम गौतमानें आपलें न्यायदर्शन द्विप्रमाणात्मक अनुमानपद्धतीनेच माडलें होते; परंतु जेव्हां त्यास असे आढळून आले कीं, याचा व्हावा तसा परिणाम होत नाही; तेव्हा त्याने आणखी दोन प्रकार त्यात घातले, व शेवटी जो सिद्धात कथन केला तो पाचवा प्रकार. अशा रीतीने हल्लींची पंचप्रमाणात्मक अनुमानपद्धति बनली आहे. आर्य व ग्रीक अनुमानपद्धतींत जो फरक आहे तो दोघाच्या मनोरचनेचा आहे. ग्रीक लोकाची दृष्टि फक्त वादच जिकण्याकडे होती; परंतु हिंदूची दृष्टि वादापेक्षा प्रतिपक्षाचे पूर्ण समाधान करणे ह्या गोष्टीकडे विशेष असल्यानें त्यानी ही पद्धति उपयोगात आणली. असे हिचें समर्थन डॉ. बॅलंटाईन व मॉनिंगबाई यानीं केलें आहे.

## सांख्यदर्शन.

ख्य शब्द सम् व ख्या या दोन शब्दांपासून झालेला आहे; व त्यावरून संयोगात्मक तर्कशास्त्राचा बोध होतो. हा तत्त्वज्ञानपंथ अत्यंत जुना असून त्याचा संस्थापक कपिलमुनी आहे. याच्या मतें विश्वात मूलतत्त्वे २४ असून २५ व्याला पुरुष अथवा आत्मा म्हणतात. ही पदार्थसंख्या कपिलांनी निश्चित केली यामुळेंच त्यांच्या पंथास हें नाव प्राप्त झाले असले पाहिजे. या २४ तत्त्वांतलि प्रकृति हे जगाचें आदिकारण आहे. पुरुष व प्रकृति असे जगतात दोन पदार्थ आहेत असे कपिलांचे तत्त्व असून येथूनच सांख्यांचा व वेदान्ताचा विरोध सुरू झाला. प्रकृति जड असून तीत उत्पत्तीचे सामर्थ्य नाही. मुळात ती अक्रिय व चलनारहित आहे. फक्त पुरुषाच्या सानिध्याने लोहचुंबक न्यायाने तिच्यात चेतना व कार्यक्षमत्व उत्पन्न होते. दुसरें विरोधाचे कारण असे की. जीवात्मा हा देहापासून भिन्न असून अणुपरिमाण आहे. हे जिवात्मे असंख्य असून अमर आहेत; प्रत्येक जीवात्मा भिन्न आहे, आणि एका शरीरांतून दुसऱ्या शरिरांत जाणारा आहे. पुरुष हा ईश्वर आहे असें त्यांनी कोठे म्हटले नाही. या विचारसरणीने कपिलाची गणना गौतम, कणाद, बुद्ध अशासारख्या निरीश्वरवादी लोकांमध्ये झाली. आस्तिकवादी म्हणतात कीं, आत्मा भिन्न नसून सर्व ठिकाणी अदृश्यपणे भरलेला आहे. हे अद्वैत वेदान्ताचे मुख्य तत्त्व आहे. अर्थात् याच ठिकाणीं सांख्याचा विरोध आहे; परंतु एका दृष्टीने त्यांना निरीश्वरवादी असे जरी म्हटले तरी वास्तवीकरीत्या ते सर्वेश्वरवादी होते. योगसूत्रकार पतंजली हा पक्का सर्वेश्वरवादी असून त्याने आपले योगशास्त्र सर्वत्र सांख्यमताच्या पुष्टीस अर्पण केलेले दिसतें. अत्यंत प्राचीन कालीं सुद्धां सांख्य व योग यांची अभिन्नता वर्णिलेली आहे, व तिचाच अनुवाद संतांनी महाभारतात केला आहे. तेव्हा अशा पुरुषास निरीश्वरवादी म्हणण्यापेक्षा सर्वेश्वरवादी मानणे हेंच अधिक युक्त आहे. निरनिराळ्या मताचा इतिहास पाहून त्यावरून हे ठरविणे जास्त चांगलें. येथें फक्त निरनिराळ्या दर्शनाचा त्रुटित गोषवारा आम्हास द्यावयाचा आहे. सबब वरील अवघड वादात आम्ही शिरत नाही.

## न्याय व सांख्य यांमधलि भेद.

न्यायदर्शनानें पुरुषाच्या ठिकाणीं निष्क्रियत्व आरोपित केलेलें नसून तो क्रियावान् आहे व कर्मफलभोगी आहे असे मानलें आहे; परंतु सांख्याच्या मते पुरुष सुखदु:खांहून भिन्न व अलिप्त मानला असून कर्म व कर्मफलाची त्यास

मुळींच बाधा होत नाहीं, कारण त्याचे ठिकाणीं त्यांनीं पूर्ण नैष्कर्म्य कल्पिलेलें आहे. पुरुष व प्रकृति याचें जेव्हा सानिध्य घडतें व लोहचुंबकाजवळ लोखंड आलें असतांना तें जसें हालचाल करूं लागतें त्याप्रमाणे प्रकृतीमध्ये पुरुषाच्या सहवासानें भावना व विचार उत्पन्न होतात. परंतु मनुष्य अज्ञानानें पुरुषाच्या ठायीं भावनांचा व विचारांचा आरोप करितो व त्यास सुखदुःखाचा उपभोगी समजतो. सांख्याच्या मतें पुरुष प्रकृतीहून निराळा आहे सर्व क्रिया व सुखदुःखें प्रकृतीच्या ठिकाणीं आहेत असें ज्ञान मनुष्याला झालें म्हणजे त्यास मोक्ष मिळतो, आणि हेंच अत्युच्च ज्ञान होय. सांख्याचें दुसरें मत असें आहे कीं, मुळांतच जें नाहीं त्यापासून अन्य वस्तू उत्पन्न होणें असंभाव्य आहे. जी वस्तू कोणत्याही स्वरूपांत अस्तित्वांत आहे तिला कांहीं तरी मूलाधार असलाच पाहिजे. त्याविना तिचें चालू अस्तित्वच संभवत नाहीं. गोल पदार्थ बनविण्याला ज्याचा तो बनविलेला असतो त्याचे ठिकाणीं गोलपणाचें बीज अत्यंत सूक्ष्म रूपानें वसत असतें जरी जड दृष्टीस तें ( बीज ) भासमान होत नसलें तरी अदृश्य स्वरूपात तें त्यामध्यें असतेंच म्हणून त्यापासून दृश्य वस्तू उत्पन्न होते, व तत्समान आकार धारण करिते. न्यायाचा यास अगदीं विरोध आहे.

मिसेस मॅनिंग म्हणते कीं, "मानवी जीवनाच्या अत्यंत गूढ तत्त्वाचा उद्बोध करून तीं सर्व जगास पटवून देण्यांत सांख्यांनीं जे परिश्रम केले ते केवळ बिनमोल आहेत. मनुष्य व त्याचप्रमाणें सर्व विश्वही विनाशी आहे. मनुष्याला वाटतें कीं, माझ्या ठिकाणीं फार मोठमोठे गुण व अनंत सामर्थ्य आहे; परंतु जेथें सर्व विश्वच विनाशी तेथें यःकश्चित् मनुष्याचा काय पाड? फक्त परमात्माच सत्य असून अविनाशी व अनंत आहे. विश्वाचा विनाशीपणा सिद्ध करण्यांत व मानवी जीविताचा फोलपणा दाखविण्यांत सांख्याची चतुराई व कौशल्य कांहीं अपूर्वच दिसतें. ही गोष्ट त्याच्या प्रतिपक्ष्यासही मान्य असून प्राचीन व अर्वाचीन सर्व पंडित याबद्दल त्याजवर स्तुतीचा वर्षाव करित आहेत; परंतु पुरुषाचें अनंतत्व व चिरकालित्व सिद्ध करण्याचे कामीं सांख्यानीं आपला हात आखडला असून बहुतेक मुग्धपणाच धरला आहे; आणि एकंदर विवेचनावरून असें वाटतें कीं, त्यांनीं जें लिहिलें आहे त्यापेक्षा त्याचे ठिकाणीं पुष्कळच अधिक विचार शिल्लक होते. मग कारण कांहीं असो. कदाचित् त्याचा निरीश्वरपणाच कारणीभूत असेल."

सर हंटर म्हणतो कीं, "विश्वाची उत्पत्ति, व्यवस्थिति व उत्कर्ष याचे जें

विस्तृत विवेचन साख्यानीं केले आहे त्याचाच केवळ अनुवाद हल्लींच्या उत्क्रांतीवाद्यानीं नवीन दृष्टीनें व नवीन भाषेनें केला आहे, व त्याच्यापेक्षां याची काही जास्त करामत आहे असे म्हणवत नाहीं.

## योगदर्शन.

परमात्मा व जीवात्मा याचे स्वरूप कळण्यास, मानवी अंतःकरणातील गूढतम गोष्टींचा थाग लागण्यास, आणि मनुष्यप्राण्याच्या हृदयात प्रामाणिक, यथार्थ व खरेखरे विचार काय आहेत याचा बोध होण्यास योगशास्त्राखेरीज अन्य साधन नाहीं. अथवा दुसऱ्या तऱ्हेनें असे म्हणता येईल कीं, अतींद्रियशास्त्र व मानसशास्त्र यांची उत्पत्ति व वाढ योगशास्त्राशिवाय होणे दुर्घटच आहे. पतंजलीनें आपल्या योगशास्त्रात हेच सिद्ध केले आहे. त्याच्या ग्रंथाचे चार भाग आहेत. पहिल्या भागात आत्म्याच्या स्वरूपाचे व योगाचे विवेचन केलेले आहे. आणि योगाच्या आठ पायऱ्याचे वर्णन दिलेले आहे. त्या आठ पायऱ्या अशाः—

( १ ) यम ( अ ) अहिंसा, ( आ ) सत्यवचन, ( इ ) अस्तेय, ( ई ) ब्रह्मचर्य, ( उ ) दानाचा स्वीकार न करणे, ( २ ) नियम ( अ ) शौच, ( आ ) इज्या, ( इ ) तपस् ( ई ) स्वाध्याय, ( उ ) उपस्थ-निग्रह. ( ३ ) शत आसने. ( ४ ) प्राणायाम पूरक, रेचक, कुंभक. ( ५ ) प्रत्याहार. ( ६ ) धारणा. ( ७ ) ध्यान. ( ८ ) समाधि.

याप्रकारें आठ पायऱ्या सागून झाल्यानंतर समाधी व तिचे प्रकार यांचे वर्णन पहिल्या भागात दिलेले आहे. दुसऱ्या भागात समाधी लावण्याची पद्धति सांगितलेली आहे. तिसऱ्या भागात योगी मनुष्याला समाधीपासून केवढे अचाट सामर्थ्य प्राप्त होते, समाधीपासून निरनिराळ्या स्थळीं निरनिराळी शक्ति कशी प्राप्त होते, स्थान व समाधि यांचे परस्पर संबंध, उदाहरणार्थ चंद्रलोकावरील योग्याचे सामर्थ्य गुरुलोकावरील योग्याच्या सामर्थ्यापेक्षा कसे निराळे असते वगैरे व्याख्यान ह्या भागात केलेले आहे. शेवटीं चवथ्या भागात मोक्षाचा विचार केलेला असून योग्याला भूतभविष्याचे ज्ञान, मृत्युकाल, दुसऱ्याच्या मनातील विचार व अन्य प्राण्याच्या ध्वनींचे ज्ञान कसे होते याचा विचार केलेला आहे.

हिंदुस्थानांत योगी लोकाच्या अचाट, अतिमानुष अशा पराक्रमाच्या गोष्टी, त्याचे अतींद्रिय ज्ञान, त्याचें भविष्यकथनसामर्थ्य, त्याची समाधिस्थितीत झालेली प्रत्यक्ष परमेश्वराची भेट व ब्रह्मसाक्षात्कार करवून देण्याची शक्ति इत्यादि प्रकार योगशब्दाबरोबर संबद्ध झालेले आहेत. हिंदुसमाजात नुसत्या योगशब्दाला अर्थच

नाहीं. जर काही रूढ अर्थ असेल तर वर नमूद केलेल्या गोष्टींशी तो संलग्न आहे. म्हणून हिंदु म्हणविणाराला त्याचें विशेष आश्चर्य वाटत नाहीं. पण जर याच्या उलट स्थिति असेल म्हणजे एकादा मनुष्य योगाची तालीम करित असेल, पतंजलीच्या आदेशाप्रमाणे वर्तत असेल, आणि जर योगानें प्राप्त होणारें सामर्थ्य मुळींच संपादन झालेलें नसेल तर मात्र आश्चर्य. काहीं दिवस युरोपियनाना हे सर्व झूट, नजरबंद, गारुडीपणा, हातचलाखी, गौडबंगाल इत्यादिकांपैकीं काहीं तरी असावें, खुळचट व भ्रमिष्ट लोकांचा हा खेळ आहे, शहाण्या मनुष्यानें इकडे लक्ष देण्याचे कारण नाहीं असे वाटे. त्याना योग म्हणजे शास्त्र होय असे वाटत नसे, हा सर्व भोळ्याभाबड्या लोकाच्या अज्ञानाचा परिणाम आहे असे ते समजत; परंतु पुढें युरोपियन पंडितांची व खऱ्या योगनिष्ठ पुरुषांची गाठ पडली व त्यानी त्याचा गर्वपरिहार करून वेदान्तधर्माचें व हिंदुविद्येचें त्यास यथार्थ स्वरूप दाखविलें. अशा प्रसंगापैकीं एक–दोहोंचें येथे वर्णन करूं म्हणजे खात्री होईल. अर्थात खालील उतारे युरोपियन लोकानीं स्वानुभवानें लिहून ठेविले आहेत एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या खरेपणाविषयी संशयच राहणार नाहीं.

प्रो. विल्सन यानें लिहून ठेविलें आहे कीं, "एकदा एक ब्राह्मण हवेत अधांत्री बसलेला आपण पाहिला. तशा स्थितींत तो एकदा बारा मिनिटें व दुसऱ्या खेपेस ४० मिनिटें असलेला दिसला."

डा. मॅग्रेगोर यानें शीखाचा इतिहास लिहिला आहे त्यात खालील चमत्कारीक गोष्ट दिली आहे.

"१८३७ सालीं एका बागेचात फारच विस्मयकारक गोष्ट घडली. एकदा एक फकीर लाहोर येथे आला व त्यानें जाहीर केलें कीं, अन्नपाण्याशिवाय वाटेल तितक्या दिवस लाकडी पेटीत कोंडून जमिनींत पुरून ठेविलें तरी आपणास काहीं होणार नाहीं. प्रथमः रणजितसिंग याचा या गोष्टीवर विश्वास बसेना, व म्हणून त्यानें ती गोष्ट प्रयोग करून खरी आहे की नाहीं हे पाहण्याचे ठरविलें. रणजितसिंगानें त्या फकिरास सांगितलें कीं, आपणास ही गोष्ट प्रत्यक्ष पहाणे आहे. लागलीच त्या फकिरानें त्याच्या म्हणण्यास रुकार दिला. सर्व तयारी करण्यांत आल्यावर फकीर लाकडाच्या पेटींत बसला, ती पेटी एका खोलींत पुरून टाकली व ज्या बागेच्या मध्यभागीं ती खोली होती त्या बागेच्या सभोवार कोट होता आणि दरवाज्यावर सशस्त्र पाहरा ठेविला होता. हेतु हा कीं, कोणीही कोणत्याही मिषानें आत जाऊं नये; व त्या फकिरास अन्नपाणी व हवा मिळू नये.

बंदोबस्त अत्यंत कडक होता. अशा रीतीने ४० दिवस व ४० रात्री निघून गेल्यावर स्वतः रणजितसिंगमहाराज, त्याचा नातु, काही सरदार, सेनापति, वेंटम्, जमादार 'वाड' Wade व स्वतः मी इतकी मंडळी त्या फकिरास जमिनींतून वर काढून पेटींतून खुला केल्यावर तो जिवंत आहे कीं नाहीं हें पाहण्यास मुद्दाम गेलो होतो. त्यास बाहेर काढल्याबरोबर तो आमच्यापाशीं बोलूं लागला. तेव्हा आमचा आनंद गगनांत मावेना व आश्चर्यास तर पारावारच नव्हता. लागलीच तोफांची सरबत्ती देऊन गावात जिकडे तिकडे ही चमत्कारीक हकीगत जाहीर करण्यात आली, व ठिकठिकाणी आनंदोत्सव करण्यात आले. महाराजांनीं त्यास लागलीच एक सोन्याची साखळी देऊन त्याचा निरोप घेतला."

अशा प्रकारच्या गोष्टी हिंदुस्थानात प्रत्यहीं घडत असतात. व त्या करून दाखविणारे योगी, संत, महंत ठिकठिकाणीं आहेत. फ्रायरला एका योगी पुरुषानें सूर्याकडे सारखी दृष्टि लावून ठेविली म्हणून आश्चर्य वाटले. युरोपांत ही शक्ति अज्ञात असल्यानें त्यांस याबद्दल राहून राहून कौतुक वाटतें. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थानात ह्या गोष्टीचे कोणासच कांहीं वाटत नाहीं.

## मीमांसा.

दर्शनाच्या शेवटल्या जोडीला मीमासा असें म्हणतात. मीमांसेचे पूर्व व उत्तर असे दोन प्रकार आहेत. ते कालवाचक नसून क्रमवाचक आहेत. पूर्व मीमांसेंत ब्राह्मणग्रंथांत दिलेल्या कर्मकांडाचा विचार केलेला असून उत्तर मीमांसेंत परब्रह्माच्या स्वरूपाचा विचार केलेला आहे. अर्थात् या ज्ञानाला उपनिषदांचाच सर्वस्वी आधार आहे. किंबहुना ब्राह्मणग्रंथाच्या पाठीमागून उपनिषद्ग्रंथ तयार झाले असल्याने व त्यांच्याच आधारें हीं दर्शनें निर्माण झाली असल्यानें त्यास हे नाव प्राप्त झालें.

पूर्व मीमांसेंत यज्ञयाग, अग्निहोत्र, दान इत्यादि क्रियांचे सविस्तर व सूक्ष्म वर्णन केले आहे. या ग्रंथाचा कर्ता जैमिनी. यानें धर्म, अधर्म याचा खल करून असें ठरविलें कीं, वेदाज्ञप्रमाणें वागणें हाच खरा धर्म होय व त्यापासूनच सुखाची प्राप्ति आहे.

उत्तर मीमांसेचा कर्ता प्रख्यात व्यास महर्षी हा होय. षड्दर्शनांपैकीं हे सर्वांत श्रेष्ठ असून यानें वेदान्तधर्माचा जोरानें पुरस्कार केला आहे. वेदान्तामध्यें परमात्मा व जीवात्मा यांच्या परस्परसंबंधाची चर्चा केलेली असते व ह्या पंथाचा

उत्तर मीमांसा ग्रंथ प्रमाणभूत मानलेला आहे. ह्या ग्रंथामध्ये हिंदूंच्या असामान्य व लोकोत्तर बुद्धीचा जो विलास पहावयास मिळतो तसा इतरत्र कोठेही आढळून येणार नाहीं. व्यासांनीं नास्तिक वादाचा पाडाव करून पुनश्च सर्वेश्वरवादाचें निशाण अध्यारोपित केले आहे. आत्मज्ञानानेंच मुक्ति प्राप्त होणार आहे असा ब्रह्मसूत्रांचा मुख्य सिद्धांत आहे.

ब्रह्मसूत्रांविषयीं प्रो. मॅक्सम्यूलर असे म्हणतो कीं, " प्रत्यक्ष प्राणापलीकडील गोष्टही दूर लोटण्याचे सामर्थ्य आलें पाहिजे म्हणजे मग दुसरी प्रियतम गोष्टच उरणार नाहीं. अशी जेव्हा मनाची तयारी होईल तेव्हा सर्व जीवात्म्यांचा ईश जो परमात्मा, त्याची भेट होईल. यमनियमयुक्त ज्ञानाची जेव्हा इतकी पराकाष्ठा होईल तेव्हा प्रत्यगात्मा व परमात्मा याची एकरूपता होईल; परमात्म्यांत जीवात्म्याचे प्रतिबिंब दिसावयास लागेल, जीवशिवाचें ऐक्य होईल; जीवनस्थितीस शुद्धधर्माचा आदर्श, परमतत्त्वज्ञानाची प्रतिछाया व सत्यधर्माचे रहस्य यापैकीं कोणतेंही नाव शोभेल." "याच मूळ कल्पनेचा विस्तृत ऊहापोह वेदान्तांत केला आहे; व ज्यानें बर्कलेचे तत्त्वज्ञान समजून घेऊन शिवाय उपनिषदें व ब्रह्मसूत्रे याच्यातील ज्ञान अधिगत केले आहे त्यास खात्रीपूर्वक असे सांगतां येईल कीं, उपनिषदें व ब्राह्मण यातील तत्त्वज्ञानापुढे बर्कलेचे तत्त्वज्ञान अगदींच तुटपुंजें व खुरटें दिसते."

परमात्मा व जीवात्मा याच्या संबंधाबद्दल मतैक्य कोठेंच दिसून येत नाहीं. रामानुजाचार्यांना ह्या दोघामध्ये सेव्यसेवकाचा संबंध दिसतो. ते दोघे अगदीं स्वतंत्र असून जीवात्मे असंख्य आहेत असे त्याचें म्हणणे आहे. याच्या उलट शंकराचार्य म्हणतात कीं, परब्रह्म एकच असून त्या व्यतिरिक्त कांही नाहीं. डोळ्यांस जे दिसते ते सत्य नसून भ्रामक आहे. व त्यास ते माया असे म्हणतात.

स्वामी दयानंदसरस्वती याचे मत रामानुजाप्रमाणें आहे व परमात्मा व जीवात्मा याचें ऐक्य कधींहि होणें शक्य नाहीं असें ते म्हणतात. परंतु लोकमतावर शंकराचार्यांच्या मताची विलक्षण छाप असून, सार्वत्रिक शंकराचार्यांच्या मताचाच अनुवाद केला जातो. हिंदु लोकात सर्वेश्वरवादाचें प्राबल्य अतीशय असून आजतागायत मानवी बुद्धीनें तत्त्वज्ञानाचे जे निरनिराळे सांप्रदाय संस्थापित केले आहेत त्यांपैकीं सर्वेश्वरवाद अतीशय श्रेष्ठ आहे.

सर वुइल्यन जोन्स म्हणतो कीं, "आचार्यभाष्यासारख्या सुंदर ग्रंथाचे एकाद्या

युरोपियन भाषेत संपूर्ण भाषांतर झाल्याशिवाय तत्त्वज्ञानाचा इतिहास पुरा होणार नाहीं. प्रत्यक्ष सरस्वतीस सुद्धा आचार्यभाष्यांची महती गातांना शीण आल्याखेरीज रहाणार नाहीं."

जड सृष्टीचा विस्तार व तिचा अभेद्यपणा हे प्रकार प्रत्यक्ष दृष्टीस दिसत असता ते नाकबूल करण्यात काय हाशील? परंतु वेदान्ताचे मुख्य तत्त्व असें आहे की, जरी हे प्रकार आपणास दिसले तरी ते खरे नव्हेत; दृष्टीच्या विकृत कार्याचा तो दोष आहे; त्याचे यथार्थ स्वरूप जसे दिसते तसें नसून फार भिन्न आहे. मानवी दृष्टीचा हा भ्रम आहे. मानवी मनाच्या कल्पनेने निर्मित केलेली ही सृष्टी आहे.

परब्रह्मज्ञानाच्या दृष्टीने हे सर्व आभासरूप आहे. मनुष्याच्या कल्पना व्यक्त व दृश्य स्वरूपाने दिसूं लागल्या कीं, त्यास सृष्टि असें म्हणतात. सृष्टीचे बाह्य व नयनगोचर देखावे आणि तज्जन्य भावना ह्या आभासमूलक आहेत. जर यातील आधारभूत चैतन्य क्षणभर आपले कार्य बंद ठेवील तर त्याचा परिणाम दृश्यमान सृष्टीचा सर्वनाश हाच होईल. लौकिक समज दृश्य सृष्टि खरी मानण्याकडे असतो; तो दुरुस्त करून खरें रहस्य सांगणें हीच वेदान्ताची मुख्य कामगिरी आहे. एपिकारमस व प्लेटो यांचे हेच मत असून सांप्रत याच मताची मोठ्या आढ्यतेने तरफदारी केली जाते; परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, त्याबद्दल आधुनीक लोकप्रिय लेखकास आदर वाटत नाहीं. कदाचित् याचे कारण असें असूं शकेल की, आधुनीक पंडिताना ईश्वराचे सर्वसाक्षित्व, सौजन्य, सर्वज्ञता इत्यादि गुणाबद्दल खात्री नसेल; परंतु हिंदूंचे मत याच्या उलट असून ईश्वराच्या वरील गुणावर त्याचा पूर्ण भरंवसा आहे, व अशा अव्यभिचारी भक्तीच्या पायावर त्यांनी वेदान्तशास्त्राची इमारत उभारली आहे." सर जेम्स मॅकिन्टॉश म्हणतो की, वेदान्त-तत्त्वाची कल्पना अतिशय विशुद्ध, सुंदर, खुबीदार, स्वाभाविक व स्वतंत्र आहे.

मीमांसा ग्रंथाच्या विवेचनपद्धतींत प्रथम पूर्वपक्ष सांगून नंतर उत्तरपक्ष मांडलेला असतो व शेवटी मुख्य सिद्धांत कथित केलेला असतो. ह्या पद्धतीचे प्रो. मॅक्सम्यूलर यास फारच कौतुक वाटलें व त्याने असें लिहून ठेविलें आहे कीं, "आजपर्यंत जगात चमत्कृति-जनक अशीं बरींच काव्ये व ग्रंथ निर्माण झाले; परंतु ह्या ग्रंथाची थोरवी काही अपूर्वच आहे. धन्य आहे त्या महाभागाची कीं ज्याच्या बुद्धींतून असलें पुस्तक उदयास आले. प्रत्येक प्रकारच्या ज्ञानप्रसारास असलें साधन उत्पन्न करून ते इतके सुव्यस्थित, सोपे, सर्वसंग्राह्य बनविणाऱ्या हिंदूंच्या कल्पक बुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे."

साहीं दर्शनें वाचणारा व अभ्यास करणारा युरोपियन पंडित खरोखरच विरळा; त्यास मुख्यत्वेंकरून भाषेची अत्यंत दुर्बोधता, तत्त्वज्ञानातील परिभाषा-काठिण्य आणि आध्यात्मिक व बौद्धिक परिपक्वतेचा अभाव इत्यादि अडचणी फार जाचतात असें दिसते. आर्यतत्त्वज्ञानाच्या कारंज्यांत उपनिषदाच्या झऱ्यांचे जोमदार प्रवाह वहात आहेत. उपनिषदाची संख्या एकंदर ५२ आहे. उपनिषदात तत्वज्ञानात्मक विषयावर व्याख्यानें लिहिलीं असून त्याच्या उपदेशरूप मंदानिलापासून आध्यात्मिकतेच्या व महानुभावित्वाच्या लहरी सर्वत्र प्रसार पावतात, त्या लहरी सारख्या अन्यत्र कोठेंही पहावयास मिळणें फारच दुरापास्त. उदात्त तत्त्वज्ञान, गाढ विद्वत्ता, चिरस्थायी सिद्धान्त व सत्यपूर्ण तत्त्वे याचा उपनिषदात जो संग्रह केलेला आहे तो मानवी मनाच्या अजबखान्यातील एक बिनमोल पदार्थ म्हणून मानला जाईल, व हिंदूच्या दृष्टीने पाहिल्यास त्याच्या अप्रतीम बुद्धिवैभवाचे तें एक अत्युत्कृष्ट स्मारक म्हणून जगापुढे सदैव उभे राहील.

कान्ट व शोपेनहोर याच्या तत्त्वज्ञानाशीं उपनिषदाचा पूर्ण मिलाफ असून जेथें कमीजास्त भाग दिसतो तेथें उपनिषदाचीच सरसता प्रत्ययास येते. शोपेनहोर व ड्युसन यांनीं जेव्हा मानवाच्या धार्मिक बुद्धीचा हिशेब घेतला तेव्हा त्यास ख्रिस्ती धर्मातील न्यू टेस्टामेंट ( नवा करार ) व उपनिषद्ग्रंथ यातील धर्माभिमुखता फार आवडली व त्याचे असे मत झालें कीं, जगात जोंपर्यंत हे ग्रंथ जिवंत आहेत तोंपर्यंत मानवी जनावरील धार्मिक दडपण नाहींसें होऊन जगात जिकडे तिकडे पशुवृत्तींचा धुमाकूळ होण्याची भिती नाहीं; परंतु त्या दोन ग्रंथामध्ये उपनिषद्ग्रंथ फारच उच्च कोटीतील आहेत असे त्याचें म्हणणे आहे.

जर्मनतत्त्वज्ञ शोपेनहोर याचे उद्गार मननीय आहेत. " ज्यू धर्मातील अंधश्रद्धायुक्त समजुती व वेडगळ समज याचें मनावर जे कीट वाढले होतें व अशा अंधश्रद्धेच्या पायावर रचलेल्या तत्त्वज्ञानाने जो मनाला पंगुपणा आला होता तो सर्व उपनिषदवगाहनाने नाहींसा होऊन मन कसें प्रफुल्लित व जोमदार होतें तें पहा. सर्व जगात उपनिषद्ग्रंथाच्या अभ्यासापेक्षा दुसरा कोणताही अभ्यास फलदायी व मनाच्या उच्च स्थितीप्रत नेणारा नाही. माझ्या आयुष्यांतील उपनिषदध्ययन हेंच श्रेष्ठ सुख व मरणोत्तर प्राप्त होणारे आत्यंतीक सुखही तेच. "

एल्फिन्स्टनसाहेबाची ग्रीक व प्राचीन आर्य यामधील तुलना खरोखर सदैव ध्यानात ठेवण्याजोगी आहे. तो असें म्हणतो कीं, " हिंदूचें सर्व विषयातील ज्ञान बरेंच वाढलेलें होतें; तरी पण ईश्वर-स्वरूपज्ञानाचा जो भव्य दीप भारतीय

आर्यांजवळ होता व ज्याच्या सहाय्याने त्यांनीं सर्व आध्यात्मिक प्रदेश हिंडून त्यात अभूतपूर्व व दुःसाध्य शोध लावले त्याचा एकादा मंद किरण सुद्धां विशाळ व गाढ ग्रीक विद्वत्तेला पैदा झाला नाहीं. तेणेकरून तिला संशयरूप अंधकार व नास्तिकवादरूपी खाचखळगे यातून मार्ग काढणें फार कठीण झालें. ''

## भगवद्गीता.

भगवद्गीता हा ग्रंथ वेदान्त तत्त्वज्ञानाच्या मुगुटावरील अत्यंत दैदीप्यमान हिरा होय. याच्या प्रभेनें त्या मुगुटांतील किंचित् हिणकस व कालातराने मलीन झालेला भाग पुन्हा उठावदार, तेजोमय व सुंदर दिसूं लागला; व एकंदर वेदान्त तत्त्वज्ञानास यानें अगदीं अपूर्व शोभा आली आहे या जगात ब्रह्माखेरीज इतर सर्व माया आहे. ब्रह्म तेवढें सत्य असून इतर सर्व मिथ्या व आभासरूप आहे. असल्या विचारसरणीने काही असामान्य, अलौकिक बुद्धिमान पुरुषास मनन करण्यास अवाढव्य क्षेत्र मिळाले, त्यांत ते तल्लीन झाले व जगास विसरून गेले; साधारण लोकांची बुद्धि असल्या कठीण विषयावर घासल्याने फारच बोथट झाली; त्यास कोणत्या मार्गाने जावे हे कळेना. श्रेयस्कर व निःसंशय हितप्रद मार्ग कोणता हें न कळण्याने समाज बेलगामी होऊन धरबंध सर्व सुटला; कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाही. जिकडे तिकडे स्वतंत्र बुद्धीचे वारे खेळूं लागले; परंतु सुकाणू मात्र कोणाच्या हातात नाही. अशा स्थितींत समाजाचीं शकलें होणार हे ओळखून व्यासासारख्या त्रिकालज्ञ महर्षींनीं हा ग्रंथ तयार केला व त्याची योजनाही चमत्कारिक ठिकाणी केली. महायुद्धाचे तोंड लागणार व जिकडे तिकडे एकच रणधुमाळी माजणार अशा प्रसंगीं गीतेस आरंभ केला हे कसें? हा प्रश्न विचार करण्यासारखा असून बहुतेक विद्वानांनी तो आपआपल्या मतीने सोडविला आहे. परंतु अशाच ठिकाणीं तो वाद अप्रस्तुत होईल सबब सोडून देणें बरें. शेवटीं कोणाही युरोपियन अगर हिंदी विद्वानाचे प्रशंसापर अभिप्राय न देता हे प्रकरण पुरे करतो. कारण आर्यतत्त्वज्ञानाच्या अभ्यासाची परिपूर्ती गीतेखेरीज होत नाही. सबब प्रत्येक पंडितास सानंद व साश्चर्य उद्गार काढावे असे वाटणे हा या ग्रंथाचाच विशेष आहे. परंतु त्याची योग्यता वाढविण्यास कोणाच्या प्रशंसेची त्यास जरूर नाही तो स्वतः स्वायंभुव, रवीसारखा तेजस्वी असून सर्व जगाचे आध्यात्मिक जीवन नियमित करण्यास समर्थ आहे. सबब अशा ग्रंथाचा अध्यनकाल हा प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यातील अत्यंत आनंददायी काल गणला जाणे अगदीं योग्य आहे. शेवटीं फिरून एकवार सर्वांस या ग्रंथाचा व्यासंग सवडीनुसार करण्यास सागून रजा घेतो

---

# प्रकरण ५ वें.

## भारतीय वैद्यशास्त्र.



ज्याप्रमाणे भारतीय आर्यांनी इतर सर्व शास्त्रे पूर्ण वृद्धिंगत केली त्याचप्रमाणे त्यांनी वैद्यशास्त्रासही वाढीच्या अत्युच्च शिखरास नेऊन पोचविले होते. सूक्ष्म निरीक्षणाची फार मोठी शक्ति, सर्वसामान्य सिद्धांत काढण्याची अजब युक्ती व पृथक्करणात्मक विवेचनाची जबर हौस इत्यादि गोष्टींना धिमेपणाच्या उद्योगाची जोड मिळाल्यावर शास्त्राचा उत्कर्ष व्हावा यांत काय नवल ? परंतु एवढ्याच गोष्टी त्यास अनुकूल होत्या असे नाही तर त्यांची मायभूमी, खानिज, वनस्पत्य व इतर औषधीय लहान लहान झाडे यांच्या अफाट संपत्तीने परिपूर्ण असल्याने ह्या शास्त्राची वाढ होण्यास फार मदत झाली. सर्व हवेत, ऋतूंत, व सर्व भूमीत वाढणाऱ्या औषधींची येथे वाण नसल्याने या शास्त्राचा अभ्यास करण्यास त्यांस फारच सोईचे पडले. स्वतंत्र आर्यवैद्यकशास्त्र ज्यांनी बनविले त्यांनी त्यावर पुष्कळच ग्रंथ रचले असले पाहिजेत ही गोष्ट कोणासही पटण्यासारखी आहे. परंतु दुर्दैवाने काळाच्या आसुरी लीलेने त्याचा नाश होऊन आज फारच थोडे हयात आहेत. त्यामुळे त्या शास्त्रात आर्यांनी किती प्राविण्य संपादन केले होते याचा नक्की ठाव लागत नाही. तत्त्वज्ञान, व्याकरण इत्यादि विषयावरील असंख्य ग्रंथ आज उपलब्ध आहेत; परंतु वैद्यशास्त्राची तशी स्थिति नसल्यामुळे त्यांचा ह्या अत्यंत महत्त्वाच्या शास्त्रांतील शोधात किती प्रवेश झाला होता हे ठरविणे दुरापास्त झाले आहे. वास्तविक पाहता वैद्यशास्त्र हे व्यावहारिक व प्रयोगात्मक शास्त्र आहे, म्हणून त्याची अशी हेळसांड होऊं नये; परंतु ह्याच्या अगदी उलट प्रकार दिसतो त्यास नाइलाज आहे. तत्त्वज्ञान, व्याकरण, ईश्वरस्वरूपज्ञान वगैरे शास्त्रे कल्पनात्मक, विचारात्मक व चित्ताल्हादक असून प्रत्यक्ष उपयुक्ततेच्या दृष्टीने कमी किंमतीची आहेत; परंतु वैद्यशास्त्र सदैव व्यवहारोपयोगी असून यच्चावत् मनुष्यास त्याची जरूर आहे असे असता त्याचा नाश व्हावा हे दुर्भाग्य तर खरेच, परंतु त्याब-

रोबर हयगय व अदूरदर्शीपणा हे आरोप आपोआप येऊन चिकटतात. असो. आतां अवशिष्ट वैद्यक ग्रंथ व प्राचीन संस्कृत ग्रंथ यांचा नाश होण्यापूर्वी इतर भाषेंत त्याचीं जीं भाषांतरे झाली असतील त्यावरून या शास्त्राच्या वाढीचा काही इतिहास सापडल्यास पाहूं.

प्रथमतः ह्या शास्त्राचा उत्पादक कोण याची चर्चा करूं. हिंदू लोकात असा समज आहे कीं, या शास्त्राचा मूल उत्पादक धन्वंतरी असून त्याने आपला शिष्य सुश्रुत यास हे शास्त्र पढविले. दुसरी उपपत्ति अशी लागते की, चरक नावाचा जो प्रख्यात वैद्यकग्रंथकार यास अग्नीवेश याने शिकवून तयार केले व अग्नीवेशाला ही विद्या आत्रेय मुनीपासून मिळाली. चरक म्हणतो कीं, मी मूल ग्रंथात जेथें अतीशय लांबट भाग होते ते लहान व बेताचे केले व जे भाग अगदी लहान होते ते थोडेबहुत वाळविले. एकंदरींत पाहता हल्ली जे वैद्यकावर प्रमाणभूत ग्रंथ म्हणून मानले जातात ते या दोघाचे—( चरक व सुश्रुत )–आहेत.

आर्यवैद्यकात कोणकोणते विषय प्रतिपादले आहेत ते पाहूं. १९०५ साली मद्रास इलाख्याचे गव्हर्नर असलेले लार्ड अँप्थिल म्हणतात कीं, " हिंदुशास्त्रांत आरोग्याचे नियम हल्लीप्रमाणेच सुधारलेल्या स्वरूपाचे होते; व प्रख्यात धर्मशास्त्र कार मनु याची आरोग्यरक्षक म्हणून फार दूरवर कीर्ति पसरली आहे. जगांतील अतीशय नामांकित आरोग्यसुधारक माणसामध्ये त्याचा फारच उच्च दर्जा होता. "

सर वुइल्यम हंटर म्हनतो कीं, " आर्यवैद्यक इतर पूरक शास्त्रांशी फारच एकरूप झालेलें होतें. शरीररचना, अवयव, जोड, स्नायू, रक्तवाहिन्या व शरीर घटक tissue धातु याचा आर्यवैद्यकात विस्तृत विचार झालेला आहे. हिंदूंच्या सर्वमान्य व सर्वसंग्राहक वैद्यक ग्रंथात वनस्पत्य, खानज, प्राणीविषयक सर्व वस्तूंचा समावेश झाला आहे; त्याची नामावळी बेसुमार विस्तृत झाली असून ह्यातून बरीच नावें युरोपीय वैद्यकाने उचललेली आहेत औषधक्रिया मोठी खुबीदार असून, औषधाच्या वर्गीकरणाचे व सेवनाचे नियम फारच सूक्ष्म अतएव लाबलचक आहेत. आरोग्य, अन्नसेवन व आहार याकडे फार बारीक दृष्टि दिलेली आहे. प्रो. विल्सनच्या मते भारतीय आर्यांचे निदान अगदी तंतोतंत प्रकृत स्थितीशी जुळते असून लक्षणांची व्याख्या व पृथक्करण सूक्ष्मगामी आहे. ह्याचप्रमाणे शस्त्रक्रियाही बरीच वाढली होती व औषधयोजनेंत तर त्याचा हातखंडाच असे. कारण की, नैसर्गिक अनुकूलतेमुळे कोणत्याच औषधीची कधी वाण

नसे; शिवाय त्याची चोकस बुद्धि, मेहनती स्वभाव, सूक्ष्म व खोल दृष्टि इत्यादि गुणांमुळें व वनस्पतींच्या विपुलतेमुळे ह्याची फारच भराभर वाढ झाली. ”

सांप्रतच्या युरोपियन व प्राचीन भारतीय वैद्यशास्त्रात मोठा फरक म्हटला म्हणजे शस्त्रक्रियेचा. हल्ली शस्त्रक्रिया अत्यंत यशस्वी, सुपरिणामी व गुणकारी होण्याला त्याजबरोबर इतर भौतिक शास्त्राची जी प्रगति झाली आहे ती बरीच उपयोगी पडली हें शब्दशः सत्य होय. परंतु यावरून असें म्हणता येणार नाहीं कीं, प्राचीन काळीं शस्त्रक्रिया नव्हती. तत्कालीन शास्त्राच्या वढीप्रमाणें या शाखेचीही वाढ झाली होती. बेवर, एल्फिन्स्टन, व मॅनिंगबाई याच्या मतें आर्य-वैद्यककालीं शस्त्रक्रिया फार पुढें गेलेली असून कित्येक बाबतींत चालू काळी सुद्धा त्यापुढें आपलें गेलें नाहीं असें म्हणावें लागतें. नाक, कान इत्यादि अवयव कापून नवे बसविणें हीं सध्या कष्टसाध्य असलेलीं कामें त्या काळी सहज करीत असत. त्याचप्रमाणें या कामीं लागणारी शस्त्रें सुद्धां विलक्षण तीक्ष्ण, नाजूक व सूक्ष्म असत. फार काय, पण केससुद्धां उभा पिंजून देत असत असें म्हणतात. हस्तलाघव, धीटपणा वगैरे या कामीं लागणारे गुणही भरपूर दिसून येत. चिर-फाड करणें, छाट मारणे, रक्तप्रवाह बंद करणें, सूक्ष्म हत्यारें तयार करणें, वनस्पतींचे पापुद्रे व काडी यावर प्रयोग करून विद्यार्थ्यांस शिकवणें, सुईणपण करणें, जिवावरील कामें करताना धीर न खचणें, बायकामुलांची पाहणी करणें इत्यादि गोष्टी फार धिटाईनें, चतुराईनें, निश्चलपणें व काळजीनें केल्या जात. वर्गीकरण, कारणे, चिन्हें, शुश्रूषा, निदान, भावी लक्षणें या गोष्टीचा आर्यांच्या शारीर-शास्त्रांत प्रामुख्यानें अंतर्भाव होत असे. अश्वव्याधि, गजव्याधि याचाही थोडा फार विचार झाला होता. परंतु प्रयोग व निरीक्षण या दोन गोष्टी शस्त्रक्रियेंतील मुडदेफाडीपेक्षां अधिक श्रेयस्कर असें सुश्रुताचे मत आहे.

अश्वरोगशास्त्रावरील एका ग्रंथाविषयीं एलियटसाहेबानें पुढील उद्गार काढले आहेत. “ लखनौ येथील राजग्रंथसंग्रहालयांत अश्वरोगशास्त्रावर एक ग्रंथ आहे. त्याचें भाषांतर ग्यासुद्दिन महंमदशहा खिलजीनें करविलें. या फारशी भाषांतरांत त्यास ‘ कुरटुल्मुल्क ’ हें नांव दिलेलें आहे. सुश्रुताचा गुरु शालिहोत्र या नांवाचा एक ब्राह्मण होता व त्याच्याच नावावरून हें नांव त्या पुस्तकास मिळालें, व हें भाषांतर १३८१ सालीं करण्यांत आलें.

ह्या ‘ कुरटुल्मुल्क ’ फारशी ग्रंथास जी प्रस्तावना जोडण्यात आली आहे त्यात असें म्हटलें आहे कीं, कुधर्मी व भ्रष्ट हिंदु लोकांच्या भाषेकडे वारंवार

जावें लागूं नये व त्यांजपाशीं संपर्क नको म्हणून हें पुस्तक तयार केलें आहे. जरी ह्या पुस्तकाच्या भाषांतराचे १३८१ असें साल दिलेले आहे तरी तें चुकीचे असावे असें वाटतें; कारण ह्या तारखेशी सुलतान ग्यासुद्दिन महंमद शहाची कारकीर्द जुळत नाहीं; तर तो ग्यासुद्दिन तखलग असेल तर हे साल ६० वर्षे मागें नेले पाहिजे; बरें याच नांवाचा माळव्याचा सुलतान होता असें समजलें तरी १०० वर्षांची चूक होते; सर्वसाधारणपणे असे म्हणण्यास हरकत नाहीं कीं, हें पुस्तक अकबराच्या पूर्वी तयार झालें आहे. या पुस्तकाचे ११ भाग व सूत ३० प्रकरणें आहेत. खालीलप्रमाणे भागाची वर्गवारी दिलेली आहे.

( १ ) जाती व नामे ( २ ) अश्वारोहण, निपज, गंध ( ३ ) तबेल्याची व्यवस्था व गोमाशांचा बंदोबस्त, ( ४ ) वर्ण व तऱ्हा, ( ५ ) ठिपके व वर्णच्छटा, ( ६ ) रोग व उपाय, ( ७ ) रक्तस्राव, ( ८ ) अवयवरचना, ( ९ ) भक्ष्य व आहार, ( १० ) स्थूल दिसण्याकरिता कोणतें अन्न द्यावें, ( ११ ) दातांवरून वयोमर्यादा कशी ठरवावी.

याच विषयावर संस्कृतामधून आरबी भाषेत ' किताबुलबैतारत ' या नावाचे दुसरें एक पुस्तक बगदाद येथे तयार झालें होतें; परंतु त्याचा नामनिर्देशसुद्धा ' कुरातुलमुल्क ' च्या संपादकाने केला नाहीं. यावरून ते त्याच्या पहाण्यात आलें नसावे. असे वाटतें. त्याचप्रमाणे याच विषयावर आणखी एक पुस्तक शहाजहानच्या कारकीर्दींत तयार झालें होतें. त्याचें नाव ' शालोटारी ' असे होतें. मूळ ज्या संस्कृत ग्रंथाचें हे भाषांतर आहे त्याची १६०० श्लोकसंख्या आहे. मेवाडचा राणा अमरसिंह याजवर जहांगिरच्या कारकीर्दींत जेव्हा स्वारी झाली तेव्हां इतर संस्कृत पुस्तकाबरोबर हे षोडश सहस्रात्मक श्लोकाचें पुस्तक सय्यद अबदुल्लाखान बहादुरजंग यास सापडलें व त्याचें त्यानें भाषांतर केलें. अशा रीतीच्या या तीन ग्रंथाचा पूर्वेतिहास आहे. यावरून हें शास्त्र देखील किती पुढे गेलें होतें याची कल्पना येईल शारीरशास्त्रासंबंधी सर्वसाधारणपणे प्रो. वेबर म्हणतो की, " वेदकालीन प्राण्याच्या शारीरशास्त्राचें बरेंच ज्ञान आर्य लोकांस अवगत होतें. कारण प्रत्येक अवयवास भिन्न व योग्य शब्द सापडतो व ही गोष्ट शास्त्राच्या वाढीशिवाय होणें शक्य नाहीं. मग मनुष्याच्या शारीर शास्त्राची गोष्ट कशाला हवी ? अमरकोशामध्ये मनुष्याचें शरीर व रोग यांसंबंधीं जे शब्द दिलेले आढळतात त्यांवरून वरील अनुमानच काढणे प्राप्त आहे. " प्रोफेसर विल्सनच्या मतें संस्कृतमध्यें वैद्यकग्रंथाची बरीच मोठी संख्या असून त्यापैकीं

प्रख्यात ग्रंथांची आरबी भाषेंत भाषांतरें झाली आहेत. या भाषांतर ग्रंथामध्यें वैद्यकशास्त्राच्या शस्त्रक्रियेसुद्धां सर्व शाखांचा ऊहापोह केलेला आहे व बिनचूक निरीक्षण आणि सप्रमाण, यथान्याय व यथाशास्त्र औषध-योजना दिलेल्या आहेत.

सर्व सुधारणांची जननी, विद्येचें माहेरघर, कलांचें विश्रामस्थान, धर्म व तत्त्वज्ञानाची मूलभूमी असें हे प्राचीन आर्यावर्त असल्यानें सर्व जगानें याच्या तोंडाकडे पहावें, यापासून शिकावें, याजकडून न्यावें व उपकृत व्हावें यांत काय आश्चर्य ? शिक्षणानें व अध्यापनानें आर्यभूमीचे सर्व जगावर उपकार झालेले आहेत हें खरें; परंतु मनुष्यास जोंपर्यंत शरीर ही वस्तु अत्यंत प्रिय वाटणार तोंपर्यंत या बाबतींतले भारतीयांचे उपकार जगानें विसरणें म्हणजे महान् कृतघ्नपणा होय. सर्व युरोपनें प्राचीन हिंदुस्थानांतून वैद्यकाची कला नेलेली आहे. " मद्रास किंग् इन्स्टिट्यूट ऑफ् प्रिव्हेन्टिव्ह मेडिसीन् " या नांवाची संस्था उघडण्याचे वेळीं मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड अँप्थिलसाहेब म्हणतात कीं, " खरोखर हिंदू लोकांनीं कर्नल किंगसाहेबाचे सदैव ऋणी असले पाहिजे; कारण कीं त्यानें पुढील अभिमानाची गोष्ट प्रथम हिंदूंस समजावून दिली. ' युरोपखंड अगदीं रानटी स्थितींत होतें त्या वेळीं हिंदुस्थानांत उपचारात्मक व प्रतिरोधात्मक दोन्ही पद्धतींचीं औषध तयार करण्याचीं तत्त्वें सर्वत्र महशूर झालीं होतीं. वैद्यकशास्त्र हिंदुस्थानांत तयार होऊन नंतर त्याचा प्रवेश युरोपांत झाला ही गोष्ट सर्वांस अवगत आहे की नाहीं कोण जाणें; परंतु वस्तुस्थिति अशी आहे. युरोपांतील वैद्य १७ व्या शतकापर्यंत आरबी ग्रंथांवरून हें शास्त्र शिकत; व स्वतः आरबांनीं तें हिंदुस्थानांतून नेलें होतें. प्राचीन सुधारणा पूर्वेकडून पश्चिमेस गेली असतां त्या सुधारणेच्या जन्मभूमींत-आर्यावर्तांत-तिचा मागमूसही उरूं नये हें केवढें आश्चर्य ?

आतां हें शास्त्र हिंदुस्थानांतून बाहेर कसें गेलें या हकीगतीकडे वळूं. या शास्त्राच्या देशांतरास ८ व्या शतकापासून प्रारंभ झाला. ७५३-७७४ च्या दरम्यान सिंधप्रांत आरबी खलीफ मनसूर याचे ताब्यांत होता. त्या वेळेस वकील-मंडळाबरोबर आणखीही विद्वान् येत, येथें अभ्यास करीत, पसंत पडतील त्या ग्रंथांचीं भाषांतरें करीत, जे हिंदू विद्वान् त्यांच्या बरोबर जाण्यास तयार असतील त्यास बगदाद येथें घेऊन जात असा क्रम चालू होता. जे विद्वान् येथून बाहेर गेले त्याबरोबर ब्रह्मगुप्ताचा ब्रह्मसिद्धान्त व खंडखाद्यक हे ग्रंथ बाहेर गेले.

या पंडितांच्या साहाय्यानें अल्फाझारी व याकूब हबन तारीक यांनीं या ग्रंथांचीं भाषांतरें केलीं. तेव्हांपासून या ग्रंथांचा फार प्रसार होऊन आरबी लोकांवर त्यांची फार छाप पडली, व आरबाना टॉलेमिच्या पूर्वी ज्योतिषशास्त्राचें याच ग्रंथावरून ज्ञान झालें. याच ज्ञानगंगेचा दुसरा ओघ हरूनच्या काली म्हणजे ७८६–८०८ च्या दरम्यान वहात होता. वैभवशिखराच्या उत्तुंग शिखरावर आरूढ झालेलें बरमाक नामक प्रधान कुटुंब वल्खहून राजघराण्याबरोबर बगदादला आलें होतें. मूळ वल्ख शहरीं त्यांचा पूर्वज बुद्धधर्मी असून तेथील विहाराचा तो अधिपति होता. परंतु पुढें बुद्ध अंमल नष्ट झाल्यावर हे मूळचें बुद्ध कुटुंब महंमदानुयायी बनलें. परंतु त्या कुटुंबाचे ठिकाणीं मुसलमानी कडवेपणा नसून लोकांनाही ते कुटुंब मूळ शुद्ध मुसलमानी धर्माचे आहे असे वाटत नसे. या कारणाने म्हणा अथवा आनुवंशिक संस्कारांच्या प्रभावामुळें म्हणा, त्याचा हिंदुस्थानाकडे फार ओढा होता. त्यामुळें त्यानीं हिंदुस्थानात विद्वान् पाठवून त्यांस वैद्यशास्त्र व औषधें तयार करण्याची कृति पढवून नेलें. तसेच हिंदुस्थानांतील विद्वान् व पंडित यास बगदाद येथें बोलावून त्यांस राजवैद्य व रुग्णालयपति केले आणि त्याच्याकडून आरबीमध्ये वैद्यशास्त्र, विषोपचारशास्त्र औषधाची रासायनिक कृति, तत्त्वज्ञान, ज्योतिषशास्त्र व इतर विषय याजवर ग्रंथ तयार करवून घेतले. यानंतर खुद्द मुसलमानपंडित बारमाकचे वकील म्हणून हिंदुस्थानात येऊन हेंच काम करीत. उदाहरणार्थ आल्मुवांफक या नावाचा एक पंडित आल्बेरुनच्या अगोदर थोडेच दिवस येऊन गेला होता.

त्याचप्रमाणें ९५०–६० मध्ये बगदाद येथें राज्य करणारा खलीफः ७५३–७७४ मधील आलमामसूर; सासोनेयन राजा नोशिरेवन ( ५३१–५७२ ) याचा समकालीन बर्झोव्ह; बगदाद येथें राहणारे काहीं ग्रीक, आद्य आरब ग्रंथकार सेरापियन, आल्मानसूरपाशीं असलेला व्हाझी; शेख राइस् अथवा अबूअली सिना ( १०३६ मृत्यू ) फिरोझशहा बादशहाचा नोकर आयाझुद्दिन खालीद या गृहस्थानीं अत्यंत परिश्रमानें, काळजीने व दीर्घ व्यासंगाने संस्कृत वैद्यक ग्रंथांचीं आरबी भाषेत भाषांतरें करून आरबी वैद्यकशास्त्र तयार केलें. यापैकीं कांहीं स्वतः बादशहा असून बाकीचे पंडित होते. आरबी बादशहानीं फार धूर्तपणानें, दूरदृष्टीनें, प्रजाहिततत्परतेनें, शास्त्रज्ञान–लालसेनें आपल्या दरबारातील पंडिताकडून त्यास मोठीं इनामें देऊन संस्कृत ग्रंथाच्या आधारें आरबी वैद्यक ग्रंथ तयार केले व काही ठिकाणीं निव्वळ भाषांतरें करविलीं. ह्या पंडिताच्या

ग्रंथामध्यें अश्विनीकुमार, चरक, सुश्रुत यांचीं नांवें ठिकठिकाणीं आलीं असून त्यांचे गुणानुवाद मोठ्या उदार मनानें गाइले आहेत; त्यांच्या बुद्धिमत्तेची तारीफ केलेली आहे; व त्यांच्या परिभाषाकौशल्याचें कौतुक केलें आहे. त्या वेळीं हिंदु विद्वानांस सर्वत्र पाचारण केलें जात असे, त्यास मोठ्या सत्कारानें नेऊन त्यांचा द्रव्यद्वारा उत्तम परामर्ष घेतला जात असे व त्यांजकडून भाषांतराचें काम करून घेण्याबद्दल त्यांची मनधरणी केली जात असे. याचीं खालीं दोन उदाहरणें देतों. अबूओसाहिबा नामक आरबी ग्रंथकार म्हणतो कीं, मंकानामक एक प्रख्यात आयुर्वेदविशारद होता. तो हिंदुस्थानांतून इराण येथें गेला; खलीफ हरून अल-राशिद यास त्यानें बरें केलें; चरकाचा पारशी भाषेत एक विषारी द्रव्यावरील ग्रंथ यानेंच भाषांतरित केला. असाच सालेह नामक दुसरा हिंदु विद्वान् होता असें अबूओसाहिबा लिहितो. तो तत्कालीन पंडितामध्यें अग्रगण्य असून आर्य-वैद्यकाच्या पद्धतीनें उपचार करण्यांत अत्यंत कुशल होता. हा सुद्धा हरू-नच्या कारकीर्दींत इराक येथेंच रहात असे. पुढें तो इजिप्त, पालेस्टाईन-मधून प्रवास करीत असतां वाटेंत मरण पावला. तेव्हां त्यास इजिप्तमध्येंच पुरण्यात आलें.

वरील एकंदर विस्तारावरून एवढें लक्षांत येण्यास हरकत नाहीं कीं, वैद्यक-शास्त्र मूळचें हिंदूंचें असून त्यांनीं त्याची सर्व शाखांसह पूर्ण वाढ केली होती. अशा सर्वांग सुश्लिष्ट शास्त्राचा उपयोग युनानी पद्धत उभारण्यास सर्वांशीं झाला. यावरून मुसलमानी वैद्यशास्त्राचा सर्व डोलारा आर्यवैद्यकावर उभारला होता; व आरबी भाषेतून पुढें हें शास्त्र युरोपांतील निरनिराळ्या देशांनीं उचललें. १७ व्या शतकापर्यंत युरोपियन वैद्यकशास्त्रास सर्वस्वीं याचाच आधार होता. चरकाचें नाव लाटीन भाषेंतील भाषांतरांत ठिकठिकाणीं पहावयास सांपडतें. ज्याअर्थी या लाटीन भाषेतील ग्रंथावरून पुढें आधुनिक युरोपियन भाषांत आर्यवैद्यक उतरलें आहे त्याअर्थीं हल्लींच्या युरोपांतील वैद्यकशास्त्राचा सुद्धां मुख्य आधार आर्य-वैद्यकच आहे असें म्हटल्यास कांहीं वावगें होणार नाहीं.

वरील विवेचनावरून आर्यवैद्यक कोणकोणत्या मार्गांनीं युरोपांत गेलें हें कळणें सुलभ आहे. पहिला मार्ग सिंधमधून आरबी समुद्राच्या मार्गानें व दुसरा अफ-गाणिस्थान, इराण व अरबस्थानांतून. आरबांप्रमाणें पूर्वीं ग्रीक लोकांनीं सुद्धां आर्यवैद्यकज्ञानाचा प्रसार व संरक्षण मोठ्या दक्षतेनें केलें. आम्‍डआरियम नामक ग्रीक वैद्य व दुसरा ईटियस या दोघांनीं त्रिफळा कसा करावा याचें वर्णन

आपल्या ग्रंथात केलें आहे. यावरून केव्हांपासून आर्यवैद्यकाचा अभ्यास प्राचीन लोक आस्थेनें करीत होते हें दिसून येईल.

सर्व जगास ज्या आर्यवैद्यकानें शहाणें करून सोडलें त्यावर प्रो. विल्सन म्हणतो त्याप्रमाणें शेकडो ग्रंथ झाले असल्यास काय नवल ? यांपैकीं काहीं मुख्य ग्रंथकारांचीं नांवें पुढें देतों.

आत्रेय, अग्निवेश, चरक, धन्वंतरी, सुश्रुत, भारद्वाज, कपिस्थळ, भेल, लातुकर्ण, पाराशर, हरित, कश्यप, आश्वलायन, बादरायण, कात्यायन, वैजवापी, कुश, संस्कृत्यायन, बाभ्रव्य, कृष्णात्रेय, औद्दालकी, श्वेतकेत, पंचाल, गोनर्दिय, गोणिकपुत्र, सुबंधु, शंकर, कंकायन.

नियरकस म्हणतो कीं, अलेक्झांडरच्या दरबारीं असलेल्या ग्रीक राजवैद्यांना सर्पदंशावर उपाय माहीत नव्हता, परंतु त्याच दरबारीं असलेल्या हिंदी वैद्यांनीं सर्पदंशावर ताबडतोब उपाय योजून रोगी बरे केले व जितके सर्पदंशाचे रोगी असतील तितके आपण बरे करूं असे जाहीर केले. या ऐतिहासिक पुराव्यावरून सर्पदंशासारख्या अत्यंत प्राणघातक गोष्टींत विलक्षण सिद्धि मिळवून किती अनाथ लोकाना त्यांनीं जीवदान दिले असेल याची वाचकांनीच कल्पना करावी.

आतापर्यंत पुष्कळ गोष्टींच विवेचन झालें. आतां भारतीय रसायन कोठपर्यंत पोंचलें होतें याबद्दल विद्वानांचे काय मत आहे ते पाहूं. एल्फिन्स्टनसाहेबाचा असा सरसकट शेरा आहे कीं, हिंदूंचे रासायनिक कौशल्य कल्पनातीत अतएव विलक्षण आश्चर्यकारक होतें. ह्या पुस्तकात मोठ्या दुःखानें एक गोष्ट वारंवार लिहावी लागते याबद्दल वाईट वाटतें; ती ही कीं, काळाच्या सपाट्यात 'माधव' नामक वैद्यग्रंथकारानें निर्दिष्ट केलेले बहुतेक ग्रंथ नाश पावले व त्यांपैकीं हल्लीं 'रसार्णव' हा एकच शिल्लक आहे. भारतीय रसायन शास्त्राच्या इतिहासकारानें आणखी एक रसरत्नाकर म्हणून ग्रंथ सांगितला आहे. तो म्हणतो कीं, रसार्णव व रसरत्नाकर हे प्रयोग-प्रतिपादक ग्रंथ असून त्यात सहजासहजीं क्रियेच्या प्रश्नाचा विचार केला आहे. याशिवाय रसरत्नसमुच्चय म्हणून एक पद्धतशीर व बराच मोठा ग्रंथ असून त्यांतील विवेचनशैली, शास्त्रीय परिभाषा व विषयमांडणी इतकी सुबक व सफाईदार आहे कीं, तो ग्रंथ गेल्या थोड्या वर्षांच्या काळात कोणी तरी लिहिला असावा असे वाटतें. यात औषधें तयार करण्याची कृति, औषधांचीं नांवें व गुणधर्म आणि औषधोपयोगी वस्तु हीं सर्व दिलेलीं आहेत.

सुश्रुतासंबंधीं डॉ. रॉय म्हणतो कीं, सुश्रुताच्या ग्रंथांत ( कॉस्टिक अल्कली ) तयार करण्याच्या कृतींत लोहपात्रांत सोडाखाराचें मिश्रण ठेवावें ही जी सूचना दिली आहे ती चालू प्रयोगास व रसायनशास्त्रज्ञानास किती धरून आहे हे जर ताडून पाहिलें तर भारतीय आर्यांच्या इतक्या प्राचीन शोधाबद्दल व औषधें तयार करण्याच्या नैपुण्याबद्दल मन अगदीं आश्चर्यानें गुंग होऊन जातें. हा प्रयोग ढोंगीपणाचा, जडीबुटीचा, भोंदूपणाचा नसून सर्वांशीं शास्त्रसंमत आहे; बर्थेलॉट नामक एका विद्वानानें नवीन शोध लावून असें सिद्ध केलें आहे कीं, तो प्लिनीस ११ व्या शतकांत माहीत होता; परंतु सुश्रुताच्या ग्रंथावरून या शोधाचें सर्व महत्त्व संपुष्टांत येऊन आर्यांच्या कल्पकतेचें यथार्थ कौतुक होणें शक्य नाहीं असेंच मनास वाटूं लागतें. रसायनशास्त्राचा उपयोग वैद्यशास्त्रांत करून पाऱ्याच्या रसायनाचा उपयोग पोटांत घेण्याच्या कामीं प्रथम पॅरॅसेलस ( १४९३–१५४१ ) यानें केला असा गौरवपर उल्लेख युरोपांतील प्रत्येक भाषेंतील रसायनशास्त्राच्या इतिहासांत केलेला आहे; परंतु भारतीय रसायनशास्त्राचा इतिहासकार म्हणतो कीं, पॅरॅसेलस यानें पूर्वेकडील देशांतून हें ज्ञान पैदा केलें असें मानण्यास बळकट आधार आहे.

धातूंच्या रसायनासंबंधीं डॉ. रॉय आपल्या 'भारतीय रसायनशास्त्राचा इतिहास' नामक ग्रंथांत असें लिहितो कीं, "आतापर्यंत जीं कारणें दाखविलीं त्यावरून पाऱ्याचीं रसायनें तयार करण्याचे कामीं हिंदूंनीच सर्वांपेक्षा आघाडी मारली असें दिसून येईल. अथवा तीं तयार करणें हा त्यांचा आवडताच विषय होता असें म्हटल्यास चालेल. सुश्रुत, चरक या दोघांचेच ग्रंथ जरी पाहिले व इतरांचे सोडून दिले तरी पोटांत घेण्यासाठीं धातूंच्या रसायनाचा उपयोग प्रथम हिंदूंनीच केला असें निःसंशय ठरतें."

थोरल्या प्लिनीच्या काळापर्यंत पाऱ्याचे कोणकोणते औषधी गुणधर्म आहेत याचा युरोपांत निश्चय झाला नव्हता. प्लिनीनें पाऱ्यास सर्व धातूंमध्यें कनिष्ठ ठरवून त्यास विषाची उपमा दिली आहे. यावरून प्लिनीच्या काळापर्यंत युरोपाचें वैद्यकविषयक ज्ञान किती दाढलें होतें याची कोणासही कल्पना करितां येईल.

पुढील एल्फिन्स्टनच्या उताऱ्यावरून आर्यवैद्यकाची व्याप्ती केवढी होती याची कल्पना करण्यास सोपें जाईल.

" तेजाब, मत्रिकाळ, लोह, ताम्र व शिसें, कथील व जस्त यांचीं प्राणील मिश्रणें; लोह, ताम्र, पारद, अंज व सोमल याचीं गंधयुक्त मिश्रणें; व लोह आणि शिसें याचीं कारबानमय लवणें यांच्या कृति संस्कृत ग्रंथात दिलेल्या असून त्या थोड्या चमत्कारीक आहेत. आर्यवैद्यक यांचा बिनदिक्कत उपयोग करीत असे. केवळ पारद व इतर खनिज पदार्थ पोटात घेण्यास देत असत, एवढेंच नव्हे तर धुराच्या कामीं रक्तपादाचा उपयोग करून त्यापासून त्वरित व सुखकर लालास्राव उत्पन्न करीत; लस टोचण्याचाही त्याचा प्रघात असे; व शस्त्रकलाभिज्ञास भूषणभूत व अभिमानास्पद अशी गोष्ट म्हणजे गर्भ कापून काढीत असत शस्त्रक्रियेच्या १२७ हत्यारांचीं नावे संस्कृत वैद्यकग्रंथांत दिलेली आहेत. "

राष्ट्रीय विश्वविद्यालयावर व्याख्यान देत असता १९०६ साली बेझंटबाई असें म्हणाली कीं, " भौतिक शास्त्रे व रसायनशास्त्र यात तुम्हीं फारच मजल गांठलेली आहे; पण वैद्यकात तुम्ही विशेष पुढें गेला आहा. पाश्चात्य देशांत वैद्यक हे शास्त्र नसून अजून अंदाजावरच त्याचे बरेचसें काम चालले आहे. औषधे तयार करण्याच्या पाश्चात्य पद्धतीपेक्षा हिंदुस्थानातील आर्य व युनानी या दोन्ही भेषजपद्धति फारच पुढे गेलेल्या आहेत. ' प्राचीन भारतात भेषज-शास्त्र, आरोग्यशास्त्र व रसायनशास्त्र इत्यादि शास्त्राचा किती विकास झाला होता हे सध्या उपलब्ध असलेल्या ग्रंथावरून व चिकाटीने शोध लावणाऱ्या चिकित्सक विद्वानाच्या परिश्रमावरून दिसून येत आहे. भारतीय वाङ्मयामध्ये जों जो जास्त शोधकबुद्धीने प्रवेश करावा तों तों प्राचीन तत्त्वज्ञानावर व शोधावर नवीन प्रकाश पडल्याशिवाय रहात नाहीं हें कोणासही प्राचीन वस्तुसंशोधकाच्या वार्षिक अहवालावरून व मासिक पुस्तकावरून कळून येईल.

किंग इन्स्टिट्यूट ऑफ प्रिव्हेंन्टिव्ह मेडसिन् या संस्थेच्या सुरवातीस प्रारंभ करण्याच्या वेळी मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड ॲम्पथिल् यांनी जें भाषण केलें त्यावरून वरील म्हणण्याची प्रतीति आल्याशिवाय रहाणार नाहीं.

" प्राचीन आर्यावर्तांतून मुसलमान लोकांनी वैद्यकशास्त्राचे ज्ञान स्वदेशीं नेले होतें तें त्यांनीं हिंदुस्थानावर स्वारी करून येथे राज्य करण्यास आल्यावर परत आणले. मध्यंतरी पुष्कळ शतकें या ज्ञानाचा लोप झाल्यासारखा वाटत असे, परतु मुसलमानांच्या आगमनानें तें ज्ञान परत स्वदेशीं आलें. उत्तर हिंदुस्थानांत मोंगल बादशहांनीं जीं जी शुद्ध जलसंचयाची कामे करून लोकांच्या आरोग्याची

तरतूद केली त्यांपैकीं बरीच सध्या सुस्थितीत आहेत; त्यावरून मोंगल राजे आरोग्यसुधारक होते, त्यांनीं प्रजेच्या शरीरस्वास्थ्याची व अनामयत्वाची पुष्कळच काळजी घेतली असे दिसते. हल्लीं ब्रिटिश अमदानींत म्युनिसिपालट्याच्या संस्थापनेनें व कारभारानें त्याच प्रकारच्या लोकाच्या सुखसोयी वाढविण्यात येत आहेत. शुद्ध जलसंचय, जलशुद्धीकरणाचीं कामें, पाण्याच्या दाबाचा उपयोग, लौकिक सुखाकरितां करून घेण्याकरितां बांधलेली कामे, दवाखाने, रुग्णालयें, वैद्यकपाठशाळा साथींचा प्रसार न होण्याबद्दल केलेले कायदे, लोकांचें आरोग्यसंवर्धन होण्याकरिता म्युनिसिपालट्या ( नगरमंडळ्या ) व ग्रामंडळ्या यांजवर लादलेली जबाबदारी, इत्यादि गोष्टी नवीन वाटतील, परंतु प्राचीन काळीं आर्यावर्तांत अस्तित्वात असलेल्या गोष्टींचें हे फक्त अनुकरण आहे व यात नवीन असे काही नाहीं.

मध्यंतरीं अवनतीच्या फार प्रबल मान्यापुढें या सर्व लोकहितकारी गोष्टी नष्ट झाल्या, त्याचा अवशेष सुद्धां क्वचित् राहिला नाहीं, यामुळें हिंदुस्थानातील लोकांस त्या नवीन वाटत असून ब्रिटिश अंमलाबरोबर ज्या पुष्कळ गोष्टी आल्या त्यापैकींच ही आहे असे वाटते. परंतु खरी गोष्ट अगदीं उलट असून शिष्यावर गुरूस शिकविण्याची पाळी आली आहे. एवढेंच नवीन आहे. काळाच्या असंख्य कौतुकास्पद लीलापैकी ही एक आहे यापेक्षा दुसरे काय ? इतिहासकार व प्राचीन वस्तुसंशोधक याच्या परिश्रमानें या गोष्टी प्रकाशांत येऊन प्राचीन आर्यावर्तांचें ज्ञानवैभव केवढें होते, अवनतीच्या फेऱ्यात सापडल्यामुळें किती हानि होते, समर्थांच्या पदरीं केवढा दैन्यपणा येतो या सिद्धान्ताचें स्पष्टीकरण पहावयास मिळतें. या जगात नवीन असें कांहीं नाहीं. हल्लीं जें आहे ते प्राचीन काळीं होते, फक्त स्वरूप भिन्न असेल, पेहराव निराळा असेल, अथवा लौकिक ज्ञान व समजूत सर्वसामान्य नसेल एवढाच फरक; सर्वस्वीं नवीन असे कोठेंही आढळणार नाहीं. याच तत्त्वाचें सत्यत्व हल्लीं रोगप्रतिबंधकपद्धतींत दृग्गोचर होते. संसर्गानें व स्पर्शानें रोगाचा प्रसार होतो हें तत्त्व हल्लीं सर्वत्र सर्वज्ञात झाले असल्यासारखे दिसतें; परंतु कर्नल किंग म्हणतो कीं, तें प्राचीन काळीं लोकास माहित असून अधम व कनिष्ठ जातींच्या स्पृश्यास्पृश्यतेच्या चालीवरून समाजांत रूढ होतें हें कोणाही विचारी मनुष्यास समजल्याशिवाय रहाणार नाही त्याचप्रमाणें हिंदु व मुसलमान लोकात देवीची लस टोचून देवीच्या साथीचा प्रतिकार करण्याची चाल होती. जेन्नरनें जो देवीच्या लसीचा शोध लावला तो नवीन नसून मागील ज्ञानात थोडीफार भर टाकली असें म्हणतां येईल. कारण जेन्नरच्या पूर्वी युरोपांत सुद्धां

हा उपाय माहीत होता, व तो कान्स्टांन्टिनोपलाहून युरोपांत गेला. तुर्की मुलुखांत व युरोपलगतच्या आशिया खंडाच्या भागात वैद्यशास्त्र जें भरभराटीस आले तें मूळ हिंदुस्थानांतूनच तिकडे गेलें याबद्दल कोणासच संशय घेण्यास जागा नाहीं." कारण ही गोष्ट मागील विवेचनांत स्पष्टपणे सिद्ध केलेलीच आहे. सबब गव्हर्नरसाहेबाच्या म्हणण्यास त्या गोष्टीचा पुरावा मिळून मागील विवेचन व हें भाषण हीं परस्परपोषकच झालीं आहेत. गव्हर्नरसाहेब पुढें त्याच भाषणात म्हणतात कीं, "कर्नल किंगने गाईच्या फोडातून लस घेऊन ती मुलांच्या दंडांत घालणें व एका मुलाच्या फोडातून लस घेऊन तिने दुसरें मूल टोचणें हा देवीच्या साथींतील उपाय धन्वंतरीच्या ग्रंथात आढळतो असे सिद्ध केले आहे.

**धन्वंतरीच्या ग्रंथांत पुढील शब्द आहेतः**—'गायीच्या बेंबीतून निघणारें प्रवाही द्रव्य अथवा मनुष्यप्राण्याच्या दंडातून मिळणारें पातळ द्रव्य हें एका सुईच्या अग्रावर घ्या व त्यानें दंडातून रक्त निघेपर्यंत टोचा म्हणजे ते रक्तात मिनेल. असें केल्यानें देवीचा ताप येईल.' हल्लींच्या देवी टोचण्याच्या उपायाहून हा कोणत्याही प्रकाराने भिन्न नाही व जेन्नरच्या पूर्वी प्राचीन काली हिंदूंनी हा शोध लाविला होता असे मानण्यास कोणताच प्रत्यवाय नाही त्याचप्रमाणे हल्ली प्लेगच्या दिवसात स्थानत्याग व हवा शुद्ध करण्याचे जे प्रकार योजण्यात येतात ते सुद्धा हिंदु वैद्यकशास्त्रात सांगितलेले आहेत असे मानण्यास कर्नल किंगच्या शोधाचा बळकट पुरावा आहे."

---

# प्रकरण ६ वें.



## गणित.



मनाची एकाग्रता व विचाराचें केंद्रीकरण या दोन गोष्टी प्राचीन हिंदु लोकास फार उत्तम साध्य झाल्या असल्याकारणाने मानसिक स्वास्थ्य व आनंद यांचा त्याना पूर्ण लाभ झाला होता. अशा मनस्थितीच्या लोकाच्या हातून काय होणार नाहीं? मात्र यांना किती वर्षांची खडतर तपश्चर्या, केवढा मनोनिग्रह व कसला आत्मविश्वास पाहिजे याचा अनुभव प्रत्यक्ष तो प्रयत्न सुरू केल्याशिवाय कळणार नाहीं. परिणामीं गोड ते सर्वत्र गोड या न्यायानें आर्यांच्या ठायीं हे गुण मुळा

पासून होते असें गृहीत धरण्यास कोणतीच अडचण दिसत नाहीं. अशा प्रकारच्या मनाच्या तालमीनें त्यास कोणतीही इंद्रियगोचर अथवा अतींद्रिय गोष्ट साध्य करणें कठीण जात नसे. या प्रकारच्या मनःस्थितीला प्रत्यक्ष प्रमाणे असून शिवाय त्यांच्या वाङ्मयांत तीं पदोपदीं दृष्टोत्पत्तीस येत. अशा मनोविकासी शिक्षणानें त्याच्या मेंदूची तरतरी फार वाढून त्याची धारणाशक्तीही जबरदस्त झाली होती. ही गोष्ट साध्य झाल्यानें सर्व प्रकारचीं चित्तैकाग्रतामूलक व मानसविकासात्मक शास्त्रें, उपशास्त्रे, त्यांस केवळ लीलेने उत्कट स्थितीप्रत नेतां आलीं. मनाची एकाग्रता व कल्पनांचें केंद्रीकरण यांच्या भक्कम पायावर ज्या गणितशास्त्राची इमारत नेहमीं उभारली जाते त्याचा हिंदू लोकांस अत्यंत छंद लागावा हें अगदीं साहजीक आहे. याला पुरावा पाहिजे असल्यास भारतीय ज्योतिषाचा बस्स आहे. आर्यावर्तांत ज्योतिषशास्त्र किती प्राचीन काळीं भरभराटीस आले, हें पाहिलें म्हणजे वरील गोष्टीस निराळा आधार देण्याची मुळी जरूरीच उरत नाहीं अर्थात ज्योतिषाबरोबर गणितही आलेंच. गणित हें केवळ कल्पनागम्य शास्त्र असता त्याचा हिंदूंनीं सर्व बाजूंनीं पूर्ण विकास करून त्याची मदत ज्योतिषशास्त्रास दिली हें पाहिलें म्हणजे क्षणभर असें वाटतें की, ह्या लोकाना प्रत्यक्ष सरस्वती प्रसन्न होऊन त्याच्या घरीं दासीप्रमाणे वागत होती की काय? अथवा सृष्टिदेवीनें आपलें सर्व कल्पनाधन याच्या चरणीं अर्पण करून यास जगाच्या शिक्षणासाठीं पाठविले होतें की काय न कळे. तें काहीं असो; याबद्दल सर्व विद्वानांचे ऐकमत्य असून गणितशास्त्राचे भारतीय लोक उत्पादक आहेत असें ठरलेले आहे. ज्यानीं गणितशास्त्राची उभारणी केली, त्यांनी अंकपद्धती शोधून काढली असेल याबद्दल शंकाच रहात नाहीं. कारण त्याशिवाय गणितशास्त्राचे एक क्षणभरही चालणार नाहीं. प्रख्यात जर्मन चिकित्सक श्लेजेल म्हणतो कीं, "मनुष्यानें आजपर्यंत जे जे शोध लावले त्यापैकी लिपीचा शोध पहिल्या प्रतीचा असून त्याच्या खालोखाल दशांश पद्धतीचा आहे असें इतिहासकारांनीं मानलेले आहे; व यापैकी दशांशपद्धतीहि हिंदूंचीच कल्पना आहे असा सर्वसंमत सिद्धांत आहे."

प्रो. मॅक्डोनल्ड म्हणतो कीं, "विज्ञानशास्त्रांत सुद्धां युरोपखंड भारतभूमीचें अत्यंत ऋणी आहे. अंकपद्धतीचा प्रथम फार मोठा शोध करून आर्यांनी जगावर उपकार केलेले आहेत. कारण ही पद्धत आधुनिक जगानें त्यापासून उचललेली आहे. त्यानंतर मोजमापनाच्या कामीं फार फायदेशीर अशी दशांशपद्धति सुद्धा त्यांनीच

शोधून काढली; हिचा परिणाम गणितशास्त्राच्या वाढीवर झाला नसून जगांतील सर्व सुधारणेवर व संस्कृतीवर झाला आहे. तेव्हां या गोष्टीची थोरवी मानावी तेवढी थोडीच होणार आहे. आठव्या व नवव्या शतकांत हिंदूंपासून आरबांनीं हीं शास्त्रे उचललीं व नंतर तीं आरबांबरोबर पाश्चिमात्य राष्ट्रांत आलीं. याच कारणानें बीजगणितास आरबी नाव प्राप्त झालें, परंतु त्याची खरी उत्पत्ति हिंदुस्थानांतच आहे." वर जो प्रो. मॅकडोनल्ड यांचा विस्तृत उतारा दिला आहे त्याचाच अभिप्राय पुढील लेखकाच्या याच विषयावरील लिहिण्यांत थोड्या-फार शब्दफरकानें व्यक्त झाला आहे. सर मोनियर विल्यम्स, मॅनिंग, सर हंटर, प्रोफेसर वेबर व प्रो. विल्सन यांनीं जवळजवळ सारख्याच शब्दांत वरील गणित-शास्त्राचें देशांतर कबूल केलें आहे. बीजगणितांतील पृथक्करणपद्धति, अंकपद्धति, दशांश लेखनपद्धति, ह्या गोष्टींच्या कल्पना हिंदू डोक्यांतून निघून त्यास त्यांनी पुढें शास्त्रीय स्वरूप दिलें. एकापासून नवापर्यंत आंकड्यांचीं जीं नावें आहेत त्यांच्या आद्य अक्षरांत व अंकांच्या लेखनपद्धतींत एक चमत्कारीक साम्य आहे. ह्या सर्व गोष्टींचें ज्ञान आरबांनीं करून घेतलें व त्यांजपासून ते पुढें युरोपांत फैलावलें हा मुख्य सिद्धान्त वर दिलेल्या युरोपियन् पंडितास मान्य आहे व तो त्यांनीं स्पष्ट व सरळ शब्दांत व्यक्त केला आहे.

## अंकगणित.

मॅनिंगबाई, प्रो. वेबर व सर विल्यम हंटर यांच्यासारख्या अत्यंत मेह-नती विद्वानांनीं निर्भीडपणें व स्पष्ट रीतीनें असें कबूल केलें आहे कीं, "बीजगणित व सर्व प्रकारचें अंकगणित यांत हिंदु लोकांनीं अत्यंत प्राविण्य संपादिलें होतें व या कामीं त्यांना कोणाचीही काडीमात्र मदत नव्हती."

प्रख्यात इंग्लिश गणितज्ञ प्रो. वॉलेस म्हणतो कीं, "लीलावती ग्रंथांत अंक-गणिताचा बहुत विचार केलेला आहे. अंकगणित शास्त्रांतील सर्वसाधारण नियम या ग्रंथांत दिले आहेत, एवढेंच नव्हे तर त्याचा व्याज, देवघेव, मिश्रण combination अंकपाश, श्रेणी, श्रेणींची बेरीज, अनिर्णीत प्रश्न व घना-कृतींचें मापन इत्यादि ठिकाणीं कसा उपयोग करून घ्यावयाचा हे सुद्धां सांगितलें आहे. हे नियम बिनचूक असून हल्लींच्या संशोधनाच्या रीतीनें पाहिले असतां अगदीं सोपेही आहेत. यावरून उत्तरें सहज काढतां येतात दशांशलेखन-पद्धतीच्या उपयोगाचें यांत फारच सुंदर विवेचन आहे."

परंतु लीलावती हा ग्रंथ अगदीं अलीकडच्या कालांतील असल्यानें त्यावरून हिंदुस्थानांतील खऱ्या गणितशास्त्राच्या वाढीचे ज्ञान होणार नाहीं. वेबरच्या

क्रमिक व शालोपयोगी अंकगणितावरून सर्व गणितशास्त्राची कल्पना करणे जितकें अप्रयोजक होईल तितकेंच लीलावतीवरून सर्व जुन्या भारतीय गणितशास्त्राचें ज्ञानमापन करणेंही अप्रयोजक होईल. आकड्याच्या घडामोडीचा व्याप कल्पनातीत वाढल्यानें त्याकरितां प्राचीन आर्यगणितज्ञांनीं जीं कोष्टकें व परिमाणें बनविलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे त्यांच्या गणितज्ञानाच्या वृद्धीचें अनुमान करण्यास सोपें जाईल.

## भूमिति.

भूमितिशास्त्रांत प्राचीन भारतीय आर्यांनीं अलौकिक कीर्ति संपादन केली होती हें तर महशूरच आहे. प्रो. वॉलेस याचा खालील लांबलचक उतारा घेणें जरा अप्रशस्त दिसेल, परंतु विषयाच्या महत्त्वाकडे दृष्टि दिली असता तो गुणी जनास रुचेल अशी आशा धरून तो घेण्याचें आम्ही धाडस करितों.

"ज्या एकाद्या पुस्तकांत त्रिकोणमितिशास्त्राचें उद्घाटन केलेलें आहे तें जरी कितीही प्राचीन काळीं रचलेलें असले तरी विज्ञानशास्त्राच्या प्रारंभकाळीं तें केव्हाहि निर्माण होणें शक्य नाहीं. सूर्यसिद्धान्ताचें लेखन होण्यापूर्वी भूमितिशास्त्र हिंदुस्थानास अवगत असलेंच पाहिजे. सूर्यसिद्धांत हा ग्रंथ ख्रिस्ती शकापूर्वी निदान २०० वर्षें तयार झाला होता हें युरोपियन शोधकांनीच कबूल केलें आहे.

ग्रीस व अरेबिया ह्या देशांत त्रिकोणमितींतील जी अकरणिगत पद्धति रूढ होती तीहून सूर्यसिद्धान्त ग्रंथांतील पद्धत फारच भिन्न आहे. युरोपांत व्हीटा नामक प्रख्यात गणितज्ञाच्या पूर्वी सुमारें दोनशें वर्षे जे गणिती होऊन गेले त्यांस भूमितींतील जो एक सिद्धान्त अवगत नव्हता. त्याच्याच आधारावर सूर्यसिद्धांतातील त्रिकोणमितीची इमारत उभारली होती. या हिंदी त्रिकोणमितींत जी कसज्या ( sine of arc ) योजलेली आहे ती ग्रीक लोकांस माहीत नव्हती; ते फक्त दुप्पट कंसाच्या पूर्णज्येचा chords of double arc उपयोग करीत असत. ज्या-चा ( Sine ) शोध आरबांनीं लावला असें मानतात; परंतु ग्रीक लोकांपेक्षा जें हें जास्त ज्ञान आरबास झालें तें हिंदूपासून असे मानल्यास कोणतीहि चूक होणार नाही. परिघाच्या भाषेंत वर्तुलाची त्रिज्या सांगणे हा प्राचीन हिंदूंचा एक अपूर्वच शोध होय. टॉलेमी व इतर ग्रीक गणिती यानीं त्रिज्येचे भाग पाडण्याच्या कामी परिघाचा काहीं संबंध आहे असे मुळींच मानलें नाहीं. ग्रीक लोकांस माहित नसलेला ज्या ( Sine )

चा उपयोग हाच हिंदू व ग्रीक त्रिकोणमितीतील महत्त्वाचा फरक होय. रेखामापनाच्या कामीं ग्रीक लोक जो नियम पाळीत असत तो विज्ञानशास्त्रातील एक फार मोठा शोध होय. आधुनिक काळांत ग्रीकांनंतर प्रथमतः याचा उपयोग ब्रिग्जनामक गणितज्ञाने केला.

हल्लीं तज्ज्ञानीं असा शोध लावला आहे कीं, हिंदुस्थानात भूमितीच्या सहाय्यानें तयार केलेलीं ज्योतिर्विषयक कोष्टकें होतीं; परंतु तीं केव्हा तयार झालीं याचा पक्का अदमास लागत नाहीं. काहीं विद्वानाचें असें म्हणणें आहे कीं, फार प्राचीन कालीं प्रत्यक्ष वेध घेऊन तीं तयार केलेलीं असावीं व तो प्राचीन काल म्हणजे ख्रिस्तापूर्वी तीन हजार वर्षांचा असला पाहिजे असें बेली वगैरे विख्यात ज्योतिर्विदाचें म्हणणें आहे. आता हें मत जर ग्राह्य धरावयाचें तर त्याबरोबरचें त्या कालीं अगर त्या कालाच्या पूर्वी पुष्कळ वर्षें हिंदुस्थानात भूमितिशास्त्राची वाढ झाली असली पाहिजे असें मानणें प्राप्त आहे. ही दोन्ही तत्त्वें मान्य झाल्यावर भूमितीतील प्रास्ताविक व आरंभाचे काहीं सिद्धांत हिंदुस्थानातून युरोपात म्हणजे ग्रीसमध्यें गेले असले पाहिजेत हें म्हणणें कोणासहि सहज पटण्यासारखें आहे.

भूमितीतील एक प्रख्यात सिद्धांत असा आहे कीं, काटकोन त्रिकोणाच्या कर्णावरील चौरसाचें क्षेत्रफळ त्याच काटकोन त्रिकोणाच्या इतर दोन बाजूंवरील चौरसाच्या क्षेत्रफळाच्या बेरजेबरोबर असतें. तीन बाजूंची लांबी दिली असता एकाद्या त्रिकोणाचें क्षेत्रफळ काढता येतें हा दुसरा महत्त्वाचा सिद्धांत आहे. हे दोन्ही सिद्धांत ग्रीक लोकास ठाऊक नव्हते व यांच गोष्टीवरून हिंदु भूमितिकोविदाची थोरवी सर्व जगाच्या प्रत्ययास येण्यासारखी आहे."

परंतु सूल्वसूत्रांची रचना ख्रिस्ती शकापूर्वी ८ व्या शतकात झाली व युक्लिडच्या पहिल्या पुस्तकातील ४७ वा सिद्धांत पायथागोरासनें प्रथम सिद्ध केला असें जे मानण्यात येतें तें बरोबर नाहीं. कारण पायथागोरसच्या पूर्वी निदान दोन शतकें तरी तो हिंदूंना माहीत होता याबद्दल पुरावा आहे. म्हणून पायथागोरसनें हिंदूंपासून भूमितीचें बरेंच ज्ञान उचललें असें जे श्रेडरचें म्हणणें आहे ते अगदीं यथार्थ आहे.

एल्फिन्स्टन म्हणतो कीं, " त्रिकोणाचें क्षेत्रफळ त्याच्या बाजूंनीं व्यक्त करता येतें ही हिंदूंस पूर्ण अवगत असलेली गोष्ट क्लॅवियसनें युरोपात प्रसिद्ध करीपर्यंत कोणास माहीत नव्हती. त्याचप्रमाणें त्रिज्या व परिघ याजमधील परस्परप्रमाण

हिंदू लोक जें मानीत व तें ज्या मापनानें मोजण्यात येई ते हल्लींच्या शोधावरून निघालेल्या प्रमाणाशीं पडताळून पाहता अगदीं तंतोतंत जुळते आहे. त्रिकोण व वर्तुळ याच्या गुणधर्माचे उद्घाटन वरील दोन उदाहरणावरून केलेले पाहिलें म्हणजे हिंदूंच्या भूमितीज्ञानाच्या खोलपणाची खात्री पटते. अगदीं गेल्या शतकापर्यंत ह्या गोष्टी युरोपियनास माहीत नव्हत्या व त्याच हिंदूंस हजारों वर्षांपूर्वी माहीत असाव्या यापेक्षा त्याची श्रेष्ठता सिद्ध करण्यास आणखी पुरावा तो कोणता पाहिजे ? ''

प्राचीन ग्रंथाचा जितका जितका जास्त शोध लागेल तितका तितका प्राचीन भारतीय आर्यांच्या ज्ञानराशीवर जास्त प्रकाश पडून आधुनिक ज्ञानधनमोद्धत युरोपियन पंडित याच्या डोळ्यात झणझणीत अंजन पडून त्याची दृष्टि निवळेल व हिंदुस्थानाबद्दल यथार्थ ज्ञान करून घेण्याची त्यास इच्छा होईल असें दिसते. अस्तु. शेवटीं काऊन्ट जानस्टर्ना याने दिलेले एक उदाहरण देऊन हे भूमितीचें प्रकरण आटपूं.

काऊन्ट जानस्टर्ना म्हणतो कीं, '' अकबर बादशहाच्या आयने अकबरी नामक सरकारी पुस्तकात वर्तुलाचा व्यास परिघाच्या १२५०—३९२७ ह्या प्रमाणात असतो असे दिलेले आहे अर्थात् हे प्रमाण हिंदूंपासून घेतले आहे यात शंका नाहीं. मेटियसचे ११३—३५५ हे प्रमाण व १२५०–३९२७ हे प्रमाण यात वस्तुतः विशेष फरक नाहीं. आता हें प्रमाण बसावण्यास एका वर्तुलमध्ये ७६८ भुजाचा बहुकोण काढता आला पाहिजे व तो काढण्यास नुसत्या अंकगणिताच्या ज्ञानानें पुरे पडणार नाहीं. त्याकरता वक्ररेषा व नवमाशाचे Ninth power दशमस्थानापर्यंत वर्गमूळ काढता आले पाहिजे. अर्थात् इतके ज्ञान असल्याशिवाय त्यांना वरील प्रमाण ठरावणे अशक्य आहे. परंतु या गोष्टी ग्रीक अथवा आरब यांपैकीं कोणासच माहीत नव्हत्या. त्या ते पुढे हिंदूंपासून शिकले असले पाहिजेत. ''

थोडक्यात सांगावयाचे म्हणजे प्राचीन काळीं हिंदूंचे भूमितीचे ज्ञान अफाट वाढलें होते, व त्याजपासून पुढे सर्व जगान ते घेतले ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी ढळढळीत असल्याने त्याजविषयी यापेक्षा जास्त लिहिण्याची जरूरी नाहीं.

## बीजगणित.

बीजगणितातील प्राचीन भारतीय आर्यांस कोणकोणत्या गोष्टी माहीत होत्या हें पाहूं. प्रो. वॉलिस व कोलब्रूक याच्या मतें करणीपद्धतीचें ( surd roots ) गणीत,

अनेकवर्ण समीकरणाची सामान्य पृथक्करणपद्धति, एकवर्ण समीकरणाच्या अनिर्णित सिद्धान्ताचें सामान्य उत्तर काढण्याची रीति, अनेकवर्ण समीकरणाचे एक उदाहरण अनिश्चित पद्धतीनें सोडविले असता त्यावरून अनेक उत्तरें काढण्यासाठीं सर्व-साधारण नियम योजणें, नियमित संख्येस शून्यानें भागलें असता भागाकार असंख्य येणें, अनेकवर्णात्मक समिकरणाचे उत्तर प्रथम ती एकवर्णात्मक अगर वर्गसमी करणाच्या रूपात विच्छेदून नंतर त्यास नित्य सामान्य नियम लागू करणें इत्यादि प्रकार त्यास माहित होते. ह्या पद्धति म्हणजे अदमासाचें काम नसून शास्त्रशुद्ध, नित्य, सर्वसंमत सिद्धांत आहेत; आणि त्याचें ज्ञान त्यांना पद्धतशिर रीत्या संपादलें होते हें प्राचीन ग्रंथावरून दिसून येतें. ला ग्रांज ( La Grange ) याच्या संशोधनानें गणितशास्त्रात पुढे जी प्रगति झाली त्या काळापर्यंतच्या युरोपियन गणीतज्ञानाइतकें हें आहे हे कोणीही कबूल करील.

प्लेफेअर म्हणतो की, " बीजगणिताची परिभाषा ज्योतिषशास्त्राच्या पुस्त-कात वापरणें व या दोन शास्त्राचा उपयोग परस्परांच्या परिपोषास करून घेणे अशी स्थिति येण्यास अनेक वर्षांचा अभ्यास व अनेक विद्वानाचे अव्याहत परिश्रम अवश्य असावे लागतात. " हिंदूंच्या एकंदर गणितशास्त्राचा अभ्यास केल्यास प्लेफेअर म्हणतो तशी स्थिति आहे असें दिसून आल्याशिवाय रहाणार नाहीं. ह्या वरून हिंदूंची गणितशास्त्रांत झालेली प्रगति, त्याच्या गणिताचा पुराण-कालीनपणा व त्याची स्वाभाविक कुशाग्र बुद्धि आणि योजकता हे गुण स्पष्ट होतात.

मागील अंकगणित व भूमिति यांच्या प्रतिपादनांत हिंदूच्या अचाट बुद्धिचा-तुर्याचें व कल्पकतेचें जें समर्पक व आदरयुक्त युरोपियन पंडितांचें वर्णन दिलेले आहे तें येथें फिरून देण्याची आवश्यकता दिसत नाहीं. कारण कीं, त्यांच्या कीर्तीचा परिमल त्रिखंड भेदून राहिला असल्यामुळें वास्तविक या आगंतुक युरोपियन पंडितांच्या शिफारशीची मुळींच जरूरी नाहीं. परंतु हल्ली आम्हांमधील आत्म-प्रत्यय कमी झाल्यानें व ज्या त्या गोष्टींत परक्याकडे पाहण्याची संवय झाल्यामुळें प्राचीन शास्त्रग्रंथात स्वतंत्र संचार करून पूर्वजांच्या कौतुकास्पद गोष्टींचा व कृतींचा परिचय करून घेणें होत नाही. सबब दुधाची तहान ताकाने भागवून घेणाऱ्याच्या साठी ( आम्हासाठीं ) कित्येक वेळां पुनरुक्तीचा दोष पतकरून युरोपियन पंडितांचे आपल्या पूर्वजांबद्दलचे प्रशंसापर उद्गार द्यावे लागतात.

कोलब्रूक, मॅनिंगबाई, प्रो. मोनियर वुइल्यम्स, एल्फिन्स्टन याचे मागें उद्धत केलेले उतारे परत देण्याची जरूर नाहीं. ह्यावरून एकच गोष्ट प्रामुख्यानें दिसते

ती अशी कीं, ज्याप्रमाणें अंकगणित व भूमिति या दोन शास्त्रांत जगाचें गुरुत्व हिंदुस्थानाकडे प्राचीन काळी होतें त्याचप्रमाणें बीजगणितातही होतें.

' एडिन्बरो रिव्ह्यू ' नामक मासिकात पुढील उतारा आहे. " $Ax^2 + B$ ( अक्ष$^2$+ ब. ) ही पूर्ण वर्गात्मक संख्या 'क्ष' च्या कोणत्या किमतीनें होईल, असा प्रश्न आहे. या प्रश्नाचा मोठा मजेदार इतिहास दिलेला आहे. डायॉफन्टस यानें हा प्रश्न सोडविण्याचा थोडाबहुत प्रयत्न प्रथम केला. नंतर फरमाट ( Feremat ) यानें १७ व्या शतकात त्याच पद्धतीत आणखी फरक करून तो प्रश्न इंग्रजी बीजगणितज्ञाकडे पाठविला. शेवटीं त्याचें संपूर्ण व समाधानकारक उत्तर प्रख्यात यूलर नामक गणितज्ञानें दिलें. परंतु शेवटीं यूलरची ( Euler ) रीत व भास्कराचार्यांची रीत एकच आहे असें आढळून आलें. "

पुढे त्याच मासिकाच्या २९ व्या भागाच्या १५३ पानावर असें म्हटलें आहे कीं, " भास्कराचार्यांनी जें विशिष्ट उदाहरण दिलेलें आहे तेंच लार्ड ब्रॉकर यानें १६५७ सालीं स्पष्ट करून सांगितलें, आणि त्याच प्रश्नाचें जें सामान्य उत्तर १७६७ सालीं डीलाग्राज यानें दिलें तें ब्रह्मगुप्त यानें दिलेल्या उत्तरापेक्षा मुळींच निराळें नाहीं. "

हिंदू व ग्रीक बीजगणितज्ञ याजमध्यें जो एल्फिन्स्टनच्या मतें मुख्य फरक आहे तो नवीन शोधांच्या बाबतींत नसून रीतीच्या सोपेपणात आहे. हिंदूंची बीजगणितातील पृथक्करणाची एक फार आवडती रीत होती तिचा १६२४ पर्यंत जगास पत्ताही नव्हता. ती प्रथम बाचेट डी मेझेरिक यानें युरोपात प्रसिद्ध केली, व यूलरनें जिचा अंगिकार केला ती ह्याहून मुळींच भिन्न नव्हती.

हिंदूंच्या ज्योतिर्विषयक शोधात व भूमितीच्या उपपादनात बीजगणिताचा उपयोग केलेला दिसतो तो त्याचाच शोध आहे व हा उपयोग करण्याची हातोटी पाहून सर्वास त्याबद्दल मोठा विस्मय व आदर वाटतो.

हिंदूंच्या अंकगणित, बीजगणित व भूमिति, या शास्त्रावरील ग्रंथासंबंधानें कोलब्रूक म्हणतो की, " हल्ली एकंदर गणितशास्त्राची जी वाढ झाली आहे त्या समयीं व सांप्रतच्या सुधारलेल्या पृथक्करणात्मक पद्धतीच्या काळी ह्या पुस्तकाच्या भाषांतरापासून विशेष लाभ होईल असें वाटत नाहीं. परंतु गणितशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें मात्र थोडाफार फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. जेव्हा गणितज्ञाचें लक्ष प्रथम हिंदूंच्या ज्योतिषशास्त्राकडे व तत्संलग्न इतर विषयाकडे

वधले गेले त्या काळीं जर हें भाषांतराचें काम झालें असतें तर बीजगणितास त्या वेळीं मदत झाली असती. व गेल्या शतकांत ज्या रीती शोधून काढाव्या लागल्या व संशुद्ध कराव्या लागल्या त्या कराव्या लागत्या ना. ”

हिंदूंच्या पडत्या काळात समाजाची व शास्त्राची वाढ होण्याचें बंद पडून कांही प्राचीन अवशेष शत्रूंच्या माऱ्यापुढें व आसुरी नाशलालसेपुढें शिल्लक उरतात कीं नाहीं याबद्दल अत्यंत धास्ती वाटावयास लागली होती. परंतु अशी स्थिति येण्याच्या पूर्वी साधारणतः गणितशास्त्राची किती वाढ झाली होती हें दाखविण्यास ‘ ललितविस्तार ’ नामक ग्रंथातील एक उदाहरण घेऊं.

विप्के म्हणतो कीं, “ बुद्धाच्या लग्नाच्या पूर्वी त्याची परीक्षा घेण्यांत आली. त्या वेळीं त्यास एका योजनांत किती परमाणु बसतात असा प्रश्न घालण्यात आला होता, व त्याचें त्यानें जे उत्तर दिलें त्यावरच विख्यात शास्त्रज्ञ आर्किमिडिज यानें आपलें ‘ आरिनारीयस ’ पुस्तक रचलें. ”

आता गणितशास्त्रांतील एका भागाचा किंचित विचार करून या शास्त्राचा निरोप घेऊं.

शून्यलब्धी ( Differential calculus ) याचा शोध आपण लावला असें पाश्चात्यांचें म्हणणें आहे; परंतु जगविख्यात गणिती भास्कराचार्य यानें या पद्धतीचा उपयोग केलेला आहे. मात्र एवढें खरें कीं, त्यानें पूर्वीच्या लेखकाप्रमाणें या विषयाचा सहज उपन्यास करून तो पुढें चालला आहे; सविस्तर वर्णन देण्याच्या व लांबलचक प्रतिपादन करण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं असें त्याच्या ग्रंथावरून दिसतें

स्पाटिशवूड व लेथाब्रिज हे म्हणतात कीं, सांप्रतच्या शून्यलब्धीसारखी एक पद्धति भास्कराचार्यांच्या ग्रंथांत आढळते, व त्याच्या सारख्या ज्योतिष्यास ती अवश्य असल्यानें ती त्यास माहीत असली पाहिजे. हल्लीच्याच स्वरूपात अगर परिणत अवस्थेत ती असेल असें जरी आग्रहानें व नेटानें सांगता आलें नाहीं तरी ती त्यास व त्याच्या पूर्वगामी गणितज्ञास माहित असली पाहिजे यांत कांही शंका नाहीं.

---

# प्रकरण ७ वें.



## ज्योतिषशास्त्र.



ज्यो तिषशास्त्राच्या अभ्यासानें मन अतिशय प्रफुल्लित होतें. अगणित तारकांचें अफाट प्रदर्शन पाहून कोणाचें मन प्रशांत होणार नाहीं ? विश्वाच्या दरबारातील अनेक वस्तूंपैकीं तारकामय नभोमंडळ ही एक अत्यंत मूल्यवान् चीज आहे. निकट सहवासामुळें आपणास त्याचें विशेष कौतुक वाटत नाहीं, परंतु हे नभोवितान जरी दररोज दृष्टीस पडणारें आहे, त्यांतील असंख्य तारका व नक्षत्रें दररोज उगवतात व मावळतात ही गोष्ट जरी चिरपरिचयाची आहे तरी त्याचें मनोहारित्व केव्हांही नष्ट झालेलें नाहीं. रजनीच्या प्रशांत समयीं जर एकादा निसर्गभक्त झोंपेस दूर सारून उघड्या प्रदेशांत येऊन बसला, व आकाशाकडे टक लावून नक्षत्रांच्या राशीसंबंधानें विचार करूं लागला, तर त्याची रात्र केव्हांच निघून जाईल. रात्रीच्या वेळीं आकाशांत घडणारे फेरबदल व घडामोडी त्याच्या दृष्टीस आपोआप पडतील व जिव्हेस शीण न देता, घसा कोरडा न करितां, कोणत्याही प्रकारचें पुस्तकादि साहित्य न बाळगतां त्यास किती तरी ज्ञान होईल ! मिल्टन कवीनें म्हटल्याप्रमाणें आकाश हे परमेश्वरानें मनुष्यास दिलेलें पुस्तक आहे. त्यातून त्या जगन्नियंत्याच्या उपदेशाचें पठण करणें, ईश्वरी आदेश समजून घेणें व परमेश्वरी स्वरूपाचें ज्ञान करून घेणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. ज्या मानानें ह्या पुस्तकाची तयारी होईल त्या मानानें प्रत्येक राष्ट्रास सुधारणारूपश्रेतेचा चांद मिळेल. ईश्वरी विश्वविद्यालयात ज्योतिषशास्त्राचा विषय प्रमुख असून त्यात प्रत्येक राष्ट्रीय छात्रास पदव्या मिळूं शकतात. या पुस्तकात जे मुख्य विषय आहेत ते असे:—सृष्टीच्या सर्वांगाचा अभ्यास, दिव्य तेजानें प्रकाशणाऱ्या गोलांच्या हालचाली, उत्पात, उल्कापात, ग्रहणें, युति भिन्न ग्रहांचे उदयास्त, धूमकेतू, निरनिराळ्या ग्रहापासून एकमेकांवर घडणारे परिणाम, परस्परांचीं अंतरें, —इत्यादि, इत्यादि. या विषयाचा अभ्यास जगाच्या आरंभापासून सुरू आहे व त्यात प्रत्येक राष्ट्र आपल्या शक्तीप्रमाणें भर घालीत असून व प्राविण्याबद्दल जगा-

करून धन्यवाद घेत आहे. तरी अजून कशास कांहीं पत्ता नाहीं. अशी या शास्त्राची स्थिति आहे. विद्वानांच्या मतें ज्योतिषशास्त्र हें राष्ट्रसुधारणेचे चिन्ह असून संस्कृतीचें माप आहे. आतापर्यंत ज्योतिषशास्त्राबद्दल विद्वान मंडळींत काय काय समजुती रूढ आहेत या पाहिल्या म्हणजे त्यापुढें त्याच्या अनुरोधानें हिंदुस्थानच्या स्थितीचे प्राचीन काळापासून परीक्षण करण्यास बरे पडेल. डॉ. सर विल्यम हंटर व एल्फिनस्टन या दोन विद्वानाच्या मतानें हिंदुस्थानात प्राचीन काली या विषयाची लोकास फार मोठी अभिरुचि असून, त्यात त्यानी अत्यंत प्रावीण्य संपादन केलें होतें. सध्या जीवंत असलेले ज्योतिषवाङ्मय प्राचीन आर्यांच्या अफाट बुद्धीचे यथायोग्य प्रदर्शन करितें व त्याच्या विमल आणि सात्त्विक संस्कृतीचें बिंब–प्रतिबिंबन्यायानें सर्व जगास उदाहरण घालून देतें. परंतु एवढीच जर त्याची कामगिरी असती तर त्यास इतके महत्त्व प्राप्त झाले नसते. त्यास जी एवढी किंमत येते ती त्यापासून हिंदु संस्कृतीचा प्राचीन काळ ठरतो म्हणून. ऐतिहासिक अवशेष शिल्लक नसता, प्राचीन लेख वगैरे मिळणें शक्य नसता आणि इतर सर्व साधनाचा पूर्ण अभाव असता हिंदुस्थानचा प्राचीन काळ ठरविणे फारच अवघड जाते. अशा स्थितीत ज्योतिषग्रंथ हे त्या कामीं फार सहायभूत होत असल्यानें या शास्त्राची मातब्बरी विशेष वाढली आहे ज्योतिषशास्त्राचा इतिहासकार बेली म्हणतो की, “ हिंदूंच्या ज्योतिषविषयक वेधाच्या तक्त्यावरून अनुमान काढता त्याचा प्राचीन इतिहास फार दूरपर्यंत जाऊन पोचतो; व त्याचा हेब्रयू शास्त्राशी मुळीच मेळ बसत नाही. आजपर्यंत हेब्रयू शास्त्रें प्राचीन काल ठरावेण्यास अत्यंत विश्वासार्ह, प्रमाणभूत व खात्रीलायक आहेत अशी विद्वानाची समजूत असे, परंतु अलीकडे बेलीच्या अत्यंत परिश्रमपूर्वक केलेल्या गणितावरून तो विश्वास डळमळून पडला आहे व विद्वानाचें लक्ष आर्य ज्योतिषाकडे प्राचीनकालनिर्णयार्थ लागलें आहे; व प्राचीन आर्यांच्या संस्कृतिबद्दल, आश्चर्यकारक विद्वत्तेबद्दल व आदरणीय संस्थाबद्दल पूर्ण ऐकमत्य दिसून येऊं लागलें आहे. परंतु एवढे ध्यानात ठेवणे अवश्य आहे की, हल्लीचे ग्रंथ अवशेष रूप असून, ज्यास व्यापक शास्त्र म्हणतात व ज्यावर दांडगी ग्रंथसंपत्ति असावी लागते ती सर्व नष्ट झाली आहे. ”

वेबरच्या मतानें हिंदुस्थानात ख्रिस्तपूर्व २७८० मध्यें ज्योतिषाचा अभ्यास सुरू होता, परंतु कॅसिनी, बेली, जेंटिल, फेफेअर इत्यादि ज्योतिर्विदाच्या मतें तीन हजार वर्षांपेक्षा सुद्धा जास्त मागील काळात हिंदुस्थानात या शास्त्राचा

अभ्यास सुरू असून त्या वेळचे ग्रंथसुद्धां अजून अस्तित्वांत आहेत व त्यावरच वरील मंडळींची मोठी भिस्त आहे. अशा प्राचीन काळीं केलेल्या गणिताचें एक उदाहरण घेऊं. कलियुगाच्या प्रारंभीं ज्योतिषशास्त्र हिंदुस्थानात पूर्णपणें भरंभराटीस आले होते असे काउन्टजॉन्स्टर्ना याने सप्रमाण सिद्ध केलें आहे. तो म्हणतो की, " हिंदूंच्या ज्योतिर्विषयक गणितावरून कलियुग ख्रिस्ताच्या पूर्वी ३१०२ या वर्षी फेब्रुआरीच्या २० व्या तारखेस २ तास २० मिनिटें व ३० सेकंदें या वेळीं सुरू झाले असे सिद्ध करिता येतें. हिंदू असें समजतात कीं त्या वेळीं ग्रहाच्या संस्मरणीय युति होत्या व असें त्यानी आपल्या कोष्टकात लिहून ठेवलें आहे. याच वेळचे गणित बेलीने करून असे ठरविलें आहे कीं त्या वेळी गुरु व बुध हे बरोबर क्रान्ति वृत्तावर होते, मंगळ ८° अंशावर असून शनि फक्त सातच अंशावर होता. त्याच्या अशा स्थितीत ते सूर्य-तेजानें निस्तेज होऊन कांहीं काळ अदृश्य होणे साहजिक आहे; व हिंदू ज्या चार ग्रहाच्या युति लिहून ठेवतात ते शनि, मंगळ, गुरु व बुध हेच क्रमाने असावेत असें उघड दिसते त्या वेळीं शुक्र जरी दिसणे शक्य नव्हतें तरी या ग्रहाची युति होण्यास कोणतीच हरकत दिसत नाही हल्लीं त्या काळचे गणित करून पाहिले असता ब्राह्मणाच्या तत्कालिन गणिताशीं इतकें तंतोतंत जुळतें कीं त्यानी प्रत्यक्ष वेध घेऊन ते केलें असलें पाहिजे, ही समजूत ठाम होते.

" फ्रान्सचा राजा १४ वा लुई याने लॉ बेरी नामक ज्योतिष्यास सयामच्या राजाकडे वकील म्हणून पाठविले होतें. त्याने १६८७ सालीं तेथे दिसलेल्या सूर्यग्रहणांची कोष्टके बरोबर आणली. त्याचप्रमाणें कर्नाटकमधील पॅट्रूलेट पाद्री व तिरवेलूर येथील जेंटिल यानीही काही तक्ते हिंदुस्थानांतून पाठावले होते. व ते सर्व पडताळून पाहता इतके बरोबर जमले कीं सर्वांनीं आश्चर्यांने तोंडात बोटें घातलीं; व मजा अशी कीं त्यापैकी प्रत्येकाने आपआपले तक्ते हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतातून व निरनिराळ्या वेळीं पाठविले होते; परंतु काकतालीय-न्यायानें ते सर्व तक्ते एका ठिकाणीं होऊन त्यातील प्रमाणानी एकाच सिद्धान्तास पुष्टि येण्यास मदत झाली. यावर बेलीचा काय अभिप्राय आहे, तो पहा. ४३८२ वर्षांपूर्वी हिंदु ज्योतिषशास्त्रज्ञानीं घेतलेले वेध, लॉ बेरीने पाठविलेले तक्ते व अलीकडच्या काळात कॅसिनी व मेयर यांनीं केलेली गणिते यामध्ये एका मिनिटाचा सुद्धां फरक पडत नाहीं. यावरून प्राचीन आर्यांनीं ते शोध घेण्याच्या कामी केवढी दक्षता व सूक्ष्मदृष्टि योजलेली असेल याची कोणासही सहज कल्पना

करिता येईल. चंद्राच्या गतींत हिंदू ज्योतिष्यांनीं जे संस्कार शोधून काढले तेच टायकोब्राही यांसही मिळाले. या सर्व गोष्टींवरून व प्रमाणांवरून हिंदू संस्कृतीचा काळ किती जुना आहे व त्यांची ह्या शास्त्रांत केवढी पारंगतता होती हें दिसून येईल. जर ३००० वर्षांपूर्वी बेलोन्च्या गणिताप्रमाणें भूमिति व ज्योतिष या दोन शास्त्रांत हिंदूंनीं इतके अपूर्व प्रावीण्य संपादले होते तर तें ह्या स्थितीप्रत येण्यास याच्यामागें किती वर्षांचा अभ्यास कारणीभूत झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. कारण कीं त्या वेळीं अर्वाचीन मुद्रणसाहित्य नसल्यानें ज्ञानाचा प्रसार जलद होत नसे व अशा साधनाभावीं मन सुसंस्कृत, परिपक्व व स्वतंत्र विचारक्षम होण्यास त्यास धिमेधिमेच चालावें लागलें असेल. एरवीं अशा गोष्टी साध्य होत नाहीत. ”

अनेक उदाहरणावरून आर्यांच्या ज्योतिषज्ञानाच्या प्राचीनतेबद्दल सर्वांची खात्री पटण्यासारखी आहे. फार प्राचीन कालापासून त्यांची कीर्ति सर्वत्र प्रसृत झालेली आहे आरबी ग्रंथावरून लातिन भाषेत ज्या ज्योतिष ग्रंथाचें भाषांतर झालेलें आहे त्यांत ग्रहकक्षेच्या शिरोबिंदूला जो संस्कृत शब्द आहे तो तसाच योजण्यांत आला आहे. संस्कृत ‘ उच्च ’ शब्दावरून पुढें इतर युरोपीयन भाषांत ऑक्स ( Oux ) हा शब्द बनलेला आहे; त्याचप्रमाणें रोमनशाहींत ‘ कॉन-कॉल पाशल ’ नामक जें राजदप्तर लिहिण्यांत येत असे त्यांत योजिलेला ‘ अण्डुबॅरियस ’ अथवा ‘ अर्ड्बेरियस ’ हा आर्यभट्टाचाच अपभ्रंश असला पाहिजे व आरबांनींही ‘ अर्जबहार ’ म्हणून त्याची थोरवी गायिलेली आहे.

आर्यावर्तांत–ज्योतिषशास्त्र प्राचीन काळीं सर्व राष्ट्रांच्या अगोदर उदयास आलें म्हणून त्याची वाहवा करावयाची असे नाहीं. केवळ प्राचिनत्वामुळें आर्यावर्तास कोणी हा महत्त्व देणार नाहीं. त्यांत टिकाऊ, सर्व काळीं लागू पडणारे व बिनचूक असे सिद्धान्त प्रतिपादले गेले आहेत म्हणूनच त्यास एवढी मोठी किंमत आहे. उदाहरणार्थ; सत्तावीस नक्षत्रें, बारा राशि, ग्रहाच्या मध्यम गति, विषुव-चलन, पृथ्वीचें अंतरिक्षांत अधांत्रीं रहाणें अगर आलंबशून्य स्थिति, आपल्या आसाभोंवतीं पृथ्वीची दैनंदिन फेरी, आपल्या आसाभोंवतीं चंद्राची प्रदक्षिणा, त्याचें पृथ्वीपासून अंतर, ग्रहाच्या कक्षेचीं परिमाणें, ग्रहणांचें गणित या सर्व ज्योतिर्विषयक बाबी बिनचूक निरीक्षणानें व यथायोग्य अनुमानानेंच ठरविलेल्या आहेत व त्यामुळें आर्य ज्योतिषशास्त्राचें नाव जगभर गाजलेलें आहे. इतका अभ्यास व अशीं बिनचूक व सर्वमान्य अनुमानें अति महान् संस्कृतीशिवाय

केव्हांहीं अस्तित्वांत येणें शक्य नाहीं. प्रगल्भशास्त्रांची निपज म्हणजे कांहीं पोरखेळ नव्हे. वर्षेंच्या वर्षें लोटावीं तेव्हां कोठें एकादा सिद्धान्त अस्तित्वांत येतो. शास्त्रसंगोपन व वाढ हें काळजीचें, अभ्यासाचें, कालाचें व अभिरुचीचें काम आहे व या सर्व गोष्टी केवळ सुसंस्कृत राष्ट्रेच करूं शकतात. रानटी स्थिति व शास्त्रप्रगति यांचें साहचर्य कोणीही क्षणभरसुद्धां कल्पणार नाहीं. अशा अफाट व अगाध बुद्धिप्रकर्षानें ज्यांनीं ज्योतिषशास्त्राची उभारणी केली त्यांच्या सिद्धान्त सोडविण्याच्या रीती, गणिताच्या पद्धति, वेध घेण्याचे प्रकार व शोध करण्याची हातोटी अपूर्वच असणार यांत काय संशय ? ही गोष्ट एल्फिन्स्टन, प्रो. विल्सन यांनीं प्रांजलपणें कबूल केली आहे. सूर्यसिद्धान्ताचें भाषांतर प्रो. व्हिट्नेनें आपल्या अमेरिकन प्राच्यमंडळाच्या नियतकालिकांत छापल्यावर असा वाद निघाला कीं नक्षत्रें कोणीं शोधून काढलीं ? पारिसमधील प्रख्यात बायोनामक ज्योतिषी व बर्लिनमधील प्रो. वेबर यांजमध्यें हा वाद चालू झाला. पहिल्याचें म्हणणें कीं हिंदूंनीं नक्षत्र स्वतः कल्पिलेलीं नसून तीं चिनी लोकांपासून त्यांनीं घेतलीं. परंतु चिनी लोकांचा स्यू हा शब्द ( Sieu ) व हिंदूंचा नक्षत्र हा शब्द या दोन शब्दांत फार अंतर आहे. स्यूचा अर्थ फक्त एकच तारा असा आहे. याच्या उलट नक्षत्राचा अर्थ तारकासमूह अथवा तारकामय व्योमभाग असा आहे. ख्रिस्ती शकापूर्वी फार तर २००–३०० वर्षें हा शब्द चिनी लोकांस माहीत असावा; परंतु नक्षत्र हा शब्द वेदग्रंथांत आढळून येतो असें वेबरचें म्हणणें आहे. यावरून हिंदूंची कल्पना व पुराणत्व आपोआप सिद्ध होत आहे.

आरब हे हिंदूंचे शिष्य असून आपलें ज्योतिषशास्त्र त्यांनीं बहुतेक आर्य ज्योतिषावरून रचलें. प्रो. वेबर व सर हंटर यांच्या मतें आरबांनीं सातव्या व आठव्या शतकांत हिंदू ग्रंथांचीं भाषांतरें करून नेलीं, व ते, ब्राह्मणज्योतिषाजवळ शिकले. हिंदू ज्योतिषांना आदरपूर्वक बोलावणें खलिफ हरुनल रशिद व अल्मामन यांच्या दरबारीं दिलेलें असे, व तेथें पुष्कळ विद्वान् लोक हिंदुस्थानांतून जात; याच लोकांच्या साहाय्यानें खालीं दिलेल्या सिद्धान्ताचें भाषांतर झालेलें आहे. आरबी भाषेंत सिद्धांताला सिन्दहेंड असा शब्द वापरलेला आहे. एकंदर नऊ सिद्धान्त आहेत ते असे:—

( १ ) ब्रह्मसिद्धान्त, ( २ ) सूर्यसिद्धान्त, ( ३ ) सोमसिद्धान्त, ( ४ ) बृहस्पति-सिद्धान्त, ( ५ ) गार्ग्यसिद्धान्त, ( ६ ) नारदसिद्धान्त, ( ७ ) पाराशरसिद्धान्त, ( ८ ) पुलस्त्यसिद्धान्त, ( ९ ) वसिष्ठसिद्धान्त.

युरोपीयन लोकांस माहीत असलेल्या या सर्व सिद्धातांत श्रेष्ठ म्हणजे सूर्य-सिद्धांत होय. हा फार पुराणकालीं रचलेला असावा असा त्यांतील दोन श्लोकावरून तर्क आहे.

कल्पादस्माच्च मनवः षड् व्यतीताः ससन्धयः ।
वैवस्वतस्य च मनोर्युगानां त्रियनो गतः ॥ २२ ॥
अष्टविंशाद्युगादस्माद्यातमे तत्कृतं युगम् ।
अतः कालं प्रसख्याय संख्यामेकत्र पिण्डयेत् ॥ २३ ॥

प्रत्येक मनु–कृत, त्रेत, द्वापार व कली अशा–चार युगांचा मिळून झालेला असतो.

**अर्थ**—चालू वैवस्वत मन्वंतरापूर्वी संधिकालासह सहा मनु होऊन गेले आहेत व चालू मनूची तीन युगें पुरी झाली आहेत. सबब एकंदर बेरीज केली असता पाहिल्या कृतयुगापासून आजपर्यंत एकंदर २७ युगें होऊन गेली व चालू अठ्ठाविसावें आहे. अशा तऱ्हेनें कालाचे मापन करून एकंदर संख्या काढावी. सूर्यसिद्धान्तरचनेच्या कालासंबंधी वरील श्लोक लक्षात ठेवण्यासारखे आहेत. डेव्हीस व हाउटन यांच्या मतें पाराशरमुनि अनुक्रमें खिस्तापूर्वी चवदाव्या व बाराव्या शतकाच्या अखेरीस असावा असे खुद्द त्याच्या गणितावरून यांनी काढले आहे. अर्थात् काउन्ट जान्स्टर्नी म्हणतो त्याप्रमाणे खाल्डियन, अरब व ग्रीक याच्यापूर्वी हा होऊन गेला यांत काहींच संशय राहत नाही.

पाराशर मुनीच्या नंतर आर्यभट्ट फलज्योतिषी झाला. याचा नक्की काल अजून ठरला नाहीं; परंतु तो विक्रमादित्यापूर्वी होऊन गेला हे निश्चित आहे. युरोपिअन पंडितांच्या मतें यास पृथ्वीची दैनंदिनगति, सूर्यचंद्राच्या ग्रहणाचे-सिद्धान्त व अयनबिंदु व विषुव याचे चलन इत्यादि गोष्टी माहीत होत्या. याचे मुख्य ग्रंथ तीन आहेत:—

( १ ) आर्यभट्टिका, ( २ ) दशगीतिका, ( ३ ) आर्याष्ट-शतक.

आर्यभट्टानंतर अत्यंत विख्यात वराहमिहिर नावाचा फलज्योतिषी होऊन गेला. ज्योतिषी म्हणून जरी याची कीर्ति कमी नसली तरी मुख्यत्वेकरून हा फलज्योतिषी म्हणूनच प्रसिद्ध आहे. याने ज्योतिषशास्त्रावर थोडीबहुत ग्रंथरचना केली आहे. परंतु याचे मुख्य ग्रंथ फलज्योतिषावरच लिहिलेले आहेत. हा खिस्ती शकापूर्वी पहिल्या शतकात होऊन गेला व विक्रमादित्याच्या नवरत्नांत याची गणना होत असे. नवरत्नांचीं नांवें पुढील श्लोकांत दिलेली आहेत:—

धन्वंतरिः क्षपणकोऽमरसिंहशंकु—।
वेतालभट्ट-घटखर्पर—कालिदासाः ॥

वराहमिहिराचे मुख्य ग्रंथ पुढें दिल्याप्रमाणें आहेतः— ( १ ) बृहज्जातक. ( २ ) बृहत्संहिता, ( ३ ) पूर्वीच्या पंचसिद्धान्तांचा सारांश.

मॅनिंगबाई लिहिते कीं, " बृहत्संहिता पुस्तकातील अत्यंत चित्ताकर्षक गुण म्हटला म्हणजे विस्तृत सुबोध विवेचन होय. या ग्रंथाची प्रख्यात आरबी फलज्योतिषी अल्बिरुणी याने फारच वाहवा केली आहे. यात भूगोल, बांधकाम. खोदकाम इत्यादि विषयाची माहिती ( फलज्योतिष या मुख्य विषयाशिवाय ) भरपूर दिलेली आहे "

शेवटचा जगविख्यात ज्योतिषी भास्कराचार्य होय. हा अगदी अलीकडच्या काळीं म्हणजे १२ व्या शतकांत होऊन गेला. गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धातावरील सुबोध व खुबीदार विवेचन व इतर अनेक गणितग्रंथ याबद्दल याचें नांव अखिल ज्ञानी जनास अवगत झालेले आहे

पृथ्वीच्या वर्तुलाकारासंबंधीं ऐतरेय ब्राह्मणात पुढीलप्रमाणें उल्लेख आहे:—

" ह्या इंद्रलोकतुल्य समारंभाने कलशऋषीचा मुलगा तुर याने जनमेजयास पावन केले व नंतर त्याने सपूर्ण वर्तुलाकार पृथ्वी जिंकली. "

त्याचप्रमाणें भट्टीकाव्यातही वर्णन आहे

पञ्जरमध्ये कक्षया परिवेष्टितः खमध्यगतः
मृज्जलाशिखिवायुमयो भूगोलः सर्वतोवृतः

पृथ्वी, आप, तेज व वायु यांना युक्त असलेला हा भूगोल पिंजऱ्यामध्यें ठेवलेल्या पोपटाप्रमाणे आकाशाच्या पोकळीत फिरत राहिलेला आहे; व याच मताचा अनुवाद भास्कराचार्यांच्या गोलाध्यायात केलेला आहे. ज्योतिषशास्त्रज्ञांची परंपरा पुढें कायम होती तेराव्या शतकानंतर सतराव्या व अठराव्या शतकापर्यंत कित्येक ज्योतिषी होऊन गेले व त्यापैकीं राजा जयसिंग याची हकिगत पुढे दिली आहे. केशव व गणेश दैवज्ञ हे मधल्या ३०० वर्षांत प्रख्यात ज्योतिषी होऊन गेले. परंतु ही परंपरा चालविणारे ज्योतिषी मध्ये होत असून त्याच मालिकेंतील शेवटचा राजा जयसिंग होय.

आर्यभूमींत तत्त्वज्ञानी, कवि, ज्योतिषी, गणिती इत्यादि निरनिराळ्या शास्त्रांतील पंडितांची एकसारखी परंपराच लागली होती असे दिसतें. मध्यंतरी अनेक घडामोडी झाल्या, असंख्य राज्यक्रांत्या घडल्या, समाजपरिवर्तनेंही त्याचप्रमाणें

अगणित झाली. परंतु इतर प्रकारच्या वैभवास जशी ओहोटी लागलेली दिसते तशी ज्ञानलालसेस लागलेली दिसत नाही. याचा ताजा नमुना म्हणजे राजा जयसिंग होय. हा प्रख्यात ज्योतिषी नुकताच दोनशे वर्षांपूर्वी होऊन गेला. जयपूर, उज्जयिनी, मथुरा, काशी, दिल्ली इत्यादि ठिकाणी यानें वेधशाळा बांधलेल्या असून त्यापैकी काशी येथील वेधशाळा अजून त्याच्या कर्तबगारीची साक्ष देत आहे. याने १७०२ साली प्रसिद्ध झालेली डी ला हायरची ज्योतिर्विषयक कोष्टकें दुरुस्त केली आहेत; व आपण स्वत: " झिज महंमदशाही " नामक एक नक्षत्रांची वर्गीकरणात्मक यादी लिहिली असून तिजवरून त्याच्या बुद्धिमत्तेची कल्पना करता येते; अथवा थोडक्यात बोलावयाचें म्हणजे त्यानें स्वहस्ताने उभारलेले हे शास्त्रविषयक आपले स्मारकच होय.

सर्व शास्त्रांपेक्षा या शास्त्रास उपकरणबाहुल्याची फार जरूर आहे. हल्लींप्रमाणे अति सूक्ष्म यंत्रांची, वेधसाधनांची, निरीक्षणोपकरणांची मदत नसता वर सिद्ध केल्याप्रमाणे अति प्राचीन काली सुद्धा इतका गहन अभ्यास व्हावा हे खरोखर तत्कालीन विद्वानास अत्यंत भूषणास्पद आहे यात काय संशय? प्रख्यात युरोपियन ज्योतिषी फेअर म्हणतो की, " ब्राह्मणांचा शोध लावण्याची **चपलता व बिनचूक शैली** खरोखर आश्चर्यकारक आहे " या एकाच वाक्यावरून सर्व शास्त्रांच्या वाढीची उपपत्ति लागेल. पुढेही यासच पुष्टि देणारा उतारा प्रो. सर विल्यमच्या लेखणीतून उतरला आहे. "ब्राह्मणपंडित दशलक्ष, महापद्म इत्यादि सारख्या गणितातील संख्या सहज कल्पितात, व त्याचा उपयोग गणिताच्या कामी करून घेतात; या सारख्या संख्या काय आहेत, त्याचा कसा व कोठे उपयोग करावयाचा, असा भूस्तरशास्त्रज्ञ, ज्योतिषी वगैरे इतर देशातील पंडितास मोठी अडचण पडते. परंतु हिंदू पंडिताना त्याचे काहींच वाटत नाही. अनंतपटी, असंख्यपणा, व याच्या खालोखालच्या संख्या कल्पिण्यास, त्याना नांवे देण्यास, त्या, लोकाच्या बुद्धीच्या आटोक्यात आणण्यास व गणितात रूढ करण्यास त्यास काहींच अडचण भासत नाही. अडचण भासल्याबरोबर त्यांनी काल्पनिक वस्तूस सत्य व व्यवहार्य मूठीत आणून सोडलेच; त्याच्या बुद्धीच्या टप्प्यात कोणती गोष्ट येत नव्हती असे कधींच झालें नाहीं. परंतु आमच्या कम नशिबानें त्याच्या बुद्धिविलासाचीं ग्रंथरूपी फळे फारच थोडी आजतागायत हयात आहेत. परंतु त्यात सुद्धा अजून असें काही सिद्धान्त लिहिलेले आढळतात की त्याची युरोपीअन विद्वानास फोड व्हावयाची आहे असे सर विल्यमचे म्हणणे आहे. उदाहरणार्थ,

सूर्यसिद्धान्ताच्या दुसऱ्या प्रकरणाच्या प्रारंभी ग्रहाच्या गतीसंबंधी जो एक चमत्कारिक सिद्धान्त केला आहे त्याचें कोडें अजून कोणासच उकललें नाहीं. अस्तु. एवढ्यावरून आपल्या पूर्वजांनी ज्योतिषशास्त्रांत केवढी भर टाकली, त्यांतील अक्षय सिद्धांत कसे अल्प साधनांनी परंतु सूक्ष्मभेदी दृष्टीनें हुडकून काढले; त्यांचें प्रतिपादन किती उत्तम तऱ्हेनें व मनाजोगें केलें आहे; हे पाहिले म्हणजे मति अगदीं गुंग होऊन जाते, व आपणास त्यांचे वंशज म्हणवून मिरविण्यास क्षणभर लाज वाटते. परंतु अजूनही जोपर्यंत संस्कार नष्ट झाले नाहींत; आम्ही अवनतीच्या कर्दमांत पूर्ण गाडले गेलों नाहीं; तोपर्यंत कामास लागल्यास त्याच्या आशीर्वादानें पुन्हा पूर्वस्थितीवर येण्यास कांहीं वेळ लागणार नाहीं. आर्यभूवर परमेश्वराची पूर्ण कृपा आहे; परंतु तिची प्रजाच नादान निघाली तर देवानें तरी काय करावें ? सबब हा आमच्या वरील आरोप आम्ही कृतीनें काढून टाकूं तर पूर्वजांचे यश मलिन करण्याच्या आरोपांतून आपली सुटका होईल. नाहीं तर आजपर्यंत जी स्थिति भोगली तिच्यापेक्षां कष्टतर स्थिति भोगणें प्राप्त होईल हे निराळें सांगणें नकोच.

---

# प्रकरण ८ वें.

## युद्धकला व युद्धशास्त्र.



ऋग्वेदादि आद्य ग्रंथांपासून तों महाभारत, रामायण व अगदीं अलीकडील काळांतील संस्कृत व प्राकृत ग्रंथ घेतल्यास त्यांत युद्धाचीं रम्य वर्णनें, वीरांचे पराक्रम, धर्मयुद्धाचे नियम, सैन्याची हालचाल, व्यूहांची रचना इत्यादि गोष्टी आपणांस पदोपदीं पाहावयास मिळतील. त्याचप्रमाणें कित्येक ठिकाणचीं पराक्रमाचीं वर्णनें वाचल्यास तीं खरोखर कपोलकल्पित आहेत असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु ज्या देशांत बलभीम, अर्जुन, भीम, बली, सगर, परशुराम इत्यादि पौराणिक योद्धे होऊन गेले त्यांच्या अनुमानावरून हीं वर्णनें खोटीं आहेत असें मानणें म्हणजे फारच धाड-

साचें होईल. दुसरी गोष्ट अशी कीं, आर्यांनीं जेव्हां हा देश पादाक्रान्त केला त्या वेळची सुस्थिति, विपुलता, निर्भयता, स्वातंत्र्य वगैरे अनुकूलता लक्षांत घेतली असतां असे पराक्रमी पिंड पोसणार नाहींत असें तरी कां मानावें? ( वसाहतींच्या भागांत सांगितल्याप्रमाणे ) ज्यांनीं त्या वेळीं ज्ञात असलेलें सर्व जग पादाक्रांत केलें, त्यांचे पराक्रम असामान्य असल्यास आश्चर्य काय? सबब कविकल्पनांचें अवगुंठन काढून टाकल्यास जो भाग राहिल तो तत्कालीन योध्याच्या वर्णनाचा; व असा भाग कांहीं सामान्य प्रतीचा राहील असें कोणाही विचारी माणसास वाटणार नाहीं. हल्लीं मात्र सर्व भूतलावर वसाहति स्थापणें म्हणजे धाडसाचें व कौशल्याचें शतकृत्य असें मानलें जावें, आणि तत्कालच्या सिद्ध गोष्टी मात्र सब झूट म्हणून झिडकारिल्या जाव्या हा कोण जुलूम, पक्षपात व वृथाभिमान? जर हे दुर्गुण टाकून निर्मल दृष्टीनें आपण प्राचीन इतिहासाकडे पाहिलें तर त्या काळच्या वीराचे लष्करी पराक्रम, नाविक कौशल्य, दर्यावर्दी धाडस, व्यूहरचनाचातुर्य इत्यादि गुण आपल्या डोळ्यांत भरल्याशिवाय राहणार नाहींत. त्या वेळचे व्यापारी किती दूरच्या दर्यावर्दी फेऱ्या करीत व अगणित संपत्ति आणीत हें पाहिलें म्हणजे तत्कालीन राजाजवळ नाविक बल असलें पाहिजे, व त्याच्याच मदतीनें ते अशा व्यापाराचें रक्षण करीत असावे हें आपणास दिसून येईल. मनु व स्ट्रॅबो या दोघांच्या ग्रंथांत असें नाविक बल व सरकारच्या अठरा कारखान्यांपैकीं नाविक कारखाना असल्याचें दिसून येतें. अर्थात हें ज्ञान लोकांमध्ये रूढ होण्यास त्या कालीं कांहीं साधनें असलीं पाहिजेत. राजाकडून शिक्षण मिळो, व्यापारी स्वतःच्या हिंमतीवर प्रत्यक्ष संकटाशीं तोंड देऊन व्यापारानें राष्ट्राची संपत्ति वाढवून अनुभविक शहाणे बनोत अथवा कांहीं ग्रंथ असोत, कोणत्या हि का रीतीनें होईना; लोक युद्धशास्त्रांत व दर्यावर्दी युद्धांत प्रवीण होते एवढी गोष्ट खरी. भारतभूमीच्या व वसाहतींच्या राज्याचें दान ईश्वरानें त्यांच्या हातावर सोडलें असें कांहीं कोणासच मानतां येणार नाहीं. शिवाय जरी धनुर्वेद हल्लीं लुप्त आहे तरी त्याचें नाव सर्वतोमुखीं असतां भलतेंच अनुमान करणें केव्हांही शहाणपणाचें होणार नाहीं. मात्र महाभारतांत, अग्निपुराणांत व इतर ग्रंथांत या विषयावर व्याख्यान रूपानें कोठें कोठें कांहीं माहिती आली आहे त्यावरून पूर्वी असा एक ग्रंथ असावा, त्यांत इतक्या प्रकारचे विषय प्रतिपादलेले असावे असें खात्रीलायक मानतां येतें. यासंबंधानें डॉ. हंटर म्हणतो कीं, "सैन्याच्या हालचाली, रचना, तळ, सैन्यपुरवठा यासंबंधीं सविस्तर नियम असून

त्यांपैकीं बरेच महाभारतांत दिलेले आहेत." दुसरी एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं, त्या वेळीं सैन्याचें आधिपत्य प्रत्यक्ष राजांच्या हातीं असून युद्धाचा बरा-वाईट परिणाम त्यांच्या धोरणावर, कौशल्यावर, रणविद्येवर व पुढारीपणावर अव-लंबून असे. परंतु राजे लढाईतून नामोहरम होऊन परत आल्याचीं उदाहरणें फारच क्वचित् आढळतात. कारण अशा राजास त्याच्या आया, बहिणी व पत्नी तोंड दाखवूं नका असें साफ उत्तर देत. सबब हा घरांतील अपमान पत्करण्या-पेक्षा रणशय्येवर अखेरच्या प्रसंगी पडणेंच त्या काळच्या वीरास ज्यास्त श्रेयस्कर वाटे. आणखी जे राजे असे पराक्रम करीत, व अखिल पृथ्वीचें राज्य जिंकून राजसूय यज्ञ करीत त्यास लष्करी शिक्षण मिळत नसेल असें कसें म्हणता येईल? उलट तो एक क्षत्रियाच्या शिक्षणातील महत्त्वाचा भाग असे असें आपणांस पुराणावरून दिसतें. गुरुगृहीं ही विद्या त्यास शिकविली जाई. राम व इतर राजपुत्र विश्वामित्रापाशी धनुर्विद्या शिकले; लहुकुशास वाल्मीकीनें पढविलें, पांडवांचा गुरु द्रोण असून त्यानें ती विद्या परशरामापासून घेतली होती इत्यादि गोष्टी उघड उघड दिसत असतां लष्करी शिक्षणाची उपेक्षा होत होती असें कोणासहि म्हणता येणार नाहीं. सबब तें कसें दिलें जात असे, त्यात कोण-कोणत्या अस्त्राचा उपयोग होत असे ते पाहूं. हिंदू लोक युद्धाच्या कामीं ज्या युक्त्याप्रयुक्त्या योजीत त्या फारच महत्त्वाच्या आहेत हिंदु लोक सैन्याची विभागणी खालीं दिल्याप्रमाणे करीत.

( १ ) उरस. ( २ ) कक्षा, ( ३ ) पक्ष, ( ४ ) प्रातिग्रह, ( ५ ) कोटी, ( ६ ) मध्य व ( ७ ) पृष्ठ.

विभागणी केल्यानंतर शत्रुपक्षाच्या हालचाली, सामर्थ्य, स्थलाची अनुकूलता इत्यादि पाहून निरनिराळ्या विभागाची मांडणी व आखणी करावी लागत असे. विभागाचे रचनेस व्यूह असे म्हणत. त्याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) मध्यभेदी व ( २ ) अंतर्भेदी. या शिवाय त्याचे पोटभेद दिलेले आहेत व त्याचीं नांवें आकारसादृश्यावरून ठेवलेलीं आहेत. पहिल्या व्यूहाचे सहा प्रकार आहेत. ( १ ) मकरव्यूह, ( २ ) श्येनव्यूह, ( ३ ) शकलव्यूह, ( ४ ) अर्धचंद्र, ( ५ ) सर्व-तोभद्र ( पोकळ चौरस ), व ( ६ ) गोमूत्रिक.

दुसऱ्या भेदाचे चार प्रकार आहेतः—( १ ) दण्ड, ( २ ) भुज, ( ३ ) मंडल, व ( ४ ) असंहत. याखेरीज पोटभेद आहेत.

उदाहरणार्थ दंडाचे सतरा, भुजाचे पांच व मंडल आणि असंहत यांचे आणखी बरेच पोटभेद आहेत. अशा रीतीने सर्व युद्धरचना शास्त्रोक्त असे. परंतु पुष्कळ वेळां सेनापतींच्या कल्पकतेवरून व परिस्थितींच्या मानानें आणखीहि प्रकार उपयोगात आणावे लागत. ज्याप्रमाणें जरूरी भासते व अडचणी जास्त येतात त्याप्रमाणें दुसरे उपाय योजणें भाग पडते. अशा रीतीनें शास्त्राची वाढ होत असते. शास्त्रांची वाढ खुंटली म्हणजे राष्ट्राची अवनति खास सुरू झाली असे समजावें. हाच न्याय आपणांस महाभारतकाली दिसतो. त्या वेळीं हिंदू राष्ट्रांत चैतन्याचें वारें पूर्ण खेळत होतें. अर्थात् मागील लोकांनीं आपल्या अनुभवानें घालून दिलेले नियम त्या कालीं पुरे पडेनात. उदाहरणार्थ युधिष्ठिरानें अर्जुनास सूची-मुखव्यूह रचण्यास सांगितलें असता अर्जुनानें वेळ प्रसंग पाहून वज्रव्यूहाचा उपयोग केलेला दिसतो व दुर्योधनानें त्यावर अभेद्यव्यूहाची तोड योजलेली दिसते. परंतु पुढें हिंदू राष्ट्राच्या ऱ्हासास प्रारंभ झाल्यावर स्वतंत्र कल्पनाशक्ति नष्ट झाली व याचाच परिणाम वडिलांच्या संपत्तीवर अल्पसंतुष्टपणें लोक समाधान मानूं लागले. हा न्याय सर्वत्र सारखाच लागू असलेला दिसतो.

सैन्याचे मुख्यतः चार प्रकार असतः—( १ ) अश्वदल, ( २ ) गजदल, ( ३ ) रथदल, आणि ( ४ ) पदाति. गजदलाचा उपयोग मेकॉलेनें म्हटल्याप्रमाणे सजीव लोह—दंडासारखा. शत्रूच्या संरक्षणसाधनाचा संहार व चुरा करण्याच्या कामीं करीत. प्रो. मंक्रिडंकर म्हणतो कीं, " चंद्रगुप्तानें सेल्यूकसला गज-बल दिलेलें होतें व त्याच्या जोरावर त्यानें अँटोगॉनस वर फ्रिजियामध्यें इप्सस येथे विलक्षण जय मिळवून सीरीया व आशियामायनर हे प्रांत काबीज केले." टेसियसच्या ( Ctesias ) मताप्रमाणें हिंदुस्थानांतील हत्तींच्या जोरावर सीरस ( Cyrus ) चा पराभव होऊन तो मारला गेला.

आता यापुढें हिंदू लोकांच्या लष्करी गुणांचें थोडक्यात कथन करूं. युद्धाच्या कालीं जिवाची पर्वा न धरता शत्रूवर तुटून पडणें, कधीं माघार न घेणें, धन्याकरिता वाटेल तें हाल सोसणें, नेकी, इमान, सोशिकपणा, कर्तव्यदक्षता, साहस, पराक्रम, धैर्य, मितपणा इत्यादि गुण प्रमुखपणें पाळले जात. अर्काटच्या वेढ्याच्या वेळीं हिंदू शिपायांनीं दाखविलेला दिलदारपणा सर्वश्रुतच आहे. दुसरें उदाहरण १७८२ सालच्या टिपूबरोबरच्या लढाईतलें आहे. सेनापति मॅथ्यू सर्व शिपायांसह शत्रूच्या हातांत सांपडला होता त्या वेळीं बाहेरच्या शिपायांनीं हरतऱ्हेनें व कोणत्याहि संकटास न जुमानता आपल्याजवळची प्रत्येक पै किल्ल्यांत

पाठविण्याची शिकस्त केली व त्यांस सांगून पाठविलें कीं, "आमचें कसेंहि होईल, आम्हांस काय वाटेल ते चालेल; परंतु आपले मात्र मासाशिवाय चालणार नाहीं. सबब आम्ही आपल्या शक्तीप्रमाणे मदत पाठविली आहे त्याचा स्वीकार करावा." शांततेच्या काळीं परकी राजकर्त्यांच्या मुखातून व परकी लेखकांच्या लेखणीतून अशा प्रकारच्या गुणाचें वर्णन होतें तेव्हां त्यांत सत्यता असेल याबद्दल कोणासच शंका घेण्यास जागा नाहीं. युद्धाच्या धुमश्चक्रींत आपल्या सैन्यास त्वेष व स्फुरण यावें म्हणून कोणीही परकी अथवा स्वजातीय सेनापति काय वाटेल ते प्रशंसापर उद्गार काढतील, परंतु युद्धाच्या उष्णतेबरोबर अशा प्रलापांतील गरमपणाही थंड होतो. शांततेच्या थंड काळीं लेखकाच्या थंड डोक्यातून धन्यवादाचे उष्ण विचार व शब्द जेव्हां बाहेर पडतात तेव्हां मुळात लेखकाच्या मेंदूवर अशा गुणानीं खोल परिणाम केला असला पाहिजे असें मानल्यावाचून गत्यंतरच रहात नाहीं. अशा लेखकांपैकीं सर चार्लस नेपियर, सेनापति बूल्स, एल्फिन्स्टन, क्लाइव्ह, लॅरेन्स, स्मिथ, कूट, हॅलिबर्टन इत्यादि प्रमुख होत.

अशा पराक्रमी हिंदूंचीं हत्यारें काय होतीं हे जाणण्याची प्रत्येकास जिज्ञासा असणें अगदीं स्वाभाविक आहे. साधारणतः प्राचीन काळीं धनुष्याचा उपयोग सर्वत्र होत असलेला आपण पाहतो; परंतु हिंदूंची धनुर्विद्येत फारच गति होती असें दिसतें. एका धनुष्यामधून एकाच वेळीं चार ते नऊ बाण सोडल्याचें प्रो. विल्सन सांगतो. अशा रीतीचें धनुर्विद्यानैपुण्य प्राचीन हिंदूंत सर्वत्र दिसतें. अर्जुनासारखे धनुर्धर, पृथ्वीराजासारखे शब्दवेधी, मत्स्यवेधी, अचुक नेम मारणारे कसलेले तिरंदाज, आपले बाण परत आणणारे पटु तिरंदाज सर्वत्र असत. आस्ट्रेलियन रानटी लोकांत 'बूमरँग' नावाचें फिरून मागें येणारें बाणासारखें हत्यार पाहिल्यानंतर युरोपीयन लोकांची खात्री झाली. तोंपर्यंत त्यास हिंदू लोक आपले बाण काम झाल्यानंतर परत घेत ही गोष्ट सुद्धां वेडेपणाची कल्पना आहे असें वाटे. दुसरें अतिशय उपयोगात असलेलें हत्यार म्हणजे तरवार होय. हिचा परकीयांस इतकी भीति वाटे व हिंदू लोक इतक्या कुशलतेनें याचा उपयोग करीत कीं, त्याचें नांव सर्व लोकात महशूर झालें आहे. या तरवारीच्या निष्ठुर व कौशल्यपूर्ण उपयोगावरून इतर भाषांत तद्दर्शक शब्दप्रयोग रूढ झाले आहेत. उदाहरणार्थ एक फारशी म्हण घेऊं. ती अशी आहे कीं, हिंदू उत्तर देणें म्हणजे हिंदुस्थानांतील तरवारीनें जखम करणें. त्याचप्रमाणें एका 'सोबाब मो आलक' या प्रख्यात आरबी काव्यात असें म्हटलें आहे कीं, " जवळच्या नात-

लगाचा जुलूम हा हिंदू तरवारीच्या घावापेक्षा फारच कडक व वेदना-दायक आहे."

वरील दोन्ही परकीय भाषेतील अवतरणावरून एवढे अनुमान काढण्यास हर-कत नाहीं कीं, हिंदू तरवारीची चव परकीयास मिळाली असली पाहिजे. ज्या अर्थी भाषेमध्ये एवढा शब्दप्रचार रूढ होण्यापर्यंत मजल गेली त्या अर्थी हिंदूंनीं आपली तरवार कशी गाजविली असेल, त्याचा दरारा केवढा असेल, परकीय लोक त्यास प्रथम कसे चळचळा कापत असतील, याची त्यावरून यथार्थ कल्पना होईल. ही जशी पराक्रमाची गोष्ट झाली तशी या हिंदू हत्याराचे पाणी व धातु हीं सुद्धां उत्कृष्ट असत. कित्येक वर्षे त्याजवर गंज चढत नसे. त्यांचा उपयोग होत असताना तीं सहसा मोडण्याची भीति नसे; अशा तऱ्हेने धातूची कमाई केलेली असे. वर दिलेल्या दोन हत्यारांशिवाय आणखीही पुष्कळांचा ते उपयोग करीत. त्याचे मुख्यतः पाच वर्ग कल्पिलेले आहेतः—( १ ) यंत्रमुक्त-यंत्राच्या अगर कळीच्या साहाय्याने फेकलेली अस्त्रे, ( २ ) हस्तमुक्त-हातानें फेंकलेली, ( ३ ) मुक्तामुक्त-जंबिया, त्रिशूल, ( ४ ) तरवारी, गदा वगैरे, ( ५ ) नैसर्गिक-मूठ वगैरे. या खेरीज पुराणकाली भिंदिपाल, तोमर, नाराच, परशु, कृपाण, क्षेपणी, पाश इत्यादि हत्यारे उपयोगात असत.

साप्रतच्या युद्धांतील वरील हत्यारांशिवाय तोफ हे एक विशेष हत्यार आहे. प्राचीन काली दारूचा उपयोग हल्लींइतका होत नसे ही गोष्ट खरी; म्हणून धुराची दारू प्राचीन लोकांस मुळींच माहीत नव्हती असे म्हणणे निव्वळ वेडेपणाचे होईल. युरोपीयन लोकांची ही समजूत आहे व आपणच कायते धुराच्या दारूचे शोधक असा त्यास फार अभिमान आहे. परंतु प्राचीन ग्रंथांतील उताऱ्यावरून आपणास तिच्याविषयीं काही माहिती मिळाल्यास पाहूं. प्रख्यात् महाकाव्यातून व पुराणांतून वाटेल तेवढीं उदाहरणें देता येतील. मात्र एवढे खरें कीं, पूर्ण खात्रीलायक शास्त्रीय ग्रंथ लुप्त झाल्याने आपली तहान अशा रीतीने निवडलेल्या असंबद्ध श्लोकावर व वाक्यावर भागवून घ्यावी लागते. परंतु या गोष्टीस इलाज नाहीं. असें जरी आहे तरी या तुरळक व तुटक माहितीवरून ही कला प्राचीन कालीं बरीच वाढीस लागली होती असे स्पष्ट दिसते. प्रथम मध्ययुगाकडेच दृष्टि पोंचवूं. त्या वेळीं तोफा व बंदुका याचा उपयोग सर्रास होत असे. 'पृथ्वीराज' ग्रंथांत २५ व्या श्लोकांत म्हटले आहे कीं, 'तोफा व बंदुका याचा आवाज दहा कोस ऐकूं गेला.'

नृप पंग नयर छुट अराब । कोटह कंगूर चठि चठि सिताब ॥
जंबूर तोप छुटही झनंकी । दश कोश जाय गोला भनंकि ॥
सिरदार मार बाराह रोह । लंगी अभंग वर हनै कोह ॥

अयोध्येच्या राजाच्या दरबारीं असलेला राजा कुंदनलाल नामक हिंदु इतिहासकार म्हणतो कीं ' लिच्छम ' नामक एक फार मोठी तोफ अयोध्येमध्यें होती. पण यापूर्वी ती अजमीरच्या महाराजापाशीं होती. टपालाची पद्धत व खातें असून युद्धशास्त्राबद्दलही त्यानें माहिती दिली आहे. ( मुताखाब टाफसी–अल अखबर पान १४९–५० )

माफी म्हणतो कीं," अग्न्यस्त्रांचा उपयोग करण्यांत हिंदूंची पोर्च्युगीज लोकांवर फार कडी आहे. " फरि आई सुद्धा म्हणतो कीं, पोर्च्युगीज लोकांवर तोफांनीं हल्ला करणारें एक हिंदी जहाज आपण पाहिलें आहे. १५०२ सालीं कालिकत बंदरात अशीच जहाजें होतीं व १५०३ सालीं ३८० तोफांनीं झामोरिनच्या लोकांना हल्ला केला. "

यापुढें प्राचीन कालाकडे वळून तोफखान्यासंबंधीं कांहीं माहिती मिळाल्यास पाहूं. महाकाव्यें व पुराणें वाचीत असतांना आपणांस अस्त्र हा शब्द फार आढळतो. उदाहरणार्थः—रामास निरनिराळी अस्त्रें देतांना विश्वामित्र खालील दोन अस्त्राचा उल्लेख करतो.

आग्नेयमस्त्रन्दयितं शिखरन्नाम नामतः । ( रामायण. )
आग्नेयमस्त्रं लब्ध्वा च भार्गवात्सगरो नृपः ।
जिगाय पृथिवीं हत्वा तालजंघान्सहैहयान् ॥ ( हरिवंश )

" भार्गवापासून आग्नेय अस्त्र मिळविल्यानंतर सगर राजानें पृथ्वी जिंकली व तालजंघ आणि हैहय यांना ठार मारिलें. "

उर्वस्तु जातकर्मादि तस्य कृत्वा महात्मनः ।
अध्याप्य वेदानखिलांस्ततोस्त्रम्प्रत्यपादयत् ॥
आग्नेयन्तु महाबाहुरमरैरपि दुस्सहम् ।
स तेनास्त्रबलेनाजौ बलेन च समन्वितः ॥

अर्थः—त्या महात्म्याचीं जातकर्में उर्व ऋषीनें करून त्याजकडून वेदाभ्यास करविला व नंतर देवांना सुद्धां असह्य असें जे आग्नेय अस्त्र ते त्यास दिलें. अशा तऱ्हेनें चतुरंग बल व अग्न्यस्त्र यांनीं युक्त असा तो राजा राम युद्धामध्यें सज्ज असे.

ब्रह्मास्त्र या शब्दाचा उपयोग संस्कृत ग्रंथामधून वारंवार केलेला पहावयास मिळतो.

प्रोफेसर विल्सन आपल्या संस्कृत कोशात त्याचा अर्थ ब्रह्मापासून (ब्रह्म-शब्दापासून) निघालेलें जे काल्पनिक अस्त्र त्यास ब्रह्मास्त्र असे म्हणतात असा देतो.

श्रीमद्भागवतांत द्रोणपुत्र व अर्जुन याचें ब्रह्मास्त्रानें झालेले युद्ध वर्णिले आहे.

रेव्हरंड बानर्जी म्हणतो की, ब्रह्मास्त्र म्हणजे आधुनिक तोड्याची बंदूक होय.

ब्लॅव्हट्स्की म्हणतो की, "प्राचीन काळी हिंदु लोक अग्न्यस्त्राचा उपयोग करीत नसत असे म्हणता येणार नाही."

काश्मीरचा राजा व हल यांच्यामध्ये युद्ध झाले त्या वेळी मातीचे हत्ती करण्यात आले व ते योग्य प्रसंगी फुटून जिकडे तिकडे धूर झाला असे लिहिले आहे. यावर टीका करताना एलियट लिहितो की, फक्त आपोआप भडका उडाला असे कसे होईल ? त्याकरिता काहीं तरी ज्वालाग्राही पदार्थाची योजना केली असली पाहिजे.

ॲरिस्टॉटल यास पाठविलेल्या पत्रात अलेक्झांडर लिहितो की, "हिंदुस्थानात माझ्या सैन्यावर भयंकर ज्वालायुक्त पदार्थ पडले."

त्याचप्रमाणे थॉमस म्हणतो की, "हिंदुस्थानांतील ब्राह्मण दूर उभे राहून जळणाऱ्या व गर्जना करणाऱ्या हत्यारांनी लढतात."

वरील उदाहरणावरून स्पष्टपणे एवढेच दिसते की, हिंदु लोक अशा अग्निमान अस्त्रांचा भरपूर उपयोग करीत. मात्र परदेशीय लोकास त्याचा उपयोग माहीत नसल्याने त्याचा फार संहार होई व त्यास अत्यंत विस्मय वाटे. प्रो. विल्सन म्हणतो की, "अशाच अस्त्रांपैकी एक वज्रास्त्र म्हणून असे. त्याचा उपयोग दूर अंतरावर असलेल्या पदार्थांचा नाश करण्याच्या कामी केला जाई. त्यास गति मिळण्यास दारूसारखा गतिदायक काहीं तरी पदार्थ असला पाहिजे यात संशय नाही." याशिवाय वैद्यक ग्रंथ वाचले असता दारूची कृति आर्यांस माहीत नसावी असें मुळीच म्हणता येणार नाहीं. ज्या देशांत सोरा, गंधक व कोळसा हे दारूचे घटक मुबलक सांपडतात व ज्यांच्या वैद्यक ग्रंथात सर्व खनिज पदार्थांचे सूक्ष्म विवेचन केलेलें आढळतें त्यास या प्रत्येक अथवा तिघांच्या मिश्रणाचा ज्वालाग्राही धर्म माहीत नसेल असे मुळींच मानता येणार नाही. सबब हिंदुस्थानात अस्त्रे होती, त्यांच्या कामी दारूचा उपयोग करीत हे मागे सांगितलेले

अनुमान सिद्ध आहे असें मानण्याशिवाय इलाज नाहीं. वर दिलेल्या अनुमानापेक्षां जास्त स्पष्ट पुरावा रामायणांत मिळतो.

अयोध्येचे वर्णन करताना व इतर ठिकाणींही असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, ज्याप्रमाणें स्त्रियास दागिने त्याप्रमाणें नगरीस गोपुरें व प्रासादतले असतात. त्याचें संरक्षण करण्यास तोफाची फार जरूरी आहे व त्या तटावर ठेवलेल्या असत.

पुराणांतरीं युद्धाचें व किल्ल्याचे वर्णन करतांना तोफाना शतघ्नी असें म्हटलें आहे. शतघ्नी म्हणजे शंभराना मारणारी. संस्कृत कोशामध्ये जें यंत्र लोखंडाचे लहान गोळे अथवा इतर पदार्थ फेकून शेंकडो माणसें मारतें त्यास तोफ असें म्हणतात अशी शतघ्नींची व्याख्या दिली आहे; व तिला वृत्रघ्नी, काली असेंही म्हणतात.

शतघ्नी व इतर त्याच जातीची यंत्रे रामायणांतील खालील श्लोकात सांगितली आहेत.

| सर्ग | श्लोक. |
|---|---|
| ३ | १२, १३, १६, १७. |
| ४ | २३. |
| २१ | शेवटचा. |
| ३९ | ३६. |
| ६० | ५४. |
| ६१ | ३२. |
| ७६ | ६८. |
| ८६ | २२. |

शतघ्नी लोखंडाची केलेली असून तिचा आकार झाडाच्या लहान फांद्या अथवा खोडें यासारखा असतो असें सुंदरकांडात म्हटलें आहे व पुढेंही त्याच काव्यात अशा तोफा केवळ किल्ल्यावर चढवून ठेवावयाच्या नसून त्या रणांगणावर ओढून नेतात असें म्हटलें आहे. रामायणाशिवाय पुराणात निरनिराळ्या ठिकाणी तोफा व बंदुका याना 'सहस्रघाती' 'उल्हाट यंत्रे' अशी नावें दिलीं आहेत.

"राजपुरुषानें ( Magistrate ) विषयुक्त हत्यारें, तोफा, बंदुका, अस्त्र अथवा एकादें कपटयंत्र यांच्या साहाय्यानें युद्ध करूं नये" या हिंदुधर्मशास्त्रांतील वाक्यावर टीका करताना हालहेड म्हणतो की, "अलेक्झांडर यास हिंदु-

स्थानांत तोफा व बंदुका ही हत्यारें पहावयास सापडली ह्या आजपर्यंत भ्रामक वाटणाऱ्या विधानावर यापुढे लोकांचा विश्वास बसूं लागेल. हिंदुस्थान व चीन या देशांत फार प्राचीन काळापासून दारूचा उपयोग माहीत आहे. अग्न्यस्त्र म्हणजे वेळूच्या एकाद्या नळींतून सोडलेला आग्नमुखाचा बाण. पूर्वी याच्या पुष्कळ तऱ्हा होत्या. त्यापैकीं एक चमत्कारिक अशी होती कीं, ' हे अस्त्र सुटल्यावर त्याचे हवेंत पुष्कळ विभाग पडत. असे विभाग पडल्यावर तें एकाद्या झाडाच्या फांदीसारखें दिसे. त्यांतील प्रत्येक भाग पेटलेला असून तो विझवणें फार अवघड जात असे; ' परंतु अलीकडे हे हत्यार नष्ट झालें आहे. या सर्व हत्याराचा शोधक विश्वकर्मा होता असे म्हटलें आहे. "

हिंदुस्थानचा परराष्ट्रीय मंत्री एलियट ( १८४५ ) यानें प्राचीन काळीं हिंदुस्थानात अस्त्राचा उपयोग लोक कसा, कोठें व कितपत करीत असत, त्याचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें, तीं उडावेण्याची पद्धत काय होती, किती अंतरावरून तीं सोडलीं जात वगैरे सर्व गोष्टींची चर्चा केल्यावर शेवटीं म्हणतो कीं, " गंगाकाठच्या प्रदेशात निसर्गसिद्ध सोरा ( Saltpetre ) व उत्तर हिंदुस्थानात गंधक मुबलक सांपडत असल्यानें व ह्या पदार्थांच्या ठिकाणीं भडका होणें, पेट घेणें वगैरे सहजप्राप्त धर्म असल्यानें त्याचा अस्त्रांच्या कामीं उपयोग केला जात असे असें म्हणण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं. अथवा हिंदुस्थानांत हे पदार्थ मूळचे विपुल असल्यानं त्यापासून अशा अस्त्राची युक्ति सुचली असावी असे हिंदूंच्या इतर सर्व विद्या व कला यावरून मानण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं. "

येथपर्यंत तोफा, बंदुका वगैरे सर्व प्रकारचीं वन्ह्युत्पादक शस्त्रे याविषयीं चर्चा केली. यानंतर जलास्त्रासंबंधीं काहीं माहिती मिळाल्यास पाहूं. मूळचे शास्त्रग्रंथ लुप्त झाल्यानें हिंदुस्थानात प्राचीन काळीं येऊन राहिलेले परदेशीय ग्रंथकार काय म्हणतात यावर एकाद्या भिकाऱ्यासारखें विसंबून रहावें लागतें. त्यांची माहिती सर्वस्वी विश्वसनीय आहे असे म्हणण्याचा आमचा कटाक्ष नाहीं. उलट आम्ही असें म्हणतों कीं, त्यास भाषेच्या अडचणीमुळें, देशस्थिति, चालिरीती, अल्पकालीन राहणें या सर्व गोष्टींमुळें विश्वसनीय माहिती मिळणें कठीण; परंतु त्याचे लेख म्हणजे इतिहास व आमचीं पुराणें म्हणजे ब्राह्मणानीं रचिलेलें थोतांड, त्यास शास्त्रीय ग्रंथाची किंमत देणें अयोग्य, असा अलीकडे समज प्रसृत होत चालल्यामुळें अशा आक्षेपकाचें समाधान सुवर्णकार— वर्णछिद्र न्यायानें करणें बरें

अशी आमची समजून असल्यामुळें विशेषतः परदेशीय लेखकांचेच उतारे आम्ही उद्धृत करतों.

टेसियस, एलेयन, फिलास्ट्रेटस, लासेन, युसेबी, सालमर्टी इत्यादि सर्व ग्रंथकार प्राचीन कालीं हिंदु लोक युद्धाच्या कामीं दाहक पाण्याचा उपयोग करीत असें नमूद करतात. या दाहक जलाचे घटकावयव काय होते हें नक्की माहीत नाहीं; परंतु शत्रूंची नगरें, किल्ले, वाहनें, हत्यारें व लोक यांची जाळून राखरांगोळी करण्याच्या कामीं त्याचा उपयोग होत असे असें त्यानीं म्हटलेलें आहे. अस्तु.

वरील सर्व निरूपणावरून वाचकाच्या लक्षात एक गोष्ट आली असेल की, अर्वाचीन अत्यंत सुधारलेल्या युरोपियन युद्धशास्त्रास मात करणारी अशी एक विद्या प्राचीन कालीं भारतीय आर्यांस अवगत होती व याच गोष्टीमुळें त्याचे महत्त्व प्राचीन कालापासून लोक मान्य करीत आले आहेत. ती विद्या म्हणजे अस्त्रविद्या होय; व तिचा उपयोग चालू काळातील शिपाईगड्यास, रणधुरंधर सेनापतीस, रणगाजी महायोद्धयास माहीत नाही याबद्दल प्राचीन हिंदु लोकांचा त्यांस हेवा वाटावा हें अगदीं साहजिक आहे. वर सविस्तर वर्णन केलेल्या दोन अस्त्राखेरीज धूमास्त्र, वायव्यास्त्र, वर्षास्त्र अशी अनेक अस्त्रें प्रचारांत होती. त्या योगाने शत्रूच्या बलावर, धुराचा, पावसाचा, वायूचा चोहोंकडून मारा करून त्याची दृष्टि मंद व जड केली जात असे. हवेमध्ये नाना तऱ्हेचे विषारी पदार्थ, अनेक आकृतींचीं भयंकर जनावरें, हिंस्र पशु, नाग वगैरे प्राणी मिसळून दिले जात; त्यामुळें त्यास डोळे उघडण्याची छाती होत नसे. विषारी व रोगट धुरामुळे त्याचे घसे गुदमरून श्वास कोंडत असे. कधीं कानठळ्या बसविणारे असंख्य ध्वनि एकदम उठत तर कधीं एकाएकीं महापूर आणणारा जलौघ दृष्टीस पडे. कधीं कधीं तर निबिड अंधकार सर्वत्र पसरून शत्रु कोण, मित्र कोण याची ओळख पडेनाशी होई. कधीं कधीं विजांचा कडकडाट होऊन सर्व शत्रुसैन्य गर्भगळीत होत असे; अशी एक ना दोन अनेक अस्त्रे प्रसंगविशेषीं उपयोगात आणलीं जात. दुसऱ्या बाजूने सोडलेली अस्त्रे पाहून एकमेक निवारक व प्रतिबंधक अस्त्रे सोडीत. रामायण, कार्तिकमाहात्म्य व इतर पुराणे या ग्रंथांत अशा प्रकारच्या अस्त्रांच्या अनेक मौजा सांगितल्या आहेत.

शेवटीं प्राचीन युद्धाच्या एका अंगासंबंधीं दोन शब्द लिहून हें प्रकरण पुरे करूं. राम पुष्पक विमानांत बसून अयोध्येस परत आले, पुण्यवान लोकांना देव विमानें

पाठवीत, तुकाराम सदेह विमानांतून वैकुंठास गेले वगैरे प्रकारच्या अनेक गोष्टी आपण पुराणांत वाचतों व ऐकतां. देव-दानवांचें युद्ध चाललें असतां कित्येक वेळां रणसंग्राम विमानांतून हवेंत चाले असेंहि वाचल्याचें प्रत्येकास आठवेल. आता हा प्रकारसुद्धां हिंदूंच्या सुपीक मेंदूचें एक फळ होय असे अगदीं कालपर्यंत सर्व पंडितांस वाटत नसे; परंतु महायुद्धानें ज्या अनेक खुळचट समजुतींचा निरास केला त्यापैकींच हीं एक होय. समुद्रसंचार करणें ही गोष्ट सुद्धां एका काळीं अशक्य कोटींतलीच समजली जात असे; परंतु जगच्छिक्षक कालानें हळुहळू ती गोष्ट खरी करून दाखविली व पुढे पुढे त्या गोष्टीचें लोकास काहींच वाटेनासें झालें आणि भूप्रवास व जलप्रवास सारखेच वाटूं लागले.

भूभागाप्रमाणेंच जलपृष्ठावरही राष्ट्रीय मालकी प्रस्थापित करण्याची धडपड निरनिराळ्या राष्ट्रांमध्ये चालू झाली व त्याचेंच महायुद्ध हें दृश्य चिन्ह होय. ह्या युद्धात कल्पनागोचर विमानाचा प्रत्यक्ष उपयोग होऊं लागला व पुढे काहीं कालानें वातावरणावरही सत्ता स्थापण्याकरिता राष्ट्राराष्ट्रांमध्ये चढाओढ लागली व त्यामुळें यापुढें युद्धशास्त्रामध्यें क्रांति होऊन आजपर्यंतचे सर्व समज बदलून जाऊन लोकांच्या जीवनक्रमावर सुद्धां याचा परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं, असे दिसतें. आम्हास जें काहीं सांगावयाचे आहे तें हेंच कीं, प्राचीन हिंदु लोकांच्या कल्पना जगास एकदम पचनीं पडत नाहीत; कारण आर्यांची शक्ति व इतर जगाची शक्ति यामध्यें फार तफावत असल्यानें एकाचा आहार दुसऱ्यास न मानवल्यास कांही आश्चर्य नाहीं. परंतु आजपर्यंत सर्व जगास इतर गोष्टी पचनीं पडण्यास इतका काळ लागला त्याचप्रमाणें हीं विमानाची युक्तिसुद्धा सर्व जगास पटून आर्यबुद्धीचें कौतुक करण्यात व त्याच गुणानुवाद गाण्यात सर्व जगास धन्यता वाटेल असा एक दिवस उजाडल्याखेरीज राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. अर्वाचीन हिंदूंनीं कालाप्रमाणें योग्य फरक आचरणात करून, बाकी पूर्वजाच्या पावलावर पावलें टाकीत चालल्यास, ज्याप्रमाणें पूर्वजांची जीवनयात्रा क्षेमकर, सुखकर, कीर्तिप्रद झाली, त्याप्रमाणें आमचीहि झाल्याशिवाय राहणार नाहीं. मात्र त्यांच्या-प्रमाणें आध्यात्मिक जीवन ठेऊन निष्कलंक आचरणानें, अचाट तपस्येनें, अंतर्बाह्य शुचिर्भूतपणानें वागण्याचें असिधाराव्रत त्यांनीं सांभाळले पाहिजे.

---

# प्रकरण ९ वें.



## संगीत व इतर शास्त्रें.

चिनी लोक संगीताला राजशास्त्र (शास्त्राणाम् राजा) असें मानतात. संगीताचा उद्भव मनुष्याच्या वृत्ति अगदीं तल्लीन असतात तेव्हांच होतो. सांसारिक काळजींच्या काचणींतून मनुष्याचें मन पूर्ण स्वतंत्र असतें, बाह्य परिस्थितीच्या एखाद्या आघातानें मनाची आनंदवृत्ति जागृत होते, त्या वृत्तीचा विचारशक्तीवर पूर्ण अंमल बसतो सजीवतेचा वायु फक्त त्या एकाच वृत्तिरूप नलिकेच्या द्वारें बाहेर पडतो, अथवा क्षणभर मनुष्यामधील अहंभाव नष्ट होऊन त्या भावनेशीं जेव्हा तो तद्रूप होतो, अशा प्रशांत, एकांत व समाधीच्या वेळीं त्याच्या मुखावाटे जे ध्वनि बाहेर पडतात तेंच शुद्ध संगीत होय. अशा संगीताला इतरत्र तोड मिळणें अशक्य आहे. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे वेद होय. वेदांना जें इतकें महत्त्व आलें आहे त्याचें कारण हेंच होय. वेदांना अपौरुषेय म्हणतात व अत्यंत विशुद्ध गीताचें भाण्डार म्हणतात, याचें कारण वेदद्रष्ट्या ऋषींची समाधियुक्त मानसिक स्थिति व एकतानता. मनुष्य जेव्हा अहंभाव विसरून परमात्मज्ञानामध्यें गर्क होतो, मानवी जीवाची परमात्म्याशीं एकतानता होते, तेव्हा अर्थात् ऐहिक बंधनें त्यास न बाधतां त्याच्या मुखांतून अत्युच्च स्थितीचे उद्गार लीलेनें निघूं लागावेत व असे दैवी स्फूर्तिरूप गोड आलाप अपौरुषेय वेद मानले जावेत हें कांहीं अनुचित नाहीं. पूर्वसंस्कार व शिक्षणसंस्कार यांच्या संयोगापासून उच्च मनोवृत्तीचें बीज रुजून पुढें मनाच्या कैवल्य स्थितीमुळें व निस्सीम एकतानतेमुळें त्या बीजरूप मनोवृत्ति उफाड्याच्या व पूर्ण वाढीच्या सुरम्य वल्ली दिसाव्या व त्यापासून येणाऱ्या गानरूप वायुलहरींनीं मनास अत्यंत आनंद व्हावा यांत काय आश्चर्य ? भारतीय आर्यांचा संगीतप्रिय स्वभाव आहे. दिवसाच्या प्रत्येक भागांत बाह्य परिस्थितीप्रमाणें निरनिराळीं गाणीं गावीं असें त्यांस आवडतें. भारतीय आर्यांच्या संगीतांत वर्षेंच्या वर्षें घालवावीं तेव्हा कोठें त्यांच्या मनःस्थितीचें कोडें परदेशीय लोकांस उकलणें शक्य आहे. अर्थात् असें न करितां केवळ जातां जातां दृष्टि फेंकून अथवा रस्त्यांतून जातांना निकृष्ट वर्गांतील लोकांच्या तोंडून ऐकलेली

पानचट संगीतशून्य गाणीं, रस्त्यांतून निघालेल्या मिरवणुकीच्या वेळीं गायलीं जाणारीं पद्यें व वाजविलीं जाणारीं वाद्यें यावरून सरसकट विधान ठोकून देण्याची घातुक व घमेंडखोरपणाची संवय युरोपीयनांस लागलेली आहे. अशा बेजबाबदार घमेंड्यानंदनाचे शब्द वेदतुल्य मानणारे आमचे स्वाभिमानशून्य व बालिश सुधारक आत्मनिंदात्मक स्वरात बसविलेलीं गद्यगाणीं जेव्हा त्यासपीठा-वरून गाण्यास सुरवात करितात तेव्हा त्यांची टर उडावी, नंतर त्यांनीं बहु-जनसमाजावर रुसावें व लोकांनीं त्यांच्या शब्दास कवडीचें मोल द्यावे हें अगदीं यथायोग्य आहे.

आर्यांचा स्वभाव संगीतप्रिय आहे असे ॲन विल्सन व कोलमन यांचें विधान मागे दिलेलेच आहे. यापुढे कर्नल टॉड काय म्हणतो तें पाहूं.

" आर्य संगीत किती प्रगल्भ दशेस आले होते व त्याची तुलना युरोपांतील संगीताशीं करणें हे अद्याप सुद्धा अशक्य आहे. या गोष्टी प्राच्यविद्याविशारदांस अवगत नसून अभ्यास करण्यास योग्य आहेत हें कोणीही न पक्षपाती विद्या-व्यासंगी व शास्त्रभक्त पंडित कबूल करील. ग्रीसचे नांव क्रिया व कला यापाशीं अत्यंत निर्गाडत झालेले असले तरी ज्या वेळीं भरतखंडात ऋषींच्या तोंडून दिव्यगायनाचें कर्णमधुर आलाप सहज लीलेनें गायले गेले व पुढे त्याजवर आर्य-संगीतशास्त्राची स्वतंत्र इमारत उभारली गेली तेव्हा ते राष्ट्र रानटी स्थितीतून बाहेर पडलें नव्हतें. " इतक्या जुनाट आर्य संगीत शास्त्राची अखंड परंपरा हिंदूंनीं चालू ठेविली आहे. यापासून पुढें हे शास्त्र प्रो. वेबर व बेनफी यांच्या मतें इराणी लोकांनी घेतले; इराणांतून अरबस्थानांत गेलें व अरबस्थानातून गिडोड अरीझो यानें अकराव्या शतकात युरोपांत नेले असा याच्या प्रवासाचा क्रम मानण्यात येतो. परंतु हा क्रम जरी हल्लीं सर्वमान्य झाल्यासारखा दिसतो तरी याच्यापूर्वी बरीच शतकें आर्य संगीतानें युरोपात संचार केला असला पाहिजे. कारण स्ट्रॅबो म्हणतो कीं, " कांहीं ग्रीक लोक संगीत शास्त्राची उत्पत्ति हिंदुस्थानात झाली असे मानतात. सिटिरा (cittiara) नबला हीं वाद्येंसुद्धां हिंदुस्थानांतीलच आहेत असेंहि त्याचे म्हणणे आहे. परंतु कर्नल टॉड म्हणतो कीं, ' शुद्धलेखनपद्धतीच्या दृष्टीनें सिटिरा (cittiara) व नबला ह्या शब्दांचे विवरण केल्यास ते मुळचे सतार व तबला असावेत असें मानण्यास मुळीच प्रत्य-वाय नाहीं. यावरून हें शास्त्र अकराव्या शतकापूर्वी स्ट्रॅबोच्या वेळीं ग्रीकांस माहीत होतें हें उघड आहे. दुसरें प्रमाण कर्नल टॉड म्हणतो त्याप्रमाणें असे आहे

कीं, ग्रीक लोकांची लांबलचक, कर्णकटु, कंटाळवाणी संगीत लिपी, व टायमॉथिअसनें शोधून काढलेली द्विश्रुतिक स्वरपंक्ति ही ( chromati scale ) सुद्धां अलेक्झांडरच्या वेळीं हिंदुस्थानांतून युरोपांत नेली असली पाहिजे; व यावरून हा अकराव्या शतकाचा काळ किती मागें ओढावा लागेल याची कोणासही सहज कल्पना होईल.

हिंदुस्थानांत वैदिक कालापासून संगीताची गोडी लोकांस किती आहे हें वरील विवेचनावरून कळून येईल.

संगीत पद्धतीनें ज्या प्रार्थना म्हणण्यात येत त्याचा समावेश सामवेदांत होतो. ऋचा ऋग्वेदातील, परंतु त्या तालसुरात बसवून त्याचा स्वतंत्र सामवेद तयार करण्यात आला. यावरून ऋषींना संगीताची किती गोडी होती हें कळून येणार आहे. यावरून पुढे स्वतंत्र गंधर्ववेद तयार करण्यात आला होता व त्यांत संगीताचा कला आणि शास्त्र या उभय दृष्टीनें ऊहापोह केलेला होता. परंतु दुर्दैवानें इतर अनेक अमूल्य ग्रंथाप्रमाणें हाही काळाच्या जबड्यात सापडून लुप्त झाला व याजसंबंधाने इतर ग्रंथात जे ठिकठिकाणी उल्लेख आलेले आहेत त्यावरूनच त्याची महती व संगीत शास्त्राची सर्वांगीण वाढ याची कल्पना बांधावी लागते; असें जरी आहे तरी त्या गोष्टीस इलाज नाहीं. परंतु ठिकठिकाणच्या उल्लेखावरूनही या शास्त्राच्या वाढीविषयीं अभ्यासशील विद्वानांची खात्री पटते. परंतु ज्यास व्यासंग न करितां केवळ आत्मप्रौढीवरच हिंदूंचा गचाळपणा सिद्ध करावयाचा असेल त्याकडे लक्ष देण्याचे मुळीच कारण नाहीं.

हल्लीं हिंदुस्थानात ज्या प्रकारचा शास्त्रीय संगीताचा अभ्यास चालतो तें पाहूं. प्रथमतः रूढ असे सहा मुख्य राग असून त्याजपासून छत्तीस रागिणी निघालेल्या आहेत. या छत्तीस रागिणीपैकीं प्रत्येकीतून आणखी तीन उपरागिणी बनविलेल्या आहेत व या उपरागिणीमधून आणखी अनेक सूक्ष्म रागिणी निर्माण करण्यात आलेल्या आहेत. मात्र लक्षात ठेवण्याची गोष्ट अशी कीं, या प्रत्येक रागिणीत, उपरागिणीत व सूक्ष्म रागिणींत मूळ रागामध्यें असलेल्या स्वराकडे किंचितसुद्धा दुर्लक्ष केलेले नाहीं. मग कोणी असें म्हणेल कीं, इतक्या रागिणी तयार करण्याची काय जरूर ? तर त्याचें उत्तर असें कीं, कंठाला तालीम देऊन सृष्टीतील असंख्य आलापाचें अनुकरण करिता यावें म्हणून शास्त्रीय पद्धतीनें बसविलेले हे पाठ होय. सृष्टींत जे विविध आलाप ऐकूं येतात तेच सर्व आपल्या कंठानें व्यक्त करितां येतात हें आर्यांनीं रागरागिणींच्या साहाय्यानें प्रत्यक्ष सिद्ध

केले आहे. या रागिणींची मोजदाद करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? या सृष्टींत मानवकोटीपासून सूक्ष्म कीटकयोनीपर्यंत किती आलाप आहेत याची संख्या कोणीं ठरविली आहे काय ? याकरिता प्राचीन शास्त्रकारानीं समुद्रांतील लाटाप्रमाणे त्या असंख्य आहेत असें जें ठरविलें आहे तें किती यथार्थ आहे बरें ?

याप्रमाणें रागरागिणींचा विचार केल्यानंतर स्वराचा विचार केलेला आहे. स्वराचे दुय्यम व सूक्ष्म असे भेद पाडिलेले आहेत अष्टमाचे हिंदू पद्धतीने बावीस दुय्यम स्वर पाडले आहेत. परंतु पाश्चात्य पद्धतीनें ते फक्त १२ च पाडिलेले दिसतात. स्वराचे आरोह, अवरोह व मध्यमावस्था आणि रागाच्या अनुरोधानें, प्रसंगाच्या अनुकूलतेनें व रसपरिपाकाच्या प्रचुर ज्ञानानें त्यात कमी अधिक फेरबदल करणे हें प्रत्येक गवयाच्या नैपुण्याचे द्योतक आहे. पुष्कळ वेळां संगीतपटु युरोपीयनास ह्या सूक्ष्म भेदांचें आकलन व अनुकरण करणें अत्यंत बिकट जाते. म्हणून ते हिंदूंस नावें ठेवून आपलें अज्ञान झाकण्याचा प्रयत्न करितात; परंतु असला प्रयत्न सिद्धीस जाणें कधीं तरी शक्य आहे काय ? व याच कारणाकरिता हिंदू गवई, युरोपीयन तज्ज्ञाच्या अभिप्रायास बहुशः फारशी किंमत देत नाहींत.

राग, रागिणी, स्वर व ताल यास वाद्याची जोड देणे फार अवश्य असून तशी ती हिंदु शास्त्रकारानी दिलेली आहे. मुख्य चित्र उठावदार पार्श्वभागाशिवाय फिकें दिसतें. अत्यंत लावण्यसुद्धा दागिन्याशिवाय साधारणतः डोळ्यात भरत नाहीं. तोच न्याय स्वराचा. ताना, स्वर याना योग्य वाद्याची साथ मिळाली म्हणजे दुधात साखर घातल्याप्रमाणें होते. असो. ही विद्या नुसती कंठगतच न राहता तिला लौकिक प्रचारात आणण्यासाठीं व ती सर्व जनास सुलभ करण्याकरिता योग्य अशी परिभाषा बसवून स्वतंत्र संगीत लिपी अथवा स्वरचिन्हमाला तयार करण्यात आली. प्रो. विल्सनच्या मते हिंदूंनीं संगीत शास्त्र पूर्ण प्रगल्भ दशेस आणण्याकरिता स्वरसप्तक, स्वरमाला, ताल, सूर, स्वराचें सूक्ष्म वर्गीकरण, द्विश्रुतीक स्वरग्राम व अनेकश्रुतीक स्वरग्राम इत्यादि गोष्टी निर्माण केल्या. यावरून त्याचा व्यासंग, जिज्ञासा व आवड ही व्यक्त होतात.

इतकी चर्चा केल्यावर एक मुख्य गोष्ट सागावयाची राहिली ती अशी कीं, हे राग, रागिणी व ताल बसविण्यात शास्त्रकाराचा करमणुकीशिवाय दुसरा एक हेतु होता. करमणूक करून घेणें हा प्राणिमात्राचा धर्मच आहे; परंतु शास्त्राचा

कामगिरी निव्वळ करमणुकीपेक्षां अगदीं निराळी आहे. एखाद्याच्या ठिकाणीं उपजतच तत्त्वज्ञानाचा उदय होऊन त्याला ब्रह्मप्राप्तीचा मार्ग खुला होईल; परंतु यामुळें जगास काय उपयोग ? याकरिता शास्त्राच जरूरी लागते. त्याचप्रमाणें एकादा निसर्गसिद्ध उत्तम गवई असेल; परंतु त्याची ती विद्या व करमणुकीचें साधन त्याजबरोबर लुप्त न होतां जगास त्याचा अखंड उपयोग व्हावा याच शुद्ध व सर्वप्रेमी बुद्धीनें शास्त्राची रचना करण्यांत आलेली असते. याच न्यायास अनुसरून भिन्न वेळीं भिन्न मनोभावना जागृत करून सर्व श्रोतृगणास समरस बनविणें हाच गायनशास्त्राचा प्रधान हेतु आहे. रागाचे मुख्य सहा भेद पाडिले आहेत ते असे:—

( १ ) हिंदोल—पुष्प-प्रसूनाचा सुगंध व मधुमासांतील मधु याचा मधुर ठसा मनावर उठविण्याकरिता याचा उपयोग करण्यात येतो.

( २ ) श्रीराग—सूर्यास्तकालीन नितान्त प्रशांतपणा व निस्तब्धता.

( ३ ) मेघमल्लार—वर्षाऋतूंतील मेघनाद व विजेचा कडकडाट.

( ४ ) दीपक—हा सध्या लुप्त आहे. त्यायोगे गायकाच्या शरीरांतून ज्योति निर्माण होऊन सभोवारच्या प्रदेशांत लखलखाट होतो व या ज्योतीमुळें स्वतः गवई गतप्राण होतो.

( ५ ) भैरव—आगामी सूर्योदय, हिमबिंदुनिपात, विहगकूजित, प्रातः-कालीन सुगंधी व बलदायक वायु इत्यादि.

( ६ ) मालकंस—मानसिक चेतना व प्रस्फुरण.

हिंदु व पाश्चात्य पद्धतीमधील साम्य अर्थर व्हिटन यानें पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे. " द्विश्रुतीक सरणी व स्वरसप्तक हीं दोघामध्ये सारखीच आहेत.

अष्टमत्रय, खरज, मधुरा व तार हा स्वरभेद उभयशास्त्रास मान्य आहे व पाणिनीच्या काळापूर्वीं सप्तसुरांचीं आद्याक्षरें ठरलीं आहेत. पुढ हीं स्वरचिन्ह-माला इराणी लोकानी घेतली, नतर तिचा संचार अरबस्थानात झाला व तेथून ग्रीक लोकानीं नेल्यामुळें मुळांतला हा विशेष ग्रीक स्वरमालेत उतरला. आणखी एक साम्य सांगितले पाहिजे ते असे कीं, ग्रीक लोकाच्या संगीत देव-तेचें नाव ॲपोलो असून तिच्या सभोवती नऊ दासी असतात असे वर्णन आहे. हरीचा उत्सव ज्या वेळीं करण्यात येतो त्यात रासमंडळाचा नाच होतो. त्या वेळीं हरि हा आपल्या नवरागिणीनामक अप्सरांबरोबर नर्तन करितो. ह्या नव-रागिणी नवरसाच्या अधिष्ठात्री देवता आहेत असे मानण्यात येते. ह्या कल्पनेत व ॲपोलो आणि त्याच्या नव दासी या कल्पनेमध्यें साम्य नाही असें कोण म्हणेल ? "

प्राचीन काळांतील मुख्य संगीतपटु भरत, ईश्वर, पर्ण व नारद हे होत. गेल्या काहीं शतकांत गोपाल नाईक व तानसेन हे होऊन गेले. हे दोघे अकबराच्या दरबारीं होते. गोपाल नाईक, यास दीपराग अवगत होता. मागें सांगितल्याप्रमाणें हा दीपराग गाऊन मृत्यु पावला व असें करण्यास अकबर बादशहानें त्यास हुकूम केला होता अशी दंतकथा आहे भरदुपारीं अकबराच्या हुकुमावरून श्रीराग गाइल्यानें जिकडे तिकडे रात्रीसारखा अंधःकार पडला अशी तानसेनाविषयीं लोकवार्ता आहे.

ज्योतिष, गणित, वैद्यक व लष्करी शास्त्र यांखेरीज इतर अनेक शास्त्रे हिंदुस्थानांत भरभराटीस आलीं असें हिंदूंच्या अचाट कामाच्या अवशेषावरून दिसतें. एल्फिन्स्टन म्हणतो कीं, " शास्त्राच्या पूर्ण अभिवृद्धीकरितां हिंदू लोक फारच मेहनत घेतात व त्या कामीं बुद्धीची अपूर्व कुशाग्रता दाखवितात. "

आयुर्वेदाची पूर्ण वाढ होण्यास प्राणिशास्त्र, विद्युत, रसायन, इत्यादि शास्त्रांची आवश्यकता आहे. अर्थविद्या सफळ होण्यास रसायन, गणितशास्त्र, हवामानशास्त्र, भूस्तरशास्त्र, पदार्थविज्ञान इत्यादि सजातीय शास्त्राचें थोडें फार अध्ययन पूर्वी झालें असलें पाहिजे. त्याचप्रमाणें विमानविध्वंस अशाच प्रकारच्या दुसऱ्या शास्त्राची आवश्यकता आहे. प्राचीन भव्य इमारती, व अजिंठा, कारला, वेरूळ, बदामी वगैरे ठिकाणचीं अफाट पांडवकृत्यें व भयंकर कोरींव लेणीं तयार होण्यास वास्तुविद्येचें हलकें सलकें ज्ञान पुरणार नाहीं. खरोखर हीं पांडवकृत्यें व कोरींव लेणीं जगांतील अद्भुत चमत्कारांत मोडत असून त्यास लागणारें शिल्पज्ञान केवळ अतर्क्यच असलें पाहिजे.

पाश्चात्य राष्ट्रांत एवढे नामांकित वास्तुविद्यापंडित झाले, परंतु अजून कोणासही इजिप्तसारखे मनोरे बांधण्याची कला साधत नाहीं. भूमध्य समुद्र व तांबडा समुद्र यांचा संयोग प्राचीन कालीं आसपासच्या स्थानिक राजांनीं टोलेमिसारख्या ग्रीक पंडिताच्या मदतीनें केला होता; परंतु त्याच्या काठचा प्रदेश वाळवंटाचा व रेताड असल्यानें हा संयोगी कालवा वारंवार बुजून जातो सांप्रत काळीं तेंच काम केल्याबद्दल फ्रेंच शिल्पज्ञ लॅसेप्स याचें नांव सर्वतोमुखीं झालें आहे, व तें तसें होणें अगदीं रास्त आहे. मात्र आमची सध्या एवढीच इच्छा आहे कीं, पूर्वीप्रमाणें तो बुजून जाऊं नये. इजिप्तमधील मनोरे स्वर्गांतून खालीं पडले अगर पृथ्वीच्या पोटांतून वर आले अशा दोन संभवनीय कल्पना प्राचीन लोकांस सुचल्या होत्या.

महाभारतांत मयसभेचें जें वर्णन आहे तें सुद्धां खरोखर अतिशय विस्मय-कारक आहे. मयासुरानें दाखविलेल्या या खेळात अतिसूक्ष्मदर्शक यंत्रें, दुर्बिणी, घड्याळें वगैरे वस्तु होत्या असें वर्णिलें आहे. ही मयसभा एवढी मोठी होती कीं, त्यांत हजारों लोकांचा समावेश होई; परंतु ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्यास १०।१२ माणसें पुरे होत. त्याचप्रमाणें त्यांत अग्निरथाचेंही वर्णन आहे.

फार मोठ्या शक्तीच्या दुर्बिणी त्या वेळीं होत्या व अशाच प्रकारची एक इंद्रप्रस्थामध्यें संजयाजवळ होती व ती त्यास व्यासानें दिली होती असें सांगितलें आहे.

वनस्पतिशास्त्रासंबंधी प्रो. विल्सन लिहितो की, " हिंदूंना वनस्पतींच्या अंतर्बाह्य दोन्ही गुणाचें ज्ञान होतें. त्यांनी त्यांची विस्तृत याद तयार केली असून त्यांत त्यांचा व्यवहारार्थ उपयोग व त्यांच्या गुणधर्मांची दर्शक नांवें दिलीं आहेत. अकबर-उल-सालेख या नांवाच्या वर्तमानपत्राच्या १८८७ सालातील २५ नोव्हेंबरच्या अंकात असें विधान आहे की, काश्मीरमध्यें नुकताच त्रिभागात्मक वनस्पतिकोश सांपडला आहे; हा कोश जगापुढें अद्याप न आल्यानें त्या विधानावर विश्वास ठेवणें कठीण आहे.

मालतीमाधव नाटकात मालतीनें माधवाचें चित्त लोहचुंबकाप्रमाणें ओढून घेतलें असें वर्णिलें आहे यावरून हिंदूंना कृत्रिम लोहचुंबक करण्याची कृति माहीत असली पाहिजे असें दिसतें.

प्रो. विल्सन एका ठिकाणीं लिहितो की, " सृष्टींत निर्वात ( Vacunm ) स्थल नाहीं " हें तत्त्व हिंदूंस माहीत होतें. कांहीं यंत्रसाधनांनीं हवा काढून टाकतां येते. अशा वेळीं निरनिराळ्या अणूंमधील सांधा गेल्यानें ते एकत्र होऊन त्यांची रास व्हावी असें कोणीहि सहज मानील; परंतु हें वस्तुस्थितीस विसंगत असल्यानें त्याचें योग्य व समाधानकारक उत्तर पुढें दिल्याप्रमाणें दिलें आहे

" दोन पदार्थांमध्यें अति सूक्ष्म इंधक ( ether ) नावाचें तत्त्व असल्यानें व तें सर्वत्र भरून राहिल्यानें अशा प्रकारची आपत्ति ओढवत नाहीं. अलीकडे या तत्त्वाचा स्वीकार हळूहळू होत चालला आहे. ग्रहांचें भ्रमण व ध्वनीचें वहन याच तत्त्वामुळें होतें असें मानण्यांत येतें. निर्वात स्थलामध्यें ध्वनिसंचार होतो असें जे मानण्यात येतें तें याच कारणामुळें. दोन परमाणू या तत्त्वामुळें ether ( इंधक ) भिन्न रहातात व हवा त्यास एकत्र खेचते. हवा दोन पदार्थांच्या संघ-

ष्णाचें कारण असून तेजमध्यें स्पर्शधर्म आहे. अग्नीचा धर्म तेज होय; याचमुळें आकृतिप्रदर्शन होतें. कित्येक ही क्रिया रंगामुळें होते असे मानतात; परंतु आकृति अथवा रंग प्रकाशाशिवाय व्यर्थ होत. जलाचा धर्म रुचि हा आहे. यावरून एकोणिसाव्या शतकांतील शोधांचें ज्ञान प्राचीन आर्यांस होतें असें मानण्यास कोणती हरकत आहे ? ”

चंद्राच्या आकर्षणशक्तिमुळें भरती–ओहोटीचा खेळ होतो. याचे ज्ञान पूर्वी होते हें खालील रघुवंशांतील श्लोकावरून दिसून येईल.

तं तास्थिवांसं नगरोपकंठे ।
तदागमारूढगुरुप्रहर्षः ॥
प्रत्युज्जगाम क्रथकैशिकेंद्रः ।
चन्द्रं प्रवृद्धोर्मिरिवोर्मिमाली ॥

हत्तीच्या गंडस्थळांतून मद वाहतो ही गोष्ट स्ट्रॅबो यास प्राचीन ग्रीकांच्या वेळीं माहीत होती नंतर तिची माहिती क्युव्हीयर यानें प्रसिद्ध करीपर्यंत पाश्चात्य जगास ती माहीत नव्हती. परंतु प्राचीन काळचें एक काव्य असें सापडणार नाहीं कीं, ज्यांत मत्तगजमदासंबंधी उल्लेख नाहीं. यावरून सृष्टपदार्थशास्त्राची माहिती आर्यांस होती हे स्पष्ट होते. सृष्टीच्या पोटांतील खनिज संपत्ति काढून ती शुद्ध करणें, महासागरांतून मोत्यें काढणें, खाणी व त्रिहीरी खोदणें इत्यादि सर्व कामाचें पूर्वी ज्ञान होतें. त्याचप्रमाणें हिरे, मोत्ये, इंद्रनील वगैरेंचे गुणधर्म, जाति इतक्या बारकाईनें सांगितलेल्या आढळतात कीं, ह्या वस्तु सुद्धां त्याच्या नजरेतून व सूक्ष्म अवलोकनांतून राहिल्या नव्हत्या असें दिसतें.

पन्नास वर्षांपूर्वी विमानासंबंधीं बोलणें म्हणजे माथेफरूपणासारखीं बडबड करणें होय असें पाश्चात्य लोकांस वाटत असे; परंतु गेल्या पन्नास वर्षांत ही गोष्ट जवळ जवळ यशस्वी होऊन ती व्यवहार्य ठरली आहे व तिचा उपयोग गेल्या महायुद्धांत फार मोठ्या प्रमाणावर करण्यांत येत असे एका विचक्षण युरोपियन पंडितानें असे म्हटलें आहे कीं, “ हिंदुस्थानांत विमानविद्या हें स्वतंत्र शास्त्र असून त्याचा हिंदू लोक व्यावहारिक कामाकडे उपयोग करीत असत. ”

या विवेचनावरून एवढें होतें कीं, रसायन, यंत्रविज्ञान, हवामानशास्त्र वगैरे शास्त्राचें अध्ययन प्राचीन काळीं हिंदुस्थानांत बहुत झालें असलें पाहिजे. विमान-

विद्या होती असे एकदा कबूल केले की अंतरिक्षात वाहणारे वाऱ्याचे निरनिराळे प्रवाह, हवेचे एकावरील एक थर, हवेची शीतोष्णता व घनता इत्यादि गोष्टींचे ज्ञान त्यास असलेच पाहिजे असे मानावे लागते. यजुर्वेदात ( ६, २१ ) विमानविद्येविषयी स्पष्ट उल्लेख आढळतो.

उदाहरणार्थः—

**समुद्रङ्गच्छ स्वाहा अन्तरिक्षङ्गच्छ स्वाहा ।**
**देवं सवितारङ्गच्छ स्वाहा ॥**

मनु म्हणतोः—

**संशोध्य त्रिविधं मार्गं षड्विधं च बलं स्वकम् ।**
**सांपरायिककल्पेन यायादरिपुरं शनैः ॥**

काही लोकांचे असे म्हणणे आहे की, विमानविद्या हे व्यापक वायु—विद्येचे अंग आहे. ( शतपथ ब्राह्मण ११, १४ ) याशिवाय शतपथ ब्राह्मणात सर्पविद्येचा, आश्वलायन सूत्रात विषविद्येचा व पाणिनीच्या ग्रंथांत लोहशास्त्राचा स्पष्ट उल्लेख आहे.

विद्युत् व लोहचुंबक या गोष्टीहि लोकांच्या पूर्ण परिचयाच्या होत्या. वेदान्ती मनुष्य नेहमी असे म्हणत असतो की, विजेची उत्पत्ति मेघापासून होते व ही गोष्ट टचूलेट व इतर शास्त्रज्ञ यांच्या प्रयोगावरून कोणासही कळण्याजोगी आहे. प्राचीन ऋषींना वैद्युत आकर्षणशक्ति माहीत होती व इतरही वैद्युत चमत्कार ठाऊक होते. या सर्व शास्त्रांच्या पूर्णतेविषयी कथाप्रसंगाने व केवळ ठिकठिकाणच्या नाममात्र निर्देशाने एखाद्या हट्टी व आग्रही वावदूकाचे समाधान होणार नाही; परंतु त्यामुळे ती ऋषींस माहीत नव्हती असे बिलकूल म्हणता येणार नाही याच्या उलट व्यवहारांत त्याचा प्रत्यक्ष उपयोग केलेला पाहिला म्हणजे व्यवहाराचे संपूर्ण ज्ञान व शास्त्रीय बुद्धीचा यथायोग्य उपयोग याचे ऋषींच्या आचरणातील चित्र डोळ्यापुढे उभे राहते.

शेवटी एका गोष्टीचा विचार करून हे संकीर्णशास्त्रविवेचनात्मक प्रकरण पुरे करूं. निद्रा व भोजन ही मानवी अथवा इतर कोणत्याही जीवनाची अधारभूत अंगें आहेत हाती असलेल्या साधनाचा अत्युत्तम उपयोग करून घेणे हे ज्ञानी मनुष्याचे मुख्य लक्षण होय. श्रम झाले असता झोप येणे हे अगदी साहजिक आहे. परंतु निद्रावश स्थिति असता त्या स्थितीचा आरोग्याला जास्तीत जास्ती उपयोग कसा होईल हे पाहणे हेंच खरें शहाणपण होय.

कृमिकीटक चतुष्पाद व अज्ञानी जन सर्व निजतात आणि ज्ञानी मनुष्यही निजतो; परंतु ज्ञानवान् मनुष्याने आपल्या बुद्धीचा उपयोग करून जर आपले शरीर झोपेमुळें आरोग्यवान् करून त्याचा आध्यात्मिक उन्नतीकडे उपयोग केला नाहीं तर दोघांच्या स्थितींत काय फरक? झोंप कमी काल येऊन आरोग्य मात्र जास्त वाढविणें हें साध्य होण्यास झोंप घेण्याची एक शास्त्रनिष्ठ पद्धति ठरविली पाहिजे. झोंपेपासून भरपूर समाधान मिळून शिवाय कालाची बचत झाल्याने त्याच्या मनाची व ज्ञानाची उन्नति करून श्रेष्ठ पद मिळविण्यास उपयोग झाला पाहिजे.

अशी एक पद्धत तपोनिष्ठ, शास्त्रमग्न व दीर्घोद्योगी असे जे प्राचीन ऋषि त्यांनीं शोधून काढली होती. ही पद्धत आम्हा हिंदू लोकात वंशपरंपरेनें चालत आहे. तिचा उपयोग करण्यास कालाचा अथवा स्थलाचा कोणताही निर्बंध नाहीं. जेथें मानवी शरीर विश्रांतीकरितां पडेल तेथें ती आचरणात आणता येते. विद्युत् व लोहचुंबकत्व या दोन शास्त्रांतील प्रमेयावर तिची उभारणी झाली आहे. प्रत्येक माता आपल्या कुटुंबातील मुलास निजताना बजाविते कीं, 'मुलानों, दक्षिणकडे अथवा पूर्वेकडे पाय करून निजूं नका बरें' या हिंदी सतींच्या भाषणात काही अर्थ आहे अथवा नाही याचा फारसा विचार न करिता अंध-श्रद्धामय धर्मशास्त्रातील हे एक वचन आहे असें मानण्याचा बराच प्रघात आहे. परंतु कोणत्या ना कोणत्या कारणानें साधारणतः प्रत्येक हिंदू वर दिलेल्या दोन दिशेकडे पाय करून निजण्याचे टाळतो. याची कांहीं शास्त्रीय उपपत्ति मिळा-ल्यास बरें होईल असें वाटल्यावरून बाबू सीतानाथ रॉय यांनी त्यासंबंधी आपले कांहीं विचार प्रदर्शित केले आहेत, ते मननीय वाटल्यावरून पुढें देतो

स्मृतिग्रंथ व विष्णुपुराण या ग्रंथांत गार्ग्य व मार्कण्डेय ऋषींनीं ज्ञानप्राप्ति व्हावी अशी इच्छा असेल तर पूर्वदिशेकडे डोकें करून निजावें; शरीरसामर्थ्य व दीर्घायुष्य पाहिजे असेल तर नेहमी दक्षिणेकडे माथा करून निजावे; प्रवासात असताना पश्चिमेकडे डोकें करून निजल्यास चालेल; परंतु उत्तरेकडे डोकें व दक्षिणेकडे पाय करून कधींही निजूं नये; त्यायोगें भयंकर व्याधि जडते; सबब ज्यास निरामयत्व प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल त्यानें सदर आदेश पाळले पाहिजेत असें लिहून ठेवलें आहे.

याप्रमाणे आनुवंशिक संस्कारानें म्हणा अथवा संवयीनें म्हणा, बहुतेक हिंदू लोक या आदेशाचे पालन करतात. आता आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें यापासून काय निष्पन्न होतें तें पाहूं.

सूर्यकिरणाचा जो प्रवाह आपल्या पृथ्वीवर एकसारखा वाहत असतो त्यात उष्णतोत्पादक विद्युत् ( Thermal electricity ) संमिश्रित असते.

हा प्रवाह पृथ्वीच्या पूर्व बाजूवर पडल्याने व पृथ्वी वाटोळी असल्याने पश्चिम भाग थंड राहून फक्त पूर्व भागच उष्णतापूर्ण असतो. ही किरणजन्य उष्णतोत्पादक विद्युत् पृथ्वींत भिनून पूर्वेकडून पश्चिमेकडे अशी हिंडत रहाते. या विद्युत्प्रवाहानें पृथ्वीच्या अंतर्भागात लोहचुंबकाचे धर्म संपृक्त होतात व पृथ्वी ही लोहचुंबकगुणानीं भरून जाते. परंतु सूर्यकिरणाची ही क्रिया भूमध्यरेषेवर एकसारखी घडत राहिल्यानें दर क्षणीं नवी विद्युत् तयार होत असते. म्हणून पूर्व क्षणीं उत्पन्न झालेल्या विजेस भूमध्यरेषेवर प्रदेशावर रहावयास मिळत नाहीं. सबब ही जुनी विद्युत् काही दक्षिण ध्रुवाकडे व काहीं उत्तर ध्रुवाकडे अशी पांगते व तेणेंकरून ह्या उभय ध्रुवामध्ये लोहचुंबकाचे धर्म आपोआप भरपूर संचित होतात. अशा रीतीनें आपली पृथ्वी लोहचुंबकाचा एक अफाट लोळाच बनून जाते व याचें प्रत्यंतर म्हणजे होकायंत्राच्या काट्याची स्थिति होय. हा काटा नेहमीं दक्षिणोत्तराभिमुख असतो हे नव्याने सांगण्याची मुळींच जरूर नाहीं. भूमध्य प्रदेशावर हा काटा नेहमीं भूमध्यरेषेशीं समांतर असून दक्षिण व उत्तर ध्रुवप्रदेशामध्ये तो पृथ्वीच्या पातळीला काहीं कोण करून एका बाजूला लवलेला असतो; व ह्या त्याच्या स्थितीला त्याचे बाक असें म्हणतात.

ज्याप्रमाणे पृथ्वीमध्ये लोहचुंबकाचे गुणधर्म उतरतात असे वर सांगितले त्याचप्रमाणे ते मानवी शरीरामध्येही उतरतात; मात्र फरक इतकाच कीं, लोखंड अगर पोलाद ह्यामध्ये ते ज्या मानाने मिसळून जातात त्यापेक्षा फारच थोड्या प्रमाणात ते आपल्या शरीरात प्रवेश करितात. परंतु मुख्य प्रश्न येथे किती मिसळतात हा नसून ते मिसळतात की नाहीं हा आहे; व इतर कारणे सोडून दिलीं तरी रक्तात लोहपरमाणु मिसळलेले असल्याने त्याबरोबर लोहचुंबकधर्म शरिरात प्रवेश करितो हे मानण्यास कोणासच शंका येणार नाहीं.

दक्षिणध्रुव व उत्तरध्रुव अशी पृथ्वीची जशी एवंगुणविशिष्ट दोन टोके आहेत, त्याचप्रमाणे पद व शीर्ष ही मनुष्यदेहातील तद्गुणविशिष्ट दोन टोके होत.

ही चुंबकधर्मी ध्रुवद्वयाची आमच्या शरिरात जी योजना करून ठेवलेली आहे त्यायोगे आमचे शरीरस्वास्थ्य कायम राहून सुखाची प्राप्ति होते. परंतु ही शरीरनिष्ठ ध्रुवसंपन्नता ( Polarity ) जर कोणत्याही कारणाने ढळेल तर आमची निरामय स्थिति बदलून सर्व शरीरात बिघाड होईल; रोग, व्याधि याचा प्रसार होऊन अनवस्थाप्रसंग गुदरल्याखेरीज रहाणार नाहीं.

शरिरामध्यें चुंबकधर्म उत्पन्न होण्याला पृथ्वी हें मुख्य कारण आहेच, परंतु शरिरांत व शरिराबाहेर जो प्राणवायु पसरलेला आहे त्यायोगेही ही क्रिया होत असते. प्राणवायु हा चुंबकधर्माचा उत्तम वाहक आहे व त्याचा शरिरावर परिणाम झाल्याखेरीज रहाणार नाही. पृथ्वी व प्राणवायु ( Oxygen ) यांचा मनुष्याच्या शरिरावर जरी सारखाच परिणाम व्हावा अशी समजूत आहे तरी शरिराच्या भिन्न घटकावयवामुळे तसा परिणाम होत नाहीं व आपणास मनुष्यदेहाची जी भिन्न भिन्न स्थिति आढळून येते त्याचें हेंच कारण होय

सबब हें शरीर-स्वास्थ्य कायम राखण्याकरिता सुप्तावस्थेत शरीर कोणत्या स्थितींत ठेवावें याचा लोहचुंबकधर्मान्वये विचार केलेला आहे डोकें जेव्हां दक्षिणेकडे करून आपण निजतों तेव्हां आपल्या शरिराचा उत्तरध्रुव व पृथ्वीचा दक्षिणध्रुव हे सन्निध येतात, त्याचप्रमाणे जर आपण पूर्वेकडे डोकें करून निजलो तर अभ्यासानें अगर अन्य कारणानें डोक्यांत उत्पन्न झालेला दाह उष्णतोत्पादक विद्युत्पूर्ण किरणाच्या परिणामानें शमन पावतो व याच्या उलट निजलो तर हा प्रवाह पायामधून शरिरातून संचार करील व डोक्यातून बाहेर पडतांना उलट थोडेंबहुत उद्दीपन करील व मेंदूची साम्यावस्था व थंड स्थितात बदलून जाईल. उष्णतेनं उष्णता मारणं, शीतानें शैत्याचा नाश करणं त्यातीलच हा प्रकार होय. डोकें व मेंदू ही जगतात सर्व प्रकारची कामगिरी करण्याची साधनें असल्यामुळे तीं स्वस्थ, थंड व शान्त रहाणे हें अवश्य आहे. सबब पूर्वकडे डोकें करून निजणे व त्याचप्रमाणे एकंदर शरीर निरोगी ठेवण्यास दक्षिणोत्तर निद्रा घेणे याची वरील विवेचनावरून थोडी तरी कल्पना येईल अशी आम्हास आशा आहे.

वर पूर्वेकडे डोकें करून का निजावें याचें विवेचन करिताना आम्ही जें सांगितलें कीं, उष्णतोत्पादक विद्युत्प्रवाहाचा जेथे प्रवेश होतो ( शरिरात ) तेथील मूळचा दाह शान्त होऊन ज्या भागांतून तो बाहेर पडतो तेथे थोडा दाह उत्पन्न करून निघून जातो, तर हा नियम भेषजीय विद्युच्छास्त्रांत अनेक प्रयोगांवरून सिद्ध असल्याने त्याबद्दल कोणासच संशय घेण्याचें कारण नाही. मार्कंडेय व गार्ग्यमुनींनीं आन्हिकधर्मांत वरील आदेश कां लिहून ठेवले याचा थोडबहुत खुलासा वरील आधुनिक शास्त्रीय उपपत्तीनें लागल्याखेरीज रहाणार नाही त्यांची दृष्टि सार्वजनिक आरोग्याच्या, सुखाच्या व उन्नतीच्या विचारांनी कशी भरून गेली होती व अज्ञ जनास शास्त्रीय उपदेशापेक्षा धार्मिक आज्ञा जास्त बंधक वाटतात असें वाटल्यावरून त्यांनी याच मार्गाचा अवलंब केला असे दिसतें व हे त्यांच्या विश्वकुटुंबी बुद्धीस अनुरूपच आहे.

विद्युत् व लोहचुंबकत्व यांचीं आणखी पुष्कळ उदाहरणें आहेत. या गोष्टी शरीरस्वास्थ्याला, आरोग्याला व बळकटीला आवश्यक वाटल्यावरून त्यांचा व्यवहारांत सर्वत्र उपयोग केलेला दिसतो.

( १ ) देवळावरील कळस सोनें, रुपें व तांबें या धातूंचे केलेले असतात व अलीकडे त्रिशूलाकार तांब्याच्या अथवा लोखंडाच्या काबी अथवा गज इमारतीच्या अग्रभागीं बसविलेले असतात. दोन्ही उपायांनीं विजेच्या आघातापासून इमारतीचें संरक्षण व्हावें हा हेतु असतो.

( २ ) दंडांत अगर गळ्यात सोनें, रुपें अथवा तांबें यापैकीं ऐपतीप्रमाणें एकाची पेटी, ताईत अथवा गोळक करून बांधतात. अभिमंत्रित तांदूळ अगर विभूति त्यात असते. परंतु मुख्यतः विद्युत्प्रयोगानें रोग बरे करण्याच्या पद्धतींत कमरपट्टे, आणि इतर अवयवांस बांधण्याचे पट्टे यांचा जो उपयोग होतो, तोच वरील जिन्नसापासून होत असे व हल्लींही होत आहे. मात्र त्याची शास्त्रीय माहिती नसल्यानें त्याजवरील श्रद्धा कमी झालेली आहे.

( ३ ) दर्भासन, मृगाजिन, व्याघ्राजिन, रेशमी व लोकरी आसनें यांचा उपयोग विजेच्या आघातापासून संरक्षण होण्यास फार होतो. हल्लींप्रमाणें विद्युत्प्रतिबंधक मोठमोठ्या इमारती नसून जंगलांत पर्णकुटिकेमध्यें राहण्याचा जेथें सर्वत्र प्रचार असे तेथें या साधनाचा विजेपासून बचाव करण्याकरिता उपयोग करण्यांत यावा याचें काय आश्चर्य ? वरील जिन्नसाचा आसनाचे कामीं उपयोग केल्यानें पृथ्वीवर घडलेल्या विद्युदाघाताचा आपणास संपर्क पोहोचत नाही. कारण आपलें शरीर व भूमि यांमध्यें हें विद्युन्निवारक आसन असल्यानें विद्युदाघात अशा आसनस्थाचे शरीरास इजा देण्यास समर्थ नसे.

हिंदूंच्या समजुतींपैकीं आणखी एक दोन सांगून या विषयाचा निरोप घेणें बरें. हिंदू देवादिकांच्या मूर्तीचे चित्र काढलें असतां, मुखाभोंवतीं एक प्रभामंडळ काढलेलें असतें. अर्थात तें चक्राकार, चकचकीत व तेजस्वी असतें. पुष्कळ दिवस दिव्यत्वाच्या नांवाखालीं याची कोणी चौकशी केली नाहीं. जे ईश्वरी अंश आहेत त्यांच्या मुखाभोंवतीं अशी प्रभा असणें साहजिकच आहे, अशी सार्वलौकिक समजूत होती. परंतु अशा तऱ्हेनें शास्त्रज्ञ लोकांचें व चिकित्सकांचें समाधान होणें अशक्य होतें. पुढें या बाबतींत आस्ट्रियामधील शोधक रसायनशास्त्रज्ञ यानें असा शोध लावला कीं मनुष्यजातीसुद्धां सजीव, निर्जीव प्रत्येक नैसर्गिक पदार्थ, आणि तारका यांच्या भोंवतीं एक अत्यंत सूक्ष्म व जड दृष्टीला

भासमान होणारें असें प्रभावलय असते; परंतु शरिराच्या इतर भागासभोंवता-लील यांतील परमाणु मुखाजवळील परमाणूंपेक्षां अत्यंत विरल व हीनतेज असतात. सबब सर्व शरिराभोंवर्ता असलेलें हें वलय भासमान न होता फक्त मुखासभोंवताली असलेलेंच दृश्यमान होते. आता या शास्त्रीय शोधानें व प्रत्यक्ष प्रयोगानें एका गूढ गोष्टीस व्यवहाराच्या कोटींत बसवून अतर्क्यता व दिव्यता या भाववाचक अंध समजुतीस अर्धचंद्र दिला. मात्र त्यायोगें प्राचीन भारतीय ऋषिवर्यांची कीर्ति द्विगुणित झाल्यावाचून राहत नाहीं. कारण प्रयोगानें हें कोडें उकलण्यास जगास अद्यापपर्यंत कालावधि लागला, परंतु ऋषिजनांच्या ज्ञानचक्षूंस याचें केव्हाच दर्शन झालें होतें ! जर ह्या आधुनिक शास्त्रज्ञानें शोध करून हें कोडें उकललें नसतें तर आम्हीं मात्र चित्र काढताना प्रभामंडळयुक्त मुख काढून तें तसें का काढलें याबद्दल किती दिवस अज्ञानी राहिलों असतो कोण जाणे ! हिंदूंची गतानुगतिक बुद्धि त्यास जगाच्या चढाओढींत टिकविण्यास उपयोगी पडली हें मात्र खरें. इजिप्सीयन गेले; बाबीलोनियन नामशेष झाले; इराणी स्मृतिशेष उरले; खाल्डियन लोक इतिहासातच मात्र परिचित राहिले. अशा प्रकारचे प्राचीन काळच्या लोकांच्या दैवाचे विलास दृष्टीपुढें उभे ठाकले म्हणजे गतानुगतिक बुद्धीनें का होईना, जगाचे हे दिवस पाहण्यास आर्य राष्ट्र जगलें यावरून त्याला पुढें भाग्याचे दिवस येणार अशी मनाची स्वाभाविक समजूत होते व ती परमेश्वरी कृपेनें खोटी ठरणार नाहीं अशी आशा करण्यास बलवत्तर कारणें आहेत.

वरील व्हॉन रीशेन बॅकचें तत्त्व स्पृश्यास्पृश्यतेस लावून कांहीं सार निघतें कीं नाहीं हें पाहूं. एकाद्या हिंदू मेजवानीचे प्रसंगीं सर्व मंडळी जेवणास बसली असतां कधीं कोणी कोणास शिवणार नाहींत. आपल्या पानाभोंवती पाण्याचें मंडल तयार करून जेवण होईपर्यंत त्याच्या बाहेरील पदार्थास स्पर्श करणार नाहीत. मुसलमानामध्यें एका ताटांत जेवावें अशी कुराणाची आज्ञा आहे व तेणेंकरून प्रेम-संवर्धन होतें असें ते लोक मानतात. युरोपीयन लोकात जरी एका ताटाचा प्रेमवर्धक प्रकार नसला तरी एका मेजासभोंवता बसून एकमेकास पेले ओवाळून यथेच्छ हात मारण्याची फार मोठी चाल आहे. अशा लोकास हा प्रकार चमत्कारिक वाटल्यास काय आश्चर्य ? यात प्रेम नाहीं, फक्त सामाजिक जुलूम म्हणून मेजवानीसारखे प्रसंग करतात असेंही त्यास वाटेल. परंतु थोडा विचार केल्यावर ही गोष्ट साफ खोटी आहे असें कळून आल्याखेरीज राहणार नाहीं. प्रत्यक्ष एका कुटुंबांत आजा, बाप,

मुलगा, भाऊ एकमेकांस जेवतांना शिवत नाहींत या प्रकारास काय म्हणावें ? यांत प्रेमाचा अभाव कोणास सापडेल काय ? तर ही गोष्ट निराळ्या दृष्टीनें पाहिल्यास यांत थोडेंबहुत तथ्य आहे असें कोणासही आढळून येईल. हा आत्मिक शक्तिविकासाच्या प्रयत्नाचा मासला होय. आपली शक्ति क्षणोक्षणीं वाढत असते व ती जेवणाच्या व अन्नपचनाच्या वेळीं फार वेगानें काम करीत असते. जगात प्रत्येकाची शक्ति सारखी नसते व दोन कमी अधिक शक्ति एकत्र आल्या असता त्याचा कलह हा ठेवलेलाच असतो. तर ज्यांनीं आध्यात्मिक अभ्यासाच्या मार्गे आपले चित्त लावले आहे त्यांनीं अशा द्वंद्वापासून अलिप्त रहाण्याची इच्छा करावी व आपल्या आध्यात्मिक शक्तीस वाढण्यास पूर्ण अवसर द्यावा हें अगदीं साहजिक आहे. हा आत्मबल वाढविण्याचा अभ्यास एकानेंच करावा व दुसऱ्यानें करूं नये असें थोडेंच आहे ! परंतु आध्यात्मिक बलाची वाढ वरिष्ठ वर्गांत आढळते व म्हणून हा प्रकार ब्राह्मणात आढळून येतो. हल्लींच्या ब्राह्मणांत तो अपभ्रष्ट स्वरूपात असेल, परंतु प्राचीन आर्य शक्तींच्या पाठीस लागलेले होते म्हणूनच त्यांनी तो प्रचारात आणला. समाजातील कोणत्याही व्यक्तीस आपलें मनोबल वाढविण्यास पूर्ण मुभा आहे. अशा मार्गांतील अभ्यासकाच्या अंगी व्हॅान रिशेन बॅक म्हणतो त्याप्रमाणे एक प्रकारची आकर्षक व वशीकरणात्मक शक्ति उत्पन्न होते व ती त्याच्या सभोंवतीं पसरत्यानें त्याच्या ताब्याभाड्यास, आसनास, दंडास, वस्त्रछाटीस व्यापून राहते यात काय नवल ? परंतु इतर मनुष्यांचे विचार स्वार्थी असतात. साध्या मनुष्याचे मन आत्मनिष्ठ व ईश्वरनिष्ठ नसल्यानें त्यावर अहंकार व स्वार्थ यांच्या मिश्रणाचे फार पूट बसलेले असतें व याजपासून जे किरण बाहेर पडणार ते मलीन व अशुद्ध असणार. निकृष्ट वर्गाकडे जसजसे आपण जाऊं तसतसे तामशी विचार-किरण त्याच्यामधून जास्त बाहेर पडणार. मागे सांगितल्याप्रमाणे अशा विधर्मी किरणाचे संघटन झाल्यास त्याचा परिपाक म्हणजे युद्ध, व त्यात सात्विक बलाचा विजय होणार हें खासच. तरी सुद्धा योगनिष्ठ व आत्मनिष्ठ यास जी आत्यंतिक पायरी गाठावयाची असते त्यास या शक्तिक्षयानें विलंब होतो सबब असा नेमधर्मी पुरुष बहुधा नीच व पतित लोकाचा संपर्क व सहवास टाळीत असतो. असें केल्यानें आत्मिक बल अव्याहत वाढून त्याचा हेतु लवकर साध्य होतो. व्हॅान रिशेन बॅक म्हणतो कीं, हें मानसिक बलाचें किरण सात्विक असोत, राजसी असोत वा तामसी असोत, ते धातूच्या भांड्यापेक्षां मातीच्या अगर लाकडाच्या पात्रात जास्त लवकर

संचित होतात व म्हणूनच विटाळलेलीं मृण्मय व काष्ठमय पात्रें फोडून धातुमय पात्रें अग्निसंशोधित केलेलीं आपण पाहतों. असे तपोनिष्ठ पूर्वी आपली शक्ति, यज्ञयाग व पुढें पुढें ईशचिंतनांत घालवीत व जेणेंकरून लवकर सायुज्यमुक्ति मिळेल त्याची वाट पहात बसत. अशा लोकानीं आपल्या आसपास इतरांस येऊं न दिल्यास त्यांत त्याचा काय दोष आहे !

वरील स्पृश्यास्पृश्य विचार व या प्रकरणांतील प्राचीन आर्यांच्या इतर चालीरीती ह्या सर्वांस सारख्याच मान्य व्हाव्या असे आमचे म्हणणे नाहीं. आम्हास एवढेंच सांगावयाचें कीं, ज्या गतानुगतिक बुद्धीनें आम्हीं अनेक स्थित्यंतरांतून पार पडलों त्या बुद्धीवर नवीन शास्त्राचे संस्कार करा व आपला प्राचीन धर्म व आचार अर्थशः समजून घ्या आमच्या आचारविचारावर नवीन प्रकाश पाडून युरोपीअन त्याचे याथातथ्य सिद्ध करीत आहेत; परंतु ते आम्हीं घेणे हे लाजिरवाणे आहे.

मागे सांगितलेल्या नष्ट राष्ट्रांच्या नशिबीं जें सुख नव्हतें ते आम्हास मिळणार आहे; म्हणूनच आम्हीं वाचलो आहों. तर नवीन शास्त्राचें साहाय्य घेऊन प्राचीन चालीरीती समजून घ्या व या आपले जगत्श्रेष्ठत्व सिद्ध करा. आम्हास हल्लीं मान मिळत नाहीं याचें कारण आमचे अज्ञान. प्राचीन कालीं जें योग्य होतें तेंच आम्हीं मात्र अजून उराशीं घेऊन बसलो आहों व अशा तऱ्हेनें अनौचित्याचा अपराध करून आम्हीं आपलें हंसें जगाकडून करून घेत आहों सबब आधुनिक साधनें नसतां केवळ चिंतनानें व किरकोळ उपकरणानें प्राचीन भारतीय आर्यांनी जे शोध लावले तेंच आज जगास साहाय्यभूत झाले व त्याचीच आज पुनरावृत्ति होत आहे; परंतु त्याच शोधावर उभारलेल्या चालीरीती काल बदलल्यामुळे हास्यास्पद भासूं लागल्या तरी त्या न टाकता त्यावर आधुनिक शास्त्राचा शोधक प्रकाशीकरण-प्रवाह टाका व त्याचें संशोधन करून त्या परिस्थितीला जुळवून घ्या व आपल्या प्राचीन वंशजाच्या कीर्तीस शोभेल अशी कृति करण्यास लागा. म्हणजे या ज्ञानपवित्र, अनुभवी, आत्मज्ञानीनिष्ठ व वृद्ध भारतीय राष्ट्रास सर्व आधुनिक बाल राष्ट्रें शतशः प्रणाम करतील व ज्ञानाकरिता याची सेवा करतील अशीं चिन्हे आज दृग्गोचर होऊं लागलीं आहेत. यावरून काल अनुकूल असून ईश्वरी कृपा आहे हे स्पष्ट दिसत आहे अशा वेळीं जर आम्हीं आपलें कर्तव्य ओळखलें नाहीं तर मात्र आशा नाहीं आळशी, उधळ्या व कंगाल आजोबा लवकर मरावा म्हणजे खाण्यास एक मनुष्य तरी कमी झाला असे

निराशेचे विचार कधीं कधीं डोकावतात त्याचप्रमाणें राष्ट्रांच्या संसारांत फाजील लोकसंख्येनें बुभुक्षित झालेलीं कांहीं राष्ट्रें हिंदुस्थानाकडे साभिलाष दृष्टीनें पहात आहेत; अशा वेळीं मागें सांगितल्याप्रमाणें त्यांस चेले बनवून त्यांचा बकासुरी स्वभाव बदलून त्यास शान्त, दान्त करणें व त्यांस वेदान्तधर्माचें ज्ञान देणें ही कामगिरी भावी पिढीवर अवलंबून असल्यानें पूर्वजांच्या बिनमोल व लोकविस्मयकारक कृतीवर नजर देऊन त्याप्रमाणें वागलें पाहिजे; तरच आमचा तरणोपाय आहे व प्राचीन ऐश्वर्याची पुनरपि प्राप्ति होण्याची आशा आहे यापेक्षां दुसरें काय ?

---

# प्रकरण १० वें.



## भारतीय बांधकाम व खोदकाम.



प्राचीन आर्यावर्तांतील अत्युच्च संस्कृतीचें आणखी एक चिन्ह म्हटलें म्हणजे बांधकाम व खोदकाम होय. भव्य देवालयें, उंच उंच स्तूप, काळाबरोबर झुंजणारे अभेद्य किल्ले, दीपमाळा, जयस्तंभ, कमानी, कोरीव लेणीं, विहार वगैरे सर्व प्रकारचीं कामें पाहून अर्वाचीन शिल्पज्ञ थक्क होऊन जातात. कांहीं वेळ मनास अशी शंका येते कीं खरोखर अशा अपूर्व व प्रचंड कामाचे जनक तरी कोण असतील ? यांची रचना करणारे कोणी तरी राक्षस योनींतील असावेत असें वाटतें. पंचमहाभूतांना गुलाम बनवून जी अचाट शक्तीचीं कामें आज करून घेण्यांत येतात त्यापेक्षांही या कामांची बळकटी, प्रचंडपणा, भव्यपणा हे गुण कांहीं अजब आहेत. मिसेस मॅनिंग म्हणते कीं, हीं कामें प्रथम पाहिलीं म्हणजे यांचें वर्णन करण्यास वाचा असमर्थ होते; परंतु पुढें पुढें जास्त परिचय झाला म्हणजे त्यांतील असामान्य विस्मयकारकपणा नाहींसा होतो. परंतु कौतुक व सौंदर्य यांचें मनःपटलावर उमटलेलें चित्र कधींही पुसलें जात नाहीं.

येथील इमारतींचे विशेष म्हणजे बळकटी, टिकाऊपणा, सौंदर्य व भव्यता हे होत. महंमद गझनवीसारख्या अत्यंत कडव्या धर्मांध मुसलमानानें सुद्धां ही गोष्ट कबूल केलेली आहे. तो मथुरा येथें असतांना त्यानें खलीफास एक पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो कीं, महंमदी धर्माइतक्याच येथील इमारती बळकट

आहेत. देवालयांचा नाश, मूर्तींचा उच्छेद व इतर ईश्वरस्वरूपी साकार वस्तूंची हानि हेंच ज्याचें ब्रीद व मुख्य धर्मकार्य त्या महंमद गझनवीनें अशी कबूली द्यावी यापेक्षां येथील इमारतींच्या बळकटपणाविषयीं दुसरा काय पुरावा पाहिजे ? आज हजारों वर्षें होऊन गेलीं; ऊन, पाऊस, थंडी, वीज, भूकंप आणि इतर अन्य प्रकारचे आघात सहन करून कांहीं इमारती जशाच्या तशा उभ्या आहेत. त्यांच्या सौंदर्यांत अगर भव्यपणात कोणत्याही प्रकारचें न्यून आलेलें नाहीं. मि. थार्नटन, प्रो. वेबर, फर्ग्युसन, लार्ड व्हॅलेनशिया यांसारख्या प्राच्यभाषा-कोविद, कलापंडित व मार्मिक टीकाकार यांनीं मनापासून येथील प्रचंड, गंभीर विस्मयकारक इमारतींची यथेच्छ स्तुति करून शेवटीं त्याचें यथार्थ व सौंदर्या-नुरूप वर्णन करणें अशक्य आहे अशी कबुली दिलेली आहे एल्फिन्स्टन एका ठिकाणीं एका इमारतीचें वर्णन करताना म्हणतो कीं, " खांब, गणेशपट्या, खिडक्यांचीं कवाडें व मेहेरपी यांचीं कामें इतकीं कांहीं सुबक व एकसारखीं केलेलीं आहेत कीं त्यांच्या पट्या साच्यांतून ओतून काढल्या आहेत की काय असा क्षणभर भास होतो. लता, वेली, पुष्पें, मानवाकृति, पशुपक्षी व इतर कांहीं काल्पनिक आकृति ही सर्व एका ठिकाणीं मनोहर रीतीनें घालून त्यांची कलाकुसरीचीं केलेलीं कामें खरोखर मनास चटका लावून सोडतात. खरोखर भिंती, दरवाजाच्या बाजवा व गणेशपट्या, सुबक कुसरीच्या कामानें व वेल-बुट्यांनीं इतक्या कांहीं नयनमनोहर केल्या आहेत कीं त्यांची बरोबरी करणारीं कामें दुसरीकडे क्वचितच पहाण्यास सापडतील. "

पॉडचरीच्या दक्षिणेस २० मैलावर चलंब्रम् या नावाचें एक अति भव्य मंदिर आहे. ३६० फूट लांब, २६० फूट रुंद अशा विस्तीर्ण पटांगणात हे पवित्र भव्य मंदिर असून त्यास एक हजार खांब आहेत; व प्रत्येकाची उंची ६।७ पुरुष आहे. यावरून त्या देवालयाचा आकार केवढा असेल, त्याचें दर्शन किती उदात्त असेल, याची कोणासही सहज कल्पना होईल असें युरोपियन पंडित डॉ. राबर्टसन व प्रो हीरन म्हणतात; मग आम्हां हिंदूंस त्याचें चित्र मनश्चक्षू-समोर सहज उभें करितां येईल यात काय नवल ? एवढा वेळ दगडी देवा-लयाविषयीं विचार झाला यापुढे खोदलेल्या देवालयांविषयीं ( कोरीव लेण्या-विषयीं ) जगाचें मत काय आहे ते पाहूं. पांडवकृत्यें अथवा कोरीव लेणीं हीं या देशाशिवाय अन्यत्र कोठेंच पहावयास मिळत नाहींत. यांचे ठिकाणीं दिसून येणारें कलाकौशल्य व बुद्धिचातुर्य कांहीं अगाध आहे असें प्रत्येकजण निर्मुक्त कंठानें म्हणत असतो.

वेरूळच्या लेण्याविषयीं प्रो. हीरनचा पुढीलप्रमाणे अभिप्राय आहेः— "पृथ्वीच्या पृष्ठभागावर व पोटांत शिल्पकलेला जेथें जेथें प्रवेश करून आपलें शोभिवंत काम, सुबकपणा, कसब, उदात्तपणा व गांभीर्य दाखविता येईल तितकें सर्व तिनें या ठिकाणीं दाखविलें आहे या लेण्यामध्ये जिने, पूल, माड्या, गच्चया, देवालये, खाब, ढलेच ( porties ) द्वारकमानी, मनोरे, भव्य पुतळे, उठावदार वेलबुट्या ( reliefs ) वगैरे सर्व कांहीं आहे. याच्या दारात पाऊल टाकताना अंगावर एकप्रकारचा काटा उभा राहिल्याशिवाय रहात नाहीं. वसुंधरेच्या नितांत पोटात वर सांगितलेले सर्व प्रकार पोखरून काढलेले पाहिले, डोक्यावर अत्यंत वजनदार पर्वताचें आच्छादन अवलोकन केले व ह्या प्रस्तरमय भव्य इमारतींच्या दुबळ्या खाबावर नजर गेली व कित्येक ठिकाणीं निराधार भारी ओझ्याचे हे डोंगरी आढे व छप्पर दृष्टीस पडलें म्हणजे ज्याच्या हातून तें निर्माण झाले त्याच्याबद्दल आदर, विस्मय, कौतुक व पूज्यभाव इत्यादि भावना मनामध्ये खेळूं लागतात व जर त्याचे दर्शन होईल तर आपण किती धन्य होऊं, असे विचार मनांत आल्याशिवाय राहत नाहीत." अशाच प्रकारचीं कारोमांडेल किनाऱ्यावरील सप्तमंदिरें असून त्यांचे शिल्पकाम,मानवी चातुर्य व कसब यांच्या अत्यंत थोरवीचे प्रदर्शन करीत राहील असे म्हटल्यास मिथ्यास्तुति कधींच होणार नाहीं. हीच स्तुति शब्दशः द्वारकेला लागू आहे.

इजिप्शीयन, ग्रीक आणि हिंदी शिल्पकलेची तुलना करून प्रो. हीरनने असें ठरविले आहे की, स्तंभावर बारीक नक्षी काढणे, वेलबुट्टी खोदून ते सुशोभित करणे, मनुष्याकृतियुक्त दगडी खाब खोदणे व त्यावरही अशींच कौशल्याचीं कामे करणे या बाबतींत भारतीय आर्यांनीं इतर देशास किती तरी मागें टाकले आहे !

चुनेगच्ची, भरभक्कम टिकाऊ गिलावा करणे, पायऱ्या व खाब चुन्याच्या पिठानें मढवून त्यामध्यें चित्रें खोदणे, गिलाव्याचे छत तयार करणे, खिडक्या, दारे यांचेवर जाळीचें व नक्षीचें काम करणे, एकाच इमारतीस असंख्य खाब देऊन दगडी तुळ्या पसरणे व अशा रीतीनें सर्व काम दगडानें करणे इत्यादि आणखी काहीं जास्त विशेष मॅनिंग बाईनें सांगितले आहेत.

पुढें ही कला जास्त भरभराटीस बौद्ध धर्माचे कालीं आली. या धर्माचा प्रसार सबंध हिंदुस्थान, तिबेट, चीन, जपान सिंहलद्वीप व पूर्वेकडील बेटें यात होऊन भिक्षु व भिक्षुणी, श्राविक—का, संन्याशी व शिष्यबटु याना नगराबाहेर

विश्रामस्थाने पाहिजेत म्हणून विहाररूपाने तिचा प्रसार झाला. या निमित्ताने ती हिंदुस्थानांतून बाहेर जाऊन तिचा परिणाम मुसलमानी कमानी व ख्रिस्ती प्रार्थनामंदिरें याजवर सुद्धां झालेला दिसतो, असें प्रो. वेबर व कर्नल टॉड यांचें म्हणणें आहे.

पुढे मुसलमानांनीं आपले स्वतंत्र शिल्पशास्त्र इकडे आणले, परंतु त्याचा व हिंदी कलेचा संयोग झाल्याबरोबर दुसऱ्याचाच ठसा पहिल्यावर पडला. याचे उदाहरण म्हणजे दिल्ली शहरातील सुप्रसिद्ध मशिदी,आग्र्याचा ताजमहाल, ग्वालेरचा राजवाडा ही होत. ही कामे, त्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानातील देवालयें; कार्ल्यांचीं व अजिंठ्याचीं कोरीव लेणीं, या ठिकाणी संगमरवरी दगडात खोदलेल्या वेलबुट्या, काटकोणाकृति जाळींचीं नकशी आणि काश्मिरातील इमारतींत अवयव व रंग यांचें प्रमाणबद्ध संमेलन पाहिले म्हणजे मनात अतिशय आदर उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. त्यापासून भावी शिल्पज्ञाना सौंदर्य व गांभीर्य या बाबतींत फारच शिकण्यासारखे असून कदाचित् इंग्लंडमध्ये शिल्पकलेची स्फूर्ति व नवीन अभिरुचि याजपासून उत्पन्न झाली असेल असें प्रांजलपणें कोलमन व सर हंटर यानीं कबूल केले आहे.

कर्नल टॉड या प्रख्यात रजपूत लोकाच्या इतिहासकाराने बरोली येथील देवालयाचे विस्तृत, हुबेहुब व चित्ताकर्षक शब्दचित्र दिले आहे. तो म्हणतो की, अशा सुंदर देवालयाचें सौंदर्य, गांभीर्य, तेजस्विता, ओज व मनोहारित्व याचे यथार्थ वर्णन करणे हे जरी लेखणीचे काम असले तरी तिला शीण आल्याशिवाय रहात नाही. कारण, जेथे प्रत्यक्ष शिल्पकलेचीच परमावधि झाली, तेथे लेखणी काय करणार ?

अशा इमारती हिंदुस्थानच्या सर्व भागात आहेत. ज्याना विद्या नसेल, ज्याचें मन सुसंस्कृत बनले नसेल, वेदान्त, तत्त्वज्ञान, धर्म हे कळून घेण्याचे ज्यास अवसान नसेल, त्यानीं आपल्या पूर्वजांच्या कृतींचीं हीं जगन्मोहक स्मारकें एकवार पाहून आपण पैतृक ऋणातून अंशतः तरी मुक्त व्हावे. त्यांच्या सान्निध्यांत असताना पूर्वजांची बुद्धि, साहस, चिकाटी, अभिरुचि, परिश्रम, ज्ञानलालसा इत्यादि बाबतींत अणुमात्र स्फुरण झाल्यास मोठाच लाभ झाल्यासारखा होईल; निदान पुण्यस्थलाच्या दर्शनानें नेत्र पुनीत होऊन, समाधान पावतील, मनास शांति मिळेल, चित्तात चमत्कृति उत्पन्न होईल व हृदयात मानवी जीवनाच्या उदात्तपणाचें प्रतिबिंब पडेल, हा काय लहान लाभ आहे ?

---

# प्रकरण ११ वें.



## वीणकाम.




द्धीची कुशाग्रता, मानसिक विकासाची श्रेष्ठता, नेत्रांचा सूक्ष्मभेदीपणा, श्रवणाचा नाजूकपणा, अभिरुचीचे श्रेष्ठत्व, हस्ताची बारकाई, कामधंद्यांत लागणारी शीघ्र ग्राहक शक्ति इत्यादि थोर गुणांनीं दोनशे वर्षांपूर्वी हिंदू लोकांनी काव्य, नाटक, कथा, पुराण इत्यादि वाङ्मयात्मक कामांत व चित्रकला, गाणेबजावणे, शिल्पकाम वगैरे ललितकलांमध्येच नैपुण्य संपादिलें होतें असें नाहीं; तर कलाकुसरीचें नक्षीकाम, खोदकाम, वीणकाम कलाबतूचें, जडावाचें काम, आंतकाम, रसकाम, धातुकाम, कृषिकार्य, खनिज धातु काढण्याचें काम, संशोधन काम, रंगकाम इत्यादि इत्यादि सर्व प्रकारचीं सुधारलेल्या देशांत होणारीं कामें त्यांच्या हातून फार नाजूकपणानें व सुबकपणानें होत असत, एवढेंच नव्हे तर बाह्य देशांतील लोक येथें येऊन त्या कला शिकून स्वदेशीं परत जात, कलाकौशल्याच्या कामांत हिंदू लोकांचा हात धरणें महामुष्किलीचें आहे अशी सर्वांची समजूत होती, परंतु त्या पिढीजाद कसबी लोकांचा नाश खुल्या व्यापारपद्धतीनें झाला. संरक्षक जकातीच्या अभावानें, बुद्धिपुरःसर कारागिरांच्या नाशानें, स्वजातिविषयक प्रेमानें, भेदभावानें, अन्यायमूलक सवलतीनें व इतर अन्य कारणांनीं येथील हुन्नरकला १००–१२५ वर्षांच्या अवधींत साफ बुडून मागील कलाश्रेष्ठतेची आठवण सुद्धां बुजत चालली. स्वाभिमान नष्ट होऊन, आत्मविश्वास पार मावळत चालला. जिकडे तिकडे नैराश्य, दारिद्र्य, परावलंबीपणाचे काळेकुट्ट ढग पसरून, अज्ञानाचा पूर्ण अंधकार समाजाच्या कोनाकोपऱ्यांत पसरून राहिला आहे. आत्मनिंदेनें भरलेले शब्द कर्णप्रांतावर धाडधाड येऊन आदळत आहेत, लोक किंकर्तव्यतामूढ होऊन हताश होत्साते मंदधी व जड बनत चालले आहेत. अशा वेळीं त्यास प्रस्फुरित करून सुपथावर आणून सोडण्याचें सामर्थ्य जरी आपल्या अंगीं नसलें तरी अशा स्थितींत प्राचीन वैभवाच्या गुणाधिक्याच्या, उत्तम स्थितीच्या दोन

सुखद गोष्टी सांगून त्यास धीर दिल्यास, त्यायोगे आपोआप त्यांस स्फुरण होऊन त्याच्या मधून कोणी शककर्ता निर्माण होईल; नाहीं तर निदान अपाय होणार नाही हें खास; झाला तर उपायच होईल. सबब मशागतीचे काम करण्याचें आम्ही योजिलें आहे. सध्यां जरी अज्ञानाचे दाट आवरण सर्वत्र पसरून हिंदू समाजातील शिल्पज्ञ-रत्नें त्यांत अगदी गाडलीं गेलीं आहेत. तरी अशा प्रकारचें काम कोणी हातीं घेतल्यास ते पुनरपि वर येऊन स्वतेजानें जगाचे नेत्र दिपवून टाकल्याशिवाय राहणार नाहीं काहीं लोकांस वाटतें कीं, हिंदुस्थानामध्यें कलाहुन्नराचा नायनाट झाला, तसें आम्हास वाटत नाही; परंतु या वेळीं आम्हांस चालू परिस्थितीसंबंधीं काहीं लिहावयाचें नसून प्राचीन कालीं येथील कलाकौशल्याची व हुन्नराची काय अवस्था होती हेंच मुख्यत्वेकरून पहाणें आहे.

प्रथम आपण वीणकामच घेऊं, व त्यात येथील हवामान, कारागिराचें हस्तलाघव, नयनचापल्य, साधनसामुग्रीचें अल्पत्व व साधेपणा, पिढीजाद संस्कार व संवय याचें प्राचुर्य याविषयीं युरोपीयन इतिहासकार काय म्हणतात तें पाहूं. जेम्सामिल्ल व ऑर्म हे प्रख्यात इतिहासकार म्हणतात कीं, हिंदू लोक हे जरी शरिरानें कृश, नाजूक, सडपातळ असले तरी त्याची दृष्टि फार खोल, बारीक वहिवाटलेली आहे. हाताचीं बोटें अत्यल्प, संवेदना जाणण्यास पूर्ण समर्थ असून, चपळाई, सफाई व लवचिकपणा या बाबतींत बिनतोड आहेत. रेशीम कातण्याचे धंद्यात हिंदी कारागिराच्या स्त्रिया इतक्या पटाईत आहेत कीं, रेशमाच्या एका लहानशा कोशापासून वीस प्रकारचें सूत त्या हां हां म्हणतां काततात. हें काम त्याच्या इतकें अंगवळणीं पडलें होतें कीं, वीस प्रकारच्या सुताच्या नमुन्यातून कोणतीही एक तऱ्हा एकदम कातण्यास सांगण्याचा अवकाश कीं, जरी पूर्वी निराळ्या प्रतीचा धागा लागला असला तरी तो एकदम बदलून बोलबोलता त्या मागितलेला धागा काढून देतील.

प्राचीन कालीं तरी असा समज असे कीं, इतर कोणत्याहि खंडांतील लोकांपेक्षा हिंदू लोक हे हस्तनेत्रादिकाचा खुबीदारपणा, कोमलता, नाजूकपणा, इत्यादि बाबतींत श्रेष्ठ असून वीणकामामधील धिम्मेपणा, चिकटपणा, सोशिकपणा, कल्पकता आणि व्यापारी जिन्नसाचे पैदासीचे कामीं लागणारी हुशारी, तरबेजपणा व पटुत्व या गुणामुळे नाणावलेले होते. अशा कामास लागणारें हवामानाचें आनुकूल्य येथें आहे व नैसर्गिक पदार्थांचीहि रेलचेल आहे. म्हणून इतर द्वीपस्थांना यांचेविषयीं हेवा, आदर व आश्चर्य वाटल्यास त्यांत कांहीं वावगें नाहीं. या देशातील कापूस फारच श्रेष्ठ दर्जाचा मानला जाई.

हल्लीं इजिप्त व अमेरिका हे देश कापसाच्या उत्कृष्ट निपजेत अग्रेसर आहेत. परंतु प्राचीन काळीं सर्वच स्थिति उलट होती. त्या कालांत येथील कापूस त्याच्या गुणाबद्दल अत्यंत नाणावलेला होता. ख्रिस्ती धर्मयुद्धापासून या देशांतील कापूस प्रथम युरोपांत जाऊन तेथून तो अमेरिकेंत गेला आहे. आरब लोक त्या काळीं युरोप व हिंदुस्थान या दोन खंडामधील व्यापाराची ने-आण करीत व त्यांचे भाषेमध्यें कापसाला असलेल्या कुटा ( Kuta ) नांवावरून इंग्रजी कॉटन ( cotton ) शब्द निघालेला असावा, असा अंदाज आहे. अशा उत्कृष्ट कापसापासून त्या वेळीं सुंदर, सुबक, तलम, नाजूक पातळ, पिळदार टिकाऊ कापड निघत असून त्याचा खप त्या वेळीं ज्ञात असलेल्या सर्व जगांत होत असे. कांहींहीं करून, कितीहि किंमत पडली तरी ती देऊन येथील मोहक झिरझिरीत, झगझगीत, खुमासदार कापड घेण्यासाठीं इतर द्वीपांतल्या राजे लोकांना सरदारउमरावांना, धनाढ्य व्यापाऱ्यांना उत्कंठा लागलेली असे, असें मिल, एल्फिन्स्टन, मूरे, थार्नटन त्यांच्या लेखावरून दिसते. डाक्याची मलमल तर जगप्रसिद्धच आहे तिच्याबद्दल अशी गोष्ट सांगतात की, एकदा अवरंगजेब बादशहा आपल्या मुलीस दाक्षिण्याभावाबद्दल रागें भरून म्हणाला की, " मुली हें काय ? त्वां आपलें सुकुमार व नाजूक शरीर वस्त्राच्छादित करून पुरुषाच्या दृष्टीस पडावें, असें करणें हें उचित नव्हे काय ? " त्यावरून ती मोठ्या अदबीनें म्हणाली की, " बाबा, एकावर सात जामे मी नेसल्यें आहे, परंतु त्याच्या पातळपणामुळें व नाजूकपणामुळें त्या सातही वस्त्रांतून माझें शरीर दिसतें त्यास मी काय करूं ? " ही कथा दंतकथा नसून बॉथ याच्या " डाक्यांतील कापसाचा धंदा " या पुस्तकांतून घेतली आहे. डा. वाटसन् यानें इंग्लंड व हिंदुस्थान या देशांतील कापसाच्या कापडाच्या निरनिराळ्या जातींचा अभ्यास करून येथील कापड इंग्लंडांतील यंत्रनिर्मित कापडापेक्षा जास्त पिळदार व टिकाऊ आहे, असें ठरविलें आहे.

काश्मीरच्या शालींविषयीं हल्लीं सुद्धां सर्व युरोपभर प्रख्याति आहे. येथें वाफेनें चालणारीं यंत्रें पूर्वीं नव्हतीं व हल्लींही कोष्टी व एतद्देशीय कारागीर तीं वापरीत नाहींत; तरी सुद्धां मागाचा धंदा येथें इतक्या पूर्णावस्थेस पोंचला होता की, त्यांतील मालाच्या नाजूकपणाचे, तेजस्वीपणाचे व सुंदरपणाचे बाबतींत प्राचीन देशांपैकीं कोणालाही हिंदुस्थानची बरोबरी करवली नाहीं. त्याचप्रमाणें गालीचे, सतरंज्या, किनखापी कापड यांची गोष्ट. गालीचे मच्छलीपट्टण येथें फारच नामी

होत असत व त्यांची निपज, हिंदी अभिरुचि व दृष्टि यांना अनुरूप होत असे. हल्लीं कैद्यांना तुरुंगात जाडेभरडे, ओबडधोबड, बेढब व बैठकीवजा गालीचे विणण्यास शिकवितात, त्यावरून मॅनिंग बाई म्हणते की, जेथें अशा उत्कृष्ट प्रकारचे गालीचे तयार होत तेथील कैद्यांना मोठ्या परोपकारबुद्धीनें ओबडधोबड व जाडेभरडे गालीचे विणण्यास शिकविण्याचे दिवस यावे, याला दैवदुर्विलास याशिवाय दुसरे काय म्हणावे ?

डॉ. फॉबेस, वारसन सारख्या वाणकाम-तज्ज्ञाने अहर्निश हिंदुस्थान व युरोप येथील सणंगाचा अभ्यास करून निःपक्षपातबुद्धीनें व नाइलाजानें असे म्हटलें आहे कीं, " खरोखर धन्य आहे हिंदू कारागिराची ! आधुनिक यंत्रसामुग्रीची जोड नसता केवळ साध्या मागावर इतके सुबक कापड कसे काढीत कोणास ठाऊक ! त्यांचीं हत्यारें व साधनें पाहिलीं, तर तीं साधीं, आणि चालू काळास व शोधास विसंगत दिसतात. परंतु त्याच्या चतुर हातास, कुशल डोळ्यांस व सरावलेल्या मनास तीं पुरेशीं आहेत असें वाटतें. उपयुक्तता, सौंदर्य, मोहकपणा, खुमारी इत्यादि गुण पाहिले तरी त्याही बाबतींत ते वरचढच. तेव्हा हा प्रश्न कसा सोडवावा हें मोठें कोडेंच आहे, यात शंका नाही. "

इतका वेळ सुती, लोकरी व रेशमी वाणकामाची हिंदुस्थानात प्राचीन काळीं काय स्थिति होती, येथील कारागिराचें नैपुण्य किती होतें व साधनसामुग्री कशी साधी होती हें सांगितलें; परंतु रंगीत कापडाबद्दल काहीच सांगितलें नाहीं. यापुढें रंगीत कापड, घडींव कामें, हिऱ्यामोत्यांच्या जडावाचीं कामें व इतर हराजिन्नसी हुन्नर याचा संक्षेपतः विचार करूं.

दागदागिने करणें, हस्तीदंताचीं शोभिवंत, सुबक व नाजूक कामें करणें, पशुपक्षी, वेलवल्ली, पानें, फुलें, मनुष्य, देव यांचीं हस्तीदंती चित्रें व मूर्ति करणें, त्याचप्रमाणें दागदागिन्यावर तीं कोरणें, अंगठ्यांसारख्या सूक्ष्म ठिकाणीं तीं बसविणें, भिंती, कागद, कापड यावर तीं रंगानें काढणें, चंदन, शिसवें व इतर योग्य लाकडावर तीं रंगानें काढणें व कोरणें इत्यादि बाबतींत हिंदू कला अद्यापही राष्ट्रास हार गेलेली नाहीं. मग ज्या काळीं हिंदू राज्यें होतीं, राजाश्रय मोठा होता, धनिक लोक शोकी होते, अमीर-उमराव, सरदार, मानकरी यास त्यांची हौस व शोक होता, संपत्ति विपुल होती, बाह्य देशांची चढाओढ नव्हती, देशांत शांतता असून जातिविशिष्ट धंद्यास मान होता त्या कालाची गोष्ट कशाला !

कापडाप्रमाणेंच येथील रंगाविषयीं फार पूर्वींपासून प्रसिद्धि आहे. त्यांचे मुख्य गुण म्हणजे तजेला, चमक, कायमपणा व अपुसटपणा हे होत. हे रंग वनस्पतींपासूनच मुख्यतः काढीत असत. हल्लींप्रमाणें खनिज रंग व कोळसा रंग हे पूर्वी बहुधा मुळींच ठाऊक नव्हते. रंगाचीं सर्व कामें वनस्पतीपासून काढलेल्या रंगापासून होत असत. असे रंग वनस्पतींपासून निरनिराळ्या पद्धतींनीं काढणें, त्यांचा साख धरणे, त्याचा कापडावर ठसा मारून चीटे बनविणे, सूत रंगविणे वगैरे सर्व कामें साध्या, सोप्या पद्धतीने कारागीर लोक आपल्या मोडक्यातोडक्या घरात पोराबाळांकडून अथवा बाहिणीबायकांच्या हस्ते करवून घेत. मात्र त्यांचा रंग एकदा बसला कीं कधीं काळीं निघण्याची आशाच नको. कच्चा रंग, पक्का रंग वगैरे सर्व तऱ्हा आणि निरनिराळ्या छाया व छटा याचे संमिश्रण व लेपनकार्य इतक्या खुबीने होई कीं, त्या कापडाची ती झकाकी, तेज, मनोहारित्व, छटाविलास पाहिला म्हणजे युरोपच्या पट्टराण्या रुसून बसत व त्याची समजूत काढण्याकारेता त्याची हौस, लज्जत, अभिरुचि व कल पाहून येथील व्यापारी व कारागीर तसा माल काढून त्याची समजूत करीत व अलोट संपत्ति ओढीत, या रोमन इतिहासकाराच्या कुरकुरीचे मर्म आता ध्यानीं येते अशी संपत्ति परदेशांतून इकडे किती येई ? हा व्यापार कोण करीत असे ? तो कोणत्या मार्गाने होई ? याचे सविस्तर वर्णन पुढील एका स्वतंत्र प्रकरणात करण्याचे असल्याने त्याविषयीं येथें हात आखडता घ्यावा हे बरें. मात्र एवढी गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे कीं, प्रथम वनस्पतीपासून रंग काढण्याची कला हिंदू राष्ट्रानेच शोधून काढली व याचे उत्तम निदर्शक ' इंडिगो ' हा शब्द होय. वास्तविक नील हा शब्द हिंदुस्थानात सर्वत्र रूढ असता येथील नील या शब्दाचे असे रूपांतर कसे झालें याबद्दल सर्वांस आश्चर्य वाटेल; परंतु ग्रिनीने इंडिया या शब्दावरून इंडिगो असा शब्दप्रयोग केला व त्यावरून हल्लींचा इंडिगो हा शब्द रूढ झाला असला पाहिजे प्रो. विल्सन, एल्फिन्स्टन, डॉ. टेनेट मिल्ल, बॅन्क्राफ्ट, हीरनप्रभृति पंडितांनी रंगोत्पत्तीच्या बाबतींत दिसून येणारी श्रेष्ठता अर्धवट आश्चर्याने, अर्धवट नाइलाजाने कबूल केली आहे.

प्रो. विल्सनसाहेबाने लोखंडाच्या कामाविषयीं पुढील उद्गार काढले आहेत. " लोखंडाच्या ओतकामाची कला हिंदुस्थानात किती वर्षांपासून रूढ आहे हें काही निश्चित सांगवत नाही. इंग्लंडात ती कालपरवा सुरू झाली असें हिंदुस्थानच्या इतिहासाकडे दृष्टि दिली म्हणजे वाटते. कारण हिंदुस्थानात ओतकाम, घडकाम, तारकाम, पोलादकाम ही सर्व कामें फार वर्षांपासून होत आहेत. "

लोखंडास मऊ, चिवट व बाकदार करणें व नंतर त्यापासून पोलादी पाणी-दार हत्यारें बनविणें ही कला हिंदूंस कोणीं शिकविण्याची जरूरी नाहीं. डॉ. रॉय म्हणतो कीं, जरी डमास्कस येथील तरवारींच्या पात्यांची सर्वत्र कीर्ति गाजलेली असली तरी ती कला इराणी लोकांनी येथून नेली असून त्याच्या-पासून त्यांतील रहस्य अरबांनां ताडलें. दिल्लीमधील कुतुबमिनारच्या पुढें असलेला भव्य स्तूप आज १५०० वर्षांवर तेथें उभा आहे; त्यावर, वारा, पाऊस, ऊन, थंडी यांचा सारखा मारा होत असतां त्याजवर गुंजेएवढा गंज चढलेला नाहीं; त्याच्या मूळच्या सौंदर्यांत किमपि न्यूनपणा आलेला नाहीं अथवा त्यावरील कोरीव लेख यत्किंचित् सुद्धां मलीन झालेला नाहीं. त्याचप्रमाणें जगन्नाथपुरी येथील प्रचंड लोखंडी पट्टे, सोमनाथचे नक्षीदार व स्वलंकृत लोखंडी दरवाजे, नरवारची २४ फुटी तोफ ही सर्व मोठ्या मूक घोषानें प्राचीन कालातील हिंदूंच्या धातुकलाप्राविण्याबद्दल साक्ष देत आहेत. तसेंच कनरुक ( kanaruc ) येथील देवळाच्या पाख्यास लावलेले लोखंडी वासे पाहिले म्हणजे येथें लोखंड ओतण्याची कला किती वर्षांपासून अवगत होती याची खात्री पटते व त्याचा सर्वत्र उपयोग होत होता हेंही त्यावरून कळून येतें. अस्तु. कुतुबमि-नार पुढल्या स्तूपाचा एक तुकडा घेऊन त्याचें डॉ. मूर व पर्सी यांनीं निरनि-राळें रासायनिक पृथक्करण केलें असतां त्यांतच इतर धातूंची भेसळ नसून तें शुद्ध प्रसरणशील लोखंड आहे असें आढळून आलें. इतक्या उत्तम दर्जाचें लोखंड इतक्या वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत तयार होत असे हें पाहून कोणास अचंबा वाट-णार नाहीं ? आणि तें असल्या प्रकारचें होतें म्हणूनच वर दिलेले लोखंडी स्मारकरूप जिन्नस आज जशाच्या तसे व मोडतोडीविना हयात आहेत. ग्लासगो व शेफिल्ड येथील लोखंडी जिन्नस व कारखाने प्रख्यात असून तेथल्यासारखे जिन्नस पूर्वी कच्छ येथें होत असत असें मॅनिंगबाई म्हणते; व पुढें तिचें म्हणणें असें आहे कीं, पूर्वी हिंदुस्थानांत गरजेपेक्षां जास्त लोखंड पैदा होत असल्यानें तें फोनिशियन व्यापारी घेऊन जात असत.

आणखी कांहीं किरकोळ गोष्टी सांगून हें प्रकरण बंद करूं. पीकपेरणीचा क्रम ही कला हिंदू शेतकऱ्यांस जात्याच इतकी परिचयाची झाली आहे कीं, त्यांत कांहीं शास्त्रीय भाग व महत्त्व आहे असें त्यास वाटत नाहीं. मात्र खरी गोष्ट तशी नसून हल्लींच्या शास्त्रीय व चिकित्सक दृष्टीनें त्यांत बरीच सुधारणा होणें शक्य आहे, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. परंतु चालू शतकाच्या मागें एकदोन

शतकें जाऊन त्या अशास्त्रीय कालीं या क्रमापासून झालेला फायदा व जमिनीची सुस्थिति पाहिली म्हणजे त्या गोष्टीचें जें जगास कौतुक वाटतें तें अगदीं सकारण आहे असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. त्याचप्रमाणे तारकाने, जरतारी काम, कलाबतू व किनखापी काम, गालिचे, जनानी व चिकाचे पडदे, जडावाचे दागिने, नकशीदार व इतर कलाकुसरीचे जाळीदार काम, काच व बिल्लोरी काम, लाकडी काम, तीक्ष्ण धारेचीं पाणीदार हत्यारें, इत्यादि जिन्नसांवरून भारतीय कलाप्रावीण्याबद्दल प्रत्येकाची खात्री झाल्यावाचून राहणार नाहीं. ज्यांच्या सुबकपणाची व मोहकपणाची नक्कल करणें अशक्य आहे अशीं वीणकामें, मौक्तिकरत्नजडित दागिने, भरजरीच्या जिन्नसाचे नमुने, मूल्यवान नक्षीदार कामें, अपूर्वरंगमिश्रणानें सजविलेले गालिचे. रंगाचा [illegible] व विलक्षण प्रभा यामुळे तेजस्वी दिसणारी ( enamel ) मिनाची कामें. कमानी, मेहरपी, वेलबुट्या व जाळ्या इत्यादि कोरून तयार केलेले लाकडी जिन्नस, विचित्रचित्र मोलवान शस्त्रे इत्यादि पदार्थांचे नमुने १८५२ सालच्या आंतरराष्ट्रीय लंडनच्या प्रदर्शनांत मांडले होते. ते पाहून पाश्चात्य कलापटूंनी माना तुकविल्या, आंग्लवर्चस्वानें भारून जाऊन भारतीय कलाप्रावीण्य ठामपणें कबूल केलें, व डॉ. फार्बस वाटसन् सारखे कलातज्ज्ञ असें म्हणू लागले कीं, इंग्लंडांतील कारागिरानें हिंदुस्थानांतील प्रत्येक कलाकौशल्याची वस्तु पाहून त्याप्रमाणें आपल्या माल्यांत व नमुन्यांत फरक केला पाहिजे. अशा रीतीनें अहंमन्य पाश्चात्य कलापटूंकडून व कारागिराकडूनही मूकप्रशस्ति हिंदी कलेने आपल्या अनाथ, दुबळ्या व अज्ञानी कारागिरास मिळवून दिली आहे. तिचा येथे थोडक्यांत सारांश दिला आहे. ज्यास इच्छा होईल त्यांनीं ज्या पुस्तकांतून ही माहिती मिळविली आहे ती सविस्तर वाचावी व आपल्या भारतीय कलेचें विनम्र झालेलें शिर वर करून त्याबरोबर आपली कीर्ति वाढवावी व स्वतंत्र आणि बाणेदार चरितार्थक्रमाचा मार्ग सुधारावा. हें प्रत्येक कलाप्रेमी जनास नम्रतापूर्वक सांगणें आहे.

---

# प्रकरण १२ वें.

## व्यापार आणि संपत्ति.



तर कोणत्याही गोष्टीपेक्षां व्यापाराच्या बाबतींत आज हिंदुस्थानची जी स्थिति दिसून येत आहे तींत व प्राक्कालीन स्थितींत खरोखर जमीनअस्मानाचें अंतर आहे. एक काल असा होता कीं, युरोप, आशिया व आफ्रिका या तीनही खंडांच्या व्यापाराचीं सूत्रें एकटा भारतदेश हलवीत होता. ज्या देशानें सोन्याचा धूर, कापराच्या मजलसी, अत्तराचे सडे, मोत्यांच्या रांगोळ्या, कस्तुरीचा बुक्का, गुलाल असे श्रीमंतीचे चोचले भोगले त्या देशांतील लोकांस स्वतःच्या घरांत हक्कानें गरम भाकरीचा तुकडा व घोटभर पाणी सुखानें व स्वतंत्रपणें खावयास मिळूं नये हा दैवाचा कोण दुष्ट खेळ ! जेथें स्वतंत्र राज-सिंहासनें अलंकृत झालेलीं असावीं तेथें परराक्षित, बेगडी व दागिनेवजा सिंहासनें आढळावीं, ज्यानीं परदेशीयांस आपल्या व्यापारानें, सुखासमाधानानें लुटावें त्यांजकडून आपण स्वतः पिळून जाण्याचा प्रसंग यावा, तेथें पूर्वीं तळपत असलेला ऐश्वर्यरूपी रविराज मावळल्यामुळें अशी ही स्थिति यावी हें केवढें दुर्भाग्य ! मागील ऐश्वर्य-मदाची ही ओहोटी असेल अथवा तर्क करून ही परिस्थितीची कुरघडी कशी झाली याची चर्चा व विचिकित्सा करून तरी काय उपयोग ? परंतु असें म्हणून भागत नाहीं. प्रमादशील मनुष्यस्वभावानुरूप जरी चुका घडल्या तरी त्याचें निरसन करून सुस्थिति संपादण्याकडे मानवी मनाचा कल असतो म्हणून प्राचीन कालीं आपला दर्यावर्दी व्यापार केवढा होता, येथें जहाजें बांधून त्यांतून येथील जिन्नस परदेशांत व्यापारी कसे नेऊन घालीत व सुवर्णाचे ढीग या देशांत कसे येऊन पडत; खलाशी कोण, व्यापारी कोण; आपला व्यापार कोणत्या मार्गानें चाले; कोणकोणते जिन्नस येथून बाहेर जात; जकातीची व संरक्षणाची काय व्यवस्था होती; इत्यादि प्रश्न या प्रकरणांत अत्यंत संक्षिप्तपणें विवेचण्याचें आम्हीं योजिलें आहे.

पंचतंत्र, हितोपदेशापासून तों तहत महान महान ललितवाङ्मयांतील प्रबंधा-पर्यंत कोणतेंही एक पुस्तक घेऊन त्यांतील सामाजिक परिस्थितीचें अध्ययन करा

म्हणजे त्यांत एक गोष्ट मुख्यत्वेंकरून लक्षांत येईल ती अशी कीं, येथे धनाढ्य व्यापारी असत; व्यापाराकरितां ते मोठमोठे प्रवास व जलपर्यटनें करीत व बाहेरच्या देशातून अपार संपत्ति मिळवून आणीत. उदाहरणार्थ, शाकुंतल नाटकात धनवृद्धि या नांवाचा व्यापारी समुद्रात बुडून बेपत्ता झाला व त्याची पाठीमागें क्रोडों रुपयाची संपत्ति होती असे लिहिलें आहे. नलदमयंतिआख्यानात अशाच गोष्टी पहावयास मिळतात; रामायण व मनुस्मृति यामध्ये जहाजाच्या भारणावर कर्ज काढल्याची उदाहरणे सांगितली आहेत; मनुस्मृतीत बऱ्याच ठिकाणी खुष्कीचे मार्ग, जलमार्ग नमूद केलेले आहेत. व उभय देशाच्या सरहद्दीवर चालणाऱ्या व्यापारात काही तंटेबखेडे झाल्यास ते कसे मोडावे हे सांगितले आहे; व्यापाऱ्यांची एक सुरस कथा दशकुमारचरित्रातही आहे; यावरून एल्फिन्स्टन, सर विल्यम, जोन्स, मॅनिंगबाई व प्रो. हीरन यांनी हिंदू लोक मोठे धाडसी, दर्यावर्दी व्यापारी असले पाहिजेत म्हणून जे ठोक सिद्धान्तरूप विधान केलें आहे ते अगदीं अक्षरशः खरें आहे. कारण तत्कालीन समाजाचा आदर्श म्हणून जर तत्कालीन वाङ्मय मानण्यास आम्ही तयार असतो तर त्याजपासून निघणारे सिद्धान्त हेही प्रत्येकाला मान्य असलेच पाहिजेत. सबब वरील सिद्धान्ताविषयीं कोणी शंका घेईल असे मानण्याचे मुळीच कारण दिसत नाही.

येथील व्यापारी लाब पल्ल्याच्या फेऱ्या करीत, समुद्रावर वर्षानुवर्षे काढीत, व जहाजे भरून संपत्ति घेऊन परत स्वदेशीं येत; अशाच प्रकारची गोष्ट आपणास सत्यनारायणाच्या कथाप्रसंगी सांगण्यात येते. हा एक सिद्धान्त मान्य केल्यावर ओघानेच येथे जहाजे बांधण्याचे कारखाने असले पाहिजेत असे मानावे लागते. प्रो. मॅक्स डंकर म्हणतो कीं, अशा प्रकारचे जहाजें बांधण्याचे कारखाने येथे असून, येथील व्यापारी बहुतेक सर्व युरोपखंडाशीं व्यापार करीत असत. फार प्राचीन काळापासून फोनोशियाशीं हिंदुस्थानचा व्यापार होता. ख्रिस्ती सनापूर्वी दहाव्या शतकात इस्राईल लोकाचा सालोमन व टायरचा हीराम या दोघांनी हिंदुस्थानास जहाजे पाठवून येथून हस्तिदंत, चंदन, माकडे, मयूर, सोने, हिरे इत्यादि पदार्थ 'ओफीर' जातीपासून खरेदी करून नेले. आता 'ओफीर' हा शब्द बरेच दिवसापासून वादाचा विषय होऊन बसला आहे व त्यावरून हिंदी व्यापाराचा बाह्य देशाशीं असलेला संबंध सिद्ध करण्याचा प्रयत्न करण्यात येतो. तेव्हा या मजेदार शब्दाविषयी थोडीशी हकीगत देऊ. टॉलेमीच्या मताप्रमाणे 'आभारिया' ( Abhiria ) नावाचा देश सिंधु नदीच्या मुखाशीं होता. अर्थात्

अभिरिया देशाच्या नांवावरून त्यांत आभीर लोक रहात असावेत हे उघड दिसतें. हल्ली काठेवाडात 'अभीर' नावाच्या लोकाची एक जात आहे व ही जात आणि टॉलेमीने सांगितलेली जात एकच असावी असे अनुमान करण्यास स्थानसादृश्यामुळें व सान्निध्यामुळें मुळींच हरकत नाहीं असे दिसते. प्रो. लासेनच्यामते 'ओफीर' नामक बंदर नैऋत्य किनाऱ्यावर असावे आणि मॅनिंगबाई म्हणते कीं, ते पश्चिम-किनाऱ्यावर असले पाहिजे. याशिवाय स्मिथच्या बायबलकोशाचे कर्ते यानीं ही जात आफ्रिकेच्या भागात कोठे तरी असावी असे अनुमान ठोकून दिले आहे. त्या एका शब्दाविषयीं इतके विसंगत तर्क लढविलेले पाहिले म्हणजे मन साशंक होऊन मुख्य प्रश्नास बळकटी येणे बाजूला रहाते. अर्थात् ज्या मानाने हा 'ओफीर' शब्दाचा उलगडा होईल त्या मानानाने येथील परदेशाशी होणाऱ्या व्यापाराबद्दल निश्चितपणा येईल. याकरिता 'तार्शिश' (Tarshish) व्यापारी लोकानीं जो माल खरेदी केला त्यातील जिनसाच्या यादीवरून तो हिंदुस्थानातील, आफ्रिकेतील अथवा अन्य देशातील हे ठरविणे सोपे आहे. सर्व जिनसांची लांबलचक यादी वगळून 'सालोमन' व 'हिराम' यास हिंदु व्यापाऱ्यांनी पाठविलेली अशी एकच वस्तु आपण घेऊ कीं त्यावरून सर्व प्रश्नाचा छडा लागून मुख्य सिद्धान्त बळकटपणे प्रस्थापित होण्यास मदत होईल. ती वस्तु म्हणजे मोर होत. त्या काळांत हिंदुस्थानाखेरीज कोठेही हे पक्षी मिळत नसत. अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वी हे पक्षी ग्रीस, रोम अथवा इजिप्त येथे बिलकूल माहीत नव्हते. ते त्यांनी ह्या स्वारीनंतर आपल्याबरोबर स्वदेशीं नेले. पुढे पुढे ह्या सुंदर पाखराचा शोकी व ढोंगी रोमन लोकामध्ये इतका बडेजाव वाढला कीं, सरदार घराण्यातील मेजवानीच्या प्रसंगी मोराच्या जिभेवाचून अडत असे. मिष्टान्नभोक्ते व विलासी सरदार आपल्या विहिणींचा रुसवा मोराच्या कोवळया लुसलुशीत जिव्हांनी काढीत असत. अशा प्रकारची चैन वाढण्यास व प्रथमतः ती उत्पन्न होण्यास राजवाड्यात काढलेलीं सुंदर चित्रे, नाटकात लिहिलेली वर्णने व अन्तःपुरात व विहारगृहात ठेवलेली ही पाखरें कारणीभूत झाली. 'सालोमन' व 'हिराम' यांनीं हे पक्षी हिंदुस्थानातून पैदा केले यास बळकट पुरावा आहे. मॅक्स म्यूलर, जेसेनियस, इमर्सन, टेनंट व प्रोफेसर लासेन या सर्व पंडितानीं एकमतानें असें कबूल केलें आहे कीं, हिब्रू भाषेतील मयूरवाचक शब्द मूळ संस्कृत शब्दावरून तयार झाला आहे व परदेशातील लोक, प्रत्यक्षपणे त्याची हिंदू लोक करीत असलेली मजा पाहून, माहीत होऊन गेले व त्यानीं येथून हे मोहक पाखरूं स्वदेशीं नेले.

जशी मोराच्या व्यापाराची मजेदार हकीगत वर दिली तशीच हस्तिदंताचीही आहे. हे दोन्ही जिन्नस पूर्वी व्यापाराचे मौल्यवान् पदार्थ होते व त्याचे मूलस्थान हिंदुस्थान हे निश्चित झाले म्हणजे परदेशी व्यापारी ते येथून नेत व भारतीय प्राचीन व्यापार, भूमध्यसमुद्राच्या लगतचा युरोपचा भाग, आफ्रिकाद्वीपकल्प येथपर्यंत पसरला होता, हें सिद्ध करण्यास सोपें जाते. म्हणून हस्तिदंताविषयीं याच उद्देशानें चार शब्द जास्त लिहणे उचित आहे.

हिंदुस्थान व आफ्रिका या दोन्ही द्वीपात हत्ती पुष्कळ सापडत असत. परंतु ते धरून पाळणे, त्यास माणसाळवणे, त्याचा विलासाचे प्राणी म्हणून उपयोग करणे हे सर्व चैनीचे प्रकार फक्त हिंदुस्थानातच माहीत होते. आफ्रिकेत यापैकी कोणताही प्रकार ठाऊक नसे. हिंदुस्थानातील राजे लोकाच्या अठरा कारखान्यांत गजशाळा म्हणून एक स्वतंत्र भाग असे. राजलक्ष्मीचा गजलक्ष्मी म्हणून एक प्रकार असे; राज्यवैभवाचे हे चिन्ह असल्याने आपआपल्या ऐपतीप्रमाणे लहान मोठे सर्व सरदार काही हत्ती बाळगीत असत व त्यास 'इभ' असे म्हणत. याच 'इभ' नावाने हस्तिदंताचा हिंदी बाजाराच्या पेठात मोठा क्रयविक्रय होत असे. हिंदुस्थान, असीरिया, इजिप्त, ग्रीस, रोम येथे या पदार्थाची फार आवड असल्याने, त्या काली त्याचा फार खप होत असे. लासेनच्या मताप्रमाणें इजिप्शियन लोकास हत्ती बाळगणें, माणसाळवणें वगैरे उद्योग माहीत नसल्यानें, त्याच्या भाषेत असलेल्या हस्तिदंतवाचक 'एबू' शब्दाची उपपत्ति 'इभ' शब्दापासून लावणं, हें योग्य दिसते. मॅनिंगबाई म्हणते की, ग्रीस व इजिप्त या देशात हस्तिदंतवाचक शब्द इभ शब्दापासून तयार होऊन नंतर त्याचे एलिफास हे रूपांतर झाले असले पाहिजे. परंतु एलिफास या शब्दाची खरी उत्पत्ति मात्र कळत नाही. होमरच्या पूर्वी हस्तिदंताचा उपयोग ग्रीस देशात माहित होता. व खुद्द होमर हा सुद्धा आपल्या काव्यात त्याचा पुष्कळ वेळा उल्लेख करितो. परंतु ग्रीक लोकानी आराबेलाच्याच कारकीर्दीत हस्तिदंत हा पदार्थ प्रत्यक्ष डोळ्यानी पाहिला, असे इतिहासावरून दिसते. डरायसच्या सैन्याबरोबर असे पुष्कळ हत्ती होते व ते माहुतासह हिंदुस्थानातून आणलेले होते, असें इतिहासांतरी नमूद आहे. एलिफास या हस्तिदंतवाचक शब्दावरून ह्या द्विदन्ती भव्य प्राण्यास ग्रीक लोकानी पुढें तेंच नाव दिलें व ॲरिस्टाटलनें ते आपल्या जोरदार लेखणीने रूढ केले. एकंदरींत सर्व विवेचनाचा निष्कर्ष एवढाच कीं, हस्तिदंत हा पदार्थ व मोर हा प्राणी परदेशी व्यापारी हिंदुस्थानांतून नेत व येथे ते उत्तम पैदा होत असत.

ग्रीक लोकांना साखरेचा उपयोग प्रथम हिंदुस्थानातच माहीत झाला. शर्करा या संस्कृत शब्दापासून ग्रीक भाषेतील शुगर शब्द झाला आहे व अरबस्थान आणि इराण या देशातून प्रवास करीत असतां मूळ शब्दप्रयोगात इतका फरक होणे अगदी साहजिक आहे.

सेल्यूसीडांच्या कारकीर्दीत हिंदुस्थान व सीरीया यामध्यें फार जोराचा व्यापार सुरु होता. फोनिशिया, इराण, बाबीलोन, टायर इत्यादि तांबडा समुद्र याच्या लगतच्या देशांत भारतीय लोखंड, उंची वस्त्रे, चिटे इत्यादि पदार्थांचा व्यापार फार जारीने चालत असे. परंतु हे ऐतिहासिक पुराव्यावरुन सिद्ध करण्यापूर्वी इजिप्तपाशीं हिंदुस्थानचा असलेला व्यापारी संबंधच प्रथम ऐतिहासिक पुराव्यावरुन सिद्ध करुं, म्हणजे मागाहून या देशापासून वर दिलेले देश लांब नसल्याने त्याही देशाशीं तो तसाच जोराने चालत असला पाहिजे, हे सिद्ध करण्यात काही कठीण जाणार नाही.

जुन्या करारातील उत्पत्ती-पुराणात जोसेफच्या भाऊबंदांनीं त्यांस इस्मायली ( Ishmaelites ) लोकांस विकलें असें लिहिले आहे. हे लोक गिलीडहून ( Gilead ) इजिप्तला सुगंधी पदार्थ, हिंगासारखे स्वादिष्ट रस, चीक आणि रक्ताचा बोळ हे पदार्थ उंटावर घालून नेत असत, असे लिहिले आहे. काही लोकाचें असे म्हणणे आहे कीं, रक्ताचा बोळ हा पदार्थ अबिसीनियन व्यापारी आपल्या देशातून आणीत असत. कारण तो पदार्थ त्याच्या देशांत बहुत पिकत असे. परंतु डॉ. रॉईल म्हणतो की, रक्ताचा बोळ नावाचा इजिप्ती बाल ( Bal ) शब्द संस्कृतातील मूळ 'बोल' शब्दावरुन झालेला असला पाहिजे; व यावरुन विकण्याकरिता तो हिंदुस्थानात तयार होत असला पाहिजे असे मानावे लागते. याशिवाय रेशमी कापड, मोती, हिरे, चिटे व इतर जिन्नस हिंदुस्थानातून इजिप्तमध्यें जाण्याकरिता अलेक्झांड्रिया येथे उतरत असत. तांबडा व भूमध्य समुद्र यांच्या लगत असलेल्या देशाशीं होणाऱ्या हिंदुस्थानच्या व्यापाराची अलेक्झांड्रिया ही फार बडे उतारपेठ होती. केप ऑफ गुडहोपचा शोध लागल्या कालापासूनच या बंदराचे महत्त्व कमी आलें, नाहीतर त्याच्यापूर्वी सर्व युरोपियन व्यापाराचे तें नाकच होते, असे म्हटल्यास यत्किंचित् सुद्धां अतिशयोक्ति होणार नाहीं. हिंदी व्यापारी लोकांचीं गलबते तांबड्या समुद्रांतील मियोस होरमोस येथें पहिला टप्पा करीत व तेथून अलेक्झांड्रिया येथे जात याशिवाय खुष्कीच्या मार्गानें पामिर ( Palmyra ) मधून दुसरा एक रस्ता होता; परंतु पेरिफस व

डेन्व्हीस वगैरे लेखक म्हणतात कीं, जलमार्गानेंच पूर्वीं या व्यापाराचा हमरस्ता होता.

इजिप्तखेरीज हिंदुस्थानचा ग्रीसपाशीं फार मोठा व्यापार चाले. मागे सांगितल्याप्रमाणें होमरच्या काव्यात उल्लेखिलेल्या हस्तिदंताखेरीज नळिही येथून ग्रीसमध्यें फार जात असे. येथे त्या पदार्थास नीळ म्हणतात, पोर्च्युगीज भाषेंत ॲनिल ( anil ) म्हणतात, आरबीमध्यें नळिच ( Neel ) म्हणतात; परंतु ग्रीसमध्यें मात्र त्यास हिंदुस्थानच्या नांवावरून इंडिगो म्हणत असत व हल्लींही त्याचप्रमाणे इंग्लिश भाषेमध्यें इंडिगो म्हणतात. जस्ताला असलेल्या संस्कृत नांवाचाच होमरनें उपयोग केला आहे; या सर्व प्रमाणावरून ग्रीस व हिंदुस्थान यांच्यामध्यें व्यापारी दळणवळण होते असें प्रत्येकाला वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

ग्रीसनंतर रोमकडे लक्ष पुरवूं व तेथे कोणकोणत्या मालाचा खप होत होता तें पाहूं. पेरिप्लस व टेसियस ( ctesias ) याच्या माहितीप्रमाणे सुती कापड, मलमल, चिट, दालचिनी, व इतर सर्व मसाल्याचे जिन्नस, हिरे, मोतीं, गोमेद, पाच, व इतर कमी दर्जाचे खडे, पोलाद, औषधी, सुवासिक पदार्थ, लाख इत्यादि जिन्नस जहाजें भरभरून रोमकडे जात. मिरी, दालचिनी वगैरे सर्व मसाल्याचें सामान पुरविण्याचे काम प्राचीन कालीं भारतवर्षाने उचललें होतें असें तत्कालीन इतिहासकाराकडून व अर्वाचीन शोधकाकडून कळून येतें. याशिवाय मॅनिंगबाई म्हणते कीं, जटामावशी, टाकळा, बांस, वेत, देवधूप, गुगुळ इत्यादि पदार्थही पुरवले जात असत.

या सर्व पदार्थांखेरीज हिंदुस्थानाकडून रोमला तलम रेशमी कापड फार जात असे. ह्या रेशमी कापडाचा रोमन स्त्रियाना त्याच्या वैभवकाली इतका शोक लागला होता कीं, रोमन लोक भारास भार सोनें देऊन ते घेत असत असें इतिहासावरून दिसते. आम्ही ज्याप्रमाणें हल्लीं सोन्याच्या वाहतसिंबंधी इंग्लंड व इतर युरोपीयन राष्ट्रें यांजविरुद्ध तक्रार करतो व सोन्याची परदेशी निर्गत म्हणजे राष्ट्रीय दारिद्र्याचें व अवनतीचें एक लक्षण मानतों तेच विचार मोठ्या प्लिनीनें आपल्या ग्रंथात नमूद केले आहेत. तो म्हणतो कीं, "प्रतिवर्षी असल्या तलम रेशमी कापडाकरिता हिंदुस्थानात ४० लक्ष रुपये रवाना होत असतात." दुसऱ्या खात्रीलायक प्रमाणावरून असे कळतें कीं, हिंदुस्थानच्या व्यापाऱ्याजवळ रकमा व्याजीं लावून सुखाने चार पैसे मिळावे म्हणून रोममधून प्रतिवर्षी सहा

कोटी रुपये हिंदुस्थानाकडे धांव घेत. इजिप्त, सीरिया, रोम इत्यादि ठिकाणीं माल पोचविण्यासाठीं व व्यापाराची ने-आण करणारी टॉलेमीच्या कारकीर्दीत १२५ जहाजें रोम व आसपासच्या बंदरांत नांगरलेलीं दिसत व ही सर्व हिंदुस्थानांत तयार होऊन फक्त युरोपला माल पुरविण्याचें काम करीत असत.

हिंदुस्थानचा पश्चिम किनारा सोडल्यानंतर प्रथम जो किनारा लागतो तो अरबस्थानचा. याच देशाशीं फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानचा व्यापार चालत असे. पेरिप्लसच्या पूर्वी तीनशें वर्षे होऊन गेलेला अंगारथाचिडस यानें यिमेन व पट्टल याच्यामध्ये व्यापार चालू होता असे लिहून ठेवले आहे. पॉटिंजर म्हणतो कीं, पट्टल म्हणजे सिंधमधील हैद्राबाद व हे जर खरें असेल तर प्रो. हीरन म्हणतो कीं, सिंधुनदीच्या मुखानें होणारा हा अत्यंत प्राचीन जलमार्गीय व्यापार होय यात शंका नाहीं. मनूच्या वेळीं-अर्थात आधुनिक युरोपियन पंडिताच्या मताप्रमाणें म्हटलें म्हणजे ख्रिस्ती शकापूर्वी दहा शतकें-हिंदू व साबी लोक यांच्यामध्ये व्यापाराची घडामोड होत होती. अलेक्झांडरच्या कालीं मॅसिडोनियाचा निआरकस नामक सेनापति इराणी आखातात आल्यानंतर त्यास असें कळलें कीं, आसिरियाला जाणारा माल प्रथम मस्कत येथें उतरतो व तेथून तो पुढे जातो, सबब हिंदी माल मिळण्याचें हेंच मुख्य ठिकाण होय असें त्यास तेथें सांगण्यात आलें. हे सर्व ऐतिहासिक पुरावे पाहिल्यावर कोणाचा विश्वास प्राचीन भारतीय व्यापारी घडामोडी व दर्याप्रवास यावर बसल्याखेरीज रहाणार आहे ? हा सर्व व्यापार गुजराथेमधील बनिये ( वाणी ) लोक याच्या हातीं होता. या लोकाचा हा पिढ्यानुपिढ्या धंदा असल्यानें त्यास तो पूर्ण अंगवळणीं पडलेला होता व आहे हें सध्या सुद्धा आपण पाहातो. अरेबिया, फेलिक्स येथें त्याच्या मोठमोठ्या वखारी असून तेथें हे आपला व्यापार मोठ्या मजेनें चालवीत असतात. त्याच्या मालमत्तेच्या अदमासी किंमतीवर त्यास तेथील सरकारास थोडा कर द्यावा लागत असे; परंतु तेवढ्यानें त्याचे उत्तम संरक्षण होऊन त्यांच्या व्यापारात कोठे खो येत नसे.

आफ्रिका खंडात फक्त इजिप्तपाशींच हिंदुस्थानचा व्यापार चाले असे नसून झांझीबार व तांबड्या समुद्रालगत असलेल्या सर्व बंदरीं चालत असे. मिओस होरमॉस हें तांबड्या समुद्रातील व्यापाराचें केंद्र होतें म्हणून मागें सांगितलेंच आहे. पेरिप्लसनें झांझीबारपासून डेलगाडोपर्यंतच्या सर्व बंदरांचीं नांवें आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत व इजिप्तपाशीं असलेल्या व्यापारी दळणवळणाचें कथन

कारिताना तो पुढे असें लिहितो कीं, " तांदूळ, इतर धान्यें, लोणी, तिळाचें तेल साखर, हलकें भारी असे दोन्ही प्रकारचें कापड हे जिन्नस कोंकण प्रांताच्या अंतर्भागातून व भडोच बंदरामधून इकडे येतात. ॲरियन या ग्रंथकाराची या गोष्टीला पुष्टी आहे.

प्रो. हीरनचा असा तर्क धावतो कीं, हिंदुस्थानांत जो इतका सोन्याचा संचय होता याचे कारण सोन्याच्या खाणी आफ्रिकेच्या ज्या प्रदेशात होत्या त्या देशापाशी हिंदुस्थानचा असलेला व्यापार होय.

हिंदू बानेये व ग्रीसमधील व्यापारी हे एडनच्या आखातात गार्डाफूईच्या भूशिराजवळ सोकोट्रा येथे वसाहत करून राहिलेले होते असे पेरिप्लसने स्वच्छ लिहून ठेवले आहे. एकंदरीत हल्लीं सुद्धा त्या लोकाची प्रवृत्ति पाहिली म्हणजे हा सर्व व्यापार त्याच्या हातीं असल्याबद्दलचा जो येवढा वेळ ऐतिहासिक पुरावा दिला त्यास पुष्टि येते. हल्लीं सुद्धा हिंदुस्थानाबाहेर जे थोडे हिंदी व्यापारी आहेत ते गुजराथेमधील वनिये अगर खोजे लोकच होत व याच्या पूर्वजांनीं तो प्राचीन व्यापार चालविला असला पाहिजे असे मानण्यास कोणतीच धास्ती नाहीं. कारण हा त्याचा फार प्राचीन काळापासून पिढीजाद धंदा आहे असे मागे सांगितलेच आहे.

आतांपर्यंत पाश्चात्य व्यापाराचे विवेचन झालें, परंतु पौर्वात्य व्यापारही काहीं कमी नव्हता. चीन, आस्ट्रेलिया, गंगापारद्वीपकल्प, आन्हामलाक्का इत्यादि देशाशीं बंगालच्या उपसागरातून व्यापार चालत असे. हिंदुस्थानातून जो माल निघे तो गंगानदीच्या मुखालगत असलेल्या बंदरांतून अथवा कारोमांडेल किनाऱ्यावरील बंदरातून ग्रीस, रोम या देशांशीं दळणवळण वाढल्यामुळें पुढे इकडेही व्यापार सुरू झाला असे नसून मूळपासूनच इकडेही व्यापार सुरू असे. स्वतः जहाजें बांधावी व बंगालच्या उपसागरासारख्या तुफानी दर्यावर व्यापार करीत हिंडावे हे प्राचीन आर्यांस बाळकडूच असे. पेरिप्लसच्या पुस्तकात कारोमांडेल किनाऱ्यावरील जहाजें सुटण्याचीं बंदरें दिलीं आहेत, यामुळें या गोष्टीचा काल्पनिकपणा जाऊन त्यास भरभक्कम ऐतिहासिक पुराव्याचे स्वरूप आलें आहे. कापडाबद्दल मच्छलीपट्टण व इतर गंगेच्या मुखाजवळील व्यापारी ठिकाणे पेरिप्लसनें दिलेलीं आहेत; त्या नावानेंच तीं हल्लींही प्रसिद्ध आहेत असे आपण मानतों. मग त्या वेळीं पेरिप्लस म्हणतो त्याप्रमाणें त्या बंदरांतून व्यापार चालत असे याच गोष्टीवर आपणास गैरविश्वास कसा करिता येणार ?

## सिंव्हलद्वीप.

सिंव्हलद्वीपाची नैसर्गिक ठेवण व स्थिति पाहिली म्हणजे त्याच्या प्राचीन व्यापारी प्रसिद्धीबद्दल मनांत यथार्थ कल्पना उभी रहाते. एका काळीं भारतीय व्यापाराचें ते केंद्रस्थान होतें; व त्या कामाकरितां लागणारीं तेथील सुरक्षित बंदरें, अनुकूल परिस्थिति पाहिली म्हणजे सहजच ते स्थान भारतीय प्राचीन व्यापाऱ्यांनीं मध्यवर्ती ठिकाण म्हणून पसंत केले असल्यास त्यांत काय नवल ?

याची पुष्कळ नावानी पूर्वीपासून प्रसिद्धि आहे. ' ओनीसिक्रीटस ' (onesicritus ) याने त्यास प्रथम टाप्रोबेन अशी संज्ञा दिली. त्याची उत्पत्ति टाप म्हणजे द्वीप व राहून अथवा रावण हा प्रसिद्ध राजा अर्थात् रावणाचें बेट अशी लावलेली आहे.

टॉलेमीनें असें म्हटलें आहे कीं, त्यास पूर्वी पॅलोसिमुंडी असे म्हणत; व त्यास फिनीचाही पाठिंबा आहे परंतु टॉलेमीच्या कालीं त्यास सालिस व तेथील लोकांस सालो ( Saloe ) असें म्हणत व ह्यापासून पुढें सेवन व नंतर हल्लींचे सीलोन झालें असावें अशी दुसरी उत्पत्ति आहे. टालाकोरी, मोदुट्टी, आमुरोग्रामम्, मोआग्रामम् ( महाग्रामम् ) इत्यादि प्रख्यात व्यापारी ठिकाणांचीं नावें टालेमीनें दिलीं आहेत. प्रो. हीरनच्या मतें खि. पू. ३०० वर्षे याची व्यापाराबद्दल फारच प्रख्याति होती.

ॲरियन म्हणतो कीं " सीलोनचा उत्तर भाग हा फार सुधारलेला असून त्या वेळी पूर्वेस चीनपर्यंत व पश्चिमेस इतालीपर्यंत ह्या बेटाचें दळणवळण होते. "

कासमॉसनें साधारणतः अलीकडच्या काळची जी थोडीबहुत सीलोनविषयीं हकीगत दिली आहे त्यावरून त्या बेटाच्या व्यापाराचा विस्तार केवढा प्रचंड होता हें दिसून येईल.

" हिंदुस्थान, इराण, एथिओपिया याच्या साधारण मध्यभागीं हें बेट वसत असल्यामुळें याच्या किनाऱ्यास असंख्य जहाजें लागतात व येथूनही तितकींच दूरदेशीं जातात. चीन वगैरे पूर्वेकडील देशांच्या मध्यभागातून रेशीम, लवंगा वगैरे जिन्नसाचा पुरवठा येथे होतो. हे जिन्नस मलबार व कल्याण येथे पाठवून तेथून पोलाद व कापड आणविलें जातें. सिंध येथून कस्तुरी आणवून तेथें वर दिलेले जिन्नस येथून रवाना होतात; इराण, येमेन, आदुले वगैरे ठिकाणीं हेच जिन्नस येथून पाठविले जातात. व तेथून आलेले जिन्नस फिरून पूर्वेकडील चीन वगैरे देशांच्या मध्यभागांत नेऊन पोंचविले जातात. या रीतीनें हिंदी महासाग-

रांतील प्राचीन अफाट व्यापाराची हे बेट म्हणजे महापेठच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं."

अलेक्झांडरच्या कारकीर्दीतील इतिहासकारांनी सिलोन बेटास टॅप्रोबेन असें नाव देऊन त्याच्या भरभराटीचीं व व्यापारवृद्धीचीं सुरस वर्णनें लिहून ठेविलीं आहेत. टॉलेमीच्या कारकीर्दीतही हे बेट असेंच प्रसिद्ध होतें. यावरून सरासरीनें पाहता इ. स. पू. ५०० वर्षांपासून तों इ. स. ५०० वर्षांपर्यंत या बेटाची फार चलती असून व्यापारधंदा, कलाविद्या व इतर सर्व प्रकारची संस्कृति यानीं हें बेट गजबजलेलें होतें. याप्रमाणें एक हजार वर्षे या बेटाचा पश्चिमेस आफ्रिका, येमेन, मलबार व पूर्वेस चीन व त्याच्या पलीकडच्याही देशापर्यंत व्यापार पसरलेला होता. ऑस्ट्रेलियन व्यापाराची चढउतारही येथेच होत असे.

ज्याप्रमाणें व्यापारात याची प्रसिद्धि होती तशीच विद्या, कला, संस्कृति वगैरे सर्व प्रकारच्या बाजूनें याची भरभराट होऊन तें उत्तम संस्कृतिवान बेट म्हणून गाजत होतें. याचा व हिंदुस्थानचा संबंध फार दिवसाचा होता. हे हिंदुस्थानाचा एक भाग अशीच सर्वांची समजूत होती. सेतुबंधानें हा संबंध पुढें निकट होऊन हिंदुस्थानांतील रहिवाशी येथे येऊन राहिले. त्याच्याबरोबर त्याच्या विद्या, कला, शास्त्र व धर्म येऊन सर्व बाजूनें याची सुधारणा झाली. अर्थात् हलींचे रहिवाशी सुद्धा भाषा, धर्म, जात व संस्कारानें हिंदूशीं संलग्न असल्यास नवल काय? प्राचीन हिंदुस्थानाशीं याचा निकट संबंध होता याबद्दल कांहीं अवशेष हल्लीं सापडत असून परदेशीय इतिहासकाराचे याविषयीं उतारे स्पष्ट आहेत. इ. स. ५००–६०० च्या पुढें याचें महत्त्व कमी कमी होऊं लागलें. तरी जेव्हा प्रथम युरोपीयन रहिवाशी येथे येऊन राहूं लागले तेव्हा त्यास येथील मूळच्या भव्य इमारती, प्रचंड देवालयें व संस्कृतीचे अवशेष पाहून फार अचंबा वाटला; येथे साधीं तळीं बांधलेलीं होतीं तीं मोठ्या मोठ्या अर्वाचीन सरोवराएवढी होतीं. या बेटाची प्रबलता, संपत्ति, वैभव, नैतिक व सामाजिक संस्मरणीय कृत्ये याची नोंद ॲरियन, कॉसमॉस ( ५६० इ. स. ) युरोपियन फिरस्ते, इतिहासकार व इतर नामांकित लेखक यानीं खि. श. पहिल्या शतकापासून करून ठेविली आहे व त्या सर्वांचें प्राचीन काळात व्यापारी घडामोडींत व व्यवहारात हे बेट सर्वांच्या पुढें होतें याविषयीं ऐकमत्य आहे.

व्यापार हे राष्ट्राच्या संस्कृतीचे, वैभवाचे व सामर्थ्याचे पूर्ण द्योतक आहे हा सिद्धान्त सर्वमान्य होण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. प्लिनी, ॲरियन, कॉस-

मॉस, पेरिप्लस वगैरे ज्या प्राचीन इतिहासकारांनी सीलोनचे भरपूर वर्णन केलें आहे त्याच्याच ग्रंथांत हिंदुस्थानच्या दक्षिण टोकाच्या मलबार व कारोमांडेल या उभय किनाऱ्यावरील बंदराचें, व्यापाराने समृद्ध झालेल्या शहराचे व एकंदर व्यापारोपयोगी ठिकाणांचे भरपूर वर्णन आहे; जिन्नसाची माहिती आहे, संपत्तीचीं चमत्कृतिजनक वर्णनें आहेत; त्यावरून या अत्यंत महत्त्वाच्या राष्ट्रीय घडामोडीत व सुधारणेच्या क्षेत्रात प्राचीन हिंदूनीं केवढी थोरवी संपादन केली होती हें स्पष्ट दिसून येतें. व त्यावरून कोणालाही स्पष्टपणे व मुकाट्याने त्यांच्या प्राचीन वैभवाबद्दल, विद्याकलाबद्दल, संस्कृतीबद्दल व सर्वांगिण सुधारणा, अचाट कर्तृत्वशक्ति व विलक्षण धाडस याबद्दल सपशेल कबूली द्यावी लागेल. मानवाच्या संस्कृतींत भर टाकल्याबद्दल निर्विकारी व सुज्ञ पुरुष ती आनंदाने देतीलच, परंतु विकारवश, मदांध लेखकाना व इतिहासकाराना ती देणे भाग पाडण्याइतका भरभक्कम ऐतिहासिक पुरावा त्यांच्याच सजातीय विद्वानांनीं व लेखकांनी जमविलेला असल्यानें वक्र वदनाने का होईना, परंतु ती दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

---

## प्रकरण १३ वें.

### खुष्कीचे व्यापारी रस्ते.

आतापर्यंत भारतीय व्यापार जलमार्गानें वसकसा चालत होता याचें निरूपण केले. परंतु हिंदुस्थानांतील त्या वेळीं प्रसिद्ध गजबजलेलीं बंदरें कोणतीं होतीं हे प्रथम सांगून नंतर भारतीय व्यापार उत्तर व मध्य आशियाखंडात कोठपर्यंत पसरला होता हे पाहूं.

पेरिप्लस व कॉसमॉस यानीं वर्णिलेला ( १ ) भडोच ( २ ) मंगलोर ( ३ ) नेलीसिरम् ( ४ ) सिंध हैदराबाद ( ५ ) कल्याण ( ६ ) वसई ( ७ ) धारापुरी ( ८ ) सिंधू ( ९ ) सुरत ( १० ) सिबूर ( ११ ) पारती ( १२ ) मंगरुथ ( १३ ) सालोपट्टण ( १४ ) नेलोपट्टण ( १५ ) पुदपट्टण हीं मुख्य बंदरे होत.

ज्याप्रमाणें हिंदुस्थानचा व्यापार दर्यामार्गानें चीन, तुर्कस्थान, इराण, बार्बालोन, इजिप्त, ग्रीस व रोमबेटापर्यंत पसरला होता त्याचप्रमाणे या शहरीं जाण्यास खुष्कीचाही मार्ग होता. चीनपाशीं मुख्यत्वेंकरून रेशमाचा व्यापार चालत असे, तरी हिंदुस्थानात रेशीम तयार होत नसे असें कांहीं म्हणता येणार नाहीं.

उत्तर आशियांत सोनेरी मैदान ' इद्रेष्टी ' व कोबीचें मैदान येथपर्यंत हिंदू व्यापारी फेऱ्या करीत असत. ते अशा लांब पल्ल्याच्या फेऱ्या करण्याच्या वेळीं एकटे बाहेर पडत नसत अथवा घरीं परत लवकर जात नसत. प्रवास फार दूरचा व धोक्याचा पडल्याने ते एक हजार, दोन हजार अशा मोठमोठ्या टोळ्या करून ४।५ वर्षे बाहेर असत व नंतर यथेच्छ पैसा मिळविल्यावर घरीं जात. त्या वेळीं दळणवळणाच्या साधनांची कमतरता असल्याने परत मार्ग सांपडण्यासाठीं ठिकठिकाणीं कांहीं खुणा व ओळखीचीं चिन्हें ठेवावीं लागत. अशा प्रकारचें चिन्ह म्हणून " तारवर्तीसुलेमान " ह्या नावाचा एक दगडी मनोरा होता. मध्य आशियांत गेल्यावर पुढे पूर्वेकडे चीनपर्यंत फेरी करावयाची असल्यास ह्या मनोऱ्यापासून वळावें लागते असे टॉलेमी व टेसियस हे सांगतात. अफाट महासागराच्या पृष्ठभागावर प्रवास करीत असतांना नक्षत्रपुंज, होकायंत्र व दीपगृह यांचा उपयोग होतो त्याप्रमाणे आशिया खंडाच्या मध्यभागीं असलेल्या अशा विस्तृत ओसाड व भयाण मैदानावर प्रवास करीत असताना कांहीं अंशीं समुद्राप्रमाणे स्थिति होते; पुढला मागला मार्ग कळण्याची अति पंचाईत पडते; अशा वेळीं वाटसरूंना मार्ग कळण्यास साधन असावें व एकमेकांची भेट होऊन परस्पराकडील हकीगत कळावी म्हणून त्या वेळीं हा तारवर्तीसुलेमान या नावाचा उंच मनोरा बांधला होता. येथे सर्व व्यापाऱ्यांचा तळ पडत असे. येथे कांहीं दिवस विश्रांति घेऊन, ठरावलेला कार्यक्रम पुरा करून, निश्चित केलेल्या भेटी घेऊन, नंतर पुढचा मार्ग सर्व व्यापारी सुधारीत. काबूल अथवा बॅक्ट्रीया येथून प्रवासास आरंभ केला असें धरलें तर उत्तर दिशेकडे तोंड करून उत्तर-अक्षांशाच्या ४१ अंशापर्यंत जावें लागे. नंतर एक मोठा पर्वत ओलांडून हॉशान अथवा ओरा या मैदानांतून पुढे जावें लागे. या मैदानांतून बरेंच चालून गेल्यानंतर तारवर्तीसुलेमान या मनोऱ्याजवळ जाऊन पोंचत असत. येथे आल्यानंतर कोबीच्या मैदानास पोंचण्याच्या वाटेवर काशगर हें प्रख्यात शहर व मोठमोठे पर्वत लागत. याशिवाय खोटेन व अक्सू हीं शहरेही वाटेंत लागत. या प्राचीन नगरावरून कोशोटी या शहरांतून चीनच्या सरहद्दीवरील ' सेचू ' या शहरास जाण्याचा एक मार्ग होता; व हाच पुढे पेकीन या प्रख्यात जुन्या शहरास जात असे. काबूलपासून पेकीनपर्यंतच्या या सर्व मार्गांची लांबी दोन हजार पांचशें मैल होती.

पश्चिमेकडील व्यापाराचे मागें सांगितलेल्या मार्गांशिवाय आणखी दोन रस्ते होते. हिंदुस्थानांतून प्रथम व्यापारी निघाले म्हणजे सिंधमार्गानें पामीर या प्रख्यात प्राचीन श्रीमंत शहरास जात; व तेथून सीरियाच्या बंदरातून रोम व इतर युरोपातील शहरे याजकडे जाण्यास वळत.

दुसरा मार्ग हिमालयाच्या उत्तर उतरणीवरून जात होता. हिमालयाच्या उत्तरेकडील रांगा ओलांडून पार गेल्यावर ओक्झस नदीच्या कांठाने कास्पीयन समुद्रावर जावें लागे व नंतर तेथून ज्या शहरास जावयाचे असेल त्या मानानें निरनिराळ्या दिशेकडे वळावें लागे;परंतु हिमालयाच्या घाटातून ओक्झस नदीच्या कांठानें आले असता कास्पियन समुद्र हा सर्वांत मोठा तळ असे व येथून युरोपच्या निरनिराळ्या भागात जावयास मार्ग असत.

रोमचा ऱ्हास झाल्यानंतर त्याची जागा 'बसोरा' ( Bassora ) या शहरानें पटकावली व तेथे माल पोचण्यासाठीं हिंदुस्थानातून आलेला माल ' ऑर्मस ' या शहरी उतरत असे.

येथपर्यंत भारतीय व्यापाराची परदेशाशीं होणारी घडामोड व दळणवळणाचे मार्ग याचें विवेचन केले. ज्या लोकांचा बाह्य देशाशीं एवढा अफाट व्यापार चालत असे त्याचा परस्पराशीं स्वदेशात किती तरी जास्त पटीनें सहवास घडून मालाची देवघेव व अदलाबदल चालली असेल याची कल्पना करणे काही अशक्य नाहीं. व्यापाराचा व सुधारणेचा परस्परसंबंध काय याचे मागें वर्णन केले आहे. सर्व प्रकारचे चैनीचे व शोकाचे पदार्थ, उंची उंची वस्तु, दुर्मीळ जिन्नसा याचा खप एवढ्या विस्तारलेल्या देशांत व नानाविध अत्युच्च संस्कृतीच्या लोकामध्ये व्हावा यात काय आश्चर्य ? भारतवर्षात उत्पन्न होणाऱ्या सर्व महार्ह सुखसोयींच्या, विलासाच्या व चैनीच्या वस्तूंचा उपयोग भारतीय लोक भरपूर करून घेत. एवढेंच नव्हे तर बाहेरच्या देशात पैदा होणारे मूल्यवान पदार्थ तेथील लोकास कशा तऱ्हेने उपयोगात आणावे हे माहीत नसल्याने त्याचाही फायदा भारतीय आर्यांसच मिळत असे.

येथील प्राचीन रहिवाश्याची अभिरुचि थोर, उपभोगाचे मार्ग नीतिला धरून, सुखविलासाची पद्धत नमुनेदार व एकंदर रहाणी संस्कृति-पोषक पडल्यानें त्याच समाधान [illegible] व मागणी पुरविण्याकारिता व्यापाऱ्याचे तांडेच्या तांडे एकसारखे प्रवास करीत असत. अशा व्यापाऱ्याच्या, तांबडा समुद्र, इराणी आखात, इजिप्त व टायर या ठिकाणी गांठी पडत, तेथें मालाची अदलाबदल होई व नंतर स्वदेशात ठिकठिकाणचे व्यापारी परत जात.

हिंदुस्थानची एकंदर भौगोलिक परिस्थिति पाहिली म्हणजे व्यापाराची आंखणी व घडामोडीचे अंतर्गत मार्ग व विभाग सृष्टीनें आंखूनच दिले आहेत असें वाटतें. पूर्व टोकापासून पश्चिमटोकापर्यंत व उत्तरेस काश्मीरपासून दक्षिणेस कन्याकुमारी-पर्यंत सर्वत्र राजमार्ग पसरलेले होते. या रस्त्याच्या कांठीं हिरवी गार प्रछाय झाडाची राग, विहिरी व खाणावळी असून कोसाचे दगड पुरलेले होते. अशा प्रकारच्या राजमार्गांपैकीं तक्षशिलेपासून पाटलीपुत्रापर्यंत सुमारें ११०० मैलाचा एक रस्ता असून दुसरा अयोध्या-हस्तिनापुरावरून पंजाबात गिनाबेराजापर्यंत गेलेला होता.

याशिवाय सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा व इतर जहाजे जाण्यायेण्याजोग्या ज्या नद्या होत्या त्यातून अंतर्भागातील व्यापार चालत असे. दक्षिण हिंदुस्थानांत तागर Tagara व प्लुथमा Pluthama यातून सर्व माल भडोच येथें उतरत असे.

उत्तर हिंदुस्थानातील लाबलाबच्या प्रदेशांतील सर्व माल उज्जनी येथे येऊन उतरत असे कारण हें ठिकाण हिंदुस्थानच्या मध्यभागीं असून आसपासच्या सर्व भागाची मागणी येथून पुरविली जात असे. आणि ही मागणी पुरविल्या-नंतर जो माल शिल्लक उरे व बाह्य देशास जाण्यासाठीं सांठविला जात असे त्याचें हे ठिकाण म्हणजे वखारच होती व येथूनच परदेशीं जाणारा माल भडोच-कडे रवाना होत असे.

आतापर्यंत वर्णिलेल्या व्यापारांच्या सर्व पद्धतींहून यात्राची एक पद्धत पृथ्वी-वरील सर्व देशांत रूढ आहे. हल्लींच्या दळणवळणाच्या साधनांच्या विपुलतेमुळें त्याचें महत्त्व कमी होऊन त्या अजिबात बंद होतात कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. त्याचे पूर्वीचे व्यापारी महत्त्व हल्लीं अजिबात नाहींसे होऊन त्यात थोडेबहुत फक्त पूर्वीचे धार्मिकच स्वरूप शिल्लक राहिले आहे. हरिद्वार, काशी, प्रयाग, गया, नर्मदा, कृष्णा, गोदावरी यांच्या काठचीं क्षेत्रे रामेश्वर वगैरे सर्व क्षेत्रात वर्षाच्या निरनिराळ्या काळीं लाखों लोक भाविकपणें जमत, परस्पर सुखसोयींच्या व सार्वजनिक हिताच्या प्रश्नांची आपोआप चर्चा होई व अशा रीतीनें एकमेकाच्या विचारात बाहेर पडण्यास अवसर मिळे; परंतु हल्लीं सर्वच रहाणी बदलल्यानें यात्राचे पूर्वीचे दीर्घप्रवासी व धोक्याचे स्वरूप बदलून ते करमणुकीचें व धार्मिक भावनाच्या परिपूर्तीचे एक साधन हल्ली होऊन राहिलें आहे.

---

# प्रकरण १४ वें.



## भारतीय संपत्ति



थून अत्यंत मूल्यवान जिन्नस, हिरे, मसाल्याचे पदार्थ, उंची उंची रेशमी वस्त्रें, भारी किमतीचे इतर व्यापारी व बनावट पदार्थ यांची लाखो रुपयांची निर्गत आफ्रिका व युरोप खंडात होत असे. यामुळे मागे सांगितल्याप्रमाणे प्लिनीसारखे रोमन इतिहासकार अधर्वट द्वेषबुद्धीने, अर्धवट चढाओढीच्या इर्षेने व राष्ट्रीय हिताच्या दृष्टीने हिंदुस्थानाकडे जाणाऱ्या सुवर्णप्रवाहाची मोजदाद करून लोकास इशारत देत असत. ह्या जगडव्याळ व्यापारामुळे सर्व जगातून सुवर्णौघ सारखा हिंदुस्थानात आल्याने येथे इतकी संपत्ति साठली होती की, त्याविषयी दूरदेशच्या लोकांमध्ये नानातऱ्हेचे प्रवाद सुरू असत. अफाट संपत्तीचे उदाहरण द्यावयाचे असल्यास हिंदुस्थानचे नाव सर्वमुखी झाले होते. येथील संपत्तीविषयी परदेशीय लोकांमध्यें फार चमत्कारिक अजब व अद्भुत गोष्टी रूढ झाल्या होत्या. भारतभूमी म्हणजे कुबेरनगरी व येथील व्यापारी व लोक म्हणजे सर्वत्र कोट्याधीश, येथील लोकास दारिद्र्याचा विटाळ नाही. सुख, चैन, भोग, विलास यांमध्यें वाढल्याने भारतीय लोकास गरिबीचें व निर्धनपणाचे स्वप्न सुद्धा पडत नसेल. रत्नखचित वाडे, हिरेजडित प्रसादतले, इंद्रनीलविशोभित कारंजे, कमलपूर्ण पुष्करणी, सोन्याचांदीने मढविलेली देवळे व गोपुरें, सौगंधिक पदार्थांनी, मसाल्याच्या जिनसांनी, रुचकर व मधुर खाद्यपेयांनी, अमोल दागदागिन्यांनी कल्पनाघटित अनेकरंगी वेलबुट्यांनी, भरजरी कापडांनी, गालिचे, किनखापी व मखमलीचे कपड्यांनी, चैन व विलासांच्या सर्व साधनांनी वजबजलेल्या पेठा; हत्ती, मोर, शुक सारिका, पारावत, हरिणे, ससे इत्यादि पाळीव पशूंनी सुशोभित गृहें; अशा प्रकारचा थाट हिंदुस्थानात सर्वत्र असला पाहिजे असे चित्र परदेशीय व्यापाऱ्याच्या व गरीब आणि अज्ञान झालेल्या लोकांच्या मनश्चक्षूंपुढें सदैव उभें असे. त्यांची साभिलाष दृष्टि सारखी हिंदुस्थानाकडे लागलेली असे.

प्रत्येकास वाटे कीं, एकदा तरी अशा पुण्यभूमीचें दर्शन व्हावें म्हणून हजारों परकीय लोक येथें येऊन जात. एकदा ही भूमि पाहून गेल्यावर कित्येकांच्या तोंडास पाणी सुटे, कांहीं धाडशी व तामसी लोक दुष्टबुद्धीनें येथील संपत्तीचा परिहार करण्यास टपलेले असत. परंतु जोपर्यंत अवनतीचें बीज येथें मुळींच रुजलें नव्हतें तोपर्यंत अशा सर्व आशाळभूताच्या व आसुरी बुद्धीच्या लोकांच्या श्रीमुखांत बसून त्यास येथून जीव घेऊन पळता पळतां नाकीं नऊ येत. परंतु एकदा पडत्या काळास सुरुवात झाल्याबरोबर अशाच आसुरी लोकांच्या टोळधाडीनें येथील वैभवाचें मातेरें केलें, पशुसम नरवीरांनीं कला भ्रष्टविली, नीति बुडविली, धनश्रीचे धिडवडे काढले, अभिरुचीची बेअब्रू केली, राजवैभव धुळीस मिळविलें, भक्ति निराधार केली, विद्या दारोदार लाविली, शास्त्रांना निराधार होऊन पळ काढावा लागला, संस्कृतीस वनवासास लावून पाशवीपणाला राज्यपदारूढ केलें अशा रीतीनें सर्व जगाच्या लोहचुंबकास निर्वीर्य करून परदेशीय बलाढ्य राक्षसी तरवारबहादुरांनीं येथील अगणित संपत्तीची वाटेल तशी विल्हेवाट लाविली. समशीतोष्ण हवामान, अगाध संपत्तीच्या खाणी, तेजस्वी व भव्य राजगृहें यांच्या सुरम्य वार्ता ऐकून अलेक्झांडरपासून तों अहंमदशाहा अबदालीपर्यंत सर्व परदेशी लुटारू यांनीं सारखा धुमाकूळ घालून नेववेल तेवढी संपत्ति नेली. रुचिर रविकिरणमय प्रदेश, धनधान्यसमृद्ध भूमि, अफाट व्यापार यामुळें संकलित झालेली संपत्ति ऐकून व पाहून मॅसिडोनियन वीर अलेक्झांडर हा प्रथम भरतभूमींत उतरला.

या मॅसिडोनियन बहाद्दरानें भरतभूमींत पाय टाकल्याबरोबर आपल्या शिपायास असें सांगितलें कीं, " माझ्या शूर पठ्यानों, आतां तुम्ही प्रत्यक्ष सुवर्णभूमींत पाय ठेवणार आहात; तुमच्या मायदेशापेक्षां येथे अगणितपट संपत्ति असून तेथें करामत दाखविणें हें तुमचें काम आहे, तरी तें पाहून घ्या. " अशी दणदणलेली भरत–भूमीची कीर्ति ऐकून एकामागून एक या देशावर स्वाऱ्या होऊन आतां तो निष्कांचन झाला आहे हें निराळें सांगणें नकोच. मिल्टनच्या पूर्वी होऊन गेलेल्या विद्वानांनीं व अलिकडील प्रत्येक युरोपियन पंडितानें या देशाविषयीं लिहितांना कौतुकोद्गार काढले नाहीत असें क्वचितच झालें आहे. सुलतान महंमद गझनवी याच्या एकाच उदाहरणावरून येथील महामूर संपत्तीची कोणालाही कल्पना येईल. याची हकीगत कोणास नव्यानें सांगण्याची जरूरी नाही. सोरटी सोमनाथ येथील शिवाची मूर्ति फोडून जी संपत्ति त्यानें बाहेर

काढली, तिला मोजण्यास त्याला योग्य अशी संख्याच मिळेना. मथुरेंत २६ दिवस राहून हजारो मूर्ति आटदिण्याचा सपाटा सारखा सुरूच होता. परंतु मथुरा सोडून कनोजला गेला तेव्हां त्याचे तेथें डोळेच दिपून गेले. तरी सोमनाथ, मथुरा येथे राहिल्यानें त्यास हिंदुस्थानची संपत्ति म्हणजे काय, याचाही थोडा फार परिचय झाला होता. अशा स्थितींत एकापेक्षा एक वरचढ सधन शहरें पाहिलीं म्हणजे या बुभुक्षित गिधाडी वृत्तीच्या परदेशी लुटारूस आश्चर्य का वाटावें समजत नाहीं. परंतु जेथें दररोजची पंचाईत अशा गृहस्थास कांहीं दिवस मेजवानी देऊन नंतर दुसरीकडे पूर्वीपेक्षां श्रीमंत घरीं नेऊन सोडलें तरी याची मूळची हलकट वृत्ति थोडीच एकदम बदलणार ! असो. सोनें व हिरे यांची या भूमींत पैदासच फार होत होती. मलबार किनाऱ्यावरील कालिकत शहरापाशी असलेल्या नेलीसेरम् शहरीं मोत्यांचा फार मोठा व्यापार चालत असे. हिंदुस्थानच्या खाणींतील जवाहीर संपत्ति फार प्रख्यात होती. हिरे, पाच, गोमेद, बिरोजा, पीतस्फटिक अथवा पुष्पराग इत्यादि जिन्नस या खाणींतून निघत असत. सोनें येथें मुबलक सांपडतें अशी प्राचीन काळापासून प्रसिद्धि आहे. दक्षिण देश व मलबार प्रांत येथें सोन्याच्या खाणी असत; धारवाड येथेंही कांहीं दिवसांपूर्वी सोन्याची खाण लागलेली आहे. शिवाय पोवळीं, पाच, हिरकण्या, लोलक वगैरे जवाहीर संपत्ति अगाध मिळतच होती. जगांत जीं नामांकित रत्नें व हिरे आज आबालवृद्धांस माहीत आहेत तेही येथील खाणींतूनच निघालेले आहेत ब्रुटसची माता सर्व्हीलिया इजला ज्युलियसनें नजर केलेलें मोतीं व ज्युलियसची प्रख्यात राणी क्लिओपॅट्रा इच्या कानांतील मौक्तिकवलय हीं हिंदुस्थानांतूनच तिकडे गेलीं होतीं. हल्लीं दोन हिरे जगप्रसिद्ध आहेत; एक कोहिनूर व दुसरा पिट्. जरी पिट्चें वजन कोहिनूरपेक्षा फाजील असलें तरी कोहिनूरच्या पाण्यानें सर्व जगास मोहित करून अखिल जगज्जिव्हेवर त्याचें नांव आरूढ झालें आहे. पिट्चें वजन पूर्वी १० कॅरेट होतें व हल्लीं फक्त १३६$\frac{5}{8}$ कॅरेटच आहे. त्याची हल्लींची किंमत ४८००००, पौंड आहे व तो पारीस येथील राजगृहाच्या एका स्वतंत्र दिवाणखान्यांत ठेवलेला आहे. कोहिनूरचें वजन १०६$\frac{1}{2}$ कॅरेट असून त्याची किंमत १००००० पौंड आहे. या दोन्ही हिऱ्यांचा व विशेषत: कोहिनूरचा एक स्वतंत्र इतिहास होईल इतकी कालांतरानें त्याच्याभोंवतीं माहिती व कथा गोळा झाली आहे. त्याचप्रमाणें कालानें त्यास एक प्रकारचें माहात्म्य व पावित्र्य आलें आहे.

स्त्रीला स्वरूप व राष्ट्राला संपत्ति जशीं अलंकाररूप आहेत व त्यामुळें सर्व जगाचा त्यांच्यावर सारखा डोळा असतो, तसाच प्रकार हिंदुस्थानचा झालेला आहे. आरब, तार्तार, मोंगल यांच्यांतील गझनवी, घोरी, तयमूर, नादिरशहा व शेवटचा अहंमदशहा अबदाली हे सर्व इकडे कशाकरिता लोटले ? सोफोक्लसनें एका ठिकाणीं म्हटलें आहे कीं, " सर्व दुःखांत संपत्तीचें दुःख अत्यंत वाईट आहे. मनुष्यजातीच्या मागें असंख्य व्याधि आजपर्यंत लागल्या व नाहींशा झाल्या; परंतु या संपत्तिरूप व्याधीचा नायनाट अद्याप झाला नाहीं व पुढें होईल असें दिसत नाहीं. याच्या योगानें शहरें उध्वस्त झाली असून त्यांतील कुटुंबें देशोधडीस लागलीं आहेत; निर्मल अंतःकरण भ्रष्ट होऊन सद्गुणी मनाची अधमाधम कर्माकडे प्रवृत्ति होते. " अशी ही आपन्मूलक संपत्ति चांगली कशी म्हणावी हें समजत नाहीं; परंतु व्यवहारांत संपत्तीकडे चांगुलपणाचा भाग येत नाहीं हें प्रत्यक्ष अनुभवविरुद्ध असल्यानें नाकबूल करितां येत नाहीं; विद्या, कला यांची वृद्धि होण्यास संपत्ति हेंच मूळ कारण होय; ललितकलांचें संगोपन व संवर्धन करणारी संपत्ति हीच जननी होय. कित्येक वेळेला राष्ट्रीय आपत्ति याच्या योगानेच टळल्या आहेत. थोडक्यांत म्हणजे संपत्ति ही दुपाती तरवार असून तिचा सदुपयोग होण्यास योग्य योजकाचीच दुर्लभता असते असें म्हणावें लागते.

---

## प्रकरण १५ वें.



### आर्यांचा धर्म.



र्मासारख्या विषयावर अधिकारी लेखणीला पोक्तपणें व अत्यंत दूरदर्शीपणे लिहिण्याला आजन्म अभ्यास लागतो. परंतु नुस्त्या ग्रंथपठनानेच ती योग्यता येईल असे मानणें विलक्षण धाडसाचें होईल. अलौकिक बुद्धिमत्ता, असामान्य विवेचनशैली, अखंड अभ्यास, अनेक जन्माचे संस्कार व तयारी, आध्यात्मिक अभ्यासाची व तालमीची पराकाष्ठा, परमश्रेष्ठ नैतिक व आध्यात्मिक शुचिर्भूतता, वाणीचा रसाळपणा, निश्चयात्मक बुद्धि, त्रिकालज्ञान, निर्दोष तर्कपद्धति, इत्यादि गोष्टींची भरपूर मदत लागते. ' वसुधैव कुटुंबकं ' या तत्त्वाचें प्रत्यक्ष आचरण

पदोपदीं व क्षणोक्षणीं सिद्ध करून द्यावें लागतें; त्यागाची तयारी किती लागते याचें प्रत्यक्ष अनुभवाशिवाय अनुमान करणें अत्यंत धाडसाचें होईल; हाल, अपेष्टा, कष्ट, छल सोसण्यास व त्रिकालसत्य सिद्धांताचें प्रतिपादन व आचरण करण्यास मनाचा खंबिरपणा व शरिराची सहनशीलता किती असावी लागते हे तत्त्वज्ञानी धर्मसंस्थापक यांच्या ऐतिहासिक माहितीवरून कळेल. मनाची ईश्वराविषयीं तन्मयता व ध्यास किती असावा लागतो हें निदान हिंदू वाचकांस तरी सांगण्याची मुळीच जरूरी नाहीं. जगांतील अन्यायमूलक विषमता नाहीशी व्हावी, प्रेमाचे साम्राज्य सर्वत्र पसरून भेदभावाचे बंड पार मोडून जावे, अखिल मानवांस शांति व ज्ञानप्राप्ति व्हावी; जगांतील अज्ञानाचा पूर्ण निरास होऊन ईश्वरी दरबारात कोणास मज्जाव नसावा, जगातील सर्व दुःखे नाहींशीं होऊन अध्यात्मज्ञानाची प्राप्ति सर्वांस व्हावी, व त्याकरिता स्वाभिमान, स्वार्थ याना तिलाजुळी देऊन परहित व परार्थ साधण्यासाठीं ज्याची सर्वसंगपरित्यागपूर्वक तयारी झाली आहे अशाच सत्पुरुषास धर्मासंबंधी बोलणे, लिहिणे व उपदेश करणे या गोष्टींचा अधिकार आहे. प्रस्तुत लेखकाच्या ठिकाणा तशापैकी एकही गुण असेल कीं नाहीं याबद्दल त्यास जबरदस्त शंका आहे. परंतु मागील सर्व प्रकरणावरून वाचकांच्या लक्षात असें येऊन चुकलें असले कीं, स्वतःचे विचार प्रदर्शित करण्यापेक्षा उत्तम पुरावा गोळा करून भारतीय श्रेष्ठत्व सर्व लोकाच्या निदर्शनास आणणें हेंच मुख्य काम आहे. आपल्या ठिकाणीं धर्मासारख्या विषयावर स्वतंत्र जोरदार विचार प्रदर्शित करण्याची ताकद नाहीं हें समजून हा विषय अजिबाद गाळल्यास आतापर्यंत केलेले श्रम व्यर्थ होऊन काम अर्धवट राहील; अशी भीति वाटत असल्याने आपल्या हातून होईल तसे अल्प प्रमाणात कर्तव्य म्हणून काम करावें; त्यात कांहीं न्यून राहिल्यास—तसे ते बरेंच राहणार अशी भीति आहे—ज्ञानी पुरुष दूर करतील एवढे समाधान मानून घेऊन पुढील कार्यास लागूं.

सत्य व श्रेष्ठ धर्म, प्रेममूलक, शांत व निरुपद्रवी असतो. खऱ्या धर्माचें निशाण रक्तस्रावाने विटाळलेलें नसून धर्मसंस्थापक हा मदांध, अरेराव व जुलमी केव्हांही आढळून येणार नाहीं. विध्वंस, नाश हे शब्द याच्या दरबारांत कधींही ऐकूं येणार नाहींत. साहाय्य, ज्ञानदान, दुःखविमोचन व सुधारणा या चार कोणशिलांवर धर्माच्या उज्ज्वल वैभवाची उत्तुंग इमारत उभारली जाते, व त्यांत लोकहित हीच मुख्य देदीप्यमान मूर्ति नांदत असते अशी धर्माची मिळूर याचे

जी व्याख्या दिली आहे ती किती यथार्थ आहे व हिंदू धर्माच्या बाबतींत ती तंतोतंत लागू असून यांत थोडीशी हिंदुधर्मानें भरच घातली आहे असें दिसून येईल.

अत्यंत त्रस्त मनाला शांति देणारें उत्तम औषध म्हणजे धर्म होय. समाजामध्यें सर्व लहानथोर मंडळींत एक प्रकारचा बंध दिसतो तो खरोखर धर्मानेंच उत्पन्न केला आहे. मनुष्यमात्राच्या सर्व व्यवहारांत धर्म भरून राहिला आहे व विशेषतः हिंदुसमाजाच्या दृष्टीनें ही गोष्ट सागणें ज्यास्त अगत्याचें आहे. संगतीवरून मनुष्याची ज्याप्रमाणें परीक्षा होते त्याचप्रमाणें धर्मावरून राष्ट्राची परीक्षा होते. राष्ट्रामध्यें कोणते विचार उसळत आहेत, लोकांची मनोभावना कोणत्या प्रकारची आहे, ज्ञान, संस्कृति व परार्थ यासंबंधानें लोकाच्या विचाराला कसें वळण लागलें आहे व त्यायोगें त्या राष्ट्राची भवितव्यता काय आहे हें अजमावण्यास सोपें जातें. साध्या गोष्टीवरून, क्षुल्लक कार्यावरून अथवा सहज साध्या दिसणाऱ्या कामावरून व वागणुकीवरून ज्याप्रमाणें व्यवहारांत मनुष्याची परीक्षा होते त्याप्रमाणें धर्मावरून जगाच्या सुधारणेंत प्रत्येक राष्ट्राला आपली पदवी ठरवून घ्यावयाची असते.

धर्म हें राष्ट्राच्या उच्च वा नीच संस्कृतीचें गमक आहे. धर्म या शब्दाभोंवतीं आचारात्मक असंख्य व्यवहारांचें जाळें माजलेलें दिसतें; परंतु धर्माची खरी ओळख म्हणजे परमात्मज्ञानाची प्राप्ति होणें; परमार्थज्ञानाची गुणाधिक्यता व श्रेष्ठता, नीतिशास्त्र, तत्त्वज्ञान, वाङ्मय, विज्ञान व सर्वसाधारण उन्नति यांजवर अवलंबून असल्यानें ज्या मानानें हीं शास्त्रें प्रगल्भदशेस येऊन लोकांचीं मनें सुसंस्कृत होतील त्या मानानें तो धर्म अधिकाधिक श्रेष्ठ असें ठरणार हें उघड आहे.

हिंदुस्थानातील वैदिक धर्माचा इतिहास व त्याची उदात्त शिकवण यांची प्रत्यक्ष व्यवहारात असलेल्या धर्माशीं तुलना केल्यास खरोखर वाईट वाटतें व आचरणांत इतका फरक कशानें पडला हा एक मोठा प्रश्न मनापुढें उभा रहातो. सर्व वस्तूंच्या मुळाशीं असलेला वैदिक धर्म यास स्वस्थानापासून पदच्युत करून लौकिक, विकृत, हिणकस, जडवादी धर्मानें त्याचें स्थान कसें पटकाविलें आहे हें मागें सांगितल्याप्रमाणें अर्वाचीन कालच्या हिंदूंची अवनति, त्यांची चालू धर्मव्यवस्थिति, समाजरचना, नैतिक समजुती व कित्येक हिडिस चालीरिती यांवरून स्पष्ट होतें.

जडसृष्टि व परमात्मा यांच्या परस्परसंबंधाचें विवेचन व आत्म्याचीं चिरंतन तत्त्वें यांचा ऊहापोह वेदामध्यें केलेला आहे. सर्व सृष्टींतील यच्चयावत् जीवाशीं

प्रेममय वर्तन ठेवणें, त्यांच्या दुःखानें दुःखित होणें व सुखानें सुखी होणें हेच वैदिक धर्माचें रहस्य आहे. या तत्त्वाचें स्पष्ट प्रतिबिंब बुद्धाच्या पुढील वचनांत दिसून येईल.

" माझ्या वैयक्तिक परमसुखाची मला मुळींच पर्वा नाहीं; अथवा मी अखेरच्या प्रशांत अवस्थेंत एकटाच रहाण्याला बिलकूल तयार नाही. परंतु चिरंतन सर्वत्र माझा वास असावा; माझ्याबरोबर प्रत्येक प्राणिमात्र मुक्त होऊन शाश्वत सुखाचा वाटेकरी व्हावा अशी माझी इच्छा आहे; व त्याकरितां मी जन्मोजन्मीं प्रयत्न करीन व तसें घडून आल्याशिवाय माझें कधींही समाधान होणार नाहीं. जगांतील प्रत्येक दुःख व हाल यांचा पूर्ण निरास होऊन प्रत्येक मजबरोबर मुक्ति-सुख भोगण्यास तयार होईल तेव्हांच मी आपला प्रयत्न बंद करीन !" केवढी ही अचाट महत्त्वाकांक्षा ! व कोण हें विश्वव्यापी प्रेम !

हिंदुधर्मांत, सृष्टि आणि मनुष्य यांचे एकमेकांशीं असलेले संबंध, मनुष्याचे ठिकाणीं बद्धत्व कशानें येतें याविषयीं दृढ झालेलीं चिरंजीव तत्त्वें व अढळ सिद्धान्त यांचा अंतर्भाव होतो. या अढळ सिद्धांतांना एका दृष्टीनें विज्ञान अथवा शास्त्रें व दुसऱ्या दृष्टीनें पारमार्थिक तत्त्वज्ञान असें मानण्याचा प्रघात आहे. यांतील प्रमेयें फक्त चिरकाल नांदणाऱ्या गोष्टींनाच लागू आहेत; कमलजलवत् असार गोष्टींचा यांत मुळींच विचार केलेला नाही. यांच्या ठिकाणी भेदभाव मुळींच नसून सर्वत्र यांची व्याप्ति सारख्या प्रमाणांत आहे. हिंदू असो अगर अरब, युरोपीयन, अमेरिकन, आफ्रिकन, चिनी कोणताही असो, त्यांस त्यांच्या अध्ययनापासून सारखेंच ज्ञान होऊन परमार्थाची प्राप्ति होण्याला सर्वांना सारखाच मार्ग या मोक्षशास्त्रानें मोकळा करून दिलेला आहे.

हिंदुधर्म पौरुषवादी आहे, प्रयत्नवादी आहे; म्हणजे त्यास परमेश्वराचें अस्तित्व मान्य नाहीं असें कोणींही समजूं नये. परंतु परमेश्वर निष्क्रिय असून मनुष्य आपल्या कर्मानें बांधलेला आहे. तो जसें पेरील तसें त्यास फळ मिळेल; परमेश्वर निराकार, निर्गुण व निष्क्रिय असल्यानें कर्मफलाच्या भानगडींत तो मुळींच पडत नाहीं. जो तो आपल्या कर्मफलाचा उपभोगी आहे; अर्थात् कर्म करून स्वाभिप्रायसदृश फल उत्पन्न करणें हें पुष्कळांशीं मनुष्याच्या स्वाधीन आहे. तो आपला पंगुपणा व्यक्त करण्यास केव्हांही तयार नाहीं. 'परमेश्वराला भक्ताचा हट्ट पुरा करणें भाग पडतें.' या साधुसंतांच्या वचनावरून मनुष्य आपल्या भावी सुखाचा स्रष्टा आहे असें म्हटल्यास त्यांत कांहींही वावगें होणार नाहीं. परंतु

ही स्थिति इतर धर्मांत आढळून येत नाहीं. त्यामध्यें ईश्वर हा एकाद्या ऐहिक नृपतीप्रमाणें कल्पिलेला असून मानवी मनोधर्मांचे आरोप त्याच्या ठिकाणीं केलेले आहेत. अर्थात भक्त हा आत्मनिष्ठ व प्रबल व्यक्ति कल्पिलेली नसून त्याच्या बऱ्यावाईट कर्मांबद्दल तो ईश्वराच्या न्याय, दया, कारुण्य इत्यादि भावनांवर पूर्णपणें अवलंबून रहातो असें मानलें आहे. याच ठिकाणीं हिंदुधर्मांचा व इतर धर्मांचा विरोध येऊन याच्याच योगानें त्यास वैशिष्ट्य प्राप्त झालेलें आहे.

परमेश्वराचें खरें ज्ञान प्राचीन ऋषींस झालें होतें अशाबद्दलचीं उदात्त, स्पष्ट व गंभीर वचनें त्यांच्या अनेक ग्रंथांत पहावयास मिळतात; व संस्कृत भाषेंतील हे ज्ञान, वचनें व विचार इतर कोणत्याहि भाषेंत इतक्या स्पष्टपणें व सोप्या रीतीनें लिहिलेलीं आढळणार नाहींत. या ज्ञानास ब्रह्मज्ञान असें म्हणतात. " एकमेवाद्वितीयं ब्रह्म " हें वाक्य सर्वतोमुखीं असून वादाच्या वेळीं सर्व भर याच्यावरच असतो. याच्याशिवाय लोकांच्या ध्यानींमनीं इतर कोणताच विषय नसतो. ब्रह्मास सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वशास्तृ व अनन्त असें मानण्यांत येतें.

" सर्व प्राचीन संस्कृत धर्मग्रंथाना फक्त एकच परमेश्वर मान्य आहे. त्याचें स्वरूप तेजोमय आहे. तत्कालीन प्रत्येक ब्राह्मणाची खटपट, जड व बंधनकारक वस्तुग्रामाच्या संसर्गापासून मुक्त होऊन अशा प्रकाश-तेजोरूप परमेश्वरापाशीं तादात्म्य पावावें म्हणून असे. त्या वेळीं परमेश्वराची जडमूर्ति करून पुजण्याचा प्रघात नव्हता. अथवा प्रतिमापूजेची वहिवाट मनूच्या काळापर्यंत मुळींच रूढ नव्हती. श्राद्धकर्म ही हिंदुधर्मांतील एक महत्त्वाची संस्था आहे. प्रो. मॅक्सम्यूलर म्हणतो कीं, " अजून हिंदु लोकांत श्राद्धकर्मांची परंपरा नष्ट झालेली नाहीं. त्यांतील उदात्त हेतु, गंभीर विचार व थोर कल्पना यांची जाणीव जरी फार थोड्यांस असली तरी ती चाल अजून अव्याहत चालत आलेली आहे. अंत्यविधि, अंत्येष्टि, दहनकर्म इत्यादि शब्द हिंदूंच्या कानास कटु व अमंगल लागतात. याचें कारण मानवी जीवनाच्या ऐहिक थोरवीबद्दल व भावी उत्कर्षाबद्दल त्याचे ठिकाणीं पूर्ण निष्ठा असते. माता, पिता, पुत्र यांच्या पुण्यस्मरणाचा श्राद्धरूप प्रसंग न पाळण्यानें खरोखर मोठी धार्मिक हानीच होणार आहे. सबब ही चाल जितकी दृढमूल होईल तितकी, धर्माचरणास बळकटी येऊन मानवी जीवनाबद्दल गांभीर्य व उच्चताप्रधान भावना या सुविरूढ होऊन समाजस्थैर्यास निःसंशय मदत होणार आहे. "

आता या गोष्टीसंबंधीं मतभेद असूं शकेल. परंतु जगच्चालक परमेश्वराशीं

तादात्म्य पावण्याची स्थिति प्राप्त होण्यास शरीर हें अत्यवश्य साधन आहे असें जोंपर्यंत प्रत्येकाचें प्रामाणिक मत असेल, तोंपर्यंत त्याच्या उपजत पंगूस्थितींत निष्काम बुद्धीनें जीवाची पर्वा न करितां त्यास वाढविण्याची जबाबदारी ज्यांनीं मोठ्या आनंदानें पत्करली, ऐहिक व पारलौकिक सुखसेवनास त्यास समर्थ करण्याची ज्यांनीं अहर्निश खटपट केली, त्या पूज्य मातापितरांचें पुण्यस्मरण केल्यानें खात्रीनें हितच होईल. व अशा तऱ्हेनें कृतज्ञता व्यक्त केल्यास त्यांत काय गैरवाजवी होणार आहे ?

आतांपर्यंत निवेदन केलेल्या सर्व विशेषांत पुढील विशेष फारच उत्तम, मनोग्राही व ठोबळ असून त्याची सर इतरत्र कोठेंही आढळून येणार नाहीं. हिंदुधर्माची रचना शास्त्रशुद्ध पायावर झालेली आहे. ज्या वेळीं चालू हिंदुधर्माची रचना झाली त्या वेळीं अर्वाचीन भौतिक शास्त्रें व ज्ञानपर्वताच्या कोणत्या निबिड व भयाण गुहेंत आपलीं तोंडें खुपसून बसलीं होतीं कोणास ठाऊक ? परंतु वेदद्रष्ट्या ऋषींचे ज्ञान इतकें अमोघ व बिनचूक आहे कीं, त्यांत अजूनपर्यंत कोठेंही न्यूनपणा आलेला कोणासही स्मरत नाहीं. ऋषींच्या सृष्ट्युत्पत्तीच्या कल्पना व ईश्वराविषयींच्या कल्पना, यांचा आधुनिक भौतिक शास्त्राशीं काडीमात्र विरोध नसून त्यांच्या योगानें ह्या विचारास व कल्पनेस उलट बळकटीच आलेली आहे. असा विलक्षण योग इतर कोणत्याच धर्मांत पहावयास मिळत नाहीं. तत्त्वज्ञान, शास्त्रें व ईश्वरोत्पत्ति आणि जगदुत्पत्ति याविषयीं ठाम झालेल्या समजुती यांत अणुमात्र सुद्धां फरक आढळून येऊं नये हाच हिंदुधर्मांतील अपूर्व प्रकार होय. याचमुळें आर्यावर्तास सर्व धर्मांची जननी अशी संज्ञा आहे. नोहाचा प्रलय, माता मेरीची कौमार्य स्थिति, महंमदाचें सगर्व स्वानुयायांस आश्वासन, ख्रिस्ताचे प्रलयानंतर न्यायदान, इत्यादि कुराण व बायबलांत दिसून येणाऱ्या तत्त्वज्ञानविरोधी गोष्टी वेदांत मुळींच आढळत नाहींत. वेद व उपनिषदें यांतील तत्त्वे कोणत्याहि निकषावर घासून पाहिलीं तरी त्यांत अणुमात्र हिणकस द्रव्य आढळणार नाहीं व याच कारणानें आज हजारों वर्षे अनेक रजोगुणी व सशस्त्र धर्मवीरांस तोंड देऊन हा धर्म अवनितलावर गंभीरपणानें आपला उपदेश जगतास करीत आहे. जगांतील अर्धे लोक याचे पक्के अनुयायी असून इतर अर्ध्यांहून कमी असणाऱ्या लोकांनीं याचा उपदेश स्वीकारून आपल्या धर्मास मात्र निराळें नांव दिलें आहे. त्यांचें निशाण जरी भिन्न दिसलें तरी मुळांत याच गुरूपाशीं त्यांचा अभ्यास झालेला आहे असें पूर्णविचारांतीं दिसून येईल. खऱ्या गुरूला

आपल्या बहुश्रुत व पंडित शिष्याकडून पराजय होण्यांत मोठें भूषणच वाटतें. तीच स्थिति आर्यधर्माची आहे. हा शमप्रधान, गंभीर, पूर्ण ज्ञानी गुरु असल्यानें त्यास इतर शिष्यसम धर्माकडून पराजय होण्यांत आनंदच वाटला आहे. परंतु तामसी व अपरिपक्व धर्मांनीं पितृरूप हिंदुधर्मावर शस्त्र उगारून त्याचा छल केला आहे. यांची शिष्यपरंपरा वाढविण्याची पद्धत म्हणजे समशेरदर्शन, अडवणूक आणि फसवेगिरी ! असा प्रकार आर्यावर्तांत कोठेंही पहावयास मिळणार नाहीं. इतर धर्मांत असहिष्णुतेचें बंड विलक्षण असून तत्त्वज्ञानी व शास्त्री लोकांचा छल वेदेतर धर्मांनीं केलेला सर्वत्र पहावयास मिळेल. गॅलिलिओ, कोपरनिकस, ब्रूनो इत्यादि तत्त्वज्ञानी लोकांचे बळी या लोकांनीं घेतलेले आहेत, परंतु त्याच्याच काळीं हिंदुस्थानांत झालेल्या सर्व प्रकारच्या मताभिमानी लोकांस यत्किंचित् सुद्धा त्रास पोंचला नाहीं. यावरून वैदिक धर्माची सात्त्विकता, बळकटी, आत्मश्रद्धा, तात्त्विक विशुद्धता इत्यादि गुणांची परीक्षा होणार आहे. हिंदुधर्मानें उपदेशकाच्या टोळ्या करून परकीयांस ' दे माय धरणी ठाय ' केले नाहीं अथवा अडाणी, गरीब, नडलेल्या लोकांस नाडून नाखुषीनें त्याच्या गळ्यांत परकीय धर्माचें लोढणें अडकवून दिले नाहीं. डेला व्हॅली नामक एका प्रख्यात ख्रिस्तभक्तानें आपल्या ' पूर्वहिंदुस्थानची सफर ' या पुस्तकांत बरोबर हेच विचार प्रदर्शित करून हिंदी लोकांस दुष्काळानें अनाथ व अन्नान्न करून सोडले नसते तर येथें एकही ख्रिस्त ठेवण्याची जरूरी नव्हती अशी स्पष्ट कबूली दिली आहे.

'नाइन्टींथ सेंचरी' नामक प्रख्यात मासिकांतील जर्सीच्या काउन्टेसचे खालील विचार मननीय आहेत:—

"हिंदुस्थानांतील उच्च जातींतील विचारवान् लोकांना ज्या शंका येतात व भीति वाटते त्याचे निरसन ख्रिस्ती धर्मानें होणें ही अशक्य गोष्ट आहे. मनांत उद्भवणाऱ्या अत्युच्च आशा व त्यांची तृप्ति करण्यास उपनिषदें पूर्ण समर्थ आहेत. प्राचीन ऋषींचें सूक्ष्म तर्कशास्त्र हा एक अभेद्य तट असून त्यांतील वादविवाद व विवेचनपद्धति हिंदू तत्त्वज्ञानाचें पूर्ण संरक्षण करण्यास पुरेशी आहे. जगामध्यें दिसून येणारी विषमता, सुखदुःखाची व्यस्त प्रमाणांत झालेली वांटणी हे प्रश्न कर्माच्या तत्त्वानें सोडविलेले आहेत. आत्म्याची खळबळ व तळमळ शांत करण्यास एका विशिष्ट मूर्तीवर ध्यान देऊन बसावें हा उपाय सांगितलेला आहे. पुढें ही प्रतिमा बिंदुसमान कल्पून नंतर कांहीं दिवसांनीं तो बिंदु आपणामध्येंच आहे अशी भावना करण्याचा प्रयत्न करावा. हा प्रयत्न सिद्ध झाला म्हणजे मन

आत्मविचारांत दंग होतें व अशा वेळीं ऐहिक इच्छा व सुखलालसा पार मावळून मन आत्मिक प्रेमानंदांत पोहूं लागतें. हिंदू तत्त्वज्ञानाची ही स्थिति म्हणजे परमावधि होय; परंतु अशा अत्युच्च आर्यतत्त्वज्ञानानें सुद्धां ज्यांचें समाधान होत नाहीं अशांस ख्रिस्ती धर्म कसें समाधान देणार? ख्रिस्ती धर्मामध्यें इतकी योग्यता थोडीच असणार!"

अर्वाचीन भौतिक शास्त्रांशीं कोणत्याहि एका तत्त्वज्ञानाचा पूर्ण मेळ असेल तर तो आर्यतत्त्वज्ञानाचा होय. बुद्धाचें तत्त्वज्ञान मूलतः आर्यतत्त्वज्ञानापासून भिन्न नसल्यानें त्याचा विचार करण्याचें कारणच नाहीं. आर्यतत्त्वज्ञानानें व धर्मानें बहुतेक सर्व जगावर आपला अंमल बसविला आहे. "आर्यांच्या वसाहती" या प्रकरणांत दाखविल्याप्रमाणें जगाच्या सर्व भागांत आर्य लोक पसरून ते तेथें वसाहती करून राहिले आहेत. अर्थात् त्यांच्याबरोबर त्याचा धर्म व तत्त्वज्ञान जाणें हें अगदीं साहजिक आहे. परंतु जरी थोडा वेळ हा विचार बाजूला ठेविला तरी सध्याच्या सर्व जगाच्या लोकसंख्येवरून अर्ध्यापेक्षां अधिक संख्या हिंदुधर्मी असून बाकीची ख्रिस्ती, मुसलमानी, ज्यू व रानटी अशी आहे.

सध्यां सर्व जगाची लोकसंख्या ठोकळ मानानें एक ( १००००००००० ) अब्ज आहे असें धरलें तर फक्त त्यांपैकीं हिंदू व बौद्ध धर्मी मिळून ५३००००००० आहेत व बाकीचे ४७००००००० अहिंदू आहेत. ख्रिस्तभक्त बोर्ड म्हणतो कीं, "हिंदु तत्त्वज्ञान व धर्म याचें प्राबल्य जगाच्या अजून बऱ्याचशा भागावर असून जपान, चीन, तार्तरी, हिंदुस्थान, ब्रह्मदेश, सयाम, सिंहलद्वीप, इत्यादि ठिकाणीं हिंदूपद्धतीनेंच पूजाअर्चा चालू असून विचार व भावना यांजवरही त्याचेंच प्राबल्य आहे." जे धर्म प्रत्यक्षपणें हिंदुस्थानांत उगम पावले नाहींत त्यांचेवरही हिंदू विचारांचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. जॉनस्टर्न म्हणतो कीं, 'बौद्ध धर्माचीं तत्त्वें बहुतेक इतर सर्व धर्मांत मिसळलेलीं आढळून येतात. ज्यू लोकांतील मोझेजसंबंधींची जगदुत्पत्ति व हिंदूंची जगदुत्पत्ति यामध्यें मुळींच फरक नसून वास्तविक पहिली दुसरीपासून निघालेली स्पष्ट दिसते.'

ख्रिस्ती धर्मांत 'ग्रीक चर्च' या नावाचा एक पंथ आहे. त्याची प्रिन्सेपनें पुढीलप्रमाणें उपपत्ति दिली आहे

"ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्याच्या वेळीं कांहीं बुद्ध भिक्षु धर्मांतर करून युरोपांत येऊन राहिले. तेव्हां त्यांचे बरोबर हल्लीं 'ग्रीक चर्च' पंथांत रूढ असलेले धार्मिक आचार व सण हिंदुस्थानांतून बाहेर गेले. हिंदुस्थानांतूनच राज-

सत्तात्मक राज्यकारभारपद्धति, प्रार्थना, आन्हिक धार्मिक क्रिया, महाजन मंडळें; अस्थिपूजा, चमत्कार, वेष, मुंडन इत्यादि प्रकार युरोपांत प्रविष्ट झाले."

ख्रिस्ती धर्म उदयास येण्यापूर्वी शेंकडों वर्षे जे ऋषि होऊन गेले त्यांचेच शब्द व वचनें कित्येक ठिकाणीं बायबलांत आलेलीं दिसतात. 'दुसऱ्यांनीं तुजपाशीं जसें वागावें अशी तुझी इच्छा असेल तसेंच तूं दुसऱ्याशीं वागत जा.' हें बायबलातील अगदीं वेदतुल्य वचन आहे. आतां याज्ञवल्क्याचें वचन पहा. 'हा आश्रम आमचा नव्हे; ज्या जड शरिराने आम्हास धर्माचें आचरण करितां येतें त्याचा रंग तयार होणें हें तरी आमच्या मुळींच स्वाधीन नाहीं. शरीर असेपर्यंत फक्त धर्मानें वागणें आपलें कर्तव्य आहे. म्हणून आपणास जें आवडणार नाहीं ते आपण दुसऱ्यास तरी कसें द्यावें?'

ऋग्वेदांत सर्व धार्मिक आकांक्षाचें फारच उदात्त व गंभीर उच्चारण झालें आहे त्यामुळें जी संस्कृति आर्यावर्तात पसरली तीच आज आपणांस सर्वत्र पसरलेली दिसते असें डेल्वॉस म्हणतो.

ज्याप्रमाणें रेशमाचे किडे अगर फुलपाखरें यांची पहिली व दुसरी अवलाद यात मुळींच संबंध नसतो तशी मनुष्यजातीची स्थिति नाहीं ही जात प्रगमनशील व बुद्धिमान असल्यानें हिच्या एका पिढीचा व दुसऱ्या पिढीचा अनेक गोष्टींमुळें संबंध जडलेला असतो अथवा दुसरी पिढी मागील पिढीचे गुणदोष घेऊन येते, त्याचप्रमाणें धर्माची स्थिति आहे. एक धर्म पार नष्ट होऊन दुसरा उत्पन्न झाला; पाहिल्याचा दुसऱ्याशीं काडीमात्र संबंध नाहीं, असे कधीही होणें शक्य नाहीं. जगातील ज्ञानपरंपरेस व अभिवृद्धीस असे झाल्यानें मोठाच धोका येईल. प्रत्येक तत्त्व नव्यानें शिकावयाची पाळी येईल; मागील आम्हास कांही नको असे म्हटल्यास आज जगाची जी सुस्थिति दिसते तिच्या अत्यल्पांशाइतकी सुद्धा ती झाली नसती. म्हणून जो धर्म अस्तंगत होतो तो भावी वर्धिष्णु, तडफदार, जोमदार आपल्याला पुढें करून आपण मागें सरतो. भारतवर्षातून इजिप्शियन धर्म निघाला; इजिप्शियन धर्मावरून मोझेजनें आपलीं ज्यू धर्मशास्त्रें तयार केलीं व या शास्त्रांवर ख्रिस्ती धर्माची उभारणी झाली. पारशी धर्म, ज्यू लोकांचा धर्म व ख्रिस्ती धर्म यांतून महंमदी धर्माचा उदय झाला.

बौद्ध धर्म म्हणजे ब्राह्मणी धर्माविरुद्ध शुद्ध बंड होय. या योगे त्याला क्रान्तिकारक रूप जरी आल्यासारखें भासलें तरी ज्या कारणांकरितां हें बंड उभारलें

गेलें तों कारणें नाहींशीं झाल्याबरोबर भिन्न नांवानें पूर्वीचा हिंदुधर्म वावरूं लागला व एवढ्या नाममदानें जेव्हां तो बेहोष झाला तेव्हां श्रीमच्छंकराचार्यांनीं त्याचा गर्वपरिहार करून हिंदुधर्मास मूल सिंहासनावर पुन्हां आरूढ केलें.

हिंदुधर्म अथवा वैदिकधर्म आणि बौद्धधर्म यांमध्यें समान तत्त्वें कोणतीं आहेत तीं पाहूं. ( १ ) दोघांनाहि वेदांचें जनकत्व मान्य आहे, ( २ ) दोघांनाहि त्रिमूर्तीची कल्पना पसंत आहे; मात्र प्रत्येकांतील मूर्ति निराळ्या आहेत. ( ३ ) उभयतांना पुनर्जन्म ( ४ ) व आत्म्याचें परमात्म्यांत विलीन होणें या गोष्टी मान्य आहेत.

भेद पुढीलप्रमाणें आहेतः—( १ ) वेद अपौरुषेय नसून अत्युच्चदर्जाची महासिद्धान्तसंस्थापक पुरुषाची ती कामगिरी होय, ( २ ) चातुर्वर्ण्याची संस्था मान्य नाहीं. ( ३ ) दुय्यम देव व उपदेव हे मान्य नसून ते फक्त पुण्यपुरुष व धर्मसुधारक होत. ( ४ ) देवाच्या कल्पनेत फार अंतर आहे.

सर आर्नोल्डच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे निर्मर्याद विश्वप्रेमाचें अखंडत्व, विश्वाच्या आत्यंतिक सुखाच्या व स्वातंत्र्याच्या आशेचें अमरत्व व वैय्यक्तिक सुखाचा निरास आणि विश्वव्यापक प्रेममय आशेचें अनंतत्व हें बौद्ध धर्माचें विशेष होत.

अशा जगत्प्रेमी बौद्ध धर्माचा अंमल ब्रह्मदेश, सयाम, हिंदी आर्चिपेलागोमधील बहुतेक बेटें, सिंहलद्वीप, तिबेट, मंगोलिया, जपान, नेपाल, भूतान या देशांत चालू काळांत सुरू आहे व एका काळीं तो सर्व पृथ्वीवर पसरला होता असें मानण्यास कारणें आहेत. तुर्कस्तान, इराण, इजिप्त, रोम स्कान्दिनाव्हिया व ब्रिटिश बेटें यांमध्यें तर तो बहुत करून चालूच होता.

जन्स्टर्न म्हणतो कीं, "आसाम, पेगू, आव्हा व सीलोन येथें बुद्धास गोदाम म्हणतात; सयामांत समन; जपानात आमिध बुद्ध, चीन व कोरियामध्यें फो अथवा फाही; बंगाल व नेपालमध्यें शाक्यसिंग; भूतानमध्यें धर्मराय; तिबेटमध्यें आदिबुद्ध व महामुनि; आणि मंगोलियामध्यें शाक्यमुनि" अशीं देशपरत्वें नांवें आहेत.

इ. स. ६५ सालीं मिंग्टी बादशहाच्या कारकीर्दींत "भारण" व "मतंग" या दोन बौद्ध भिक्षूंनीं चीनमध्यें प्रथम बौद्ध धर्म नेला. ते मुळचे पंजाबांतील तक्षशिलेचे राहिवाशी होते. चिनातील "गीती" व ग्रीसमधील "स्किथी" हे एकच असून ते शाक्यकुळाचे मूळ उत्पादक असावेत असा कांहींजणांचा तर्क आहे.

बौद्ध धर्माचा विस्तार सर्व जगभर झाला असें जर कोणी म्हटलें व त्याच्या स्पष्टीकरणार्थ उदाहरणें दिलीं नाहींत तर हल्लींच्या चिकित्सक काळात त्यांवर कोणीही विश्वास ठेवणार नाहीं; व त्याच्या म्हणण्याकडे कोणी लक्षही देणार नाहीं. उदरनिर्वाहाच्या प्रश्नानें सर्व लोकांचीं मनें अगदीं उत्फुल्ल भरून गेलीं असता, दिवसेंदिवस जीवनकलह फार बिकट होत असतां, वाङ्मय विषयाकडे कोणास लक्ष देण्यास सवड आहे? पूर्वपरंपरा, इतिहास, प्राचीन वैभव, पूर्वजांची कीर्ति व पराक्रम हे विषय मनुष्यमात्रास प्रिय आहेत, परंतु त्यांचा अभ्यास करण्यास शेकडा एकदोघांना सुद्धा फुरसत नाहीं; सबब करमणूक व परिश्रमरहित ज्ञानप्राप्ति होण्याला लेखकाची लेखणी अधिकारी व विषयाची मांडणी चित्ताकर्षक, मुद्देसूद व समर्पक पाहिजे. स्वतःसंबंधानें कोणालाही कांहीं लिहिता येणें जरी अशक्य नसलें तरी अवघड आहे. सबब आत्मश्लाघेचा दोष स्वीकारण्याऐवजी प्रस्तुत विषयावर ( बौद्ध धर्माचा जगद्व्याप ) आणखी कांहीं विश्वसनीय माहिती देणें बरें.

बुद्धदेवाच्या पादुका हिंदुस्थान व बाहेर ठिकठिकाणीं आढळून आल्या आहेत. अशा आजपर्यंत सहा पादुका उपलब्ध आहेत. त्या साधारणतः डोंगरांतील खडक व कातळ अशा ठिकाणीं खोदलेल्या आहेत. बौद्ध लोकांची अशी समजूत आहे कीं, जोपर्यंत अशा पादुका अस्तित्वांत असून लोक त्यांचें दर्शन घेत आहेत तोंपर्यंत महापूर, प्रलय, उल्कापात वगैरे पंचभूतात्मक आपत्तीपासून भीति नाहीं. अशा पादुकांची एक जोडी मक्केस आहे व महंमदी धर्माचा उदय होण्याच्या पूर्वी तेथे अनेक बौद्ध यात्रेकरू जात असत. या पादुकास क्षाबत् असें म्हणतात. अरबस्थानात बौद्ध धर्माचा प्रसार झाला होता हें वरील उदाहरणावरून दिसून येईल. इजिप्तमध्ये नाईल नदीच्या कांठीं सुद्धा हा धर्म पसरला होता. इजिप्शि लोकांचे 'हर्मीज' नावाचे पवित्र धर्मग्रंथ आहेत. त्यामध्ये बौद्ध धर्मांतील बहुतेक तत्त्वें गोवलेली आहेत. पुनर्जन्म, पूर्वजन्म, मानवी आत्मा परमेश्वरी अंश आहे व येथील यात्रा संपविल्यानंतर तो परत परमात्म्यात विलीन होतो इत्यादि तत्त्वें स्पष्ट वैदिक व बौद्ध धर्मांतील असल्यानें व तींच इजिप्शि लोकांच्या पवित्र धर्मग्रंथात आल्यानें वरील अनुमानास पूर्ण दृढता येते. याशिवाय ही तत्त्वें हर्मीज व थॉट याच्या संवादात आहेत. आतां थॉट हा बौद व बुद्ध अशा परंपरेनेंच सिद्ध झालेला शब्द आहे हें कोणाही विचारी माणसास दिसल्याशिवाय राहणार नाहीं. पिमांडरचे "हर्मीज" "ट्रिसमेजिस्टस" या नांवाचें संवादात्मक दुसरें

एक इजिप्ती पुस्तक आहे; त्यांत त्रिमूर्तीच्या तत्त्वावर पिमँडर व थॉइ यामध्ये झालेला संवाद दिला आहे. खाल्डियन, बॅबिलोनियन, कॉल्चीसचे लोक, व आसिरी यांजमध्यें बौद्ध धर्माचा पूर्ण प्रसार झाला होता, इत्यादि माहिती जॉन्स्टर्न याचे पुस्तकांत दिली आहे. आरामांतील सामाराइट लोक व पॅलेस्टा-ईनमधलि इसनी लोक हेही बुद्धानुयायीच होते. इसेनी लोक बाह्यतः जरी ख्रिश्चन होते तरी त्यांचे सर्व आचार बौद्ध धर्मानुकूल होते व ख्राइस्टला ते बुद्धदेव मानीत असत.

ग्रेटब्रिटनमधील ड्रुइड हे आपले कडील ब्राह्मण जातीप्रमाणे श्रेष्ठ वर्णाचे लोक होते. त्याच्यामध्यें पूर्वजन्म, पुनर्जन्म, आत्म्याचें व परमात्म्याचें संमेलन हीं तत्त्वें असून उत्पादक, संरक्षक, विनाशक या तीन धर्माच्या देवाचें त्रिकुट आपल्याकडील त्रिमूर्तीप्रमाणेंच होते. हे लोक पुढें ग्रेटब्रिटन सोडून सीझरच्या स्वारीपूर्वी फ्रान्स, जर्मनी, स्पेन इत्यादि देशामध्ये उपदेश करण्याकरिता गेले. त्यांचा हा सर्व कारभार ख्रिस्ती धर्माच्या पूर्वकालीन होता. त्याच वेळेला स्कादि-नाव्हिया व पूर्व आशियांत आल्ताइ पर्वतापर्यंत बौद्ध धर्माचा विस्तार झाला होता,त्यावरुन हे ड्रुइड लोक सुद्धां बुद्धानुयायीच असले पाहिजेत, असें वाटतें. स्कांदिनाव्हियाच्या द्वीपकल्पांत बौद्ध धर्माचा मूळ संस्थापक ‘ व्होडिन ’ या नांवाचा होता व त्यास अर्वाचीन भाषेंत ‘ ओडिन ’असें म्हणतात. व्हॉइ, भॉइ, बुद्ध या उतरत्या शब्दपरंपरेकडे लक्ष दिलें तर बुद्ध या शब्दास ‘ इन् ’ हा प्रत्यय लागून व्होडिन् हा शब्द सिद्ध झाला असें वर वर पाहणारासही दिसून येईल. ज्या ज्या देशात बौद्ध लोक जाऊन राहिले व जेथें त्यांनीं देशपरिस्थितीप्रमाणे हिंदुशास्त्राच्या आधारावर ज्या ज्या पुराणकथा, धार्मिक प्रमेयें व शास्त्रीय सिद्धात प्रस्थापित केलें त्यामध्यें व प्रत्यक्ष हिंदुधर्मशास्त्र, पुराणें, व तत्त्वज्ञान यांमध्ये निकट साम्य आढळून यावें यात काय आश्चर्य ? बौद्ध धर्म झाला तरी हिंदु-धर्माचा सुधारलेला प्रकार असें असल्यानें बौद्धधर्मांकित सर्व देशांतलि शास्त्रें,पुराणें व तत्त्वज्ञान यात एकवाक्यता व एकरूपता दिसून येणें हें क्रमप्राप्तच आहे. स्कान्दिनाव्हियांतील ग्रंथांत तर हें साम्य इतकें दिसून येतें कीं, हिंदूंचें तेथें स्थलांतर व निवास या गोष्टी मान्य केल्याशिवाय हें कोडें केव्हांच उलगडता यावयाचें नाहीं. कर्नल टॉड् म्हणतो कीं, ‘ हिंदुस्थानामध्यें स्वारी करणारे सर्व इंडोसीथियन योद्धे हे बुद्धधर्मी असल्यानें त्यांच्यामध्यें व रजपुतामध्यें चालीरीती व पुराणकथा यांमध्यें अगदीं जवळचें साम्य दिसते.

स्कान्दिनाव्हियांतील लोकांच्या पवित्र धर्मग्रंथांना " एड्डा " असें म्हणतात. वेद व एड्डा या दोन शब्दांमध्ये उच्चार-साधर्म्य स्पष्टच आहे; परंतु त्यातील विषयामध्ये जी एकरूपता आहे ती खाली दिली आहे.

( १ ) गंधर्वांनीं, यक्षांनीं वगैरे देवकोटींतील स्वर्गस्थ राहिवाश्यांनीं ब्रह्मदेवाला जे प्रश्न केले आहेत व त्यांस ब्रह्मदेवानें जीं उत्तरें दिलीं आहेत त्यांच्या सारखीच प्रश्नोत्तरें ' एड्डा ' मध्ये आहेत.

( २ ) एड्डामध्यें असलेला " मिडगार्डचा सर्प " व वेदांमधील विष्णूचा शेषनामक सर्प हे सारखेच दिसतात.

( ३ ) हिंदु कालमानाप्रमाणे कालाचे चार विभाग कल्पून त्यापैकीं प्रत्येकास युग अशी संज्ञा देण्यांत आली आहे. कृत, त्रेत, द्वापार व कलि अशीं तीं चार युगे होत त्यांपैकीं कलियुगाचीं ४३२००० वर्षे असतात; या संख्येस २, ३, ४ यांनीं गुणलें असतां अनुक्रमें द्वापार, त्रेत व कृत या युगाची वर्षसंख्या मिळते. आता आपण एड्डाकडे पाहूं. त्या ग्रंथात " बाल हॉल " नामक राजवाडा असून त्यास ५४० दरवाजे आहेत.यातील प्रत्येक दरवाज्यांतून ४३२००० शूर देव-सैनिक राक्षसाशीं झगडण्याकरिता बाहेर पडतात असें वर्णन केलें आहे. आता हे रूपक काढून टाकले असतां ४३२००० ही सैनिकसंख्या कलियुगाच्या वर्षसंख्येशीं बरोबर मिळती आहे असें स्पष्ट दिसते. यावरून उभय धर्मामध्यें युगसंख्या सारख्या आहेत असें अगदीं उघड आहे.ह्या चार प्रमाणांनी व वेद आणि ' एड्ड ' याच्या सादृश्यानें स्कादिनाव्हियामध्यें बुद्धाचा धर्म दृढमूल होऊन फार दिवस नांदला होता असे स्पष्ट दिसतें.

एथवढा वेळपर्यंत स्कान्दिनाव्हिया व भारत वर्ष यातील दोन धर्मांत असलेलीं समान स्थले, समान तत्त्वे, सारख्या कल्पना, सदृश चालीरीती, अभिन्न पुराणकथा, एकरूप तत्त्वज्ञान यांचें दिग्दर्शन केलें. तीच पद्धत इजिप्त व भारत वर्ष यास लावून त्यापासून हिंदुस्थानांतून बौद्ध धर्म इजिप्तमध्यें कसा गेला, त्याचा विस्तार व व्याप तेथें कसा वाढला हें स्पष्टपणें कळण्यास जी साधनें उपलब्ध आहेत त्याकडे अनुक्रमानें वळूं.

दोन्ही धर्मांत प्रथमतः एकच ईश्वर असे मानलें असून पुढे तत्त्वज्ञानाचा ऱ्हास होत जाऊन ईश्वराच्या असंख्य मूर्ति मानण्यात येऊं लागल्या. पूर्वीची उदात्त विश्वव्यापी ईश्वराची कल्पना बिघडून जाऊन हजारो रूपें ईश्वरास देण्यात आलीं. ईश्वर विश्वव्यापी अद्वितीय असून गुणभेदानें प्रथम त्यास तीन स्वरूपें देण्यात

आलीं. इजिप्त व आर्यधर्म या दोघांनाही ही त्रयी संमत आहे. पूर्वजन्म, पुनर्जन्म, चातुर्वर्ण्य, हिंदूंचा ओंकार, व इजिप्शी लोकांचा ॲमन्; उभय देशांतील कमलाकार सूर्यमंडळाची कल्पना, अमरत्वनिदर्शक चिन्हें; वंध्या स्त्रियांच्या नवसाचा प्रकार, गंगानदीवर ठिकठिकाणीं शिवालयें असतात, त्यांचे सारखीच नाइल नदीवर शिवलिंगाकार ' फॅलस ' चीं देवळें इत्यादि साम्यस्थळें पाहिली म्हणजे इजिप्शी धर्माची उत्पत्ति हिंदू धर्मापासूनच झाली असली पाहिजे याविषयीं बिलकूल शंका रहात नाहीं. याखेरीज जानस्टननें पुढील तीन चार उदाहरणे त्याच सिद्धांताच्या बळकटीप्रीत्यर्थ दिलीं आहेत.

( १ ) हेराडोटस, प्लेटो, पायथागोरस, सोलन, फिलॉस्ट्रेटस इत्यादि पंडितांनीं याच प्रश्नास दुजोरा दिला आहे.

( २ ) इजिप्तच्या दक्षिण भागांतील देवालयांपेक्षा उत्तर इजिप्तमधील देवालयें जास्त जुनीं, थिब्स, एलिफंटाइन येथें असलेल्या देवालयांपेक्षां मेरूमधील जास्त जुनीं; थिब्सचीं देवालयें टेंटिरा व आबिडॉस येथील देवालयांपेक्षां पुराण, आणि टेंटिरा व अबिडासचीं मेंफिस, हेलिओपालीस व साईस यांपेक्षां प्राचीन; अशीं एकापेक्षां एक जुनेपणात देवालयाची परंपरा आहे; परंतु ही सर्व हिंदू देवालयांची नक्कल आहे असें नीभर, व्हेर्लेन्शया, न्यापोलियन व वॅडिंग्टन या विद्वानांचें म्हणणें आहे.

( ३ ) जोसिफस्, आफ्रिकॅनस, युसेबियस यांस अबिडॉस व साईस या देवालयांत जीं जुनीं कागदपत्रें सांपडलीं तीं त्यांनीं काळजीपूर्वक वाचून, अभ्यास करून जतन करून ठेविलीं; तीं क्रमाक्रमानें आपणास उपलब्ध झालीं आहेत; त्यांवरून पाहता प्रस्तुत सिद्धान्त जास्त दृढ होतो.

( ४ ) मानेथोनें इजिप्तच्या राजाच्या ज्या वंशावळी दिल्या आहेत, त्यावरून कालगणना केली तर हिंदू कालगणना कोष्टकाच्या किती तरी नंतर हा इजिप्तमधील काल येतो, व यामुळें हिंदुस्थानांतून बौद्ध धर्म इजिप्तमध्यें गेला असें म्हणण्यास कांहींच आडकाठी दिसत नाहीं.

( ५ ) अबिसीनियांतील ज्यू व ख्रिश्चन यांचा पुढील हकिगतीवर फार दृढविश्वास आहे व त्यांच्यामध्यें ही दंतकथा फार प्राचीन कालापासून चालत आली आहे.

" अबिसीनिया व तांबडा समुद्र आणि बाबेलमांडेबची सामुद्रधुनी व दक्षिणेकडील प्रदेश यांमध्यें असणारी पर्वतांची रांग ही नोहाचा नातू कुश व त्याचें

कुटुंब यांचें आद्य निवासस्थान होय. त्यांनी पुढें अब्राहामच्या कारकीर्दीत 'आवसम' नामक शहर बांधलें व येथून पुढें नाइल व अतबारा या दोन नद्यांच्या संगमापाशीं असलेल्या मेरु बेटापर्यंत नाईलच्या कांठाकांठाने ते खालीं सरकत गेले." या पुराणकथेचा विचार केला व वर दिलेलीं इतर सर्व प्रमाणें पूर्णपणें संशोधिलीं म्हणजे हिंदुराष्ट्राचा वडीलपणा पूर्णपणें सिद्ध झाल्याशिवाय रहाणार नाहीं असें जानस्टनी म्हणतो.

सृष्ट्युत्पत्तिसंबंधीं बौद्ध धर्मांत पुढील कथा प्रसिद्ध आहे. "स्वर्गात रहाणार देव, यक्ष, किन्नर वगैरे आणि भूगणमधील देवदूत व दुग्गम देव हे पृथ्वीवर कधीं कधीं फिरावयास येत; तेव्हां त्याच्याबरोबर त्याच्या सुंदर व तेजस्वी स्त्रिया असत. मनःशुद्धीमुळें व आत्मसाक्षित्यानें त्यास कामवासना होत नसे. कांहीं कालानंतर आदिबुद्धाने त्यांचे ठायीं जायफळ खाण्याची प्रेरणा केली; ते खाल्ल्यानंतर त्यांचे ठायीं कामवासना प्रदीप्त होऊन त्यास पृथ्वीवर रहाणेंच बरें वाटूं लागलें, आणि नंतर याजपासूनच मनुष्यजातीची उत्पत्ति झाली."

ग्रीक लोकांची तीच कथा थोडक्यांत अशी आहे:—"त्यांचा देव कॉनस याच्या मनांत जगत् उत्पन्न करण्याचें आलें. त्यानें प्रथम दिनरजनीघटित काल निर्माण करून त्याच्या पोटांत एक अंडें ठेऊन दिलें. या अंड्यापासून त्रिमूर्ति उत्पन्न झाल्या व त्यांनीं आद्य स्त्रीपुरुष उत्पन्न केले; व या जोडीनंतर सर्व प्रजा निर्माण झाली."

आता पहिल्या बौद्ध पुराणकथेवरून बायबलांतील व कुराणातील सृष्ट्युत्पत्ति-कथा रचल्या गेल्या हें अगदीं उघड दिसतें, व दुसऱ्या कथेचा उद्गम हिंदु शास्त्रांतील ब्रह्माण्डाच्या कल्पनेवरून झाला असला पाहिजे, याशिवाय दुसरें अनुमान काढणें अशक्यच आहे.

मॅक्सम्यूलरच्या मतें असीरियन, इजिप्शियन व ग्रीक पुराणाचा पाया हिंदु पुराणेंच होत, व हिंदु पुराणांची सर्व इमारत वेदावर उभारली आहे.

उदाहरणार्थ—ग्रीक पुराणांतील व हिंदु पुराणांतील देवतांचा जो काळजीपूर्वक अभ्यास करील त्यास असें दिसून देईल कीं, भारतीय आर्य ज्या वेळीं येथून ग्रीस देशांत रहावयास गेले त्या वेळीं त्यांनी येथून पुराणें बरोबर नेलीं असलीं पाहिजेत व पुढें क्रमानें या देवतांच्या कल्पनेवर आसपासची परिस्थिति, भूरचना, ऋतुकाल इत्यादि गोष्टी पाहून नवी पुराण-रचना तेथें झाली असावी. कारण पुष्कळ देवतांमध्यें, त्यांच्या पराक्रमामध्यें व एकंदर सर्व कृत्यांमध्यें इतकें तंतोतंत

साम्य आहे कीं, ग्रीक नावें वगळल्यास त्या हिंदू देवताच आहेत असा खात्रीनें भास होईल. उदाहरणार्थ:—

| | | |
|---|---|---|
| ज्युपिटर | = | इंद्र |
| ज्यूनो | = | दुर्गा, पार्वती ( इंद्रायणी ) |
| अँपोलो | = | कृष्ण |
| व्हीनस | = | रति |
| सिरेस | = | श्री |
| सिबेल | = | पृथ्वी |
| नेपच्यून व युरेनियस | = | वरुण |
| मिनर्व्हा | = | सरस्वती |
| मार्स | = | स्कन्द |
| प्लुटो | = | यम |
| प्लुटस | = | कुबेर |
| व्हल्कन | = | विश्वकर्मा |
| क्यूपिड | = | काम |
| मर्क्युरी | = | नारद |
| ऑरोरा | = | उषा |
| इओलस | = | वायु |
| जॅनस | = | गणेश |
| डायोस्कुरी ( कॅस्टर व पोलक्स ) | = | अश्विनीकुमार |
| स्टिक्स | = | वैतरणी |
| ईडा | = | कैलास |
| ऑलिंपस | = | मेरु |

मागे सांगितल्याप्रमाणें रामायण व महाभारत यावरून ग्रीक व इतर ख्रिश्चन पुराणकथा तयार झालेल्या असाव्यात व हिंदुशास्त्रांतलि सर्व देवता पृथ्वीवर निरनिराळ्या नांवांनीं पूजिल्या जातात असें तुलनात्मक अभ्यास करणारास दिसून येईल असें मॉरिस व सर वुइल्यम जोन्स यांचें म्हणणें आहे.

शेवटीं डब्ल्यू. डी. ब्राऊन याचा अभिप्राय देऊन हा ग्रंथ पुरा करूं. " सर्व जगांतील व.ङ्मय व ईश्वरोत्पत्तिशास्त्र हें हिंदूंच्याच अखंड परिश्रमाचें फळ होय

असें पूर्वग्रहरहित व निर्विकार मनानें काळजीपूर्वक अभ्यास करणारास वाटल्या-शिवाय कधींही रहाणार नाहीं. ईश्वरोत्पत्तिसंबंधानें हल्लीं जगांत रूढ असलेलीं सर्व मतें मूळ हिंदूंच्याच कल्पनेवरून निघालीं आहेत. प्राचीन भारतीयांना मूर्तिपूजा ठाऊक नव्हती, म्हणून ते अविद्य किंवा असंस्कृत नव्हते; त्यांस हल्लीं कांहीं लोक रानटी म्हणतात तसे ते मुळींच नसून त्यांच्या ठिकाणीं गाढ विद्वत्तेला शोभणारी व विशाल प्रतिभेला अनुरूप अशी गंभीर कवित्वस्फूर्ति व नितांत आणि अगाध विचारशक्ति वास करीत होती. त्यांच्या वाङ्मयाचें संपूर्ण भाषांतर झाल्यास आधुनिक संस्कृतिरूप प्रमदा या जुन्या, टाकाऊ समजल्या जाणाऱ्या वाङ्मयरूप रुचिर, मोहक व सुगंधि पुष्पाकडे साभिलाष दृष्टीनें पाहून त्याच्या प्राप्तीवि-षयीं आतुर झाल्याशिवाय रहाणार नाहीं असें आजन्म विद्याव्यासंगी प्राच्यविद्याविशारद प्रो. मॅक्सम्यूलर, जॅकोलिट, सर विल्यम जोन्स हे छाती-ठोकपणें सांगतात. ”

